लो० टिळक यांच्या

# आठवणी व आख्यायिका



नरसिंह चिंतामण केळकर

# प्रस्तावना.

More knowledge may be gained of a man's real character by a short conversation with one of his servants than from a formal and studied narrative, begun with his pedigree and ended with his funeral

*Boswell*

When will mankind learn that literature is one thing and sworn testimony another?

*Augustine Birrell*

गतवर्षी लो. टिळकांच्या चरित्रग्रंथाचा पहिला खंड प्रसिद्ध केला त्याच्या प्रस्तावनेंत मींच असें दर्शविलें होतें कीं, माझा हा ग्रंथ अनेक दृष्टींनीं अपूर्ण आहे चरित्रग्रंथ लिहिण्याच्या ज्या अनेक पद्धति होऊं शकतात त्यापैकीं एकाच पद्धतीचा अवलंब मला करता आला आहे ही पद्धति म्हणजे प्रकरणवार साधार माहिती देण्याची पण या पद्धतीचा अंगीकार केल्यामुळें टिळकांचे चरित्रांत घडलेल्या बारीकसारीक फुटकळ गोष्टी किंवा संभाषणें वगैरे मला देता आलीं नाहींत. अशा गोष्टींना प्रकरणवारींत फारसें स्थान मिळत नाहीं, व कालानुक्रमानें चरित्र लिहिलें गेलें तरी अशा गोष्टी कालनिरपेक्ष असल्यामुळें त्या त्यांत कोंबणें योग्य होत नाहीं अर्थात् अशा गोष्टींचा समावेश एकाद्या संकीर्ण प्रकरणांत किंवा स्वतंत्र ग्रंथांत करणें अधिक सोयीचें ठरतें. माझा चरित्र ग्रंथ अपुरा म्हणजे १८९९ पर्यंतच असल्यामुळें त्यांत संकीर्ण प्रकरण घालतां आलें नाहीं आणि याच ग्रंथाचा दुसरा खंड पुढें केव्हां तरी मी लिहीन अशी मनाला थोडीशी आशा वाटत असल्यामुळें किरकोळ गोष्टींचा वेगळा ग्रंथ तयार करण्याची कल्पना मला सुचणें शक्यच नव्हतें अर्थात् तो लवकर हवा तर तो लिहिण्याचा प्रयत्न इतर कोणाकडून व्हावयास पाहिजे होता, व तशा एका प्रयत्नाचेंच फळ म्हणजे श्री सदाशिवराव बापट यांनीं तयार केलेला 'लोकमान्यांच्या आठवणी व आख्यायिका'चा हा संग्रह होय प्रस्तुत पुस्तकाला प्रस्तावना लिहिण्याचें मी कबूल केलें त्याचें झालें तरी कारण हेंच कीं, माझ्या चरित्रग्रंथाला हा ग्रंथ कांहींसा पुरवणी दाखल आहे, व जें काम वरील कारणाकरितां मजकडून झालें नाहीं तें काम बापट यांच्या या पुस्तकानें अंशतः पार पडलें या कृतज्ञताबुद्धीमुळेंच मी ही प्रस्तावना लिहीत आहे.

लोकमान्यांच्या आठवणींना श्रीयुत बापट यांनीं आपल्या 'आत्मनिवेदनांत' अनेक उपमा दिल्या त्या यथार्थ आहेत या आठवणींना त्यांनीं विस्कळित माणिक

मोत्यें असें एके ठिकाणीं म्हटलें आहे, तर मुख्य चरित्रग्रथाच्या इमारतीच्या चिरेंदरींत भरलेल्या दरजा असें दुसरे एके ठिकाणीं म्हटलें आहे पैकीं दुसरी उपमा ज्ञान-वस्तुदर्शक असली तरी अधिक समर्पक आहे असें मला वाटतें. कारण मोत्याच्या एका सराला दुसरा सर जोडल्यानें अधिक शोभा आली तरी अधिक खबिरी येत नाहीं, पण दगड-विटांतील दरजा कुशलतेनें भरल्या गेल्या तर इमारतीला शोभा व बळकटी हीं दोनहि लाभतात

प्रकरणवार लिहिलेला एकादा चरित्रग्रंथ वाचून चरित्रविषयाच्या कार्य क्षेत्राची सुसगत व व्यापक कल्पना येऊं शकेल, पण त्याचा स्वभाव व याचे गुणदोष याचा कल्पना आठवणवजा किरकोळ हकीकती किंवा सवादप्रसग यानीं जितकी येऊं शकते तितकी एकादें संपूर्ण प्रकरण वाचल्यानेंहि कदाचित् येऊं शकणार नाहीं बॉसवेल यानें जान्सनचें चरित्र लिहिलें त्याच्या प्रस्तावनेंत असें म्हटलें आहे कीं, " निवळ सार्वजनिक कागदपत्रावरून तयार केलेल्या चरित्र-ग्रथानें सऱ्या चरित्रग्रथाचें कार्य भागत नाहीं, व प्रसगविशेषीं चरित्रविषयाच्या एकाद्या व कचित् नोकराशीं झालेल्या लहानशा समायणानें त्याच्या खऱ्या चारित्र्या विषयीं जें ज्ञान होतें तें इतर माहितीनें पूर्ण व परिश्रमपूर्वक परतु औपचारिक रीतीनें लिहिलेल्या चरित्रग्रथापासून होत नाहीं, मग त्यात जुन्या वशावळी पासून खुद्द त्याच्या स्वत च्या स्मशानयात्रेपर्यंत माहिती का असेना " स्वत बॉसवेल यानें आपल्या सुप्रसिद्ध चरित्रग्रथानें वरील सिद्धान्त सोदाहरण सिद्ध केला आहे असच म्हणावें लागतें.

वास्तविक बासवेल्च हें चरित्र वाचणारास त्यातील हकीकतींच्या क्षुद्र पणाचा एकदरीनें वीट आल्याशिवाय राहत नाहीं केवढा प्रचड ग्रथ, पण त्यातील पानेंच्या पानें ओलाडावीं तेव्हा कोठें रखोरखच चटकदार किंवा बोधप्रद किंवा खरी स्वभावदर्शक अशी एकादी गोष्ट किंवा समायणातील वाक्य सापडतें परतु क्षुद्रता व चघळपणा हे दोष असताहि बॉसवेलचा ग्रथ अखिल आग्ल वाचकवर्गाला प्रिय व मान्य होऊन बसला आहे याचें कारण फिरून एक वेळ बासवेल्च्याच शब्दात सागावयाचें तर, असें म्हणता येईल कीं, Minute

सर्वसाधारण अशा गोष्टी रपल्या जातील, किंबहुना वाचनीय ठरतील, यात काय नवल? जॉन स्टुअर्ट मिल किंवा बेंजामिन फ्रँक्लीन यांनीं आत्मचरित्रें लिहिलीं तीं सर्वमान्य आहेत. तथापि त्यांतील शेंकडों गोष्टी अशा दाखविता येतील कीं, त्या सामान्य व्यक्तींच्या चरित्रांतहि सापडू शकतील. पण मिल व फ्रँक्लीन हे असामान्य पुरुष होऊन गेले, म्हणूनच तद्विषयक सामान्य गोष्टी देखील चित्ताकर्षक वाटू लागतात. मराठी भाषेंतील प्रो. कर्वे यांचें आत्मचरित्र व कै. श्री. रमाबाईसाहेब रानडे यांचे "आमच्या आयुष्यातील काहीं आठवणी" हीं पुस्तकें देखील वरील दोन प्रकारचीं उदाहरणें होत. शिक्षणाप्रीत्यर्थ कर्वे यांना भोगाव्या लागलेल्या अडचणी ज्यांना भोगाव्या लागल्या अशीं सामान्य माणसें किती तरी सापडतील! पण तीं माणसें पुढें सामान्य ठरलीं म्हणून त्यांच्या अडचणींचें कौतुक नाहीं, व तीं सामान्य म्हणूनच त्यांच्या अडचणींची सार्वजनिक नोंद कोणी करून ठेवीत नाहीं. पण तेच कर्वे हे अखेर असामान्य कोटीपैकीं ठरले म्हणून त्यांच्या अडचणी, आठवणी, स्वतः त्यांनीं लिहून काढाव्या असा त्यांना मित्रांनीं आग्रह केला व लोकहि त्या वाचून त्याचें कौतुक करतात. कै. रमाबाईसाहेब यांच्या पुस्तकांत वर्णिलेलीं नव्या-जुन्या पिढींतील नणदा-भावजयांचीं भांडणें आपल्या समाजात काय थोडीं पाहण्यास सापडतील? तसेंच रमाबाईसाहेबांनीं आपल्या पतींच्या रुसण्याफुगण्याविषयीं ज्या खासगी हकीकती लिहिल्या आहेत तशा हकीकती सामान्य कुटुंबात किती तरी घडतात. परंतु पति कै. रानड्यांसारखा पुरुष व पत्नी रमाबाईसाहेबांसारखी स्त्री, म्हणूनच त्या रुसण्याफुगण्याची हकीकत वाचणारास क्षुद्र वाटत नाहीं. तर कौतुकास्पद वाटते.

टीकाकाराकडून पहिला व जोरदार आक्षेप यावयाचा तो त्यातील कित्येक हकीकतींच्या क्षुद्रपणावरूनच, हें मी जाणून आहे. ज्या हकीकती तशा क्षुद्र नसतात त्यांचें समर्थन करण्याचें कारण पडत नाहीं त्या स्वत प्रमाणच असतात. म्हणजे त्या वाचल्याबरोबर कोणीहि मनुष्य स्वयस्फूर्तीनें असे उद्गार काढतो कीं, "हें थोराच्या थोरपणाचेंच लक्षण होय असलें आचरण सामान्य मनुष्याच्या हातून घडणें नाहीं, असलें भाषण सामान्य मनुष्याच्या तोंडून निघणें नाहीं." असे उद्गार काढण्यास असामान्य अशा दहापाच हकीकती ग्रथात असतील तर त्या इतर सामान्य अशा शेंकडों हकीकतींना आपणाबरोबर तारून नेतात. आणि रत्न्या सस्मरणीय व तेजस्वी अशा शेंकडा १०।५ गोष्टी देखील ज्याच्या सबधानें सागता येणार नाहींत त्याचें चरित्र किंवा त्याच्या आठवणी लिहिण्या छापण्याची स्फूर्ति कोणाला होणार? प्रस्तुत आठवणींच्या या ग्रथातहि सामान्य व असामान्य याचें प्रमाण जवळ जवळ वर सांगितल्यासारखेंच पडेल असें कदाचित् कोणी म्हणतीलहि वाळल्याबरोबर ओलें जळतें म्हणतात, तसाच थोराबरोबर लहानाचाहि सहज सत्कार होतो, पण त्याबद्दल कोणी नाक मुरडीत नाहीं परतु थोराच्या लहानसहान गोष्टी नुसत्या खपून जातात असेंच केवळ नसून त्या आदरणीयहि का ठरतात? याचें उत्तर असें कीं, त्याच्यामुळें थोर विभूतींचे स्मरणप्रसग वाढतात म्हणून थोराचें स्मरण हें स्फूर्तिदायक असल्यामुळें तें नित्य किंवा निदान जितका अधिक वेळ घडेल तितकें घडावें असें वाटणें स्वाभाविक आहे. ग्रथात थोराच्याहि सर्वच आठवणी पहिल्या प्रतीच्या उत्कृष्ट अलौकिक असतील तर उत्तमच, पण त्या तशा नसल्या तरी दुय्यम दर्जाच्याहि आठवणी यथाशक्ति स्फूर्तिदानाचें काम करतातच सगुण पूजेचें तत्त्वच आठवणींच्या ग्रथाच्या मुळाशीं असलेलें दिसून येतें. देव पूजेंतील सामुग्री सामान्य किंमतीचीच असते परतु देवपूजेची भावना उत्पन्न करून देणारें अभिषेकपात्र चार आण्याचें असलें तरी आघोळीचें पाणी तापविण्याच्या पन्नास रुपये किंमतीच्या बबापेक्षा तें अधिक पवित्र व जपून ठेवावेंसें वाटतें! देव धुतल्यावर पुसण्याच्या वस्त्राला एक पैसाहि पडत नाहीं, पण त्याचें धार्मिक महत्त्व स्वत मालकानें नेसलेल्या जरतारी पीताबरापेक्षाहि अधिक ठरतें! मानसिक शास्त्राचा असा नियमच आहे कीं, आपणास कोणाचेंहि स्मरण होतें तें तत्सबधीं सगुण रूपाच्या कोणत्या तरी एक किंवा अनेक अगानींच होतें, निर्गुण अशी आठवण होऊच शकत नाहीं कारण आठवण ही ज्या मूळ ज्ञानसवेदनेची पुनरुक्ति असते तें ज्ञानहि सगुण म्हणजे बाह्य सृष्टीच्या साधनानें किंवा आधारानेंच झालेलें असतें. या बाबतींत स्मृतिविषय हा महत्त्वाचा किंवा भिन्नमहत्त्वाचा या भेदानें फरक पडत नाहीं स्मृतिविषय कमी महत्त्वाचा असल्याच फार तर आपणास त्याची स्मृतीच होणार नाहीं, किंवा झालीच तर कमी

वेळा होईल. पण स्मृति झाली म्हणजे मग ती दोनीहि विषयासबधानें सारख्याच रीतीनें व्हावी लागते. कोणाहि मनुष्याची आठवण व्हावयाची म्हणजे तत्सबधी जी गोष्ट आपल्या अधिक परिचयाची तिचेंच ज्ञान आपणाला प्रथम आठवतें. परिचित मनुष्यमात्राची आठवण सामान्यत त्याचें रूप आठवूनच होते. मनुष्य-परिचयात डोळ्याचाच उपयोग इतर इंद्रियापेक्षा अधिक होतो. स्वरूपानंतर त्याचा पोषाक, त्यानतर त्याची बोलण्याचालण्याची विशेष ढब, त्यानतर त्याचे सामान्य गुणदोष, व शेवटीं तत्सबधीं अनुभवाचे विशेष प्रसग, या क्रमानें आठवणी होतात. पण उलट स्वरूप हें प्रथम स्मरणात न येता ज्याची आठवण होते अशा वस्तूंचीहि उदाहरणें देता येतील. फुलाची आठवण प्राय वासावरून, पक्ष्याची आठवण प्राय त्याच्या शद्बावरून, व खाद्य पदार्थांची आठवण प्राय त्याच्या रुची वरून होते. केवळ स्पर्शानें ज्याची आठवण होते अशा पदार्थांचीं उदाहरणें देणें थोडें कठीण आहे, पण देता येतील या नियमानुसार, मोठ्या लोकाची आठवण आपणास कशामुळें होते असा प्रश्न मनात उत्पन्न झाल्यास त्याचें एकच ठराविक असें उत्तर देता येणार नाहीं. किंबहुना असेंहि म्हणता येईल कीं, थोर लोक त्याच्या कीर्तीमुळें जितक्या लोकाना माहित असतात त्यापेक्षा फार थोड्याना ते प्रत्यक्ष स्वरूपानें माहित असतात. खुद्द लो. टिळकाचेंच उदाहरण घेतलें तर त्याची कीर्तिद्वारा माहिती असलेले लोक व त्याना प्रत्यक्ष पाहिलेले लोक याचें प्रमाण दरशेंकडा दहा किंवा पाच असें पडेल अर्थात् उरलेल्या नव्वद किंवा पचाण्णव लोकाना टिळकाचें स्मरण व्हावयाचें तर तें त्याच्या स्वरूपद्वारा न होता त्याच्या कीर्तीचें ज्ञान ज्या निरनिराळ्या प्रसगीं झालें असेल त्या प्रसगाच्या द्वारानेंच होईल कोणाला आपल्या गांवात झालेली त्याच्याविषयींची सभा आठवेल, कोणाला त्याजविषयीं ऐकलेल्या एकाद्या पदाची आठवण होईल, कोणाला त्यांचें नाव ठेवलेल्या एकाद्या इमारतीवरून आठवण होईल, वगैरे वगैरे. पण टिळकाशीं प्रत्यक्ष परिचय असलेल्या लोकानाहि त्याची आठवण

ठसा उमटला होता आठवण सहज झाली किंवा मुद्दाम केली तरी तें कार्य वरील नियमाचे द्वारेंच घडून येणार कारण मानसशास्त्राचें बंधनच तसं आहे.

आपण नेपोलियन याचेंच उदाहरण घेऊ त्याच्या चरित्रातील जगविख्यात गोष्टी या जणु काही त्याचें स्मरण करण्याला पुरेशा नाहींत असें वाटूनच कीं काय, अनेक चरित्रकारानीं त्याच्या संभाषणातील लहानसहान वाक्येंहि मोठ्या कौतुकानें संग्रहीत करून ठेविलीं आहेत शिवाय दुसरे असेहि कित्येक ग्रंथ आहेत कीं, त्यात नेपोलियनच्या जगविख्यात गोष्टींचा काहींच उल्लेख नसता, त्यासंबंधीं अगदीं किरकोळ साध्या अशाच गोष्टींच्या म्हणजे आठवणींच्या बखरी त्यात लिहून काढल्या आहेत त्यात नेपोलियन दिसला कसा, बोलला कसा, त्याच्या अंगावर पोषाक कसा असे, त्याची उठण्याबसण्याची ढब कशी असे, तो काय खाई, काय पिई, व तें कसें खाई व कसें पिई, त्याच्या नित्य व नैमित्तिक संवयी काय होत्या, तो कोणाला केव्हा काय बोलला, असल्या चिल्लर गोष्टी त्यानीं लिहून ठेवल्या आहेत. वास्तविक नेपोलियनचें नेपोलियनत्व या एकादि गोष्टींत नव्हतें पण तो इतर रीतीनें मोठा ठरलेला असल्यामुळें वरील किरकोळ गोष्टींत देखील त्याच्या अंगचा मोठेपणा संसर्गानें संक्रमित झाला होता अशा बुद्धीनें किंवा भ्रमानें त्या गोष्टी त्यानीं लिहिल्या आहेत कित्येक

तो कप्पा मी उघडू शकतों " किंवा, "माझ्यामध्यें काम करण्याची किती ताकद आहे तिचा मलाच अत लागलेला नाहीं." वगैरे वाक्यें घतलीं तर त्यात तीं एकाद्या नेपोलियननें उच्चारलीं याशिवाय त्यात अलौकिक अस काय आहे? पण हीं वाक्यें स्वत अलौकिक म्हणून कोणी तीं सग्रहीत केलेलीं नाहींत, तर एका अलौकिक मनुष्याच्या तोंडून तीं निघालीं या विशिष्ट विभूतिपूजनाला तीं वाक्यें स्मृतीचें तितकें अधिक सगुण अधिष्ठान मिळवून देतात म्हणूनच

*ज्याच चरित्र चमत्कारमय किंवा अद्भुत अशा वर्णनीय गोष्टींनीं व चम* त्कारानीं भरलेलें आहे त्याची जर ही गोष्ट तर ज्याच्या चारित्र्यात अद्भुत गोष्टी घडल्या नाहींत, तथापि जे आपल्या लोकोत्तरपणामुळें सस्मरणीय ठरले, त्याच्या सबधीं मिळतील तितक्या आठवणीच्या गोष्टी कोणा चरित्र लेखकानें उकरून काढल्यास काय आश्चर्य? डॉ जॉनसन हा एक मोठा लेखक होता, परतु त्याच्या आयुष्यात अलौकिक अशा गोष्टी फारच थोड्या घडल्या अर्थात् अशा मनुष्याची स्मृति जागृत राहण्याकरिता बॉसवेलसारख्या चरित्रकाराला हजारो बारीकसारीक गोष्टी हुडकून उकरून काढून लिहिण्याचा मोह पडला आता त्याला असा मोह पडला यापेक्षा विद्वान व सदभिरुचीचे वाचक अशा पुस्तकाला डोक्यावर घेऊन नाचू लागले हेंच सकृद्दर्शनीं अधिक आश्चर्याचें वाटतें तथापि पण जॉनसनचा मोठेपणा एकदा गृहीत धरल्यावर असल्या चिल्लर गोष्टींच्या सग्रहाची व कौतुकाची उपपत्ति आम्ही वर दर्शविल्याप्रमाणेंच करावी लागेल.

असो, लोकोत्तर चारित्र्याच्या मनुष्याच्या आठवणीविषयींची अशी उत्पत्ति लावल्यावर दुसरीहि एक गोष्ट त्याबरोबर सागावी लागते ती ही कीं, अशा आठवणी सग्रहित करून ठेवणें हें जरी समर्थनीय व उपकारक असलें तरी त्याला काहीं स्वाभाविक अशा मर्यादा व बधनें असतात आणि तीं न ओळखून चालणार नाहीं पैकीं पहिलें बधन विश्वसनीयतेचें व दुसरें औचित्याचें. पहिल्या बधनासबधानें इतकेंच म्हणता कीं, आठवणी लिहिणारावर फार मोठी जोखीम येऊन पडते त्याचा लेख हा एक प्रकारचा एतिहासिक पुरावा होऊन बसण्याचा सभव असतो म्हणून त्यानें सर्वस्वी सत्याला स्मरून व इकडचे तिकडे काहीं न करिता आपली माहिती कडव्या टाकानें लिहिली पाहिजे. जेथें आपली स्मरणशक्तीच दगा देईल किंवा घोटाळा करील तेथ इलाज नाहीं परतु एरवीं जे जसें घडलें असेल तें तसेंच लिहिणें अवश्यक असतें कोणाच्याहि आठवणी लिहिणें त्या पुराव्याच्या शास्त्राच्या मूलतत्त्वाला धरूनच लिहिलेल्या हव्या आठवण ही, प्रथमत घडलेली ज्यानें गोष्ट प्रत्यक्ष पाहिली त्यानेंच ती 'चक्षुर्वैसत्य' म्हणून सागितलेली असावी. ऐकीव माहिती प्राय त्याज्यच; निदान तश प्रकारची आठवणही दुय्यम प्रतीची समजावी अशा दुय्यम प्रतीच्या आठवणींचा समावेश आख्यायिका या सदराखालीं सहज होऊ शकतो. परतु आख्यायिकाना

इतिहासाचें स्वरूप नसून बखरीचें स्वरूप असतें हें घ्यानात ठेवलें पाहिजे. शिवाय आख्यायिका झाली तरी ती " खुद्द पाहणारानें खुद्द मला सांगितली " येथ पर्यंत तरी तिच्या मुळाशीं प्रत्यक्ष संबंध असला पाहिजे पण या पलीकडे जाऊन सांगोवांगीच्या नात्यात चुलतपणाच्या जितक्या अधिक चुली येतील तितकी सत्याची रास अधिक झालेली आढळेल प्रस्तुत पुस्तकात आख्यायिका म्हणून कांहीं घालण्यात आलेल्या आहेत, व त्या जरी खोट्या मानण्याला फारसें कारण नाहीं, तरी पुरावाच्या दृष्टीनें म्हणजे शास्त्रीय सत्यकथनाच्या दृष्टीनें त्या आठवणीपेक्षा गौणच ठरतात

औचित्याचें नंबर नंबर दोनचें असलें तरी तेंहि फार महत्त्वाचें आहे. मोठ्या मनुष्याचा संबंध आलेल्या पुष्कळशा गोष्टी मोठ्या भासतात हें जरी खरें, तरी त्यापैकीं कोणत्या सांगाव्या व कोणत्या सांगू नये, हा भेद अर्थात् सूचिकाग्र अशा सूक्ष्म सद्भिरुचीनेंच लक्षात येण्यासारखा असतो क्षुद्र हकीकतींसंबधीं प्रथम ही गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे कीं, मनुष्य कोणी कितीही मोठा असला, तरी तो निर्दोष किंवा निर्व्यंग असा असत नाहीं आणि Paint me as I am म्हणजे 'मी जसा आहे तसाच हुबेहुब माझी तसबीर काढा' हें म्हणणारानें म्हटलेलें घोमतें तरी चित्र काढणाऱ्याला तें सर्वस्वीं मान्य करून चालत नाहीं. या ठिकाणीं रंगत चित्र विषयापेक्षा चित्रकाराला अधिक सहृदयता व मनाचा नाजुकपणा ठेवावा लागतो मनुष्याचे दोष किंवा व्यंगें हीं झाकली जावीं म्हणून असत्य खोटें बोलू नये हें खरें पण त्यावर किंचित् पाघरूण घालणें किंवा उदारपणाचा कानाडोळा करणें हें दाक्षिण्यच मानलें जातें ज्या चिल्लर गोष्टींत दोष नाहींत अशाही पण कित्येक प्रसंगीं उपेक्षणीय ठरतात रिअलिझम किंवा यथा वस्तुदर्शन हा शब्द झाला तरी तीहि एक कलाच आहे म्हणजे तिच्यातहि निसर्गाला कृत्रिमतेची किंवा कौशल्याची किंचित् मुरड घालणें हें प्रेक्षकाला प्रियच वाटतें थोर व्यक्तींच्या भाषणसभाषणासंबधानें तर फारच सावधगिरी ठेवणें जरूर असते नेपोलियनचें चरित्र लिहिताना लॉर्ड रोजबरी म्हणतो —

"It is not wise to record every word that falls from a great man in retirement The mind which is accustomed to constant activity and which is suddenly deprived of employment is an engine without guidance The tongue without a purpose is not always under control पण हे शब्द उदिवासातील नेपोलियनला उद्देशून लिहिलेले होते त्याच्या तोंडून निघणारा प्रत्येक शब्द मौल्यवान् मानून तो जपून ठेवण्याकरिता हातात पाटी पेन्सिल घऊन न कळत टपून बसलेले लोक नेपोलियनच्या भावती होते व ही गोष्ट नजरेला आणून "अशाच्या देखता

तुम्ही जपून बोलत जा " अशी नेपोलियनला त्याच्या एक दोन स्नेह्यानीं नाजूक सूचनाहि केली होती. पण पराक्रमी मनुष्य एकदम वदिवासाच्या रिकामपणात पडला म्हणजेच याची जीभ बेसुमार बोलू लागते असें मात्र नाहीं. तर मोठी माणसें मोकळीं असता आवेशाच्या भरातहि जें न टिपून ठेवावें असें बोलू शकतात. यात बोलणाराकडे काहीं दोष येतो हें खरें, पण तें बोलणें मुद्दाम टिपून ठेवून कायम करणाराकडे दोष अधिक येतो. आवेशाच्या वाऱ्यानें मोठ्या माणसाच्या भाषणाचें अग उघडें पडेल तेथें जवळच्या मनुष्यानें जर सहानुभूतीनें पांघरूण घालून लाज राखली नाहीं, तर तोच अधिक अपराधी ठरेल. डॉ. जॉनसन यांची भाषणें शद्वाब्शद्व देण्यामध्यें बॉसवेल याची पुष्कळ ठिकाणीं अशीच चूक झाली आहे. ऑगस्टाइन बिरेल म्हणतो कीं, It is impossible to recognise all Johnson's recorded utterances with any one view of anything When crossed in conversation or goaded by folly he was capable of anything. सुमारें वीस वर्षांपूर्वी स्वत लो० टिळकानीं या विषयावर एका प्रसगीं असेच उद्गार काढलेले आहेत. १९०४ सालीं मुबईस हिंदू युनियन क्लबमध्यें कै० महादेव गोविद रानडे याच्या श्राद्धतिथीनिमित्त कै० गणपत रावजी आगाशे यानीं व्याख्यान दिलें, त्यात आगाशे यानीं रानड्यांच्या काहीं आठवणी म्हणून सागितल्या. त्यावर त्याना उद्देशून टिळकानीं केसरींत खालील टीका केली आहे "या गोष्टी मुबईकरास नव्या असतील, परतु पुणें शहरात त्यास कोणी विशेष महत्त्व देईल अस आम्हास वाटत नाहीं लहान मनुष्य काय आणि मोठा काय, प्रसगविशेषीं निरनिराळ्या प्रकारचे व कधीं कधीं एकमेकास विरुद्धही विचार प्रदर्शित करीत असतो, परतु त्यामुळें त्याची तीं मतें कायमचीं होतीं असें समजणें वेडेपणाचें होय। मनुष्याच्या शरीराप्रमाणें त्याचें मनहि नेहमीं उमेदींतच असतें असें नाहीं , त्याच्या मनांत कधीं दु:खाचीं तर कधीं नाउमेदीची झाक येत असते, व अशा प्रसगीं त्याच्या तोंडातून निघालेले उद्गार जर जगापुढें माडू लागलें तर त्या मनुष्यास लवकरच मूर्ख बनविता येईल. शिवाय असेंहि लक्षात ठेविलें पाहिजे कीं, आयुष्याच्या हरएकक्षणीं मनुष्य जें बोलतो तें पूर्ण विचारातीं बोलतो असे नाहीं इतकेंच नव्हे तर त्याच विषयावर जर सार्वजनिक तऱ्हेनें बोलण्याचा प्रसग आला तर निराळ्याच तऱ्हेनें तो बोलतो याकरितां

होते. त्यांतील मोठ्या लोकांसंबंधाच्या आख्यायिका वाचणारांस त्या किती मनोरंजक असतात किंबहुना स्वभावदर्शनाचा गुण त्यांत किती सांठविलेला असतो हे ध्यानांत येईल. शास्त्रीबोवांनीं ही कल्पना इंग्रजी वाङ्मयावरून घेतली होती. ती कोणत्याहि देशाच्या वाङ्मयाला व थोर पुरुषांना लागू पडण्यासारखी आहे. ॲने-कडोटस्, कथाकलाप हा समुद्रासारखाच विस्तीर्ण असतो व समुद्रासारखीच त्यांत रत्नें सांपडतात. धड चरित्रग्रंथ नव्हे धड प्रबंधग्रंथ नव्हे, धड कालानुक्रमवार इतिहास नव्हे अशा पुस्तकांचे हे उत्कृष्ट नमुने असतात. खरेशास्त्री यांनीं प्रसिद्ध केलेली 'हरिवंशांची बखर' हें एक वरील नमुन्याच्या ग्रंथाचें उदाहरण होय ! व ज्या ग्रंथाला मी ही प्रस्तावना लिहित आहें तोहि वरील नमुन्याच्या ग्रंथाचेंच एक उदाहरण होईल. त्यांतील प्रत्येक आठवण हें एक स्वतंत्र चित्र आहे. व कोणाहि चरित्रविषयाची निरनिराळ्या माणसांनीं काढलेलीं जितकीं अधिक चित्रें उपलब्ध होतील तितकें त्यांचें चरित्रवर्णन अर्थात् अधिक पूर्ण होईल. एकाद्या मनुष्याचा पुतळा किंवा मूर्ति करावयाची असेल तर त्याला मूर्तिकारापुढें निर-निराळ्या अनेक बाजूंनीं बसावें लागते, याचें कारण हेंच कीं, कोणत्याहि एका बाजूनें मनुष्याचें जें स्वरूपदर्शन घडतें तें त्याची ढोबळ ओळख पटवून देण्यास पुरेसें असलें तरी तें एकांगी म्हणून अपूर्णच असतें. पण पुतळा हा चोहों बाजूंनीं पाहातात, निदान दिसूं शकतो, म्हणून मूळ मनुष्याला निरनिराळ्या बाजूंनीं पाहिलें असतां तो जसा दिसेल तसाच पुतळाहि करावा लागतो. नुसत्या फोटोवरून टिळकांना ज्या अल्पपरिचितांनीं पाहिलें असतें ते टिळकांच्या मागच्या बाजूस उभे असतां त्यांना टिळकांची ओळख पटली नसती. पण टिळकांचा पुतळा ज्यांनीं चारी बाजूंनीं पाहिला असेल त्यांना मागच्या बाजूनेंहि टिळक ओळखतां आले असते. टिळकांचे शेंकडों फोटोग्राफ उपलब्ध आहेत. पण ते निरनिराळ्या बाजूंनीं घेतले असल्यानें प्रत्येकांतील स्वरूप वेगळें दिसतें, आणि याच कारणाकरितां त्यांच्या कोणाहि मूर्तिकाराला त्यांचे जितके अधिक फोटोग्राफ मिळतील तितके हवे असतात. टिळकांच्या जडस्वरूपाची प्रतिमा रक्षण करण्याला ज्याप्रमाणें हे अनेक फोटोग्राफ उपयोगी पडतात, त्याचप्रमाणें त्यांचें समग्र अमूर्त स्वरूप रक्षण करण्याला या किंवा अशा आठवणी

त्यात त्याच्याबरोबर दुसऱ्या कोणाचा तरी संबंध येणारच. तीच गोष्ट टिळकासंबंधींहि खरी आहे. कारण बहुतेक सर्व आठवणी टिळकाच्या लोकसंग्रहात्मक व्यवहारातील आहेत, व व्यवहार म्हणजे दुसऱ्याचा संबंध आलाच. या व्यवहारात टिळकाच्या शेंकडों सेवकांनीं व चाहत्यांनीं आपल्या मनाच्या किंवा ज्ञानेंद्रियाच्या कॅमेऱ्यानें जे शेंकडों फोटो घेतले त्याच्या निगेटिव्ह काचा त्याच्या अधाऱ्या स्मृतिकपाटात ठावून ठेविल्या गल्या होत्या. आठवणी गोळा करणारानें इतकेंच केलें कीं, त्या त्या लोकाना विनंति करून त्या त्याजकडून त्याच्या जवळील निगेटिव्ह छापवून एक एक प्रत मागविली, व ती प्रत छापून डोळ्यानं पाहणें हें स्वतः त्यानाहि प्रिय म्हणून त्यानीं ती मागणाराला दिली अर्थात् आठवणी व आख्यायिका याचें बापटकृत हें पुस्तक म्हणजे अशा चित्राचा संग्रह किंवा फोटोंचा आल्बम होय. म्हणूनच त्याला ठराविक प्रारंभ नाहीं, ठराविक अंत नाहीं, ठराविक कालानुक्रम नाहीं, ठराविक संगति नाहीं चित्रसंग्रहाप्रमाणें तो कोठेंहि उघडल्यास त्यात टिळकाच्या टिळकत्वाच्या अनेक अंगापैकीं कोणत्या तरी एकाद्या अंगाचें चित्र यदृच्छेनें पाहावयास मिळेल. सोडतींतील निरनिराळ्या किंमतीच्या तिकिटाप्रमाणें या पुस्तकास कोणास त्याची बुद्धिमत्ता, कोणास त्याचें धैर्य, कोणास त्याची देशभक्ति, कोणास त्याची सूक्ष्म विवेचकशक्ति, कोणास त्याची लोकसंग्रहेच्छा, कोणास त्याची लोकप्रियता, कोणास त्याची विद्वत्ता, कोणास त्याचें मित्रवात्सल्य, कोणास त्याची धार्मिक बुद्धि, कोणास त्याचें व्यवहारचातुर्य दर्शविणारें चित्र लाभेल. किंवा प्रस्तुत पुस्तक हें टिळकभक्ताना एकप्रकारची शकुनवतीच होईल. फरक इतकाच कीं, शकुनवतींत एकादें प्रसंगीं अनिष्ट वचन किंवा दुर्भाग्यचिन्ह निघू शकतें, पण टिळकाच्या आठवणींची ही शकुनवती उघडणारास त्याच्या मनाला ज्याच्या योगानें सत्स्फूर्ति मिळेल असेंच कांहीं तरी निघेल यात शंका नाहीं.

पुणें,
ता. २२ माहे जुलै, सन १९२४. ｝ न. चिं. केळकर.

# अर्पणपत्रिका

सन १८७० ते सन १९२०

म्हणजे

ज्या प्रभावशाली अर्ध शतकानें महाराष्ट्राच्या सार्वजनिक
आयुष्यक्रमांत नवयुग सुरू केलें ज्यानें अभिनव
कल्पना-विचारांचें स्थित्यंतर घडवून आणिलें
ज्यानें सामाजिक चालीरीतींचें मन्वंतर
प्रवर्तित केलें व ज्यानें महाराष्ट्राच्या
अर्वाचीन राजकीय इतिहासास
जन्म दिला
त्यास
कृतज्ञभावानें हा ग्रंथ-गुच्छ अर्पण केला आहे

स. चिं. बापट

# आत्मनिवेदन.



तत्त्वें तत्त्व जेव्हां सरे । तेव्हां आपण कैंचा उरे ॥
आत्मनिवेदन तेणें प्रकारें । सहजचि झालें ॥

श्रीसमर्थ.

के. राष्ट्रसूत्रधार लोकमान्य बाळ गंगाधर टिळक यांच्या 'आठवणी' चें हें पुस्तक वाचकांचे हातीं आज देण्यास मला फार आनंद होत आहे. ज्या महाभागानें आपल्या अतुल बुद्धिसामर्थ्यानें व अचाट कर्तबगारीनें सर्व हिंदुस्थानाला कोणत्याना कोणत्या तरी चळवळीच्या आंदोलनानें चाळीस वर्षे एकसारखें झुलत ठेविलें होतें, त्या असामान्य पुरुषाचें पुण्यस्मरण नित्य कोणास होणार नाहीं! जोंपर्यंत हिंदी 'राजकारण' हा शब्द लोक विसरणार नाहींत तोंपर्यंत त्याची आठवण विसरणें अशक्य आहे. एवढ्या स्थूल प्रमाणात जर ते सर्वांच्या चित्तात अखंड वास करीत आहेत, तर मग मर्यादित अशा या प्रस्तुत प्रयत्नाचें प्रयोजन काय? याला उत्तर एवढेंच कीं, समुद्राच्या अथांग हृदयात अनंत अमूल्य वस्तुसंग्रह आहे हें जरी सर्वांस माहीत असलें तरी पाणबुड्यानें बुडी मारून आपल्या शक्तीप्रमाणें त्याचे उदरातून प्रयत्न काढलेल्या लहानमोठ्या माणिकमोत्यांचे सर करून एकाद्यानें त्याचा हार गुंफिल्यास तो पाहून कोणास आल्हाद होत नाहीं!

सातारा जिल्ह्यातील आमच्या बोरगाळ गांवीं दरवर्षी लोकमान्यांच्या पुण्यतीथीचे दिवशीं, माझे वयोवृद्ध परमपूज्य तीर्थरूप टिळकभक्त भाऊसाहेब यांनीं मला म्हणवें कीं, 'येथील लोकांस तू टिळकांच्या गोष्टी सांगून त्यांची पुण्यतिथि साजरी करावी ' याच आज्ञेचें पर्यवसान लोकमान्यांच्या आठवणी लिहिण्याचें स्फूर्तीत झालें. त्याला पुढें माझे मित्र काशीनाथ नरसिंह ऊर्फ बापूराव केळकर यांचें विशेष प्रोत्साहन मिळालें व त्या पुस्तकरूपानें प्रसिद्ध करण्याबद्दल साताऱ्याचे माझे मित्र श्री जनार्दन नारायण ऊर्फ बापूराव दाभे यांनीं विशेष आग्रह केला. लोकमान्यांच्या आठवणी म्हणजे साधकाच्या किंवा मुमुक्षूच्या हातांतील स्मरणीच्या मण्याप्रमाणें आहेत. कोणत्याहि दुसऱ्या व्यवसायात चित्त व्यग्र झालें असता हातांतील स्मरणीचे मणी ज्याप्रमाणें अंतर्दृष्टीला मुख्य ध्येयापासून फारसें दूर चळू देत नाहींत, त्याप्रमाणें लोकमान्यांसारख्यांच्या आठवणी त्यांच्या धीरोदात्त स्वभावाचें व जाज्वल्य देशाभिमानाचें वरचेवर स्मरण देऊन मन कर्तव्यच्युत होऊ देत नाहींत.

पण या आठवणी सांगावयाच्या कोणी आणि हे निरनिराळ्या ठिकाणीं सांडलेले मणी एकत्र करून त्यांची स्मरणी बनवावयाची कोणी? या मण्यांची

निपजहि निरनिराळ्या वेळीं निरनिराळ्या परिस्थितींत झालेली असल्यामुळें स्फटिकाच्या मण्याप्रमाणें ते एकच रंगाचे असूं शकणार नाहींत ; अर्थात् सर्व मणी एके ठिकाणीं जमा केल्यानंतर त्यांची यथायोग्य निवड करून जो रंग ज्या ठिकाणीं खुलून दिसेल त्याच ठिकाणीं तो घालून सुंदर स्मरणी बनविण्याचें काम अधिकच कठिण व कौशल्याचें असतें. यामुळें मला हें काम प्रथम आपल्या शक्तीबाहेरचें वाटलें, तथापि लोकमान्यांविषयींच्या शुद्ध भक्तिप्रेमामुळें या संग्रहकार्यास मीं हात घालण्याचें साहस केलें. गेल्या वर्षी त्यांच्या पुण्यतिथीनिमित्त केसरी, लोकसंग्रह व लोकमान्य या पत्रांत मीं माझ्या आठवणी प्रसिद्ध केल्या, व त्याबरोबरच इतर सहानुभवी अशा कांहीं सद्गृहस्थांच्या सह्यांनिशीं महाराष्ट्रांतील सर्व लोकांस लोकमान्यांच्या आठवणी पाठविण्याबद्दल जाहीर विनंति केली. हेतु हा कीं, श्री. तात्यासाहेब केळकरकृत टिळकचरित्र जरी सर्वांगसुंदर झालें असलें तरी त्या चरित्रप्रासादाच्या चिरेबंदींतील क्वचित् भरावयाच्या राहिलेल्या दरजा 'आठवणींच्या' उत्कृष्ट सनल्यानें जर बेमालूम भरल्या गेल्या तर अद्याप बनावयाचें राहिलेलें चरित्रप्रासादाचें उत्तुंग शिखर यामुळें अधिकच खुलून दिसावें. 'आठवणी' हा एकाद्या प्रचंड नदीस चोहोंकडून येऊन मिळणाऱ्या लहानमोठ्या नद्यांप्रमाणें, किंवा चित्रकारानें काढलेल्या चित्रांतील रंगाप्रमाणें, अथवा मूर्तिकारानें केलेल्या मूर्तीच्या कोंरीव कामाप्रमाणें होत; किंवा असेंहि म्हणतां येईल कीं. सांगरल्यास जसें अस्तर, पंचपक्वान्नाच्या भोजनास जशी

...ना अडचण उत्पन्न झाल्यावाचून राहत नाही. अनभिज्ञ माणसास ज्याप्रमाणें मोत्याच्या सरातील खरें व खोटें मोतीं ओळखणें कठिण, त्याचप्रमाणें आठवणींतून त्यासत्याची पारख करणें कालांतरानें दुरापास्त. म्हणून असल्या आठवणी प्रसिद्ध करताना ज्याच्याकडून माहिती मिळाली, त्या गृहस्थाच्या नावाचा उल्लेख, काळ व स्थळ यांचा निर्देश असणें अवश्य असतें; आणि लिहिण्यास आनंद वाटतो की, आपण आपल्या आठवणी प्रसिद्ध करताना ही खबरदारी घेतली आहे हें मला दिसून आलें. माझी अशी खात्री आहे कीं, इतक्या परिश्रमानें लोकमान्यांच्या चरित्राचा भावी भव्य प्रासाद बांधण्याकरितां आठवणींच्या रूपानें लहानमोठ्या विटा जमा करून आपण ठेवीत आहां. तोच क्रम असाच चालू ठेविल्यास या सर्व सामुग्रीचा उपयोग होऊन लोकमान्यांचा चरित्रप्रासाद निर्माण झालेला पाहण्याचें सद्भाग्य देखील आपणास लाभेल. याच लोकमान्यांच्या दिव्य चरित्राचे उत्तुंग शिखरावरुन अवतीर्ण झालेल्या तत्त्वगंगेच्या पावन स्पर्शानें आमच्या देशाचा उद्धार होणार आणि आमच्या भावी संततीचा उत्कर्ष होणार, हा माझा दृढ विश्वास असल्यामुळे या प्रवाहाचें अवतरणार्थ आपण चालविलेल्या प्रयत्नाचें मी मनःपूर्वक सादर कौतुक करतों. अशल्या प्रयत्नाबद्दल मला निव्वळ कौतुक वाटत नसून आपले हातून कै० लोकमान्यांची स्मृति कायम ठेवण्याचें महत्कार्य होत आहे अशी भावना माझे अंतःकरणात असल्यामुळे पुनः एकवार आपलें मनःपूर्वक अभिनंदन करतों."

या बाबतीत ता. ३१ जुलै १९२३ च्या केसरीमध्यें पहिली जाहीर विनंति करण्यात आली. सदरचें विनंतिपत्र सविस्तर खालीं दिलें आहे.

### "लो. टिळकांचें वाङ्मय स्मारक"

विपुल ही गोष्ट उघड आहे. हजारों लहानमोठ्या व्यक्तींशीं टिळकांनीं आपलें अंतरंग व्यक्त केलें असेल. त्यांत दिसून आलेल्या ज्या अनेक लहानमोठ्या स्वभावदर्शक गोष्टी त्या सर्व कोणा तरी एकट्या एक व्यक्तीला माहीत असतील ही गोष्टच मुळांत असंभवप्राय आहे. अर्थात् अशा कोणत्याहि चरित्राला सर्वांगपरिपूर्णता येणें शक्य नाहीं. पण या गोष्टीची चिंता महाराष्ट्रभर पसरलेल्या सर्व राष्ट्रीय पक्षास वाटली पाहिजे. राष्ट्रीय पक्षाचें विशिष्ट राजकीय तत्त्वज्ञान बऱ्याच अर्शी टिळकांच्या स्वभावगुणांत व चारित्र्यांत उतरलें होतें यांत शंका नाहीं. अर्थात् टिळकांचें अनेकांगीं व विस्तृत चरित्र शक्य तर जसें तसें लिहिलें जावें. हाच राष्ट्रीय पक्षाच्या राजकीय तत्त्वज्ञानाचा पाया होय. व्यक्ती नष्ट झाल्यावरोबर त्याच्याजवळ असलेल्या आठवणीहि लुप्तप्राय होतात व अशी पिढीच्या पिढी उलटून गेल्यावर साधार चरित्रसाधनांच्या अभावीं राजकीय पंथाचा पायाच कमजोर होऊं लागतो ही गोष्ट विसरता कामा नये. चरित्रलेखनाची गोष्ट योग्य परंतु एकट्या मनुष्याच्या हातून पूर्ण झाली तरी देखील ती त्याप्रमाणें एका अर्थानें अपूर्णच राहते, त्याप्रमाणें प्रत्येकानें हेंहि लक्षात ठेवलें पाहिजे कीं, लेखक सर्वस्वीं योग्य असताहि कित्येक वेळां अनेक कारणांमुळें त्याच्या हातून हीं कामें तडीस जातहि नाहींत. न्या. रानड्यांचें चरित्र गोखले लिहिणार होते; पण गोखल्यांच्याबरोबर रानडेहि गेले असेंच म्हणण्याची आतां पाळी आली; व स्वतः गोखल्यांचें चरित्रहि अजून कोणी लिहिण्याचें मनावर घेतल्याचें दिसत नाहीं! तात्पर्य, अशा यावर्तीत कोणावरहि न विसंबतां ज्याची त्याची काळजी प्रत्येकानें स्वतः केली पाहिजे. हजारों व्यक्ति व त्यांच्याबरोबर हजारों बहुमोल गोष्टी आम्ही स्वतःच्या अनास्थेनें नामशेष होऊं देतों, व नंतर संशोधन सुरू झाल्यावर एकाद्या मोठ्या सिद्धांताची इमारत एकाद्या क्षुल्लक व्यक्तीजवळ असलेल्या क्षुल्लक चिटोऱ्यावर उभारावी लागते, हा अनुभव इतिहाससंशोधकांस आहेच. ती स्थिति होऊं नये म्हणून या कामीं येणाऱ्या भावनाप्रधानत्वाचा गुण किंवा दोष स्वतः पत्करूनहि आम्ही महाराष्ट्रभर पसरलेल्या राष्ट्रीय पक्षाच्या सर्व अनुयायांना अशी विनंति करतों कीं, आपणाजवळ असलेली परंतु दुसऱ्याला सांगण्यासारखी वाटेल अशी, टिळकांसंबंधीं प्रत्येक लहानमोठी गोष्ट लिहून काढून ती आपल्या नांवाबर त्यांनीं प्रसिद्ध करावी. यांत स्वतःला अपरोक्ष रीतीनें मोठेपणा येईल, अशी खोटी कल्पना त्यांनीं करून घेऊं नये. कोणाला कशाबद्दल किती मोठेपणा द्यावयाचा हें ठरविण्याइतकी जनता शहाणी आहे. या बाबतींत एकजुटीनें कां काम केलें पाहिजे याबद्दल एकच उदाहरण पुरें होईल. अनेक लहानमोठ्या व्यक्तींनीं आपल्या हकीकतींच्या साधार परंतु लहानमोठ्या गोष्टी धीटपणानें पुढें येऊन सांगितल्या नसत्या तर, नुकताच प्रसिद्ध झालेला कायदेभंग-कमिटीचा रिपोर्ट किंवा पंजाब-प्रकरणाचा साधार व साग्रंत इतिहास

लोकांना वाचावयास मिळाला नसता. अर्थात् टिळकचरित्राच्या बाबतींतहि लहान लोकांनीं मोठेपणाच्या किंवा मोठ्या लोकांनीं लहानपणाच्या कल्पना बाजूस सारून, पुढें येऊन, हें साधनप्रकाशनाचें काम केलें तर सर्व राष्ट्रीय पक्षानें एकजूट करून टिळकाचें वाङ्मय स्मारक केलें असें होईल. यापेक्षा टिळकांच्या अनुयायांना ज्यास्त लिहिण्याची गरज नाहीं असें वाटतें."

शंकर गणेश लवाटे
वासुदेव कृष्ण भावे
सदाशिव विनायक थापटे
अनंत वासुदेव फडणीस
काशिनाथ नरसिंह केळकर.

पण सदर विनंति केल्यापासून पुढें सुमारें सहासात महिन्यात फार तर दोघाचौघाशिवाय कोणाकडूनहि आठवणींचा मजकूर आला नाहीं. याचें कारण अशा प्रकारच्या पाश्चात्य पद्धतींच्या नवीन वळणाची आम्हास सवय नाहीं हेंच होय म्हणून त्याबद्दल आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं. टिळकचरित्र लिहिण्यापूर्वी चरित्रकार श्री. तात्यासाहेब केळकर यांच्यासारख्यांनीं चरित्रसाधनें पुरविण्याविषयीं केसरींमधून दोन वेळा जाहीर विनंति करूनहि जेथें काहीं उपयोग झाला नाहीं, तेथें आमच्यासारख्यांच्या विनंतीची कथा काय ! सदरहू विनंति-पत्रास जरी याचें तसें यश आलें नाहीं, तरी आस्थेनें व आग्रहपूर्वक सतत खासगी रीत्या व्यक्तिशः प्रयत्न करीत राहिल्यास त्यात निराश होण्याचें मुळींच कारण नाहीं असें माझ्या मनानें घेतल्यामुळें, गेलीं सहासात महिने मी या उद्योगाचे माग लागलों, पत्रव्यवहार सुरू केला व कित्येकांच्या प्रत्यक्ष गाठी भेटीहि घेतल्या. यास यश कितपत आलें याचें प्रस्तुत पुस्तक हेंच समर्पक उत्तर होय.

" माझा हा प्रयत्न म्हणजे स्वतःच्या घरच्या शिधासामुग्रीने समाराधना घालण्या-सारखा नसून इतरांनीं तयार केलेलीं पक्वान्नें वाढणाऱ्या वाढप्याच्या कामाप्रमाणेंच होय. पुण्यात वाढपी पुष्कळ मिळतात असें म्हणतात. त्यांपैकींच मीहि एक असून लोकमान्यांच्या आठवणींचें हें बौद्धिक पक्वान्न महाराष्ट्र जनतेस मी वाढीत आहे ; किंवा असें म्हटल्यास अधिक शोभेल कीं, लोकमान्यांच्या निरनिराळ्या स्नेही सेवकाकडून मागितलेली आठवणींच्या लेखाची ही ' मधुकरी ' एकत्र करून तिचें पवित्र भोजन महाराष्ट्र जनतेस घालण्याचें मी हें काम करीत आहें. आणि खरोखरच मला मधुकऱ्याप्रमाणेंच अनुभव आले ! ही मधुकरी मी मागत असता, जाणूनबुजून न वाढणाच्या इच्छेनें, समर्थ अशा किती तरी ठळक यजमानांनीं " थांबून या, " " अजून तयार नाहीं, " " आज एकादशी

आहे," ( अन्न आहे पण वाढावयाचें नाहीं ) "तुम्ही कोण ब्राह्मणच का ?" ( तुम्हास आठवणी जमविण्याचा अधिकार काय ? ) असे नानाप्रकारानीं हिणवून शेवटीं विमुख पाठविण्यासहि कमी केलें नाहीं ! निराशेच्या उन्हाचे चटके घेत व अपमानाच्या तापलेल्या रस्त्यानें पाय पोळव, धावपळ करीत, खिशाची चौपदरी करून मी हिंडत असता, काहींनीं बोलाविलेल्या ठराविक वेळींहि त्याजकडे गेलों तरी 'अजून अवकाश आहे,' ( मजकूर देण्याचें ठरविलें नाहीं ) अशी पाटी लाविलेली ! बरें, जरा उशीरा गेल्यास 'मधुकरी बंद' ( मजकूर देण्याची इच्छा नाहीं ) म्हणून तीच पाटी उलगी करून ठेवलेली ! हें पाहून जिवास फार खेद होई. लोकमान्यांच्या सर्व नव्याजुन्या, प्रसिद्ध-अप्रसिद्ध, लहानमोठ्या अनुयायांच्या 'आठवणीं'चें पवित्र अन्न मधुकरीच्या रूपानें एकत्र करून त्याची महाराष्ट्र-बालकवृंदास समाराधना घालावी, या शुद्ध बुद्धीनें मी प्रेरित झालों असताहि मला त्यात दुर्दैवानें पक्षपातीपणाहि दिसून आला. लोकमान्यांशीं कमीजास्त संबंध आलेल्या अशा सुमारे तीनशें सद्गृहस्थास आपल्या आठवणी देण्याविषयीं मी विनंति केली.

येथें येवढें सांगणें अवश्य आहे कीं, या बाबतींत पक्षभेद, जातिभेद किंवा दुसरे कोणतेहि क्षुद्र विकार मनात न आणता सरकारच्या बाजूचे, मवाळ, जहाल, ब्राह्मण, अब्राह्मण, सुधारक, दुधारक, राष्ट्रीय, मामलिक, सहकारी, असहकारी, प्रतियोगी, स्वराज्यवादी वगैरे सर्व मताचे लोकास, तसेंच हिंदु, मुसलमान, पार्शी, खिस्ती वगैरे जातींच्या स्त्रीपुरुषास मी एकजात पत्रद्वारें व समक्ष विनंति केली, कारण लोकमान्यांचें मन व कार्यक्षेत्र समुद्राप्रमाणेंच विस्तीर्ण असल्यामुळें सर्वांशीं त्यांचा संबंध आलेला होता, व न जाणों, एखाद्यास माहीत असलेली लोकमान्यांच्या थोरवीची गोष्ट आपल्या दोषैक पक्षपातामुळें त्यास न विचारल्यानें ती अप्रसिद्ध ठेल्याचें पाप आपणास लागेल, या भावनेनं मी सरसकट सर्वांस विनविलें. सारांश, आठवणी मागितल्या गेलेल्या क्षेत्राची सीमा सांगावयाची तर इतकेंच सांगतों कीं, इंग्लंडचे मुख्य प्रधान रम्से मॅक्डोनाल्ड, सर व्हॅलेंटाईन चिरोल, रुस्तमजी, नेव्हिन्सन, हॉर्निमन,

दिवस असलेला त्याचा गडी त्याचे बरोबरचा आचारी, घरातील देवपूजा करणारा ब्राह्मण, त्याचे मुलाचा खासगी शिक्षक, त्याचा नेहमीचा वृद्ध कोचमन, फार काय पण त्यास श्मश्रूचे वेळीं कधींहि दुखापत न केल्याबद्दल आपल्या हस्तकौशल्याची (!) तारीफ करणारा त्याचा डरीव कारागीर याजकडूनहि आठवणी मिळविण्याचा मीं प्रयत्न केला आहे. असो, वर मीं म्हटलेंच आहे कीं, थोर पुरुषाच्या आठवणी लिहिण्याचें हें वळण आम्हास नवीन आहे, आणि याचा पुरावा म्हणजे असा कीं, अगदीं हाताचे बोटावर मोजण्याइतक्या व्यक्ति वगळून, बाकीच्या सर्व सद्गृहस्थास वारवार विनवण्या कराव्या लागल्या. पैकीं स्थानिक मंडळींकडे चारचार पाचपाच खेपा घातल्या व बाहेरगावच्या लोकांपैकीं कोणास तीन, तर कोणास चार, तर कोणास चार किंवा कोणास पांच असीं पत्रें पाठविल्याशिवाय त्याजकडून उत्तरहि येऊं शकलें नाहीं. इतकेंच काय पण शेवटच्या पत्रांत उत्तराकरितां तिकिट पाठवून जबाब नाहीं म्हणून पुनः पुन पोस्टाचीं रिप्लाय कार्डें पाठविलीं, तरीसुद्धां उत्तर आलें नाहीं, अशी कित्ती तरी उदाहरणें पाहावयास सांपडलीं! मग मजकूर येण्याची गोष्ट कशाला? छापील पत्रानें भगत्य वाटत नाहीं म्हणून एक बोटभरहि छापील मजकुराचें पत्र न पाठविता, सर्व पत्रें (एकदर हजार–सवाहजार) मी जातीनें हातानेंच लिहिलीं होतीं आरंभीं मी मनांत अशी शपथ घेतली होती कीं, कोणीही सद्गृहस्थ मजकूर पाठवीपर्यंत किंवा पाठविण्याच नाकारीपर्यंत आपण त्यास पत्रें पाठवीत राहावयाच, पण ही माझी प्रतिज्ञा व शपथ कित्येकांनीं मला मोडण्यास भाग पाडलें, कारण त्यास मीं अनेक पत्रें पाठविलीं तरी उत्तरादाखल बोटभर चिठ्ठीहि त्यास पाठविण्यास वेळ झाला नाहीं. म्हणून अखेर मीच हरमून त्याचा पिच्छा सोडून दिला! कदाचित् त्यास सदर विषयाच तितकें महत्त्व वाटत नसाव, अगर तें कार्य हातीं घेण्यास माझी अपात्रता त्यास वाटत असावी असहि कशावरून नसेल? म्हणूनच पत्रास साधें उत्तरहि देण्याची सामान्य रीत त्यांनीं

मागतों. ती अशी कीं, माझ्या अल्प समजुतीप्रमाण महाराष्ट्रांतीलच काय, पण समग्र हिंदुस्थानातील अशी ठळक एकहि व्यक्ति मजकडून सहसा सुटली नसावी की, जिचा लोकमान्यांशी संबंध आलेला वाटला असता, मी त्या व्यक्तीस आठवणी पाठविण्याबद्दल कळकळीनें व परोपरीनें विनंति केली नाहीं. मग वरच्या पुण्या-मुंबईच्या-लोकांची गोष्ट कशाला? पण सर्वांवर ताण म्हणजे मुंबईच्या एका प्रसिद्ध शास्त्रीपुत्र आधुनिक 'महा विद्वानानें या बाबतींत माझे पत्रास उत्तर म्हणून द्वेष-मत्सर-द्वेषादिकांचें मोडण भरून त्याचा मला चवरूप प्रसाद पाठविला तो गुलरूपानें झाकून ठेवणेंच प्राप्त आहे कारण त्याचा नुसता विषारी आस्वादहि मी वाचकास दिल्यास त्यांची मानसिक प्रकृति बिघडविल्याचे फुकट पाप मात्र मला माझे माथीं घ्यावें लागेल!! असो, पण याचे उलट या बाबतींत माझ्या प्रयत्नास आस्थापूर्वक सहानुभूति दाखविणारे मला कोणी भेटले नाहीत असे मात्र नाहीं आता असेंहि झालें कीं, काहींची मजकूर पाठविण्याची तीव्र इच्छा असतांहि जमले नाहीं. धुन्या व लोकमान्यांशी विशेष संबंधी अशा प्रसिद्ध पुढारी सद्गृहस्थाच्या आठवणी मिळविण्यावर माझा विशेष कटाक्ष होता. त्या मिळविण्याच्या लोभानें मी त्यास किती त्रास दिला व तो त्यांनी कृपाळूपण कसा सोसला, याचें प्रत्तर धुळ्याचे आमदार, सत्कार्योत्तेजक सभेचे चिटणीस व प्रसिद्ध श्रीसमर्थभक्त श्रीयुत शंकर श्रीकृष्ण देव बी. ए. एल्एल्. बी. वकील यांच्या पुढील पत्रावरुन वाचकास कळण्यासारखें आहे. ते आपल्या ता. ५।०।२४ च्या पत्रांत म्हणतात, "तुमचीं एकदर सहा पत्रें पोंचलीं. प्रसिद्ध करण्यासारख्या आठवणी लिहिण्याचें अखेरीस मला काहीं साधलें नाहीं. तरी राग न मानावा इलाज नाहीं मला वाईट वाटत. तरी मला क्षमा केली पाहिजे आठवणींत सार्वजनिक बोध पाहिजे का, लोकमान्यांचे स्वभावाचा विशिष्टपणा असावा याचा विचार केला, पण अखेर काही साधलें नाहीं खरें. मीं लिहिण्याचा प्रयत्न केला, दहाबारा कागद लिहिले, पण त्यात प्रसिद्ध करण्यासारखें किंवा निराळ कोणास ठाऊक नाहीं असें काहीं वाटलें नाहीं, म्हणून तें टिपण माझ्या घरातच आठवणीसाठीं मुलाच्या हवालीं केलें हें सारें सागतों तें

दोन पत्रावर न्यायमूर्तींनीं स्वहस्तें लोकमान्याचें केलेलें वर्णन मला सांगून तीं पत्रेंहि त्यांनीं मला देण्याचें अभिवचन दिलें होतें. पण कालानें अचानक ऐन जिनसीं त्यासच आपल्या दुर्भर उदरांत गडप केल्यामुळें सर्वच बेत जेथल्या तेथें राहिला!

माझे मनांत नेहमीं असें येई कीं, आजल्या आटोक्याबाहेरच्या भलत्याच जबाबदारीच्या कार्यास आपण आतां एकदा हात घातला खरा. तेव्हां प्रयत्नाच्या दृष्टीनें आपण कसूर करतां कामा नये. काम करण्याच्या बुद्धीचें जें दुसरें लक्षण "प्रारब्धस्यान्तगमन" हें आपण विसरतां कामा नये. म्हणून कांहीं ठिकाणीं आठ–आठ हेलपाटे पडले तरी शेवटीं मजकूर मागण्यास मीं गेलों, तेव्हां देणेदाराचा तगादेदार मय्या पुरवला, पण ही व्यक्ति आतां येण नको, असेंही कांहींना कपाळास आठ्या घालून मला जाणविल्याशिवाय सोडलें नाहीं! मनुष्य कार्येक झाल्यावर तो आपला मूळ स्वभावही कसा विसरतो, हें मी या वेळीं चांगलें दिसला. हें सर्व येथें सांगण्याचें कारण इतकेंच कीं, लोकमान्यांच्या आठवणींचा संग्रह करणें, हें मी खासगी काम समजत नसून तें एक मोठ्या जबाबदारीचें सार्वजनिक कार्य असेंच मानतां, आणि म्हणून त्या कामाचा, संक्षेपानें कां होईना, जनतेस अहवाल सांगणें हें माझें कर्तव्य समजतां. हे कर्तव्य बजावीत असतां आलेल्या अनुभवाचा साग्र वृत्तांत लिहिल्यास, म्हणजे अर्थात् या आठवणींच्या आठवणी लिहिण्याचें योजल्यास, खरोखरच त्याचें एक स्वतंत्र मनोरंजक दो–पाऊणशें पानांचें मजेदार पुस्तकही बनूं शकेल!

येणेंप्रमाणें खासगी प्रयत्न मी केला; पण तो मला अगदीं अपुरा वाटल्यामुळें पुनः एकवार महाराष्ट्र–जनतेस सदर गोष्टीचें ताजें स्मरण करून दिल्यास थोडेंबहुत तरी कार्य साधेल, या उत्कंठेनें 'केसरी'च्या ता. २७ मे १९२४ च्या अंकांत मी पुनः जाहीर विनंति केली. पण केवळ अपवाद म्हणूनच कीं काय, फक्त एकच पत्र आलें व त्याचाहि व्हावा तसा उपयोग झाला नाहीं! तात्पर्य, माझ्या माहितीप्रमाणें लोकमान्यांशीं कमीजास्त संबंध आलेल्या हयात अशा बहुतेक सर्व सद्गृहस्थांस मी खासगी पत्र पाठवून व समक्ष भेटून मजकूर मिळविण्याचा आटोकाट प्रयत्न केला, व अज्ञान वा विस्मरण यामुळें ज्यांना खासगी तऱ्हेनें विनंति करणें अशक्य, त्यांना वर म्हटल्याप्रमाणें, केसरीद्वारा दोन वेळां जाहीर विनंतीहि केली. ह्यापेक्षां अधिक यशस्वी प्रयत्न करण्याच्या मार्गाची अचूक दिशा कोणी मला दाखविल्यास मी त्याचा आभारी होईन.

या पुस्तकास 'लो. टिळकांच्या आठवणी' येवढेंच सुटसुटीत व सार्थ नांव द्यावयाचें होतें, पण आठवणी पाठविणाराकडून येणारा मजकूर निव्वळ आठवणींच्याच स्वरूपाचा वाटेना, त्यास क्वचित् स्थळीं किंचित् आख्यायिकेचें स्वरूप चढूं लागलें. तेव्हां त्याही कल्पनेचा समावेश व्हावा, म्हणून "आख्यायिका" हा शब्द जोडणें

प्राप्त झालें लोकमान्यासारख्याचें चरित्र लिहिणें अशी थट्टा नव्हे तसेंच त्याच्या आठवणी लिहिणें साधें काम नाहीं. या बाबतींत धुळ्याचे रा. शंकरराव देव आपल्या ता. १।४।२४ च्या पत्रांत म्हणतात " मी विचार केला तों असें आढळून आलें कीं, त्याच्या आठवणी, आपण म्हणता खरें, पण त्या आपल्याच आठवणी होतात ! म्हणून मला माफी करा, असें मी आपणास लिहिणार होतों. पण आपली विलक्षण आग्रहाचीं पत्रें पाहून काय करावें असा प्रश्न पडला तेव्हां असं ठरविलं कीं, खासगी स्वरूपाच्या आठवणी मनातल्या मनात ठेवून लोकांना मार्गदर्शक होतील अशाच तेवढ्या द्याव्या, पण अशा आठवणी मला फारच थोड्या देता येतील " याचप्रमाणें मुंबईचे श्री. दत्तो आपाजी तुळजापूरकर बी ए एल्एल् बी वकील यानीं या बाबतींत मार्मिकपणानें प्रदर्शित केलेले विचार पुढें देत आहें. ते म्हणतात—

"मोठ्या माणसाच्या आठवणी लहान माणसानीं लिहिणें म्हणजे बरीच सावधगिरी ठेवावी लागते त्या लोकमान्यांच्या आठवणी आहेत, हें प्रथम लक्षांत ठेवलं पाहिजे नुसत्या बाळ गंगाधर टिळक या व्यक्तीच्या त्या आठवणी नसून, 'लोकमान्य' बाळ गंगाधर टिळक याच्या त्या आठवणी असल्या पाहिजेत. लोकमान्याचें काहीं तरी वैशिष्ट्य त्यात दिसून आलें पाहिजे 'नाहीं तर लोकमान्यांना सुपारीचें व्यसन होतें, तें इतकें कीं, एकदा असा प्रसंग आला कीं, त्यांच्या खिशातली सुपारी सर्व संपली होती आणि सुपारीची तलफ तर लागलेली तेव्हां त्यानीं मला मुद्दाम हाक मारून माझेजवळची सुपारी मागून घेतली ' ही गोष्ट लोकमान्याची आठवण म्हणून 'लोकमान्य माझ्याशीं बोलले,' हें गणींत करणाऱ्याच्या अनावर इच्छेनें सांगत सुटणाऱ्या भोळ्याभाबड्या खुळचट किंवा स्वयं माय टिळकभक्ताबद्दल हसू आल्याशिवाय रहात नाहीं प्रत्यक्ष भगवान् श्रीकृष्ण किंवा रामचंद्र याच्या जरी असल्या क्षुल्लक गोष्टी, व्यास–वाल्मिकींनीं सांगितल्या असत्या तरी त्याच्या भारत–रामायणादि ग्रंथांना त्यामुळें उलटा थोडासा कमीपणाच आला असता ! ज्या कवितेंत काव्य नाहीं ती कविता कसली ? ज्या आठवणींत लोकमान्याची आठवण, ओळख पटत नाहीं ती आठवण तरी कसली !

दुसरी गोष्ट म्हणजे मोठ्या माणसाच्या आठवणी सांगणारांना त्यांतच आपलें आत्मचरित्र गोवून देण्याचा मोह अनावर होत असतो आठवणी म्हटल्या म्हणजे त्या एकांगी कधींच नसतात त्यांत त्या सांगणाराचा काहीं तरी संबंध येत असतोच आत्मचरित्र कथन करण्याची पर्वणी सहज साधल्यास अगत्यास ती कोणाला नकोशी वाटणार ? पण त्यांत तारतम्यबुद्धि न ठेवल्यास रसहानि होऊन लेखक स्वतःलाच उपहासास पात्र करून घेतो

तसेंच आम्हाला लोकमान्याच्या आठवणी पाहिजेत, आख्यायिका नकोत, कर्णोपकर्णीं ऐकलेल्या लोकमान्यासंबंधाच्या चार भल्याबुऱ्या गोष्टींची आम्हाला

जरूर नाहीं. आख्यायिकेंत सत्यासत्याच मिश्रण इतकें बेमालूम झालेलें असतें कीं, त्याचें पृथक्करण करणें केवळ अशक्यच. असल्या आख्यायिकाच्या आधारा वर कोणत्याहि मोठ्या माणसाचा स्वभाव वाटेल त्या स्वरूपाचा बनवता येईल. 'टिळक, हे शरीरानें एवढे धिप्पाड आहेत व शरीर एवढे बलवान आहेत कीं, गर्दीतून जाताना रहानशा धक्क्यानें ते सहज दहापाच माणसाना कोलमडून पाडू शकतात' अशा तऱ्हेची त्यांच्याविषयींची आख्यायिका त्यांच्या हयातींतच खेडे गावातून पसरलेली पुष्कळांनीं ऐकली असेल. पण एवढ कशाला ? ' केसरींतील अग्रलेख व स्फुट सूचना एकाच वेळीं ते लिहीत असत, म्हणजे दोन लेखक जवळ बसलेले असावयाचे, एकाला अग्रलेखातील एक वाक्य सागावयाचें व तें तो लिही- पर्यंत दुसऱ्याला स्फुट सूचनातील मजकूर सागावयाचा व पुन: अग्रलेखाकडे वळा वयाचें ! ' ही त्यांच्या असामान्य लेखनकौशल्याबद्दलची आख्यायिका शब्दशः खरी मानणारे सुशिक्षित वर्गांतही बरेच लोक आढळून येत असत ! असल्या गोष्टी सत्याच्या कसोटीवर पारखून घेण्याची यातायात कोण करतो ?

आख्यायिका म्हणजे कुरीर किंवा खोलगट भिंगाच्या आरशाप्रमाणें असतात. त्यात खरें प्रतिबिंब कधीं दिसावयाच नाहीं. म्हणून आम्हास लोकमान्यांच्या आख्यायिका नकोत, आठवणी पाहिजेत.

आठवणी याचा अर्थच असा आहे कीं, त्या आठवून आठवून सागाव्या लागतात. म्हणजे त्या केवळ सत्यस्वरूपी असल्या पाहिजेत. त्यात सागणाराची अन्योक्ति, वक्रोक्ति, किंवा दुसरी कोणतीही ' उक्ति ' उर्फ मखलाशी असता कामा नये. लोकमान्यांची कृति किंवा ' उक्ति ' जशी असल तशीच जनतेपुढें आली पाहिजे. जशी ' असेल ' तशी , ' दिसल ' तशी नव्हे, कारण पाहणारा ज्या रगाच्या चष्म्यातून पाहील त्या रगाची ती त्याला दिसेल "

आठवणी व आख्यायिका या बाबतींत मला तात्त्विक दृष्ट्या जें काहीं म्हणा- वयाच होतें तें माझे सन्मित्र श्री. दाजीसाहेब तुळजापुरकर यानीं लिहून माझें काम हलकें केल, याबद्दल मजवर त्याचे उपकार आहेत. सदरहू पुस्तकात आख्यायिकाच्या सदरात पडेल असा फारच थोडा मजकूर असल्याचें दिसून येईल. काहीं लेखकाच्या आठवणींत आख्यायिकांची थोडी छटा दिसू लागली म्हणून त्या सर्व मजकुरावर हात फिरविण्यापेक्षा त्याचाहि परामर्श घेतला जावा म्हणून 'आख्यायिका' हें सदर घालावें लागलें मुद्रणाभिज्ञ श्री रा. द. पत पराडकर यानीं आपल्या एका पत्रात मला पुढीलप्रमाणें सूचना केली होती. ' आठवणींच्या लेखनविस्ताराविषयीं व त्यांच्या प्रदर्शनपद्धतीविषयीं आपणास, इतकच सुचवावेंस वाटतें कीं, व्यक्तिस्वातंत्र्याचा प्रमाणातीत सकोच न करता सर्वच आठवणी–लेखकाना, निदान मर्यादेत तरी, स्वातंत्र्य बहाल करूनच आपण चालावें. " सदबुद्धीनें केलेली ही सूचना अखड लक्षात बाळगूनहि

व वयानें, ज्ञानानें व अधिकारानें सर्वच लेखक श्रेष्ठ असताहि, केवळ पुस्तकाच्या आटपशीरपणाचे दृष्टीनेंच कांहींचे मजकुरास नाइलाजास्तव मला कात्री लावावी लागली, औचित्याचे दृष्टीनें कांहींच्या लेखातील व्यक्तींचीं नावें गाळावीं लागलीं, कांहींच्यामध्यें एकसूत्रीपणा राहावा म्हणून मजकूर मागेंपुढें करावा लागला, वगैरे 'आगंतुक मुखत्यारी' बद्दल त्यांनीं मला क्षमा करावी, अशी त्यास प्रार्थना आहे. जाता जाता या बाबतींत सांगण्यासारखें एवढेंच कीं, लेखकाकडून जसा मजकूर आला तसा तो तारतम्यबुद्धि व विवेचकपणा न चालविता सर्वच मी जसाच्या तसा छापिला असता तर त्यास साडेचार हजार पानेंहि पुरलीं नसतीं व तो एक नवलकथांचा अद्भुत खजिनाच किंवा गोपाळकालाच बनला असता!

सदर पुस्तक अनेक दृष्टीनीं दोषपूर्ण आहे, याची जाणीव प्रकाशकाला नाहीं असें नाहीं, पण तें ठराविक मुदतीच्या आंत विशिष्ट दिवशींच, प्रसिद्ध व्हावयाचें असल्यामुळें, अल्पावधींत एकाच छापखान्यांत तें सर्व छापलें जाईल कीं नाहीं या शंकेमुळें, मजकूर हातास आला, त्या क्रमानें पुस्तकाचे दोन भाग करून ते निरनिराळ्या छापखान्यांत छापून घेणें भाग पडलें, यामुळें नेहमीप्रमाणें ग्रंथाची पृष्ठसंख्या एकसारखी धावती न राहतां, त्यामुळें उत्पन्न होणारें वैगुण्य पत्करून, दोनही भागास स्वतंत्र पृष्ठसंख्या घालावी लागली. हें लक्षांत असावें कीं, पुस्तकाची हल्लींची रचना लोकमान्यांच्या चतुर्थ वार्षिक पुण्यतिथीचा दिवस गांठण्याच्या केवळ घाईघाईनेंच झालेली आहे. वास्तविक विषयवार मजकूर छापून त्यांतून लोकमान्यांचें सगतवार सुंदर चरित्र खुलून दिसण्यास कांहींच हरकत पडूं नये, पण याला सर्व मजकूर अगाऊ हातीं असावा लागतो, तो तसा नसल्यामुळें, इतकेंच नव्हे तर शेवटपर्यंत मजकूर येत राहिल्यानें, जसा तो आला तसाच छापणें प्राप्त झालें. त्यांत पत्तिप्रपंच किंवा लहानथोर असा भेद ठेविला गेला नाहीं, व एका अर्थानें लहानथोरांची सर मिसळ बैठक या पुस्तकांत घडली, हें हल्लींच्या या 'डेमॉक्रसीच्या' काळांत ठीक झालें असेंच वाटतें! ज्यांनीं या आवृत्तींतच छापण्याकरितां आपल्या आठवणी देण्याचें कबूल केलें होतें, पण अनिवार्य अडचणींमुळें त्यास तें शेवटीं जमलें नाहीं, अशा कित्येक परप्रांतस्थहि थोर गृहस्थांच्या आठवणी, व *ज्यांनीं ह्याच प्रथात

---

* टीप—माझ्या आग्रहाच्या विनंतीवरून, ज्यांनीं आपला बहुमोल वेळ खर्च करून आस्थापूर्वक आपल्या 'आठवणी' पाठविण्याची कृपा केली, पण अनेक अडचणींमुळें मला त्या सर्व, या खंडात समाविष्ट करतां आल्या नाहींत त्याबद्दल त्यांची पुनः एकवार क्षमा मागून, त्या द्वितीय खंडात अवश्य प्रसिद्ध होतील, असें त्यास आश्वासन देतों व त्यांचा येथें फक्त नामनिर्देश करतां — (१) श्री नारायण रामलिंग धामणगावकर, अमरावती, (२) डॉ० आमदार

छापण्याकरिता आपल्या गोड आठवणी अगत्यपूर्वक लिहिल्या, पण त्या उशीरा हातीं आल्यामुळें व अदमासापाहेर ग्रंथविस्तार झाल्यामुळे, आमच्या व वाचकांच्याहि सोयीकरिता आणि मुख्यत: ग्रंथप्रसिद्धीकरणाची वेळ विशिष्ट दिवशींच साधण्याच्या औचित्याकरिता येथेंच थांबून, घेता आल्या नाहींत, त्याची क्षमा मागतों. त्याच्या आठवणीहि ईशकृपेनें योग आल्यास, द्वितीय खंडात प्रसिद्ध करण्याचा माझा विचार आहे.

शेवटचें काम म्हणजे हें पुस्तक वाचकाचे हातीं देण्यास जे कारणीभूत झाले त्या सर्वांचे व्यक्त करणपूर्वक आभार मानण्याचें पूर्वी, निरनिराळ्या वर्तमानपत्रांतून, मासिकांतून, व लोकमान्याविषयीं प्रसिद्ध झालेल्या काहीं ल्हानमोठ्या पुस्तकांतून ओघात येऊन गेलेल्या त्याच्या आठवणी त्या त्या लेखकाच्या व प्रकाशकाच्या 'मूक संमतीनेंच' सदर ग्रंथात अवतरित केल्या आहेत, याबद्दल त्यानीं मला क्षमा केली पाहिजे, तसेंच आग्रहाआग्रहानें पत्रे लिहून व तोंडी विनति करून ज्यानीं आपला अमूल्य वेळ खर्चीं घालून मजकूर पाठविण्याची कृपा केली याबद्दल मी त्या सर्व लेखकाचे मनापासून आभार मानतों. माझें मित्र श्री. वासुदेव कृष्ण भावे, बी. ए. उपसंपादक, केसरी, श्री गोपाळ हरि ऊर्फ तात्या साहेब धारप, असि. म्यानेजर केसरी मराठा, श्री दत्तात्रेय विष्णु आपटे, बी. ए. म्यानेजर 'आनंदाश्रम,' लोकसंग्रह छापखान्याचे मालक श्री. शंकर रामचंद्र ऊर्फ मामासाहेब दाते, बी. ए. व विशेषत या कल्पनेच्या बाबतींत उपक्रमापासून माझे सहकारी असलेले श्री. काशीनाथ नरसिंह उर्फ बापूराव केळकर बी. ए. ( टिळक—महाराष्ट्र—विद्यापीठ ) व मला उपकारबद्ध करणारे 'गीताबीज'

---

मोतीराम बाळकृष्ण वेलकर, मुंबई, (३) श्री.खासदार माधव श्रीहरि अणे, यवतमाळ, (४) श्री. गोविंद सखाराम सरदेसाई, बडोदें, (५) श्री. दामोदर विश्वनाथ गोखले, ( दुसरा हप्ता), (६) लेखक—पुरुषार्थाचें मूळ, पुणें, (७) श्री. काशिबाई कानिटकर, संगमनेर, (८) श्री. नारायण सिताराम देशपांडे, खेड, (९) श्री. शंकर बापूजी मुजुमदार, नाशिक, (१०) श्री. धोंडो वासुदेव विद्वांस, पुणें, (११) श्री. प्रो. गोविंदरावजी चोळकर, हिंगणे, (१२) श्री. सिद्धेश्वर शास्त्री चित्राव, पुणें, (१३) श्री. हरि भिकाजी करमरकर, कोल्हापूर, (१४) श्री. लक्ष्मण रघुनाथ भिडे, सांगली, (१५) श्री. पन्नालाल व्यास, खामगाव, (१६) श्री. रा. ल. घरत, आवास, (१७) श्री. पुरुषोत्तम नारायण आठवले, सावंतवाडी, (१८) श्री. कृष्णाजीपंत कोल्हटकर, सातारा, (१९) श्री. श्रीपादराव वैद्य, पेशावर, (२०) श्री. डॉ० यादव श्रीहरि अणे, वणी (वऱ्हाड), (२१) श्री. व्य. ग. जावडेकर, धुळें, (२२) ××× एम. ए. हेडमास्तर, हायस्कूल ×××. (२३) वैद्य—गों. रा. विनीवाले, सांगली.

कर्ते श्री. गजानन विश्वनाथ केतकर, बी. ए. एल्. एल्. बी., उपसंपादक, केसरी–मराठा, यांचें या कामीं मला सहाय्य नसतें तर पुस्तक प्रसिद्ध होणें कठिण होतें, एवढेंच म्हणून त्यांचे मी मन पूर्वक आभार मानतों.

सर्वांत शेवटचे पण अत्यंत आदरयुक्त व कृतज्ञतापूर्वक आभार मानावयाचे ते श्री. तात्यासाहेब केळकर यांचे होत. पण या बाबतींत मी लिहीन तितकें थोडेंच होईल, इतकेंच म्हणून पुरे करतों. कारण या कामीं सर्वस्वीं सहानुभूति व मदत त्यांचीच आहे.

शेवटीं, महाराष्ट्रभूमीस 'स्वातंत्र्या' चें चुडेदान करून धन्य झालेल्या श्रीशिवछत्रपतींच्या पश्चात् त्यांची स्फूर्तिदायक आठवण करून देणाऱ्या भगवान् श्रीसमर्थांच्या शब्दांत थोडा फरक करून हल्लींच्या तत्सम परिस्थितींतील लोकास पुढीलप्रमाणें आठवण करून देऊन मी हें लावलेलें आत्मनिवेदन पूर्ण करतों.

बलवंताचें आठवावें रूप । बलवंताचा आठवावा प्रताप ॥
बलवंताचा आठवावा साक्षेप । भूमंडळीं ॥ १ ॥
बलवंताचें कैसें चालणें । बलवंताचें कैसें बोलणें ॥
बलवंताची सलगी देणें । कैसी असे ॥ २ ॥

पुणें, केसरी ऑफिस.
टिळकजयंति.
आषाढ व. ६ शके १८४६.

सर्वांचा नम्र सेवक,
सदाशिव विनायक बापट,
संग्राहक व संपादक.

---

# द्वितीय आवृत्ति.

वस्तुत ही द्वितीय आवृत्ती असली तरी ती नवीन जास्त 'आठवणी' च्या ताजा मजकुराच्या दृष्टीनें, द्वितीय आवृत्ती नसून तें केवळ पुनर्मुद्रण आहे असेंच मी समजतों. प्रथमावृत्ती कल्पनेच्या बाहेर अल्पावधींत म्हणजे सुमारें पंचवीस दिवसांतच खपल्यामुळें, व मागणी तर एकसारखी वाढत राहून पुस्तक न मिळाल्यामुळें, टिळक–भक्तांची निराशा होत आहे, असें दिसून आल्यावरून व हितचिंतक स्नेह्यांच्या सदिच्छापूर्ण आग्रहावरून द्वितीय आवृत्ती छापण्याचें मी मनाशीं ठरविलें व तिच्यामध्यें, जवळ असलेल्या सर्व नवीन आठवणी घालून ती छापावी असे योजिलें पण विचारांती हें करणें अगदीं अयोग्य वाटलें कारण एकतर ज्यांनी उत्साहाच्या पहिल्या उसळीसरशी प्रथमावृत्ती घेतली त्यास थोड्या फार नवीन मजकुराकरिता पुन्हा तितका खर्च करण्याचा मोह उत्पन्न करणें अत्यंत अनुचित वाटलें, शिवाय दुसरें असें कीं, तसें केल्यानें वाढणारें पुस्तक तयार होण्यास कालावधि लागणार व त्यामुळें लोकांची उत्कंठा नष्ट करून त्याच्या वाचनाची भूक मारण्याचें पाप माथीं घ्यावें लागणार असा विचार करून काहीं किरकोळ सुधारणा, विस्तृत सूची व प्रस्तावना लेखक श्री तात्यासाहेब केळकर यांचा फोटो एवढेंच देण्यापलीकडे या आवृत्तींत विशेष कांहींहि फरक केला नाहीं सुमारें एक महिन्याचे आंत पुस्तक छापून देण्याचें आश्वासन दिल्याप्रमाणें तें अगत्यपूर्वक तयार करून दिल्याबद्दल 'जगद्धितेच्छु' छापखान्याचे सौजन्यशील मालक श्री केशव रावजी गोंधळेकर यांचे आभार मानावे तेवढे थोडेच आहेत

| | | |
|---|---|---|
| केसरी ऑफीस, पुणें<br>श्रीगणेश चतुर्थी शके १८४६ | } | सदाशिव विनायक बापट,<br>संग्राहक व प्रकाशक |

---

| लेखक | पृष्ठ |
| --- | --- |

| लेखक | पृष्ठ |
| --- | --- |

# लोकमान्य टिळक
यांच्या
# आठवणी व आख्यायिका.

## खंड १ ला.

### श्रीशंकराचार्य

[ डॉ. महाभागवत, कुर्तकोटी, करवीरपीठ ]

दिवंगत राष्ट्रसूत्रधार लोकमान्य टिळक यांचें चरित्र अनेकांगांनीं परिपू आहे असा दुसरा पुरुष अलिकडच्या काळात पाहावयास सांपडत नाहीं. प त्यांचें चरित्र असें विविधांगांनीं पूर्ण असल्यामुळेंच तें कितीहि सांगितलें त सांगून संपत नाहीं, ही त्यांच्या आठवणी लिहितांना पहिली अडचण भासते भिन्न भिन्न लोकांस तें भिन्न भिन्न रीतीनें दिसत असल्यामुळें त्यांतील गोष्टींच निवड करण्याचे बाबतींत दुसरी अडचण वाटते—

" मल्लां वज्र गमे, नरां नृप गमे, कामें स्वयें स्त्रीजनां ।
गोपां आप्त, खळां नृपां, प्रभु शिशू मातापित्यांच्या मना ॥
कंसा मृत्यु, अशक्त पामरजनां. संतांसि तत्त्वांबुधि ।
श्रीशेपासन यादवां, हरि दिसे रंगांत नानाविधि ॥ "

वर्षें विचार करून बी. ए. एल्एल्. बी. झाल्याबरोबरच कै. चिपळूणकरांचा "गुरूपदेश" घेतला, व राजकारणापेक्षा विद्याव्यासंगाकडेच किती तरी अधिक ओढा असूनहि त्यांनीं स्वार्थत्यागपूर्वक जन्मभर आपल्या मनाचा हिरमोड करून घेऊन देशाच्या सद्य स्थितीमुळें राजकारण हेंच आपलें कार्यक्षेत्र म्हणून आखून घेतलें ह्यामुळें ते इतर चळवळींत प्रत्यक्ष भाग घेत नसत, पण देशाला हित-कारक असलेल्या प्रत्येक बाबतींतील कार्यकर्त्यांला ते बिनमोल असा सल्ला व उत्साह द्विगुणित करणारें प्रोत्साहन देत असत—

"स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः।"

हें त्यांचें तत्त्व होतें असो, ह्या तत्त्वानुसारच आश्रम घेण्याच्या बाबतींत व घेतल्यानंतर आपली व त्यांची ज्या बोलण्या झाल्या त्यापैकीं काहीं पुढें दिलीं आहेत.

(१) द्वारकापीठाचा व करवीरपीठाचा स्वीकार करण्यासाठीं दोन्ही-कडून बोलावणीं होतीं एकाचे दोन झालेल्या करवीर व संकेश्वर ह्या दोनहि मठांनीं पुन एकी करण्याचा प्रयत्न करूनहि यश न आल्यामुळें विचार पडला होता. कोणी कांहीं सल्ला देत, कोणी काहीं देत! प्रत्येकाचा सल्ला निराळा! पण "कोल्हापुराला जाऊ नका" असेंच पुष्कळजण म्हणत काय करावें हें ठरलें नसल्यामुळें करवीरपीठासाठीं एक वेळ आश्रम घेण्याविषयीं बोलावण्याची ऐन जरूरीच्या वेळीं तार आली असूनहि तो प्रसंग टाळावा लागला. शेवटीं, लोक मान्यांचा सल्ला घेतला त्या वेळीं ते जें काय बोलले तें माझ्या आठवणीप्रमाणें शक्य तोंपर्यंत त्यांच्याच शब्दांत पुढें देत आहे. ते म्हणाले, "कोणाचें ऐकू नका सरळ उठा, आणि कोल्हापुरला जाऊन आश्रम घ्या. आता काळ वेळ जागणाऱ्या धर्मगुरूंचीच गरज आहे. मिशनऱ्याप्रमाणें हिंदुधर्मासाठीं काम करणाराची जरूरी आहे ह्याच्याचसाठीं प्रोफेसर विजापुरकर आणि प्रो. पाठक यांना मी पीठावर बसा म्हणत होतों. पण तो योग नाहीं जुळून आला.—प्रति पक्षाकडे (कोल्हापुरला) तुम्ही गेला म्हणून लोक म्हणतीलना! दोन दिवस म्हणतील. तो त्यांचा गैरसमज घालविणें हें आपलें काम आहे मी सांगतों, कोल्हापुरात तुम्ही काहीं फार दिवस राहत नाहीं, कोल्हापुरात स्वतंत्र यांत्यानें राहिला तर करवीरसंकेश्वराचीं हीं न मिटणारीं भांडणें तरी एकदा मिटून जातील व कोल्हापुरात तसे न राहू शकला, तर शंकराचार्यांचें एक पीठ ह्या कोल्हापुरकरांच्या हातीं सांपडलें आहे तें त्यांच्या हातून सुटेल आणि पीठ संस्था-नाच्या बाहेर आल्यावर तरी एकी होईल. पीठावर आमच्या धार्मिक हक्कासाठीं भांडणारा आणि ते हक्क जाणणारा माणूस पाहिजे. हल्लींचे धर्मगुरु लक्ष देत नाहींत, त्यामुळें सरकार आमचे धार्मिक हक्कसुद्धां हिरावत चाललें आहे. कोणी

कांहींहि म्हटलें तरी ऐकूं नका, आणि तुम्ही सन्यास घेऊन पीठावर बसा. कोल्हापुरात गादीबद्दल भांडणें आहेतना ! खुशाल असू द्या. भांडणें काय करतात ! मी आहे."

लोकमान्याच्या सल्ल्याप्रमाणें वर्तन केलें. त्यांच्या अपेक्षेप्रमाणेंच गोष्टी घडल्या ! पण आज दुर्दैवानें काळानें ओढून नेल्यामुळें तह लावण्यास मात्र ते नाहींत !

(२) इ. स. १९१८ सालीं Anti-Untouchability Conference ( अस्पृश्यतानिवारक परिषद ) भरली होती. रा. विठ्ठल रामजी शिंदे हे अध्यक्षपद स्वीकारावें म्हणून आपल्याकडे आले होते. त्या वेळीं लोकमान्य टिळकांचा सल्ला घेतला असता ते म्हणाले, " ह्या बाबतींत लोकमत तयार करण्याचा प्रयत्न जरूर करावा, पण लोकमत तयार होत नाहीं तोंपर्यंत पीठावरील आचार्यांनीं अशा ठिकाणीं प्रत्यक्ष अध्यक्षपद स्वीकारून काम केल्यास एखादे वेळीं लोक पीठाचा निर्णय मान्य करणार नाहींत, व पीठाचा त्यानें व्यर्थ बोज जाईल " हा सल्ला पटला, व त्याप्रमाणें केलें. परंतु पुढील एका प्रसंगानें त्या सल्ल्याचें स्मरण करून दिलें. इ. स. १९२० सालीं नागपूर कॉंग्रेसच्या वेळीं कर्मवीर गांधीजी माझ्याकडे भेटीस आले, व अस्पृश्यता साफ फाडून टाकावी असें आचार्य ह्या नात्यानें कॉंग्रेसमध्यें भाषण करा म्हणून त्यांनीं फार आग्रह केला. त्या वेळीं टिळकांची आठवण झाली. त्यांचें तत्त्व हें होतें कीं, लोकांना मिळून मार्गें राहावयाचें नाहीं, पण लोकांना टाकूनहि पुढें जावयाचें नाहीं. लोकांना सारखें तयार करीत राहावयाचें व आपण त्यांच्यापुढें एकदोनच पावलें धरत राहून त्यांना घेऊन पुढें जावयाचें.

(३) विलायतेहून टिळक परत आल्यावर प्रायश्चित्ताबद्दल जें बोलणें झालें त्यात ते म्हणाले,—" माझ्याकडे बिल्कुल दोष नाहीं, व प्रायश्चित्ताची बिल्कुल आवश्यकता नाहीं. तरी पण शास्त्रमर्यादारक्षणासाठीं मी कोणता आग्रह धरीत नाहीं."

ह्याहि गोष्टींत वरील गोष्टींचेंच तत्त्व आहे व शिवाय आपल्या विषया पैलीकडे इतर बाबतींत त्यातील प्रमाणभूत माणसाच्या शब्दाला कसा मान ते देत असत ह्याचें प्रत्यंतर आहे.

(४) इ. स १९२० सालीं सांगलीच्या ज्योतिषसंमेलनाच्या वेळीं लोकमान्य टिळकांनीं आपल्याला मुद्दाम बोलाविलें कारण, तेथें धर्मशास्त्राचा प्रश्न उपस्थित झालेला होता, व त्याचा अधिकारयुक्तपणें धर्मपीठानें निर्णय द्यावा अशी त्यांची इच्छा होती. तिथींच्या वृद्धिक्षयाच्या नियमात फरक करण्याच्याविषयीं प्रश्न होता.

सांगलीला जाऊन पोंचल्यावर लोकमान्यांनीं स्नानसंध्यादि मठाच्या नित्य कर्मांची वेळ विचारून त्यास जुळेल असा कार्यक्रम ठेविला आणि खासगी रीतीनं

सुचविलें कीं, आपण बोलून उपयोग होईल असें मला वाटलें, तरच मी आपल्याला कळवीन, मग आपण आपला निर्णय द्या, नाहीं तर आपण निर्णय देऊन पीठाचा शब्द वाया गेला असें होता कामा नये "

ह्या त्यांच्या सांगण्याचा अर्थ हाच कीं, त्यांना पीठाचा व परंपरेचा मान कायम राखून ह्या संस्थेची रीत चालवून, ह्या संस्थेचा उपयोग करून घ्याव-याचा होता हीहि गोष्ट लोकमान्यांच्या निधनानंतर लवकरच मला पुढें दुसऱ्या एका प्रसंगीं जाणवली इ स. १९२० सालच्या कॉंग्रेसपूर्वी महात्मा गांधीजी नाशिकला आले होते. सकाळीं आले, व दुपारीं गेले. त्यांचा मुक्काम त्या दिवशीं आपल्या मठातच होता. दुपारीं जातांना म्हणाले, "आपणांशी बरेच बोलावयाचें आहे, मुंबईपर्यंत चला " मी सांगितलें, " माझ्या आश्रमधर्माप्रमाणें व पीठाच्या परंपरेप्रमाणें देवपूजा व स्नानसंध्या ह्यांची वेळ झालेली आहे, ती टाकून मला येतां येत नाहीं. नाहीं तर अवश्य आलों असतों " ते म्हणाले, " आतां स्नान संध्या किती दिवस करीत बसावयाचें ? त्याच्याहून महत्त्वाच्या गोष्टी आहेत " हें ऐकून आपणास काय वाटलें हें सांगतां येत नाहीं.

असेल त्या व्यक्तीचा, संस्थेचा, गोष्टीचा किंवा परिस्थितीचा उपयोग करून घेऊन, पुढें अधिक सुधारणेकरितां झटणें हें टिळकांचें सर्वत्र अबाधित तत्त्व होतें, व ह्या तत्त्वाप्रमाणेंच सर्व जन्मभर त्यांच्या विविध चरित्रांतील प्रत्येक बाबतींत त्यांचा व्यवहार चालत असे ।

## चिंतामण गंगाधर भानु

[ बी ए, माजी प्रोफेसर व पुणें डे ए सो चे लाइफ मेंबर व नेमस्तपक्षाचे अनुयायी, हल्ली मु यवतमाळ ]

वस्तुत' पाहता मी ल्हान माणूसना ! पण माझ्या प्रारब्धानुसार प्रो. टिळक याचा व माझा सार्वजनिक कार्यांमध्यें थोडाबहुत सबध जुळून आला. तत्संबधानें मीं कांहीं लिहावें, असें श्री सदाशिवराव बापटानीं मला सुचविलें. लोकमान्य टिळकानीं जो राजकीय सप्रदाय महाराष्ट्रामध्यें सुरु केला, त्याच्याविरुद्ध सप्रदायातील मी आहे, असें श्री. बापटास कळविलें असताहि त्याचा पुन र्भाग्रहाचा प्रेष आला. तेव्हा " नाहीं, लिहीत नाहीं " असा जबाब देणें माझ्या भिडस्त स्वभावाला प्रशस्त वाटलें नाहीं श्री. बापटाच्या प्रेषाचा सादर स्वीकार केला. त्याचें फल पुढाल लख आह.

(१) कै. श्री आगरकर व कै श्री टिळक यानीं लोकशिक्षणासाठीं अपूर्व स्वार्थत्याग करण्याचें ठरवून व सुप्रसिद्ध निबधमालाकार धाकटे शास्त्रीबुवा चिपळूणकर याच्याशीं सहकार्य जुळवून आणून १८८० सालीं न्यू इ. स्कूल व १८८१ सालीं "केसरी," "मराठा" चालणारा आर्यभूषण प्रेस या सस्था काढल्या. इतर तरुणाप्रमाणें मला सुद्धा-मी या वेळीं प व. खात्यामध्यें हगामी नोकर

मोठीच गर्दी जमली होती. स्टेशन सोडून कै. हरि रावजी चिपळूणकर यांच्या बंगल्याच्या भव्य पटांगणात या उभयतांचें स्वागत पुणेकरांनीं केलें. तेव्हां श्री. टिळकांस बोलतांना मीं प्रथम ऐकलें. ते पुष्कळच अशक्त झाले होते तरी त्यांचा आवाज खणखणीत होता. "लोकशिक्षण लोकांच्या हातांत आल्याशिवाय आपली खरी सुधारणा व्हावयाची नाहीं" हा श्री. टिळकांचा मंत्र होता, व "समाजांतील जातिभेद नष्ट करून सर्वत्र ऐक्यभाव उत्पन्न करणारें शिक्षणच आपलें इष्ट साध्य करून देईल" हा आगरकरांचा मंत्र. दोनहि मंत्र मला पटले. पुढें त्याच वर्षाच्या कोजागिरीला डे. कॉलेजनें टिळक-आगरकरांस व त्यांच्या सहकाऱ्यांस दुग्धपानाप्रीत्यर्थ बोलावलें होतें. "आपल्या राष्ट्राचा विचार करा. कामास लागा. नुसत्या आहारविहारासाठीं मानवजन्म नाहीं" हीं महावाक्यें उभयतांनीं या खेळाच्या दिवशींही उच्चारलीं.

(२) १८८३ सालीं कॉलेजांतील फेलोज व विद्यार्थी यांच्यामध्यें मानापमानाचें भांडण जुंपलें, विकोपाला गेलें; तेव्हां विद्यार्थ्यांनीं काय करावें, हा सल्ला घ्यावा म्हणून कांहीं विद्यार्थी (यांत मलाहि निवडलें होतें) श्री. टिळक-आगरकरांकडे गेले तेव्हां "फेलोजच्या निवडणुकींत विद्यार्थ्यांचें मत काय आहे, हें कॉलेजच्या अधिकाऱ्यांनीं पाहावें असें मागणें करा" असा आगरकरांचा उपदेश होता व "आपले जन्मसिद्ध स्वातंत्र्याचे हक्क केव्हांहि सोडून देऊं नका" असा टिळकांचा उपदेश होता. पण कॉलेजांतील उभय पक्षांनीं पडतें घेतलें व तटा मिटला.

(३) १८८४ सालीं साध्या वृत्तीचे सुप्रसिद्ध प्रो. केरूनाना छत्रे वारले. स्मारकाची सभा झाली तेव्हां श्री. टिळकांनीं आपला एक महिन्याचा पगार देऊन आपण कृतज्ञ शिष्य आहों असें लोकनिदर्शनास आणलें.

(४) १८८४–८५ सालीं माझी बी.ए. ची परीक्षा उतरली. कर्मधर्म-संयोगानें मला फेलोशिप मिळाली. फेलोशिप मिळालीच तर, एम्.ए. होऊन न्यू इ. स्कूलच्या स्वार्थत्यागी चालकांनीं शिक्षणाची स्वतंत्र संस्था काढून राष्ट्राला सर्वांगसुंदर शिक्षण द्यावयाचें, सारांश, "शहाणे करून सोडावे। सर्व जन।" हें जें समर्थांचें मत धारण केलें होतें, तें आपणहि स्वीकारावयाचें, असा माझा १८८२ पासूनचाच संकल्प होता, तो १८८५ सालच्या माझ्या फेलोशिपनें सफल होणार असें वाटून मला आनंद झाला. परंतु प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें व इतर कांहीं कारणांनीं मला अभ्यासच करतां आला नाहीं, शिवाय आगरकर, नामजोशी, केळकरप्रभृतींनीं "एम्.ए. व्हा, न व्हा, तुम्ही आमच्यामध्यें येऊन मिळालेंच पाहिजे" असें सांगितल्यामुळें एम्.ए. होण्याचा माझा उत्साह मंद झाला व प्रकृति सुधारण्याकडे व इतिहासग्रंथ वाचण्याकडे माझी तद्री लागली. दोन वर्षें याप्रमाणें मीं सपाटून खेळलों व इतिहासग्रंथांचें पठणहि केलें. पुढें १८८७ त

माझ्या पुण्यतील मातापितरांच्या इच्छेविरुद्ध मी न्यू इं. स्कूलला अंतर्भूत करणाऱ्या डेक्कन ए. सोसायटीचा लाईफ मेंबर झालों या सोसायटीला १८८५ तच सालीच फर्ग्युसन कॉलेज काढण्याची परवानगी मिळाली होती. या कॉलेजचे पहिले प्रिन्सिपाल प्रो. वामन शिवराम आपटे होत. व्यवस्थित टापटीप ठेवून शाळाकॉलेजचें अंतर्बाह्य स्वरूप कार्यक्षम करण्यामध्यें आपटे यांचा हातखंडा असे प्रो. टिळक, प्रो. आगरकर, प्रो. वासुदेवराव केळकर, प्रो. गोपाळराव गोखले व प्रो. माधवराव गोळे हा कॉलेजातील पहिला शिक्षकवर्ग हे सर्व गृहस्थ आपआपल्या विषयांत पटाईत होतेच, पण टिळकांचा असा लौकिक सर्वतोमुखीं असे कीं, कोणताहि विषय त्यांचा हातखंडा आहे असो हे सर्वजण जिव्हाळ्याच्या व आस्थेवाईक कळकळीनें शिकवीत व विद्यार्थीवर्गाशीं सहानुभूतीनें वागत, म्हणून मॅट्रिक्युलेशनप्रमाणेंच प्रीव्हियस परिक्षेचे निकालहि समाधानकारक होऊं लागले, शाळाकॉलेजची भरभराट झाली, मंडळीचा लौकिक वाढला, डे. ए. सोसायटी अपूर्व होणार असें लोकमत झालें व आता डेक्कन कॉलेजची जरूरी नाहीं, असें लार्ड रेसाहेबांच्या सरकारला पटून "तुमच्या हवालीं डेक्कन कॉलेज करतों" अशी सूचना सरकारनें डे. ए. सोसायटीच्या कौन्सिलपुढें १८८६ सालीं ठेवली

परंतु दुधाच्या माठ्यांत मिठाचा खडा पडावा तशी गत लाईफ मेंबरांत द्वैताची उत्पत्ति झाली सोसायटीसारख्या सुंदर व अपूर्व पुतळीला दृष्ट लागली चारजणांनीं मिळून एकमतानें राष्ट्रकार्य अथवा समाजकार्य करणें हें जणू महाराष्ट्राचें ब्रीदच नव्हे, असें झालें! दुसऱ्याचा उत्कर्ष सहन करणें व सल्पत चाललें असता पदरीं घेऊन इष्टकार्य साधणें, असली "शिक्षा" महाराष्ट्राला कित्येक शतकें नाहीं आहे! असो चव्हाटात मांडणें सुरू झालीं टिळकपक्ष व आगरकरपक्ष असे दोन पक्ष झाले प्रगति थांबणार, अशी दुष्ट चिन्हें होऊं लागली. शाळाकॉलेजाची भरभराट आणि चव्हाटात मांडणें! काय अपूर्व योग हा!!

काय बोलणार असें मला वाटे. असो, हें श्रवणाचें काम मी करीत असतानाच मला कळून चुकलें कीं, या दोघा मल्लप्रतिमल्लांच्या वाग्युद्धामध्यें सत्याची बाजू कोणीकडे झुकते आहे, हें ठरविण्याकडे दुर्लक्ष करून " जितं मया " असें कसें म्हणता येईल, हें शोधून काढण्यांत उभयतांचीं मनें गुतलीं असत. वादविवादांशीं किंवा वितंडाशीं आम्ही इतके एकतान होऊन जात असू कीं, सुटीचा तास संपला, असें सांगण्याची पाळी बहुधा येत असे. तसेंच, एकच कार्य करण्यासाठीं एकत्र झालेल्या या आमच्या मंडळींत परस्परांबद्दलचें प्रेम व अगत्य जास्त वाढावें म्हणून दर शनिवारीं आळीपाळीनें सहभोजनें सुरू झालीं होतीं. सहभोजनाचा बेत रात्रीच असे. सात वाजता मंडळी जमे व दहा वाजता प्रत्येकजण घरीं जाण्यासाठीं निघे. हीहि योजना चांगलीच उपकारक होईल, असें प्रथम वाटलें. असो, मी मंडळींत शिरल्यानंतरच्या तिसऱ्या भोजनसमारंभाला माझ्या दृष्टीनें भीषण स्वरूप आलें. प्रो. आगरकर फार दिलदार असत. अवश्य गरज भागविण्यासाठींसुद्धा त्यांनीं आमरण दरिद्री राहणार म्हणून घेतलेंच नाहीं. लाइफ मेंबरला त्यावेळीं अवघे ४० रुपये दरमहा मिळत व साल अखेरीला ४०० रुपये ग्रँट प्रत्येकास मिळे. एवंच अवघा ८८० रुपयांचा कारभार. पुणें शहरीं ७-८ हें रुपयांत संसार आटपताना नाकीं नव येत. त्यांतून प्रो. आगरकरांस दम्याची व्यथा असल्यामुळें दरमहा कमींतकमी पांच रुपये तरी औषध पाण्याला लागत. म्हणून आगरकरांची तारांबळ उडे. ही अडचण कमी व्हावी म्हणून त्यांनीं मंडळापुढें सूचना आणली कीं, लाइफ मेंबराचा पगार ४५ रु. करावा व वर्षअखेरीस अवश्यच वाटल्यास अधिक आलेले ६० रुपये ग्रँटमधून वजा करावे. या सूचनेंत वावगें

(६) झालें, पुष्कळ तरी उठून मी घरीं गेलों माझें डोकें भणाणल्यामुळें मला सगळ्या रात्रींत झोंप म्हणून आली नाहीं आगरकराची अडचण दूर केली पाहिजे असें एकदां वाटे व अजमासें ७८०० रुपये सरकारी ग्रँट आमच्या स्वतंत्र बाण्यामुळें कमी झाली किंवा अजीबात बंदच झाली तर ही दरमहाची बाद करतां येणार नाहीं, असेंहि वाटे शेवटीं, आपण सोसायटीला कायमचा रामराम करावा, असें माझ्या मनानें घेतलें पुढें स्नानवगैरे आटोपून राजीनामा लिहावयास बसणार तों श्री नामजोशी व प्रो केळकर सकाळचे ७ ७ ३० वाज ण्याच्या सुमारास माझ्या बिऱ्हाडीं आले यांच्याविषयींहि माझ्या मनांत आदर बुद्धि होती व तशांत हे माझ्या घरीं आल्ले तेव्हां मला आनंद झाला व त्या भरांत मी प्रमुक्त मनानें माझा रात्रींचा संकल्प त्यांस कळविला प्रो केळकर विद्वान् पण विनोदी आणि श्री नामजोशी वादीपंचानन या उभयतांनीं गमती नेंच वादामध्यें मला हरविलें नंतर चहापाणी होत असतां त्यांनीं प्रो टिळका समर्थ स्तुतिस्तोत्र गाइलें त्यांनीं सांगितलेला टिळकांचा स्पष्टवक्तेपणा, सोसायटी विषयींची त्यांची खरी कळकळ, त्यांची कुशाग्र बुद्धिमत्ता, लोकप्रेम संपादून इष्टकार्य करण्याची त्यांची योग्यता वगैरे गुण माझ्या अनुभवास आलेच होते. त्यांच्या विलक्षण हट्टाचा मीं उल्लेख केला, तेव्हां आगरकर पक्षाचा द्रव्य लोभ उच्छेदण्याप्रीत्यर्थ हा हट्ट व अट्टाहास आहे, असें त्यावेळपुरतें सांगून त्यांनीं माझी समजूत केली सारांश, टिळकपक्षाकडे त्यांनीं माझें मन वळविलें व मीहि आगरकरपक्षाशीं दोन हात करण्यास तयार झालों ! अर्थातच पगारवाढीचा प्रश्न थांबला.

(७) " डेक्कन कॉलेज डेक्कन ए. सोसायटीनें घ्यावें" या लार्ड रे साहेबांच्या मसलतीचा उल्लेख वरतीं केलाच आहे ही मसलत पुण्याच्या व इतर ठिकाणच्या लोकांस आवडली नाहीं ठिकठिकाणीं सभा झाल्या व सरकारचें कृत्य निषेध्य आहे, असे ठराव पास झाले आमच्या मंडळींची व विशेषत टिळक नाम जोशांची भिस्त लोकमतावर फार शिवाय, सरकारशीं सहकार्य करून लोकमत विरुद्ध होत असेल तर तें सरकारला प्रिय, परंतु लोकहितकारी असलें तरी करा वयाचें नाहीं, हा प्रो टिळकांचा बाणा तेव्हां प्रो टिळकांनीं बुद्धिचातुर्यानें काहीं तरी खुसपट काढून माघार घेण्याचें ठरविलें आगरकरपक्षालाहि फारशी उत्सुकता नव्हतीच इत्यर्थ हा कीं, " आम्हास सरकारचें म्हणणें पसंत नाहीं " असें पत्र सरकारकडे पाठविलें ह्या पत्राचा मसुदा तयार करण्यासाठीं टिळक आगरकर एकत्र बसलेले पाहून प्रो टिळकांशीं सहानुभूति बाळगणाऱ्या मलासुद्धां आनंद झाला लार्ड रे संतापले त्यांनीं सातार्‍यास एक जंगी भाषण केलें भाषणाचा विषय डे ए सोसायटीची धरसोड हा होता त्या प्रसिद्ध शाळेच्या भाषणांतील प्रत्येक मुद्दा घेऊन त्याचें खंडन टिळक-आगरकरांनीं केलें, तें अनेक दृष्टींनीं मनन

करण्यासारखें आहे. पुढें फर्ग्युसन कॉलेजला अधिक मदतच करायची नाहीं, असा लॉर्ड रेनीं हुकूम सोडला. प्रो. टिळक म्हणजे—

*" महावात सुटला तरी कां कंप येत भूधरा ! "*

या वृत्तीचे त्याच वृत्तीचें अनुकरण करणारी बाकीची मंडळी. तेव्हा वरील दट्टयानें कोणीच भीक घातली नाहीं, पण मंडळींत मात्र एकोपा दिसू लागला. सुटींचा तास सुखाचा जाऊं लागला प्रो. टिळक व प्रो आगरकर यांनी आपआपला हट्ट व दुराग्रह सोडून दिलासें दिसू लागलें. अर्थात् माझ्यासारख्या सुलभ समाधानी मनुष्याला आनंद झाला मात्र प्रो. गोखले दूरदृष्टी, त्यांनी ताडलें कीं, ही वेगळी शांति म्हणजे पुढें लवकरच येणाऱ्या वादळाचें पूर्व चिन्ह आहे. असो, या शांततेच्या संधिकालात प्रि आपटे, शाळेचे सुपरिंटेंडेंट व कौन्सिलचे चिटणीस, प्रो टिळक आगरकर मुख्य मंत्री, श्री. नामजोशी बाहेरील कार्यांचे मंत्री, अशी बुद्धिवंत व कार्यवंत पुरुषांची कमिटी ठरली. गरीबसा सागकाम्या मी, म्हणून थोडांची चिटणिशी व नायब सुपरिंटेंडेंटी मिळाली १८६८–१८७४ मध्यें ग्रेट ब्रिटन व आयर्लंडचा राज्यकारभार करणारी मंडळी अफलवताची होती म्हणतात, तशीच आमच्या छोटेखानी राज्यांतील वर टहेलकेली चौकडी होय. आता शाळाकॉलेजचा गाडा सुयंत्र चालणार असें सर्वांस वाटलें १८८९ सालच्या परीक्षेचे निकाल सर्वोत्कृष्ट झाले प्रत्येक आपलें शरीर–मति–सर्वस्व खर्च करून आपआपलें कर्तव्य करीत होता गुरुजींचें अनुकरण शाळाकॉलेजातील विद्यार्थी मोहि केलें हीलची भरभराट याच वेळीं झाली १८८८–८९ सालचा पंधरा महिन्याचा रिपोर्ट लिहिण्याचं काम प्रो टिळक आगरकराकडे आलें व या उभे यशादरांनी अहोरात्र जागून अवघ्या २४ तासात रिपोर्ट लिहून काढला सोसायटीच्या व कौन्सिलच्या कामाची माहिती प्रि. आपटे देत होते व थोडीची माहिती मी देत होता असो, प्रो टिळक आगरकर हे दोघे स्वाभिमानी बुद्धिवीर एकमतान रिपोर्ट लिहिण्याचें काम करीत आहेत, हें पाहून मला मनस्वी आनंद झाला भारतकालीन धनुर्धराग्रणी कर्णार्जुन एकमत होऊन भारतवर्षाला एकछत्री करते व पेशवाईतील नाना महादजीप्रभृति बुद्धिवीर व रणवीर एकमतानें प्रथमपासून शेवटपर्यंत चालते, तर गेल्या १९ व्या शतकात व हल्लींच्या २० व्या शतकांतसुद्धां आमच्या भारतीय संस्कृतीनें सर्वत्र अजिंक्यपणेंच मिळवून आमच्या भारताची धार्मिक सत्ता चारी धाची महात कायम केली असती ! प्रो टिळक व प्रो आगरकर एकच कार्य करण्याकरितां एकत्र जमले हा जवटचा प्रसंग होय.

(८) प्रारब्धाची कोण विचित्र लीला ही ! प्रो. टिळक-आगरकर एकमतानें काम करण्याचें ठरवून Union is Strength ( संहतिर्बलीयसी ) हें आपलें ब्रीद सार्थ करू लागले न लागले, तों थोड्याच दिवसांत " माशी शिंकली ! "

एक अत्यंत क्षुद्र कारणाचें निमित्त झालें राखेंत लीन झालेल्या अग्निस्फुलिंगावर राकेल सांडल्याचें निमित्त होऊन तो लीन झालेला अग्नि भडकतो तसाच प्रकार आमच्या सोसायटींत झाला. प्रो टिळक व प्रो आगरकरांचें अंतस्थ वैमनस्य या आगंतुक निमित्तानें उफाळलें, घडी विसकटली, या दोघांनी एकत्र राहणें अशक्य झालें वरती उल्लेखिलेलें क्षुद्र कारण अद्यापि वादग्रस्त आहे, म्हणून मी त्याचा येथें नामनिर्देशसुद्धा करीत नाहीं, अर्थात् त्याच्या युक्तायुक्ततेसंबंधीं मी सध्यां कांहीं म्हणत नाहीं. फक्त इतकेंच म्हणतों कीं, या वेळेपासून मी प्रो टिळकांच्या विरुद्ध असलेल्या पक्षाला सामील झालों

प्रो टिळक अद्वितीय मोहरा खरा त्यांची कुशाग्र बुद्धि, त्यांची ग्राहकता, प्रसंगीं काम करण्याची राक्षसी कर्तृत्वशक्ति, सभ्य व साधेपणा, त्यांची बहुश्रुतता, चैनीची निष्ठुर अनासक्ति, वगैरे डे ए सोसायटींत दिसून आलेले गुण व केसरी, मराठा पत्रें चालवीत असतां वादकुशलता, परपक्षाचा उपहास करण्याची हातोटी, सरकारी अधिकाऱ्यांशीं धिटाईचें वर्तन, कोणतेंहि विधान आपण केलें असतां तेंच कायदेशीर खरें आहे, हें सिद्ध करण्याची, निदान भासवण्याची चतुराई, लोकांस आपल्या इष्ट मताकडे ओढून आणण्याची न त्यास न दुखविता व प्रसंगीं त्यास आवडेल असेंच बोलून व वागून लोकमत आपल्या बाजूचें करण्याची त्यांची अजब कर्तृत्वशक्ति, इत्यादि प्रकट झालेले गुण लोकोत्तर होते. त्यांचा विलक्षण हट्टी स्वभाव हा अति उत्तम सद्गुण म्हणावा अथवा कींव करण्यासारखा दोष समजावा, हें त्यांच्या कट्टया मित्रांतील एका विद्वानाला तरी सांगता आलें नाहीं, हें मला प्रत्यक्ष ठाऊक आहे

(९) आपल्या विद्यार्थ्यांमध्यें अत्यंत आदर असलेल्या व लोकांच्या गळ्यातील ताईत असलेल्या बहादराला सोसायटीच्या लाइफ मेंबरशिपचा राजीनामा देऊन बाहेर पडण्याचा प्रसंग आला हें पाहून इतराप्रमाणे मलाहि वाईट वाटलें आपण बाहेर गेलों तर शाळाकालेजादि संस्था डबघाईस येऊन बुडतील, असें खुद्द प्रो टिळकांस वाटलें नसलें तरी त्यांच्या चाहत्यांस तसें वाटत होतें, यांत शंका नाहीं त्यांनीं राजीनामा लिहिला, त्यांतील कित्येक विधानें त्यांच्या समजुतीप्रमाणें खरीं असतील कदाचित्, परंतु परमार्थदृष्टीनें वस्तुस्थिति मात्र तशी नव्हती

(१०) शाळाकालेजचें काम सुटल्यावर प्रो टिळकांनीं " लॉ स्कूल " काढलें. तेव्हा अर्थातच त्यांची माझी भेट होण्याचे योग क्वचितच येत वरील राजीनामा दिल्यानंतर २ ३ वर्षांच्या आंत त्यांनीं " केसरी, मराठा " पत्रांची सर्व जबाबदारी आपल्याकडे घेतली आणि अत्यंत मेहनत करून व माझ्या वकिली चातुर्यानें जाणत्या व अजाणत्या लोकांचें मत आपल्या बाजूचें केलें राजकीय बाबीं कीं सामाजिक बाबीं, किंवा उभयता समकालीन वगैरे प्रश्नांची चर्चा करण्याचें हें

स्थळ नव्हे. सर्वांस प्रत्यक्ष असणाऱ्या राजकीय पारतंत्र्याविरुद्ध त्यांनीं आपलें अमोघ शस्त्र उचललें व हरएक प्रसंगीं तेंच शस्त्र त्यांनीं सुधारकांच्या प्रक्रियेवर चालविलें. थोड्याच वेळांत "केसरी" हें महाराष्ट्राचें मुखपत्र झालें.

(११) प्रत्यक्ष संबंध सुटला तेव्हां प्रो. टिळकांचें दर्शन क्वचित् होई हें वरती सांगितलेंच आहे. शिवाय मिलस्पेन्सरादि राज्या स्वातंत्र्यदेवतेचें आराधन करणाऱ्या ग्रंथकारांच्या व ग्रोट, आर्नोल्ड, ग्रीनप्रभृति इतिहासकारांच्या ग्रंथांशीं माझा परिचय असल्यामुळें लोकमान्यतेची पदवी प्रतिक्षणीं जवळजवळ आणणाऱ्या प्रो. टिळकांचे एकदेशी राजकारणी उद्योग फारसे प्रिय होत नसत. सामाजिक सुधारणा व तिची प्रक्रिया यासंबंधानें त्यांचीं माझीं मतें जमणें शक्यहि नव्हतें. तथापि १८९३–९४ सालीं एक आगंतुक योगायोग उत्पन्न झाला. श्री. विष्णु रघुनाथ नातु, बेळगांवचे सुप्रसिद्ध वकील, यांना महाराष्ट्राचा १८ व्या शतकांतील शेवटचा महावीर महादजी शिंदे पाटीलबोवा (ह्यासच इंग्लिश ग्रंथकार माधवराव शिंदे म्हणतात) या महाशूर, महाधोरणी, महायोजक, महापुरुषाचें चरित्र प्रसिद्ध केलें. विषय उत्तम व ग्रंथलेखकहि उत्तम! श्री. नातु डे. कॉलेजांत माझे सहाध्यायी असत. त्यांचा उद्योग दांडगा, बुद्धि कुशाग्र, ग्रंथाची मांडणी अतीच न्याय-शुद्ध, उपलब्ध साधनग्रंथांची खडानखडा माहिती, भाषा मनोहर, कल्पनाशक्ति चवाट, इत्यादि अनेक स्पृहणीय सद्गुणांमुळें त्यांचा ग्रंथ सर्व आबालवृद्धांच्या आदराला सहजच पात्र झाला. इतिहास हा माझा आवडता विषय, त्यांतल्यात्यांत मराठेशाहीचा इतिहास तर मला अत्यंत प्रिय, म्हणून माझे स्नेही श्री. नातु यांचा ग्रंथ मीं कसोशीनें दोनतीन वेळ वाचला. तो वाचून मला वाटलें कीं, ह्या ग्रंथामुळें १८ व्या शतकांतील इतर राजकारणी पुरुषांच्या धवल कीर्तीवर कदाचित् अपकीर्तीचे कृष्णमेघ येतील. काव्येतिहासांतील बखरी व विशेषतः पत्रें, यादी मीं ठीक रीतीनें वाचल्या होत्या म्हणून मला पहिल्या चार भट पेशव्यांच्या व नाना फडणिसांच्या राजकीय ध्येयासंबंधानें व कर्तृत्वासंबंधानें एक प्रकारची अव्यभिचारिणी भक्ति उत्पन्न झाली होती व आहे

कीं, केवळ राजकारणी दृष्टीनें मात्र मीं लेखमाला लिहावी आणि जरूर तेथें काने-वेलान्त्या देऊन केसरीकारांनी ती प्रसिद्ध करावी बहुतेक दोन तास ते माझ्या येथें बसले होते हीच त्यांची व माझी बहुतेक शेवटची भेट होय ह्या प्रसंगीं पुनः मला वाटलें कीं, रावसाहेब रानड्यांच्या सर्वांगीण संस्कृत भावनेला प्रो. टिळकांच्या बाणेदारपणाचें व त्यांच्या धाडशी धडाडीचें साह्य मिळालें असतें तर केवढी मोठी बहार झाली असती परंतु असें होणें शक्य नव्हतें. नाना व पाटीलबोवा एका जुटीनें शेवटपर्यंत काम करते, तर १९ शतकाच्या पहिल्या दुसऱ्या दशकांतच राज्यक्रांति झाली नसती व गाड्यांच्या आश्रयाला नाव होती, तेथें विपर्यय होऊन गाड्याला नावेचा आश्रय घेण्याचें कारणहि उत्पन्न झालें नसतें ! आता काय उपयोग ! ईश्वरी नेमानेमच असा होता म्हणून स्वस्थ बसावें आणि " गेल्याचा शोक वृथा "/हें समजून घेऊन आपली आर्य संस्कृति सर्वांगसुंदर करण्यासाठीं रात्रंदिवस विवेकपूर्वक प्रयत्न करावे, हें आमचें कर्तव्य होय, हें खरीक खरें.

(१२) मुंबईपुण्यातील हिंदुमुसलमानांच्या दंग्यानंतर उत्सवप्रिय हिंदु लोकांसाठीं प्रो टिळकांनीं श्रीगणपतीच्या सार्वजनिक उत्सवाला पुनर्जीवित केलें हें महत्त्वाचे आहे हिंदु लोक सार्वजनिक गणपति बसवून मिरवणूक काढू लागले, पण तावुतामध्यें मिरविण्याचें तहुतकांनीं सोडलें नाही या सार्वजनिक गणपत्युत्सवात मी भाषणें करू लागलों ही गोष्ट सुधारकांस फारशी आवडली नाहीं या

आमंत्रण नाकारावें लागलें तरीहि आग्रह होण्याचें सुटेना तेव्हां ही आपत्ति टळावी म्हणून मी प्रो टिळकांच्या घरीं मुद्दाम गेलों, माझ्या तक्रारी सांगितल्या व मला वेळ नाहीं म्हणूनहि सांगितलें प्रो टिळक हुषार! कोणाला कोणत्या मंत्रानें आकर्षावें हें त्यास ठाऊक त्यांनीं थोडासा वेळ जाऊं देऊन माझ्या तोंडावर

" मनुष्याणां सहस्रेषु कश्चिद्यतति सिद्धये ।
यततामपि सिद्धानां कश्चिन्मां वेत्ति तत्त्वत ॥ "

व

यदि ह्यहं न वर्तेयं जातु कर्मण्यतन्द्रित
मम वर्त्मानुवर्तन्ते मनुष्या पार्थ सर्वश. ।
उत्सीदेयुरिमे लोका "

प्रभृति श्लोक टाकले शास्त्याचें काम उपदेश करण्याचें आहे वगैरे सांगून माझें मन वळविलें व मी भाषण करण्याचें कबूल केलें "शिवाजी महाराजांनीं अफझुलखानाला मारलें, तो वध आहे, खून नव्हे " अशा अर्थाचें मी डेक्कन कॉलेजांत भाषण केलें होतें, त्याचाच अनुवाद करीन असें सांगितलें व त्याप्रमाणें ठरलेल्या दिवशीं अनुवाद केलाहि विषय आटोपून शेवटीं सामाजिक समतेच्या दृष्टीनें आम्हा मराठ्यांचें हल्लींचें वर्तन अराष्ट्रीय आहे हें मी सोदाहरण सिद्ध केलें व भाषण संपविलें प्रो जिन्सीवाल्यास माझा शेवटचा भाग रुचला नाहीं मला त्यांनीं दोलकीं विशेषणेंहि अर्पण केलीं असो, हा उत्सव आटपतो न आटपतो, तोंच युरोपियन अधिकाऱ्यांचे खून झाले, चौकशी सुरू झाली वगैरे गोष्टी प्रसिद्धच आहेत या उत्सवांत भाग घेण्याबद्दल मलाहि काहीं अर्थी "हिरण्यश्राद्ध" करावें लागलें.

याच सुमारास प्रो टिळक लोकमान्य झाले मी अद्वैत वेदान्ताचा अनुयायी झालों मंडल्याहून आल्यानंतर तेथेंच लिहिलेलें प्रचंड श्रीमद्भगवद्गीता भाष्य लोकमान्यांनीं प्रसिद्ध केलें त्या भाष्याविरुद्ध मीं टीका ११२ लेखांत केली अद्वैत पंडितांनींहि पुष्कळ आक्षेप घेतले त्यावर स्वपक्षमंडनार्थ लोकमान्यांनीं भाषणें केलीं त्यांत मलाहि दोलापागोटें अर्पण केलें असा लोकप्रवाद आहे असो, त्याच्या संबंधानें माझा काय अभिप्राय होता व आहे, याचें निदर्शन मीं अमळनेर येथील एका सभेंत केलें आहे

सारांश, लोकमान्यांचीं पुष्कळ मतें मला अप्रिय आहेत तरी त्यांच्या अलौकिक बुद्धीविषयीं व अचाट कर्तृत्वशक्तीसंबंधानें मला ते फार आदरणीय वाटतात, असें लिहून मी आपली लेखणी खालीं ठेवतों

---

## खुद लो. टिळकांच्या तोंडून (!)

के. लोकमान्य टिळक विलायतेस असताना त्यांची मुलाखत " ब्रिटन अँड इंडिया " नामक साप्ताहिकाच्या प्रतिनिधीनें घेतली होती

मुलाखतदाराजवळ दुसऱ्या विषयावर बोलणें झाल्यावर लो टिळक म्हणाले, " वस्तुत माझ्या मनामध्यें ज्ञानदान हेंच माझ्या आयुष्याचें ध्येय ठरवावें असा उद्देश होता, व त्याप्रमाणें मी शिक्षणाच्या कार्यांत आयुष्याच्या सुरवातीस पडलों झुल्यानच्या ध्येयाचें शिक्षण जनतेस द्यावें हा माझा हेतु होता लोकांना खऱ्या हिंदी शिक्षणाची तीव्र आवश्यकता आहे असें १८८० सालीं माझ्या मनाला पटलें होतें राजकीय पुढारी व्हावें असा माझा उद्देश त्या वेळीं मुळींच नव्हता १८८२ च्या एज्युकेशन कमिशनपुढें मी माझे शिक्षणविषयक विचार मांडले असून ते त्या कमिशनच्या अहवालात नमूद आहेत माझे सहकारी मित्र रा आपटे यांनीहि आपले शिक्षणासबंधींचे विचार सदर कमिशनपुढें सांगितले होते त्यानंतर माझ्यावर तुरुगांत जाण्याची पाळी आली " हें शवटचें वाक्य टिळकांनीं अत्यत शांतपणानें उच्चारलें

" तुम्हाष केदेंत जाण्याचा प्रसग का आला ? " मुलाखतदार म्हणाला,

' मी दोन वृत्तपत्रें काढलीं होतीं, आणि कोल्हापुरच्या महाराजांना त्यांचे कारभारी फार वाईट रीतीनें वागवितात अशा अर्थाचा मजकूर मीं छापल्यामुळें माझ्यावर खटला झाला पण त्याचा निकाल होऊन तदनुसार शिक्षा भोगण्याचा अवधि सपल्यावर मी पूर्ववत् माझ्या स्वीकृत कार्यास लागलों मीं चालविलेल्या शाळेशीं माझा १८९० पर्यंत सबध होता पुढें तो सबध सुटला मी या शाळेंत गणित, सस्कृत, पदार्थविज्ञानादि शास्त्रें शिकवीत होतों नतर शाळा कोणत्या तत्वावर चालविली जावी याविषयीं माझा सहकारीवर्गाशीं मतभेद झाला सरकारनें मदतीदाखल रकम देऊन शाळेच्या अतर्गत व्यवस्थेंत हात घालण्याचा प्रयत्न केला सरकारनें पाहिजे तर मदत द्यावी, पण शाळेच्या व्यवस्थेंत ढवळाढवळ करू नये असें माझें मत होतें, आणि त्यासाठींच सरकारची ग्रँट घेऊ नये असें मी

हल्लीं त्याची संख्या बावीस हजार असून किरकोळ विक्रीसह बत्तीस हजार प्रत काढतों. माझी मूळची शास्त्रीय व वाङ्मयसेवेची प्रवृत्ति परिस्थितीमुळें बाजूस राहून मला माझ्या कार्यांत राजकारणाला प्रमुख स्थान देणें भाग पडलें. "

---

## सीताराम केशव बोले

[ मजूर पक्षाचे कैवारी व कार्यकर्ते, मुंबई ]

काहीं वर्षांपूर्वी केसरींत 'वेदोक्त-प्रकरण' असा लेख आला होता, व त्यात ब्राह्मणेतरांनीं वेदपठन व वेदोक्त कर्में करूं नयेत अशा अर्थाचें प्रतिपादन केलें होतें. हें पाहून मी पुण्यास गायकवाडवाड्यात जाऊन त्यांनीं कळविलेल्या वेळीं त्यास भेटलों व त्यांच्याशीं वरील विषयासंबंधानें कांहीं भाषण झालें. तेव्हां त्यांनीं मला असें सांगितलें कीं, सदरहु लेख माझ्या पश्चात् लिहिला गेला. मी स्वतः हल्लीं केसरींत क्वचित् लिहितों. जर्मनींत छापलेले वेद जर आम्ही वाचतों, तर ब्राह्मणेतरास ते वाचण्याचा व त्याप्रमाणें कर्में करण्याचा अधिकार नाहीं या म्हणण्यात कांहीं अर्थ नाहीं. या उद्गारावरून ते सामाजिक बाबतींत उदारमतवादी नव्हते असे म्हणता येणार नाहीं परंतु राजकीय बाबतींत लोकजागृति करण्याचा जो मार्ग आपण पत्करला आहे, त्यास अडथळा येऊं नये या विचारानें कदाचित् त्यांनीं सामाजिक सुधारणेच्या बाबतींतील आपल्या मताची विशेष परिस्फुटता केली नसावी असें वाटतें, आणि या बाबतींत ते नेहमीं म्हणत कीं, एकानेंच सर्व कामें हातीं घेतलीं पाहिजेत असें नाहीं. समुद्रपर्यटन करणें शास्त्रविरुद्ध आहे, अशा जुन्या विचाराचा माणूस साठी उलटल्यानंतर विलायतेस गेला नसता यावरूनहि त्यांचीं मतें दिसून येतात.

---

## विश्वनाथ गंगाधर केतकर

[बी ए एलूएल् बी , नाशिक येथील वकील व म्युनिसिपल प्रेसिडेंट, लो टिळकांचे वडील जावई व त्याच्या मृत्युपत्रानें नेमलेले एक पच ]

(१) सन १८९७ सालात राजद्रोहाच्या कलमाच्या अमलबजावणीची साथ प्रथमच मुबई प्रातात आली रँड व आयर्स्ट याचे खून झाल्यावर इग्रजी वर्तमान-पत्रकारानीं व सरकारी अधिकाऱ्यानीं त्यास राजकीय स्वरूप दिलें वास्तविक असल्या प्रकारचे घोर अत्याचार राज्यपद्धतींतील काहीं दोषामुळें व अन्यायामुळें ज्याचीं डोकीं भडकून जातात अशा मायेफिरू इसमाकडूनच होतात, ही गोष्ट निर्विवाद आहे परतु अशा वर्ळी आपल्या कृत्यातील दोष सरकारच्या लक्षात येत नाहींत वर्तमानपत्रकार व इतर चळवळ्ये याजवर अशा घोर अत्याचाराची जबाबदारी टाकावी या हेतूनेंच राजद्रोहाचे खटले करण्यात येतात व त्याचप्रमाणें ९७ साली झालें लोकमान्यावरहि खटला विनाकारण सरकारानें केला, म्हणजे खून करणारा गुन्हेगार सापडत नाहीं म्हणून केला अशी लोकाची समजूत होती. त्यावेळीं कांहीं तरुण पदवीधर व विद्यार्थी लोकमान्याकडे येऊन त्यास म्हणाले " हे लेख मी लिहिले आहेत असें आपण सागा म्हणजे आप त्यावरचें सकट टळेल " त्या अननुभवी व प्रेमळ तरुण मडळींची समजूत घालून त्यास लोकमान्यानीं परत लावलें, परतु लोकाची अनन्यभक्ति सकटकालीं दृष्टो त्पत्तीस आल्यावर त्याचें अत करण भरून आलें

(२) एके वेळीं विंचुरकर याचे वाड्यात आम्हीं बरीच मडळी भोजनास बसलों असता शेजारीं बसलेल्या तरुण मडळीस उद्देशून लोकमान्य म्हणाले, " अरे, आज सध्या कोणीं कोणीं केली आहे ? " प्रत्येकानें टाळा दिला असल्याकारणानें जो तो दुसऱ्याचे तोंडाकडे पाहू लागला हें पाहून लोकमान्य म्हणाले, " मी स्वत रोज सध्या करीत नसलों, तरी तुम्हाला ती इतक्यातच सोडण्याचें कारण नाहीं ! "

(३) लोकमान्यावर जाणत्या समाजाची अनन्यभक्ति व अकृत्रिम प्रेम होतेंच, परतु अज्ञ समाज त्याना देवाप्रमाणें मानीत होता. लोकमान्याना भोळे लोक नवस करीत असत व ते नवसास पावतात अशी त्याची समजूत असे. यात खरेपणा किती होता हें सागता येणें कठीण आहे, परतु अशा तऱ्हेचा अनुभव १९१७ सालीं नाशिक येथें आला. प्रातिक परिषदेकरिता लोकमान्य ज्या दिवशीं नाशिक स्टेशनवर येणार होते, त्याच वेळीं सिन्नर तालुक्यातील एक मराठा जातीची स्त्री आपल्या मुलास लोकमान्याच्या पायावर घालण्यासाठीं पुण्यास जाण्याकरिता नाशिक स्टेशनवर आली होती. लोकमान्य स्वत व त्याच वेळीं तेथें

यावयाचे असें तिला समजल्यावर तिनें मंडळीस आपली हकीकत सांगितली. या बाईच्या मुलाचें डोकें फिरलेलें होतें व तो वेड्यासारखा करीत असे. तेव्हां बाईनें नवस केला होता कीं, माझा मुलगा चांगला झाला तर मी त्यास टिळकांचे पायावर घालीन. ईश्वरी कृपेनें तिचा मुलगा बरा झाला व ती बाई नवस फेडण्याकरिता पुण्यास जाण्यासाठी आली तिचा ' देव'हि त्याच वेळीं येणार असल्यानें तिला फार आनंद झाला. त्या बाईस मुद्दाम वेटिंग रूममध्यें बसविण्यात आलें. नतर लोकमान्य गाडींतून उतरताच त्यास वेटिंग रूममध्यें आणण्यात आलें व बाईनें त्यांच्या चरणावर मुलास ठेवून नवस फेडला ना. तापडे त्या वेळीं प्रेमानें म्हणाले, " अहो बळवंतराव, तुम्ही नवसास पावता असें आज आम्हास समजलें ! "

(४) गणित व ज्योतिष लोकमान्यास चांगलें अवगत होतें, परंतु फलज्योतिषावर मात्र त्यांचा पूर्ण विश्वास नव्हता. कारण त्यांच्यासबधानें केलेलीं भविष्यें बरोबर जुळण्यापेक्षा तीं बऱ्याच वेळा चुकीचीं ठरलीं होतीं. आपल्या आयुष्यातील एकच गोष्ट ते पुष्कळ ज्योतिष्यास विचारीत व ती गोष्ट म्हणजे त्यांच्या मृत्यूचा काल पुष्कळ ज्योतिष्यानीं ते ६५ वर्ष जगतील असें वर्तविलें होतें, यामुळें अखेरच्या दुखण्यात ते लोकाना उगाच धीर देण्याकरिता म्हणत असत कीं, मला अजून दोनतीन वर्षे जगात राहावयाचें आहे, मी या दुखण्यात जात नाहीं. परंतु दुर्दैवानें हें भविष्य खोटेंच झालें व त्यांच्या नेतृत्वाला हिंदुस्थान मुकला ! "

(५) तीन वर्षांपूर्वी मशिदीवरून वाद्यें वाजवीत जाण्याचे निमित्तानें महाराष्ट्रात ठिकठिकाणीं दगे झाले, त्यात येवलें ( नाशिक जिल्हा ) येथेंहि दगा झाला या दग्याचीं खरीं कारणें कोणतीं व या कामीं विशेष कोणाची फूस होती याबद्दल केसरींत लोकमान्यानीं लेख लिहिले होते कोणत्याही विषयावर अगर प्रसगावर लेख लिहितांना त्याबद्दलची सर्व माहिती मिळवूनच ते लेख लिहीत, व यासाठींच येवलें येथें स्वत जाऊन तेथील वस्तुस्थिति व हकीगत प्रत्यक्ष समजून घेतल्यानतरच त्यांनीं हे लेख लिहिले होते येवल्यास जाण्याचे वेळीं त्याचे दुसरे चिरंजीव रामभाऊ हे फार आजारी होते दुखणें कठीण असल्यानें त्यांनीं बाहेर गांवीं जाऊं नये असें घरच्या मडळींनीं त्यास सांगितलें परंतु वर्तमानपत्रकारें या नात्यानें आपलें कर्तव्य काय आहे व जबाबदारी किती आहे हें लक्षात घेऊन सांसारिक अडचण बाजूला ठेवून ते येवल्यास स्वत गेले, हें पुष्कळाना माहीत आहे अशा प्रसगींच कर्तव्यतत्परतेची परीक्षा होत असते.

(६) कै. रा. ब. गणेश व्यंकटेश जोशी याच्या अध्यक्षतेखालीं पुण्यास जिल्हा परिषद झाली. त्या वेळीं मद्यपाननिषेधासबधानें लोकमान्यांचें भाषण झालें त्यात त्यांनीं पिकेटिंगचा उल्लेख करून " पुण्यातून दोन महिन्यात मी दारूची हकालपट्टी करतों, परंतु या कामीं तुम्ही तुरुगांस भोगण्यास किंवा

मरण्यास तयार आहां काय?" असा प्रश्न विचारला. सार्वजनिक कार्यात कर्तव्य बजावीत असतां आपल्यावर कोणताही प्रसंग आल्यास लोकमान्य मदत केल्या खेरीज राहाणार नाहींत अशी अनुभवानें पुण्यातील पुष्कळ तरुण मंडळींची खात्री असल्यानेंच त्या वेळीं पिकेटिंगच्या चळवळीस सुरुवात झाली

(७) लोकमान्यांची शरीरयष्टि बारीक पण कसलेली व पीळदार अशी लोकांच्या पाहाण्यात होती. विद्यार्थिदशेत असतांना त्यांचें शरीर दिसण्यात अगदीं किरकोळ असे. यामुळें त्यांची गणना काडीजवानांत होई. त्यांच्या पत्नी त्या वेळच्या त्यांच्या मानानें जास्त सुदृढ होत्या बरोबरीचे विद्यार्थी याबद्दल त्यांची थट्टाहि करीत हा कमीपणा घालविण्यासाठीं कॉलेजचें एक वर्ष केवळ तालीम करून शरीर सुदृढ करण्यात त्यांनी खर्च केलें या वर्षांत त्यांनीं पुस्तकसुद्धां उघडलें नाहीं सकाळ–संध्याकाळ तालीम, जेवण व झोंप याशिवाय त्यांनीं एक वर्ष दुसरें काहीं केलें नाहीं. याचा फायदा त्यांना पुढील आयुष्यांत फार चांगला झाला परकीयाच्या अनुकरणामुळें क्रिकेट, टेनिस वगैरे खेळ खेळणें म्हणजेच व्यायाम अशी पुष्कळांची समजूत असते परंतु या खेळांनीं शरीर पीळदार व कसदार होत नाहीं ही गोष्ट ते नेहमीं तरुण होतकरू मंडळींस सांगत घरच्या मुलांकरितां देशी पद्धतीच्या व्यायामाची सोय त्यांनीं आपल्या वाड्यात करून ठेविली होती

(८) १९०२–३ सालीं गांवात प्लेग असल्यानें लोकमान्य फार्ग्युसन कॉलेजा जवळ परांजपे यांचे पडळांचे जागेंत झोंपडींत राहत होते त्या ठिकाणींहि प्लेगचा प्रादुर्भाव होऊन लोकमान्यांवर कौटुंबिक आपत्ति आली व त्यांचे ज्येष्ठ चिरंजीव विश्वनाथपंत हे प्लेगला बळी पडले. विश्वनाथपंत हे त्या वेळीं फर्ग्युसन कॉलेज मध्यें विद्यार्थी होते एकाच आठवड्यात चुलतभाऊ, भाचा व वडील मुलगा प्लेगला बळी पडल्यानें त्यांचे मनावर किती परिणाम झाला असेल याची कल्पनाच करणें बरें. विश्वनाथपंत वारले त्याच दिवशीं प्रस्तुत लेखक पुण्यास लोकमान्यांकडे गेला होता. झोंपडीकडे जाण्यापूर्वीच ही दुःखद वार्ता समजल्यानें लोकमान्यांच्या खासगी तंबूत जाऊन त्यांचें सांत्वन कसें करावें व काय बोलावें या विचारानें त्या वेळीं तोंडातून शब्दहि निघाला नाहीं लोकमान्यांनीं ध्यानात हाक मारून बोलावलें व ते म्हणालें, 'अहो, गावची होळी पेटल्यावर प्रत्येक घरच्या गोवऱ्या जाव्या लागतात, त्याप्रमाणेंच झालें.' पुत्रवियोगामुळें त्यास अत्यंत दुःख झालें ही गोष्ट साहजिकच होती, परंतु अशा प्रसंगींहि त्यांची वृत्ति कशी असे हें यावरून कोणाच्याहि लक्षात येण्यासारखें आहे.

(९) सन १८९७–९८ सालांतील तुरुंगवासाचे वेळीं, लोकमान्यांचा विद्या व्यासंग जाणून प्रो० मॅक्समुल्लर यानीं आपला ऋग्वेदाचा ग्रंथ लोकमान्यांकडे तुरुंगाचे अधिकाऱ्यामार्फत पाठविला. ऋग्वेदाचा ग्रंथ हातीं आल्यावर तुरुंगात

त्यांनी तो ग्रंथ दोनदा वाचला, व तो वाचीत असतानाच काहीं ऋचांवरून आर्यांचें मूल वसतिस्थान, ज्या प्रदेशांत रात्र व दिवस मोठे असतात अशा प्रदेशांत असलें पाहिजे ही कल्पना त्यांस आली. विशेषत "सूर्योदयात् प्राक् बहूनि अहानि आसन्" (सूर्योदयापूर्वी पुष्कळ दिवस गेले) या ऋचेनें त्यांच्या कल्पनेस दृढता आली. तुरुंगांतून सुटून आल्यानंतर या विषयासंबंधानें माझ्या समक्ष एका विद्वान् मित्राशीं बोलताना ते म्हणाले, "ज्या रात्रीं 'सूर्योदयात् प्राक् बहूनि अहानि आसन्' या ऋचेचा अर्थ बरोबर लागला ती रात्र मला फार आनंदाची गेली." त्यावर त्यांचे मित्र साहजिक म्हणाले, "अहो, तुरुंगांत कसला आला आहे आनंद!" लोकमान्यांनीं उत्तर दिलें, "तो आनंद कसा असतो हें तुरुंगांत गेल्याखेरीज तुम्हांस समजणार नाहीं!"

(१०) "आर्यांचें मूल वसतिस्थान" (Arctic Home in the Vedas) हा ग्रंथ लिहिण्याची तयारी करीत असतां भूगर्भशास्त्रावरील बरेच ग्रंथ स्वतः वाचून त्या वेळेपर्यंत सर्वमान्य असे सिद्धांत कोणते ठरलेले आहेत हें लोकमान्यांस स्वत च पाहावें लागलें. एका शास्त्राचा अभ्यास करणारास दुसऱ्या शास्त्रांतील अगदीं अलीकडील शोध व सिद्धांत यांची माहिती अवश्य लागते, परंतु अशा तऱ्हेचीं साधनें हिंदुस्थानांत तरी उपलब्ध नव्हतीं व अजूनहि नाहींत असें म्हटलें तरी चालेल. याबद्दल त्यांनीं स्वत मला सांगितलें कीं, 'मला जो जो वेळ, मग तो थोडा का असेना, मोकळा सांपडेल त्याचा पूर्ण फायदा घेऊन मी भूगर्भशास्त्रावरील सबंध ग्रंथ वाचले."

(११) एका दिवाळीचे दिवसांत सकाळीं स्नान व फराळ करून लोकमान्य "इंडियन अँटिक्वेरी" या मासिकाचे अंक घेऊन त्यांत वेदकालासंबंधानें त्या वेळेपर्यंत कोणी कोणी काय काय लिहिलें आहे हें पाहात होते. दिवाळीचे दिवस म्हणजे गोड गोड खाण्यांत व खेळ खेळण्यांत जावयाचे, असें असतां लोकमान्यांस वरील मासिकाचे अंक वाचतांना पाहून एका गृहस्थानें "हे काय चाललें आहे" म्हणून विचारलें. त्यावर ते म्हणाले, "अहो, हा माझा दिवाळींतील खेळ चालला आहे!"

(१२) सन १९०८ सालांतील राजद्रोहाच्या खटल्याचे शेवटच्या दिवशीं मधल्या सुटींत लोकमान्य, त्यांचे स्नेही, वकील व इतर मंडळी बोलत बसलीं असतां, या खटल्यांत लोकमान्यांस होणाऱ्या काळ्यापाण्याच्या शिक्षेची कल्पना मनांत येतांच काहींच्या डोळ्यांत अश्रु आले. वरील प्रकार होणें साहजिकच होतें. मंडळींची वृत्ति बदललीं असें पाहून लोकमान्य म्हणाले, "ज्यांना रडावयाचें असेल त्यांनीं आताच बाहेर जावें, येथें बसू नये." त्या धैर्यशाली पुरुषाचें हें म्हणणें ऐकून मंडळींस काय वाटलें असेल याची कल्पनाच करणें बरें.

## गजानन विश्वनाथ केतकर

[ बी ए एलएल् बी , टिळकांच्या वडील मुलीचे वडील चिरंजीव, हल्लीं "केसरी" व "मराठा" वर्तमानपत्रांचे उपसंपादक ]

लोकमान्य स्वर्गवासी झाले त्या वेळीं मी एलएल् बी च्या वर्गांत म्हणजे विद्यार्थिदशेंतच होतों अर्थात् पुढें दिलेल्या आठवणींत सार्वजनिक बाबतींपेक्षा घरगुती गोष्टीच अधिक येणें अपरिहार्य आहे यामुळें पुढील त्रोटक माहितींत लो० टिळक यांचा ती० दादा या घरगुती तोंडांत बसलेल्या नावानें पुष्कळ ठिकाणीं उल्लेख केला आहे

(१) ती० दादांना १९०८ सालीं शिक्षा झाली त्या वेळीं माझें वय १० वर्षांचें होतें अर्थात् त्या वेळीं शिक्षा झाली म्हणजे काय झालें याचाहि नीटसा अर्थ कळत नव्हता नाशिकला शिक्षा झाल्याची तार आली त्या वेळीं आई रडू लागली व त्या दिवशीं जेवली नाहीं याबद्दल मात्र मनाला थोडें वाईट वाटलें १९०६ सालीं माझ्या मुंजीकरिता व १९०८ सालीं माझ्या धाकट्या भावाच्या मुंजीकरिता ती० दादा नाशिकला आले होते मुंजीकरितां इतके पाहुणे आले असता त्यांत फक्त ती० दादांचीच लोक मिरवणूक का काढतात याचें लहान पणीं फारच आश्चर्य वाटे आम्ही लहान मुलें म्हणून व्याख्यानाला आम्हास कोणी नेलें नाहीं, पण व्याख्यानाला अतोनात गर्दी व धक्काबुक्की झाल्याचीं वर्णनें वडील माणसाकडून ऐकल्यावर आईला विचारलें कीं, दादा व्याख्यानात काय सांगतात ? आईनें सांगितलें कीं, "स्वदेशी माल वापरा" असें सांगतात. मग मीं विचारलें कीं, "स्वदेशी माल वापरा," येवढें दादांच्या तोंडून ऐकण्याकरिता येवढी गर्दी जमण्याचें कारण काय ? यावर आईनें कांहींसें उत्तर दिलें, पण तें समजलें नाहीं

(२) दादांचा स्वभाव रागीट असल्यामुळें रामभाऊ, बापू, मी किंवा बाबा विद्वांस यांचीं मुलें यांच्यावर रागावल्याचे कांहीं प्रसंग आठवतात सर्वच मुलांस दादांचा अतिशय धाक वाटत असे, पण रागावले म्हणजे नुसते बोलत, मार दिल्याचें कधीं आठवत नाहीं आपल्या मुलांच्या अभ्यासाची व्यवस्था दादांनीं फारच उत्तम ठेविली होती व या कामीं ते अतिशय काळजी घेत संस्कृत व संध्या पूजा वगैरे नित्य कर्म शिकविण्यास श्री. गुर्जरशास्त्री येत असत शिवाय गणित वगैरे शिकविण्यास एक वृद्ध मराठी मास्तर येत मुलांना तालमीकरिता मल्लखांब, जोड्या, जोर काढण्याचे हस्से, स्वतंत्र व्यायामाची खोली व एक तालीममास्तर इतकी व्यवस्था होती मुलांना ते स्वत सिंहगडच्या टाक्यांत पोहण्यास शिकवीत. घोड्यावर बसण्यास यावें म्हणून कांहीं दिवस एक लहानसें तट्टूहि त्यांनीं आणलें होतें क्यामेरा आणून फोटोग्राफीच्या शिक्षणाचीहि व्यवस्था केली होती

(३) याच वेळीं आम्ही दरवर्षी बहुधा मे–जून महिन्यात पुण्यास येत होतों. विंचूरकरांच्या वाड्यातील अंगणात पाणी शिंपडून व बाज टाकून उन्हाळ्यात संध्याकाळचे वेळीं दादा बसत असत, ही गोष्ट आठवते. गायकवाडाच्या वाड्यात राहण्यास आलों त्याच वेळीं बापूमामा ( टिळकांचे धाकटे चिरंजीव ) यांची मुंज झाली. वाड्यातील राहण्याचें घर बांधण्याचें काम त्या वेळीं अर्धेमुर्धे पुरें झालें होतें. घर बांधण्याचें काम दादा स्वत पाहत असत. यांत त्यांच्या बुद्धीची साक्ष देण्यासारख्या एकदोन गोष्टी आहेत. वाड्याच्या बाजूच्या भिंतीमधूनच एक बाटोळा लाकडी जिना काढलेला आहे. इतक्या अरुंद भिंतींत वाटोळा जिना बसविता येणार नाहीं असें सुतारांनीं सांगितलें, तेव्हा दादांनीं त्याच्या कड्या कापावयाच्या हें सुतारांना समजावून देऊन तो जिना तयार करवून घेतला. दुसरी गोष्ट, घरच्या माड्यातून एकाच हंडीनें दोनहि दालनांत उजेड पडावा अशी रचना. नुसतें मधल्या भिंतींत एक चौकोनी भोंक पाडलें व त्यांत हंडी टांगली तर भिंतीच्या जाडीनें अंधार पडतो. तेव्हा त्या चौकोनी भोंकापर्यंत चोहों बाजूनीं ही भिंत निमुळती करण्यात आली होती. त्यामुळें भिंतीचा भाग उजेडाचे आड येत नसे. तिसरी गोष्ट म्हणजे वाड्याच्या एका भागातून दुसऱ्या भागाकडे जाण्यास भिंतींतून

पत्रें इंग्रजी असत, व त्यात राजकीय स्वरूपाचा कांहीं मजकूर नसे दरमहिन्यास एक पत्र येत असे त्यातही मुलाच्या अभ्यासाची दादा अतिशय काळजी घेत कवडेशास्त्री हे मुलाना संस्कृत शिकविण्यास होते व महाजन म्हणून दुसरे एक मास्तर इंग्रजी शिकविण्यास येत या मास्तरानाही कशा पद्धतीनें शिक्षण द्यावयाचें यासबधीं पत्रातून नेहमीं सूचना येत मुख्यत्वें व्यायामासबधीं पत्रातून नेहमीं सूचना येत व्यायामास-धोंडे रोज किती जोर बैठका काढतात याची ते चौकशी करीत मुलानीं साध्या राहणीनें वागावें यावरहि त्याचा कटाक्ष असे इतका कीं, सायकल वापरणें किंवा चष्मा लावणें यावाहि त्यानीं निषेध केला होता! सदा वर्षांत ती० बाबा, दोनतीन वेळा, माझे वडील ती० अप्पासाहेब हे एक वेळ व मुलें एक वेळ मडालेस भेटण्यास गेलीं होतीं मुलाना बरोबर आपल्या अभ्यासाच्या वह्या घेऊन बोलाविलें होतें व त्यानीं तेथें त्यास निर निराळ्या विषयावर प्रश्न विचारून चाचणी घेतली होती मॅट्रिकच्या परीक्षेची तयारी कशी करावयाची याबद्दल विषयवार व विस्तृत सूचना त्यानीं पाठविल्या होत्या व त्या खासगी रीतीनें छापल्याहि होत्या त्या इतक्या चागल्या आहेत कीं, अजूनहि त्या या आठवणीच्या पुस्तकातच छापून काढण्यासारख्या आहेत

(५) तुरुगात असताना येथून पुस्तकाबरोबर सुपारी, कपडे, जाडे वगैरे सामान पाठविण्यात येत असे त्याकरता पेटी तयार करण्याचें काम बापू सुताराकडे होतें हा पुष्कळ दिवस दादाकडे काम करीत असे पेटी दादाकडे जाणार आहे असें कळल्यामुळें त्यानें तिचे आतील बाजूस पेन्सिलीनें ' बापू सुतार याचे दादास दडवत " असें लिहिल्याचें स्मरतें हा बोलणाऱ्या दडव्याचा निरोप पोंचला किंवा नाहीं तें माहीत नाहीं

(६) मी १९१४ सालीं मॅट्रिक पास होऊन पुण्यास फर्ग्युसन कॉलेजमध्यें जाऊं लागलों, तो तीन वर्षे गायकवाड-वाड्यातच राहिलों त्या वेळीं जगन्नाथ महाराज हायस्कुलात होते रामभाऊ व बापू प्रीव्हियसमध्यें होते बाबाचे वडील चिरंजीवहि न्यू स्कूलात होते ही सर्व विद्यार्थी मडळी हल्लीं ज्या सपादकाच्या खोल्या आहेत त्यात राहत, परतु जेवणाची व्यवस्था मोठ्या हॉलमध्यें करण्यात येत असे. दादा नेहमीं या विद्यार्थ्यांच्या खोलींत येऊन अभ्यासाबद्दल चौकशी करीत जगन्नाथमहाराज याच्या शिक्षणाबद्दल ते विशेष काळजी घेत

असें विचारीत याचा अर्थ विचारल्यास " तू आज अभ्यास केला असशील तर आपलें जेवण मिळविलेंस, नाहीं तर फुकट जेवलास " असें म्हणत

(८) मुलांना किंवा विद्यार्थ्यांना एकाद्या विषयाची माहिती सांगण्याचे कामीं दादांना मोठी हौस वाटे लहानपणीं आईनें काहीं शास्त्रीय विषयाबद्दल माहिती सांगावी व तिला विचारलें कीं, " ही माहिती तुला कोणी सांगितली ?" तेव्हा तिनें सांगावें कीं, "लहानपणीं दादा आम्हास पुष्कळ वेळा माहिती सांगत असत," यावरून त्यांची ही सवय पूर्वीपासून असे असें दिसतें विशेषत हुशार विद्यार्थ्यांस शिकविण्याची त्यांस फार हौस वाटे उदाहरणार्थ, बडोद्याच्या बापटसाहेबांचे चिरंजीव रा प्रभाकर वासुदेव बापट यास मुद्दाम बोलावून पुष्कळ माहिती ते सांगत असत माहिती सांगताना विषयाशीं तादात्म्य झाल्यामुळें त्यांत काळवेळाचेंहि भान रहात नसे एकदा सिंहगडावर असताना दादांचें जेवणखाण करण्याची व्यवस्था सौ० सौ० आक्का, धाकट्या मावशी ( डॉ साने यांच्या पत्नी ) यांचेकडे होती सिंहगडावरून सध्याकाळीं फिरून आल्यावर निरनिराळ्या विषयांवर गोष्टी निघत व त्या जेवणाच्या वेळपर्यंत व जेवतानांहि चालत त्यामुळें त्यांचें जेवणाकडे लक्ष जात नसे यामुळें जेवताना कोणताहि विषय काढावयाचा नाहीं, अशी सौ० आक्कानें आम्हास सूचना दिली होती कारण काहीं विषय निघाला कीं, बोलण्याचे भरात दादा नीट जेवत नसत पण या सूचनेचा फारसा उपयोग झाला नाहीं कारण, आम्ही विषय काढला नाहीं तर तेच काढीत ! बोलण्याप्रमाणे पुस्तक वाचतानाहि त्यांचें मन फारच गढून जात असे पुष्कळ वेळा असें होई कीं, चहा आणून ठेवून व सांगून गेलें तरी " हू " म्हणून ते वाचनातच गर्क रहात व त्या समाधींतून जागे होईपर्यंत चहा थडगार होत असे मग पुन आणावयास सांगत असा तीन तीन वेळा चहा थड झाल्याचे प्रसग आठवतात

(९) माणसांना ओळखण्याचे कामींहि त्यांची स्मरणशक्ति दिसून येई चिरोल केसचे वेळीं त्यांचेभोवतीं गुप्त पोलिसांचा सुळसुळाट झाला होता चिरोलच्या वाजूनें काहीं पुरावा मिळतोयास पहावा हा त्यांचा हेतु असावा त्यापैकीं एका गुप्त पोलिसास ' तू मला अमुक गावीं अमक्या ठिकाणीं गर्दीत नमस्कार करावयास आला होतास " असें त्यांनीं सांगितलें ! यामुळें तो बिचारा फजीत होऊन निघून गेला

(१०) गुप्त पोलिसानांहि दादा सौजन्यानें वागवीत उदाहरणार्थ, कांहीं गुप्त पोलिस सिंहगडावर येत तेथें त्यांची उतरण्याची वगैरे सोय नसे. तेव्हा त्यांची जेवण्याची व निजण्याची आपल्याच बगल्यात सोय करून त्यांची ते सामोपचारानें बोळवण करीत चिरोल केसचे वेळीं असाच एक गुप्त पोलिस साधूच्या वेषानें सिंहगडावर आला होता त्यानें असें सांगितलें कीं, " कोल्हापूरकडील पहाडात

माझा गुरु राहतो इत्यादि वगैरे जमवून इंग्रज सरकाराविरुद्ध बंड करण्याची त्याची तयारी चालू आहे व आपला सल्ला त्याना पाहिजे आहे" टिळकांनी या साधू बुवाना सांगितलें, आपण कोण आहात हें मी ओळखलें असो आता आपण येथेंच भोजन करून व झोंप घेऊन सकाळच्या थंड वेळीं गडाचे खालीं उतरा मला आपल्या गुरूना कांहींएक सल्ला द्यावयाचा नाहीं"

(११) सौजन्याबद्दल तर टिळकांची प्रसिद्धि आहेच त्यांचे घरीं नेहमीं येणाऱ्या जाणाऱ्या पाहुण्यांची गर्दी असावयाची, व पाहुण्यांची सर्व व्यवस्था नीट ठेवण्या बद्दल ते दक्ष असत व बाबा विद्वांस यांजपाशीं सर्व व्यवस्थेबद्दल चौकशी करीत किस्येक पाहुणे तर महिना महिना राहत मुसलमान लोकहि त्यात असत व त्यांचें पान मोठ्या जेवरशा घरात पण निराळें मांडीत पुण्यास मुसलमानाची शिक्षणपरिषद झाली त्या वेळीं निरनिराळ्या ठिकाणाहून मुसल्मान आले होते ते भेटण्यास येत त्या वेळीं "आपण पुन आला तर माझे घरीं उतरा" असें बहुतेकास ते सांगत कोणी आला तरी प्रथम 'आपण उतरलात कोठें?' हा त्याचा प्रश्न असे व 'उतरण्याची सोय नसल्यास मजकडे या' असे सांगत कोणी कांहीं मदत मागण्यास आल्यास त्यास सहसा विन्मुख परत धाडीत नसत व कोणी पैसे आणून दिल्यास ते न घेता होमरूल फंडाकडे अगर पैसाफंडाकडे द्या म्हणून सांगत काहीं लोक कोठें दूरच्या प्रवासास जावयाचें म्हणजे विश्वासानें आपल्या पैशाची थैली टिळकाजवळ आणून देत ही निवळ ऐकीव गोष्ट नाहीं एकानें आणून दिलेले १४०० रुपये मी स्वत मोजून बांधून दिले होते एकदा एका अज्ञानाच्या इस्टेटीसंबधीं व्यवस्था करण्याचा प्रसंग असता त्यातील दागिन्याची याद करून त्याच्या सराफाकडून किंमती करण्यात आल्या त्या वेळीं त्या सराफानें असें सुचविलें कीं, यातील कांहीं आपल्याला पाहिजे असल्यास किंमत देऊन ठेवून घ्या यावर त्यानीं त्याचा निषेध केला व शक्य तितक्या लवकर हें विष येथून घेऊन जा असें सांगितल

ज्ञानप्रकाशात सारखी एक महिनाभर टीका चालली आहे, त्याला एका आर्टिकलात हे उत्तर आहे" असें टिळक म्हणाले तेव्हा गांधी म्हणाले कीं, "ज्ञान प्रकाशाचा खप फार थोडा, केसरीचा खप सर्वत्र आहे" टिळक म्हणाले, "म्हणून एकच आर्टिकल लिहिलें. शिवाय वर्तमानपत्रातील लिहिणें त्याच्या खपावर अवलंबून नसतें" असो गांधी गेल्यावर टिळक म्हणाले, "हा पक्का मिशनरी आहे"

(१३) यानंतरची मीं पाहिलेली भेट म्हणजे सिंहगडावरची. महात्माजी या वेळीं प्रकृति सुधारण्याकरिता सिंहगडावर आले होते त्यांचेबरोबर स्वामी आनंद, एक गुजराथी डॉक्टर, सरला देवीचा मुलगा दीपक व नैसर्गिक आरोग्याचे डॉक्टर ग. वे. केळकर वगैरे मंडळी होती ते नरोत्तम शेटचे बंगल्यावर उतरले होते. लवकरच त्यांना अहमदाबादेच्या सभाबद्दलची तार आल्यामुळें परत जावें लागलें. त्या वेळीं टिळकांच्या व त्यांच्या एकदोन मुलाखती झाल्या. दादाचे त्या वेळीं वृद्धावस्थेमुळे चालताना पाय बरोबर पडत नसत व वाट दिसत नसे म्हणून सिंहगडच्या दडकाळ वाटानीं सध्याकाळीं जाण्यास बरोबर कोणी मनुष्य लागे मीं त्यांना एके दिवशीं सध्याकाळीं गांधींच्या बंगल्याकडे घेऊन गेलों. त्या वेळीं बेझंटबाईंनीं पटेल यांच्याविरुद्ध कांहीं गैरसमज उत्पन्न केल्यामुळें, व पटेल इंग्लंडात असल्यामुळें त्यांनीच बेझंटबाईंस उत्तर दिलें होतें. यात बेझंटबाईंस "पूतना" असें म्हटलेलें होतें या कडक भाषेचा गांधींनीं निषेध केला बेझंटबाईंची चूक असली तरी त्या आपल्या प्रामाणिक समजुतीप्रमाणें वागत आहेत असें ते म्हणाले यावर टिळक म्हणाले कीं "पूतना देखील आपल्या प्रामाणिक समजुती प्रमाणेंच वागत होती पूतनेला तरी अप्रामाणिक कोण म्हणतो ? पण ती जशी श्रीकृष्णास मारण्यास आली होती तशाच बेझंटबाईहि आमचें डेप्युटेशनचें कार्य

आहात मी तुम्हा दोघांमधील दुवा होतो " असेर पुन दशात फिरून आल्यावर आठदहा दिवसांनीं भेट घेऊन चर्चा करण्याचें ठरलें

यानतरचा भेट अखेरचीच यात टिळक अत्यवस्थ हाते व शुद्धीवर नव्हते त्यानीं नुसता नमस्कार केला व ' When did you come ? ' (तुम्ही केव्हा आला ?) असा प्रश्न केला पुढें काहीं बोलण्याचा प्रयत्न ते करीत होते, पण त्यास बोलता आलें नाहीं नतर डॉक्टराचे सागण्यावरून गाधी बाहेर आले पुन त्यानीं बाबुराव गोखले यास आत पाठवून " मला काहीं ' मेसज ' सागावयाचा आहे काय " असें विचारावयास सागितलें व तें आत येऊन बाबुरावानीं विचारलेंहि पण टिळक उत्तर देऊ शकले नाहींत !

(१५) टिळक व नामदार गोखले याचाहि माझ्यासमक्ष एकदा भेट झाली होती हा प्रसग घडण्यास कारण झालीं तीं अशीं त्या वेळीं टिळक व बेझट याचें कॉग्रेस-समेटासबधीं बोलण चालल होत बेझटबाई सर्व्हंट ऑफ इडिया सोसायटींत उतरल्या होत्या त्याना भटण्यास म्हणून टिळक सोसायटींत गेले तेथेंच त्यानीं सहज गोखले आहेत काय म्हणून चौकशी केली व ते होतेच अर्थात् त्यास भेटून आल शिष्टाचाराप्रमाणें गोखल्याना परत भेट देणें प्राप्त झालें भेट खासगी स्वरूपाचीच होती गोखल आजारी होते व त्याना जिना चढण्यास त्रास होत असे म्हणून वाड्यातील दाराजवळच्याच खोलींत, हल्लीं ज्यानजरचें ऑफिस आहे तेथें, भेटण्याची व्यवस्था केली होती सुमारें दहापधरा मिनिटें बोलणें झाल त्यात सामा य गोष्टी झाल्या टिळकाप्रमाणें गोखल्यानाहि मधुमेह होता गोखल्यानीं मधुमेहाच्या डोक्यावर येणाऱ्या फोडावर ' Rasinol ' नावाचें मलम लावण्यास सागितल तें टिळक शवटपर्यंत वापरीत असत अखेर कॉंग्रेससबधीं गोष्टी निघाल्याच व वाद होतो असें वाटलें पण दोघांनीं विषय आवरता घेतला

[टीप —या भेटीसबधानें जास्त हकीकत स्वत टिळकानीं वर आल्यावर सागितली त्या वेळीं वर ऑफिसात दाकरराव ल्वाटे दत्तोपत लिमये, खाडिलकर व मी हाता टिळक वर येताच खाडिलकरानीं त्यास विचारलें " काय म्हणतात गोखले ? " यावर ' गोखले म्हणतात, तुम्ही कॉंग्रेसमध्य यऊ नका कान्स्टिट्यूशनच व आमच्या कॉंग्रेसमधील मडळींचें व तुमचें पटणार नाहीं ' असें टिळकानीं सागितलें यावर तुम्ही काय उत्तर दिलें असा खाडिलकर यानीं विचारल्यावरून टिळक म्हणाले, " मीं गोखल्यास असें स्वच्छ सागितलें कीं, कॉंग्रेस सर्वांची आहे ती काहीं कोणत्याहि एका पक्षाला आंदण दिली नाहीं मी प्रथम ' कंट्री ' (देश) तयार करणार कॉंग्रेसमध्यें येणार व कॉंग्रेस काबीज करणार आहे ' यावर खाडिलकर, ल्वाटे वगैरे मडळी विस्मित झाली हें

धोरण जरी टिळकांनीं आपल्या मनाशीं बांधून ठेवलेलें असलें तरी त्यांत यत्किंचित्‌हि गुप्तपणा न राखतां, प्रतिपक्षी भेटावयास आला असतां तें टिळकांनीं उघड बोलून दाखविलें, हें खरें केलें नाहीं, धोरण कृतींत येण्याचे आधींच त्याची विनाकारण वाच्यता झाली असा यानंतर रँग्लर यांच्या बोलण्याचा आशय होता त्यावर टिळकांनीं उत्तर दिलें कीं, " पूर्ण विचारांतीं जीं माझीं ठाम मतें झालीं असतात तीं मी प्रतिपक्षाला नेहमीं उघड व प्रथम बजावीत असतों आपलें धोरण प्रतिपक्षाला उघड करून त्याच्याशीं दोन हात करण्यांतच पुरुषार्थ आहे असें मला वाटतें ! "

स्वत टिळकांनीं ही हकीकत सांगतांना सदर लेखकानें ती प्रत्यक्ष ऐकली असल्यानें येथें दिली आहे—संपादक ]

(१६) टिळक आणि रँग्लर परांजपे यांची मात्र एकदाच उभ्या उभ्या भेट झालेली माझ्या आठवणींत आहे म्युनिसिपालिटीच्या निवडणुकीस रँग्लर परांजपे उभे राहिले होते गायकवाडवाड्या टिळकांचे हयातींतच राममाऊच्या नांवावर होता तव्हां राममाऊला मत होतें व तें मागण्यास रँग्लर परांजपे स्वत आले होते वाड्यांतील पुलाच्या तोंडाशींच त्यांची व टिळकांची गांठ पडली दोघांनीं एकमेकांस नमस्कार केल्यावर टिळक म्हणाले, " आपल्या सारख्यांना स्वत मताकरितां हिंडण्याची जरूर नाहीं "

(१७) गुप्त पोलिसांप्रमाणें पोलीस अधिकाऱ्यांशींहि टिळक सौजन्यानेंच वागत एकदा गायडर व दुसरे एक पोलीस अधिकारी सहज टिळकांकडे आले टिळकांनीं त्यांना प्रथमच हसत हसत विचारलें, " माझ्याकरितां कांहीं वारंट घेऊन आलां आहांत काय ? " त्यांनीं आपण नुसतें खासगी भेटीकरितां आलों आहों म्हणून सांगितलें बोलतां बोलतां योगशास्त्राबद्दलचीं चर्चा काढली त्या संबंधीं टिळकांनीं त्यांना सरळपणानें माहिती सांगितली पुढें एक " खोड्या शास्त्री " नांवानें प्रसिद्ध असलेल्या अनार्किस्ट योग्याची त्यांनीं गोष्ट काढली हा मनुष्य त्या वेळीं जर्मनींत किंवा अमेरिकेंत असावा त्याबद्दलची टिळकांना कांहीं माहिती आहे काय हें पाहण्याकरितां हे दोन पोलीस अधिकारी आले असावे टिळकांनीं सांगितलें, हा शास्त्री मला पूर्वी भेटला होता पण हल्लीं तो कोठें आहे हें मला माहीत नाहीं यापुढें फारसें संभाषण न करतां हे अधिकारी परत गेले

(१८) टिळकांच्या विनोदी भाषणासंबंधीं एक लहानशी गोष्ट सांगतों समुद्रांतील शंख, कवड्या वगैरे चित्रांभोंवतीं बसवून तसबीर तयार करतात, त्या सारखी एक टिळकांची तसबीर त्यांच्या मुलींनीं केली होती, व ती त्यांना दाखविली त्यावर ते म्हणाले, " भोंवतालीं हे लहान लहान शंख आणि मध्यें हा मोठा शंख म्हणून मला बसविलेंत वाटतें ! "

दिवसात कैफीयत तयार करून छापून दिली ही गोष्ट होय. या सातआठ दिवसात त्यांच्या प्रकृतीस अपाय होत आहे हें त्यांच्या नित्य सहवासातल्या माणसाना दिसून येत होतें पण एकदा अमुक काम, अमुक रीतीनें, अमुक दिवसात करावयाचेंच असा टिळकाचा निश्चय झाला म्हणजे त्यांस परावृत्त करणें कोणाचाहि शक्य नव्हतें व नेवटचें निमित्तकारण म्हणजे मुंबईचें श्री० चमनलाल यानीं त्याना मोटारींतून ' थोडेसें फिरावयास चला ' म्हणून पुष्कळ हिंडवून आणलें, त्यात त्यास वारा लागला तो सहन झाला नाहीं त्याच दिवशीं त्यानीं मला किरकोळ पत्रें लिहिण्याकरिता सरदारगृहात बोलाविलें होतें मी दुपारींच गेलों व पुष्कळ वाट पाहिली शेवटीं सध्याकाळीं सहाचे नतर ते परत आले पण " मला थोडीशी तापाची थुणथुण वाटते आहे, मी आता निजतों, पत्रें उद्या लिहू " असें म्हणून ते आतल्या खोलींत जाऊन निजले तों सडकून ताप भरला व त्याचेंच अखेरच्या आजारात पर्यवसान झालें

(२२) शेवटच्या बेशुद्धींत लोकमान्याची नेहमींची बोलण्याची विनोदी पद्धति व दाव हलविण्याची पद्धति कायम होती. फक्त अशक्तपणामुळें वाक्याच्या शेवटचे शब्द थोडे अस्पष्ट येत असत. सकाळचे वेळीं माणूस ओळखण्याइतकी अर्धवट शुद्धि असे, पण दुपारीं व रात्रीं तीहुद्धा नाहींशी होई. लोकमान्याचें शुद्धींतील बोलणें यापुढें ऐकण्याचें नशीबात आहे कीं नाहीं, याबद्दल मन साशक असल्यामुळे त्याचे निदान नेशुद्धींतील शवटचे शब्द ऐकावे अशीच भावना बहुतेकाची होती.

बुधवार ता २८ जुलै रोजीं दुपारपासून लोकमान्याची शुद्धि नाहींशी झाली. त्यापूर्वी आपण या दुखण्यातून बरे होणार असा त्याचा पूर्ण विश्वास होता. त्याच्या कन्या ज्या वेळीं प्रथम त्याना भेटण्यास आल्या त्या वेळीं ते त्याच्या नेहमींच्या विनोदी पद्धतीस अनुसरून म्हणाले, " पुन सगळ्या जमल्या का तुम्ही ? तुम्हाला उठल्यासुटल्या माहेरीं येण्याची सवयच आहे ' त्याचप्रमाणें त्याचे धाकटे चिरंजीव जेव्हा पुण्याहून आले त्या वेळीं लोकमान्य म्हणाले कीं, " मी मुळींच आजारी नाहीं तुला उगीच चार दिवस मुबईस घालवावयाचे होते म्हणून माझ्या आजाराचें निमित्त करून आलास असें वाटतें. "

ता. २७ जुलै रोजीं दुपारीं, लोकमान्यानीं घरच्या व्यवस्थेसबधानें काहीं बोलावें म्हणून श्री० धोंडोपत विद्वास यानीं सूचक प्रश्न केले. त्याचा भावार्थ लोकमान्यानीं जाणला व ते म्हणाले, " अरे तू वेडा आहेस मी अजून पाच वर्षे खास मरत नाहीं आज अकरा वाजता जरा ' Critical " होतें, पण आता ती वेळ गेली आता मी बरा होणार, भिण्याचें काहीं कारण नाहीं. "

ता २८ रोजीं दुपारीं डॉ गोपाळराव देशमुख औषध देत होते. औषधाचे दोन घोट घेतल्यावर गोपाळराव म्हणाले, " आता थोडें राहिलें, तेवढें घ्या. "

यावर लोकमान्य म्हणतात, " अहो, पुष्कळ पोटात गेलें म्हणूनच थोडें राहिलें. " त्याचप्रमाणें सायंकाळीं पाच वाजता गोपाळराव औषध देत असताना पुढील-प्रमाणें संवाद झाला:—

लोकमान्य—" आता मी तुमचीं औषधें घेणार नाहीं. उगीच त्रास का देता ? "

डॉ. गोपाळराव—" पण येवढें घ्या, पुन्हा देणार नाहीं. " यानंतर औषध घेऊन लोकमान्य म्हणाले कीं, " आता, यापुढें सर्व औषधाचे डोज डॉ. साठ्ये यास द्या; ते आमचे सेक्रेटरी आहेत. "

ता. २८ जुलै रोजीं रात्रौ ११ वाजता लोकमान्यांना दुसरें इंजेक्शन दिलें, त्या वेळीं झालेला संवाद असा:—

डॉ. नानासाहेब—आता इंजेक्शन देतों म्हणजे बरें वाटेल.

लोकमान्य—माफ करा, एक झालें तें पुरे, अजून हात दुखतो आहे.

डॉ. नानासाहेब—या हातावर नको असेल तर या दुसऱ्यावर किंवा पायावर देऊं. कोठेंही दिलें तरी चालेल.

डॉ. गोपाळराव—यानें तुमची उचकी थांबून तुम्हास उचकीमुळें होणारा त्रास कमी होईल.

लोकमान्य—अहो, त्रासाकरिताच तर परमेश्वरानें जन्म दिला आहे, सुखाकरिता नव्हे.

डॉ. गोपाळराव—तरी पण आज हें एक इंजेक्शन घ्या. पुनः तुम्हाला त्रास देणार नाहीं.

लोकमान्य—नको, उद्या मरावयाचें तें आजच मराल.

डॉ. वेलणकर—वेळ नाहीं लागणार.

डॉ. गोपाळराव—चटकन् होईल.

लोकमान्य—हे डॉक्टर्स लागले पुनः सिद्धसाधकपणा करायला.

डॉ. नानासाहेब—वेळ मुळींच लागणार नाहीं.

लोकमान्य—माणसाला मारता चटकन येतें, वेळ मुळींच लागत नाहीं. आमचे दाजीसाहेब खिद्रापुरावर चटकन् पशु मारून टाकीत असत. एका सेकंदात खलास.

याना विद्वांस—पण दादा, असें काय करता ? तुम्हाला सगळें ठाऊक आहेना. नानासाहेबसुद्धा असेंच सांगतात. ते तर आपल्या सगळ्यात शहाणे आहेतना !

लोकमान्य—तें खरें, पण तूं मला कां Support ( सपोर्ट ) करीत नाहींस ? याप्रमाणें संवाद चालू असतां डॉ. गोपाळराव यांनीं इंजेक्शन केलें.

(२३) रात्रीं व दुपारीं बेशुद्धींत ते पुष्कळच बोलत असत. कधीं संभाषणासारखें, तर कधीं व्याख्यानाच्या आवाजात, व्याख्यान दिल्यासारखें बोलत. त्यांचीं सर्वच वाक्यें लक्षांत राहणें अशक्य आहे. सर्वसाधारणरीत्या येवढें सांगतां येईल कीं, या चार दिवसांत खासगी सांसारिक गोष्टींविषयीं ते एक शब्दहि बोलले नाहींत. त्यांच्या डोक्यांत सर्व सार्वजनिक गोष्टीच घोळत होत्या. अंतकालच्या बेशुद्धींतसुद्धां आपल्या अंगीकृत कार्याशिवाय इतर कोणतीहि गोष्ट मनांत न येणें ही कर्मयोगांतल्या समाधीची पराकाष्ठा होय. आम्हांस जीं वाक्यें कळलीं तीं यापुढें दिलीं आहेतः—

ता. २८ जुलै रोजीं रात्रौ—

" १८१८ सालीं असें झालें—परवां हें १९१८ साल आलें—A hundred year's history—आम्ही हे असे हीन झालों. "

" पंजाब Matter मध्यें तुम्ही काय करणार ? पटेल यांस तार केली काय ? आम्ही Special कॉंग्रेस भरवणार आहोंत. "

ता. २९ जुलै रात्रौ १ वाजतां व्याख्यानाच्या भरांत—

" माझी अशी खात्री आहे आणि आपणहि विश्वास बाळगा कीं, हिंदुस्थानाला स्वराज्य मिळाल्याखेरीज तरणोपाय नाहीं."

रात्रौ २ वाजतां व्याख्यानाच्या भरांत—

" आपण व जनता यांनीं जे परिश्रम केले त्याबद्दल मी आपले आभार मानतों. "

ता. ३० पुढें त्यांचें बोलणें अस्पष्ट होऊं लागलें व तें अगदीं जवळच्या माणसास देखील समजेनासें झालें. ते शेवटपर्यंत शुद्धीवर आले नाहींत. मरणसमयीं त्यांची मुद्रा अत्यंत शांत होती.

## सदाशिवशास्त्री भिडे

[ भिडेशास्त्री हे वयाच्या पाचव्या वर्षी अंध झाले, तथापि त्यांनी लोकांकडून वाचवून घेऊन शेकडों ग्रंथांचें अध्ययन केलें ते नामांकित प्रवचनकार आहेत वेदांतशास्त्रांत ते निष्णात आहेत मुंबई ]

(१) शके १८३९ च्या भेटींतील हकीकत. गीतेच्या वाक्यार्थासंबंधीं चर्चा चालू असता त्या आठवड्यात ज्या कांहीं अवांतर गोष्टी घडून आल्या, त्यांपैकीं पुणेकरांनीं केलेला श्रीशंकराचार्यांचा सत्कार व सदर प्रसंगीं झालेलें लोकमान्यांचें भाषण ही गोष्ट लक्षात राहण्याजोगी होती या बाबतींत वर्तमानपत्रांनीं फारसें मन घातलें नव्हतें, तरी पण त्या वेळीं आचार्यांच्या मठात चाललेली खटपट बरीच महत्त्वाची होती यात संशय नाहीं त्यासंबंधीं बोलताना लोकमान्य असें म्हणाले कीं, शंकराचार्यांना पैसे दिले तरी त्या पैशाचा विनियोग कसा होतो हें आम्हास कळणें अत्यंत अवश्य आहे, असें आता लोकांना वाटू लागलें आहे हें लोकांच्या मनोवृत्ति जागृत झाल्याचें लक्षण होय लोकांनीं जर निरनिराळ्या कामात लक्ष घालण्यास प्रारंभ केला, तर त्यायोगानें प्रातिनिधिक तत्त्वाची सवय होऊन दानधर्माला इष्ट वळण लागण्यास उशीर लागत नाहीं ज्या दिवशीं सकाळीं आमचें हें बोलणें चाललें होतें त्याच दिवशीं तिसरे प्रहरीं आचार्यांचे मठात सभा भरावयाची असें ठरलें होतें श्रीशंकराचार्य मठ संकेश्वर, पूर्वाश्रमीचे वेदमूर्ति शेंडे, गुरुस्वामी व शिष्यस्वामी, या दोघांपैकीं स्वाऱ्या त्या वेळीं पुण्यास आल्या होत्या तो भाद्रपद शुद्ध एकादशीचा दिवस असावा असें वाटतें. तिसरे प्रहरीं चार वाजता याच सुमारास श्रींच्या सत्कारास्तव भरलेल्या सभेस सुरुवात झाली. सभेंत दाखल झाल्यावर प्रथम शास्त्री वैदिक मंडळींनीं "दीर्घतमाममहेयो" या मंत्रानें श्रींस पूजाद्रव्य अर्पण केल्यावर लोकमान्यांनीं श्रींना पूजा व दक्षिणा समर्पण केली व ते बोलावयास उठले तेव्हा म्हणाले, "मठदेवता सन्यस्त आहे, तिला पैशाची जरूर नाहीं, पण मठाचा कारभार पैशावाचून चालत नाहीं श्रींची जहागीरी जस असल्यामुळें सर्वच कारभार लोकाश्रयावर येऊन बसला आहे त्यामुळें संस्थानामार्फत होणाऱ्या सर्व कार्यांत किंवा व्यवस्थेंत लोकांची इच्छा काय आहे हें पाहणें युक्त आहे श्रींच्या संस्थानाविषयीं लोकांच्या अंत करणातील अभिमान जागृत व्हावा अशा बेतानें मठाची व्यवस्था लावण्याकरिता पुणेकरांनीं एक योजना तयार करण्याचें मनात आणलें आहे, व या योजनेस श्रींनें अनुमोदनहि मिळालें आहे. तरी लवकरच श्रींच्या आशेसहवर्तमान ही योजना प्रसिद्ध होऊन त्या दिशेनें मठाच्या कार्याला सुरुवात होईल.

दुसरे दिवशींच्या भेटींत वरील सभेविषयीं गोष्टी निघाल्या असतां खुद्द मठस्थ आचार्यांच्या मनातच खरी कळकळ उत्पन्न झाल्यापेरीज असल्या सभाचा

किंवा भाषणाचा काहींएक उपयोग व्हावयाचा नाहीं, असें लोकमान्यांनीं स्पष्ट बोलून दाखविलें, आणि अखेरीस तेंच कसें खरें ठरलें, हें येथें निराळें सांगावयास नको

(२) यानंतर विलायतेला जाण्याचे वेळीं एकदोन वेळेस लोकमान्यांच्या भेटीचा प्रसंग आला त्या वेळीं राजकारणाविषयींहि काहीं गोष्टी निघत होत्या. विलायतेला जावयाच्या डेप्युटेशनसंबंधानें मतभेद, आतल्या आत बराच धुमसू लागला होता या बाबतींत बझटबाईचें नाव बऱ्याच प्रामुख्यानें येत असे ज्या बाई राष्ट्रीय पक्षास इतक्या अनुकूल झाल्या होत्या, त्यांनीं एकाएकीं टोपी फिरवलेली पाहून लोक आश्चर्यचकित झाले असले तर त्यांत नवल कोणतें ! याविषयीं लोकमान्यांच्यापुढें मंडळींत बरीच भवति न भवति चालली होती मींहि लोकमान्यांना या बाबतींत प्रत्यक्ष प्रश्न विचारून म्हटलें, " हें असें होतें तरी कसें ! काहीं माणसें पूर्वी अनुकूल असतात तींच आता एकदम प्रतिकूल कशीं होतात ! हीं माणसें पूर्वी अनुकूल का होतीं, याविषयीं लोकांना फारशी जिज्ञासा उत्पन्न होत नाहीं, पण जेव्हा तीं प्रतिकूल होतात तेव्हा मात्र लोकांची जिज्ञासा अनावर होते, अशा वेळीं प्रतिकूलतेचीं म्हणून जीं कारणें पुढें येतात, तीं तर मुळींच समाधानकारक नसतात त्यामुळें तर लोकांच्या कल्पनेस अधिकच चेव येऊन ज्याला जें सुचेल तें तो बोलू लागतो " माझें हें बोलणें ऐकून लोकमान्यांनीं " निमित्तापाये अति नैमित्तिकस्याप्यपाय " ही व्याकरणांतली परिभाषा म्हणून दाखविली, आणि सांगितलें कीं, अशा लोकांची अनुकूलता किंवा प्रतिकूलता ही नैमित्तिक असते कित्येक लोक केवळ कीर्तीकरिताच राष्ट्रकार्यांत पडतात, आणि ज्या पक्षाच्या वतीनें काम केलें असता अधिक कीर्ति मिळेल असें त्यांना वाटतें त्या पक्षात ते सामील होतात व याच दृष्टीनें त्यांना पूर्वी स्वीकारलेला पक्ष सोडूनहि द्यावा लागतो कीर्तीची प्रबल इच्छा हें त्या परत्योरीचें मुख्य निमित्त होय केवळ कीर्तीवर नजर ठेवून राष्ट्रकार्य करणें हें मोठेंसें उच्चतम नसलें तरी निंद्य मात्र खास नव्हे " उदाराः सर्व एवैते " हा गीतावाक्याचा न्याय लोकांनीं नेहमीं लक्षात ठेवावयास पाहिजे अशाप्रकारे कीर्तीला भुकेलेली मंडळी निरुपयोगी असतात असें मुळींच नाहीं. आजपर्यंत त्यांचा पुष्कळच उपयोग झाला आहे, म्हणून त्यांच्या लोकेषणेकडे दुर्लक्ष करणेंच श्रेयस्कर असतें, परंतु त्यांच्याकडे असें दुर्लक्ष केलें जात नाहीं त्यामुळें हीं माणसें बिथरतात आणि कार्याचा मात्र विघात होतो

(३) दुसऱ्या एका प्रसंगीं लोकमान्यांनीं लिहिलेल्या " ओरायनच्या " जुन्या आवृत्तींतील " नित्यानि छदांसि " या पातंजल महाभाष्यातील उताऱ्यासंबंधीं चर्चा निघाली होती. स्वामी विवेकानंदांनीं वेदांच्या नित्यत्वाबद्दल परंच मोघम

प्रतिपादन केलें होतें. परंतु वैदिक वाङ्मय नित्य व अपौरुषेय आहे, असें पूर्व मीमांसाकारांचें मत आहे व त्याला अनुसरूनच पुराणमतवादी लोकांचा सर्व साधारणपणें ग्रह झाला आहे. शब्दद्वारा वेदाचें नित्यत्व मानून स्वामीजींनीं जुन्या मताशीं जुळतें घेतलें आहे व भाष्यकार पतंजलींची देखील, अशीच शैली वरील उताऱ्यास दिसून येत होती. यावरून प्राचीन व अर्वाचीन लोकांचें वेदाच्या नित्यत्वाबद्दल मत सारखेंच आहे असा क्षणभर भास होतो. परंतु ही गोष्ट खरी नाहीं, यांत मतभेद अगदीं स्वतंत्र आहे. मीमांसक आनुपूर्वीस म्हणजे अक्षरश: शब्दरचनेस नित्यत्व मानतात तर भाष्यकारादि शास्त्रकर्ते किंवा आधुनिक सुशिक्षित लोक त्यांतील ज्ञान नित्य आहे असें म्हणतात, असा या दोन मतांत जमीन अस्मानाचा फरक आहे. यावर लोकमान्य म्हणाले कीं, मीमांसकाचें मत कोणत्याच शास्त्रकर्त्यांना पसंत पडलें नाहीं. आनुपूर्वीचें नित्यत्व सिद्ध करण्याविषयीं मीमांसकांनीं जी ओढाताण केली आहे ती तर अगदींच उपेक्षणीय आहे आणि म्हणूनच "धाता यथापूर्वमकल्पयत्" या श्रुतीचा अर्थदेखील भाष्यकाराच्या धोरणाप्रमाणेंच लावणें जरूर आहे, म्हणजे अर्थाच्या दृष्टीनें किंवा ज्ञानाच्या दृष्टीनेंच वेदाचें नित्यत्व सिद्ध करणें उक्त आहे. यावर मीं विचारलें कीं, तडजोडीची खटपट करून मतैक्याचा आभास उत्पन्न न करतां आनुपूर्वीचें अनित्यत्व व वेदाचें पौरुषेयत्व सिद्ध करण्याचे बाबतींतील नैय्यायिकाची स्पष्टोक्तीच अधिक प्रशंसनीय नव्हे का? लोकमान्य म्हणाले, अगदीं निःसंशय. या बाबतींत नैय्यायिकांनीं भ्रामक असें कांहींच लिहिलेलें नाहीं, याबद्दल ते प्रशंसेस पात्र आहेत परंतु या साध्या प्रश्नाचा निर्णय करतांना देखील नैय्यायिकांनीं आपल्या नेहमींच्या वहिवाटीस अनुसरून शब्दाचा जो कीस काढला आहे, त्यामुळें नैय्यायिकाचा हा निर्णय दुर्बोधपणाच्या अंधारांतच पडून राहिला आहे. ही गोष्ट त्यांनीं जर साध्या भाषेंत सांगून ठेवली असती तर तिचा पुराणमतवादावर पुष्कळच प्रकाश पडला

सकाळीं ८ ते ११ व दुपारीं २ ते ५ असे वादविवादाला बसत असू. समापणाचे वेळीं तसेंच काहीं महत्त्वाचें कारण असल्याखेरीज आपणास कोणींहि हाक मारू नये अशी लोकमान्यांनीं आपल्या मंडळीस ताकीद दिली असावी, असें वाटतें. कारण, आम्हाला अगदीं निर्वेधपणें चर्चा करण्यास वेळ मिळत असे. त्यांची वादविवादाची पद्धति शांत पण पूर्ण निर्णयात्मक अशी असे. माझ्याशीं वादविवाद करतांना लोकमान्यांनीं जो शांतपणा व मनाचा मोकळेपणा दाखविला तो शब्दांनीं वर्णन करण्यास मी असमर्थ आहे. वादाचे बाबतींत लोक म्हणतात तसा दुराग्रह मला कोठेंहि दिसून आला नाहीं, इतकेंच नव्हे तर काहीं स्थळीं मीं पुढें मांडलेली कल्पना कबूल करून श्लोकाचे अर्थहि त्यांनीं बदलले. चर्चेचा विषय शास्त्रीय असल्यामुळे मीमांसा, वेदांत व अलंकार या शास्त्रांतील त्यांचें प्रावीण्य फारच लोकोत्तर होतें, असें माझ्याहि पूर्णपणें प्रत्ययास आलें. मी शास्त्री असून पहिल्यापासून अध्यापनाचा व्यवसाय करणारा होतो, तथापि गीतेंतील एखादें पद कोणत्या शास्त्रांत, कोणत्या प्रकरणांत आलें आहे, यांविषयीं त्यांच्या स्मरणशक्तीनें तर मला पूर्ण आश्चर्यचकित करून सोडलें. आतां या वेळीं एकच स्थळ आठवलें आहे, तें असें कीं, शारीर हा शब्द वेदांतसूत्रांत कोठें आला आहे, असा प्रश्न निघाल्याबरोबर अंतर्याम्यधिकरणामध्यें तो असावा, असें लोकमान्यांनीं चटकन सांगितलें, व मला दुसऱ्याच अधिकरणांत असावासा वाटला, असें मी म्हटल्यावरून लोकमान्यांनीं शांकरभाष्याचें पुस्तक चटकन् कपाटांतून काढून आणलें, व अंतर्याम्यधिकरणांतील सूत्र वाचून दाखविलें व तुम्ही म्हणतां तें स्थळ दुसरें नसून शांकरभाष्यांतच आहे असें सांगून तोहि भाष्याचा भाग

पडली आहे हा मत्रलिंगाच्या कल्पनेचा अतिरेक होय वास्तविक मत्रातील यती नाम् हें पद अपाम् याचें विशेषण आहे, आणि म्हणूनच यति हे स्त्रीलिंगी वर्तमान कालवाचक धातुसाधित पदाचें बहुवचन आहे परतु इकडे कोणीहि लक्ष देत नाहीं चिकित्सक पद्धतीनें वैदिक वाङ्मयाचें अध्ययन सुरू झाल्याखेरीज या गोष्टी लोकाच्या लक्षात यावयाच्या नाहीत

(६) एकदा न्यायशास्त्राविषयीं एका वदातग्रथात आलेली टीका पाहत असता पुढीलप्रमाणें भाषण झालें हे ग्रथकार म्हणजे पडित वाचस्पतिमिश्र होत नैय्यायिकाचें खडण करताना सदर मिश्रमहाशयानीं नैय्यायिकावर बरेच कोरडे उडविले आहेत व लोकमान्यानीं देखील गीतारहस्यामध्यें नैय्यायिकाच्या भाषेच्या द्राविडी प्राणायामाबद्दल थट्टा केली आहे लोकमान्याची न्यायशास्त्रावर विशेषशी मर्जी नव्हती, हें मनात येऊन मी किंचित् रागानेंच म्हटलें "प्राचीन व अर्वाचीन वेदात ग्रथकारानीं विवेचनपद्धति बहुतेक नैय्यायिकाचीच घेतली आहे असें असून त्याचेसबधीं कडक भाषा वापरणें, हा निवळ कृतघ्नपणा नव्हे काय ?" तेव्हा लोकमान्य हसून म्हणाले, "अहो, एखादा मतभेद दर्शवितांना लेखक विरुद्ध मतावर जी टाका करतो, त्याचें कारण त्या मताविषयीं किंवा शास्त्राविषयीं अनादर किंवा तिरस्कार दर्शविणें हें नव्हे, तर स्वत च्या व दुसऱ्याच्या मतातील फरक वाचकाच्या स्पष्ट लक्षात यावा हेंच त्याचें खरें कारण होय, आणि याचकरिता मीं देखील सन्यास मार्गावर प्रसगविशेषीं कडक टीका केली आहे वास्तविक आद्य श्रीशकराचार्यां विषयीं माझी फार पूज्यबुद्धि आहे बौद्धधर्माच्या पडत्या काळीं बौद्धभिक्षूच्या नैतिक अध पाताबरोबर सबिंध राष्ट्राचा अध पात होण्याची वेळ आली होती परतु आचार्यांनीं आपल्या तीव्र वैराग्यानें व अलौकिक बुद्धिवैभवानें ज्ञानवैराग्य सपन्न असे सन्यासी उत्पन्न करून नैतिक अध पतनापासून राष्ट्राचा बचाव केला "

(७) एके वेळीं बुद्धीच्या साम्याविषयीं चर्चा सुरू असता लोकमान्यानीं बुद्धीच्या समत्वाचें वर्णन पुढीलप्रमाणें केलें, "मनुष्यास हर्षोत्पादक अगर शोकजनक अशी कोणतीहि परिस्थिति प्राप्त झाली, तरी त्या परिस्थितींत हर्षानें हुरळून न जाता किंवा दु खानें न गागरता स्वत च्या आध्यात्मिक उन्नतीकरता अगर लोककल्याणाकरिता प्राप्त परिस्थितींत जें करता येण्यासारखें असेल तें शात चित्तानें करीत राहणें, हीच बुद्धीची खरी साम्यावस्था होय असें मी समजतों मला गीताशास्त्राचें चिंतन करण्याची फारच हौस होती, परतु तिकडे लक्ष देण्यास वेळ कसा तो मिळतच नसे, पण बरें झालें कीं, सरकारनें मला पाचसहा वर्षे तुरुगाच्या एकातवासात नेऊन ठेविलें हा पाचसहा वर्षांचा काल निर्वेधपणें मिळाला म्हणूनच मला गीतेचा सागोपाग विचार करून गीतेसबधीं मला काय वाटतें, हें लोकास समजावून देण्याची तजवीज करता आली " लोकमान्याच्या

तोंडचीं हें अक्षरें ऐकून सामन्या डोळ्यांतून घळघळा अश्रु येऊ लागले तेव्हां लोकमान्य हसून म्हणाले, "शास्त्रीबोवा, यांत तुम्हांला विशेष तें काय वाटतें! अडचणीचे प्रसंगीं जर आपली बुद्धि शाबूत ठेवता आली तरच कांहीं योग साधला, असें समजावयाचें, नाहीं तर "मुत्ये को वा न पंडित ?"

(८) लोकमान्य दुसऱ्या वेळीं विलायतेस जावयास निघाले, त्या वेळीं मी पुणें मुक्कामीं त्यांची भेट घेण्यास गेलों होतों प्रथम गीतेसंबंधानें कांहीं थोडेंसें बोलणें झाल्यावर त्यांच्या प्रवासाबद्दल गोष्टी सुरू झाल्या लोकमान्यांची अशक्तता, विलायतेंतील कामाचा त्रास व बाढेची दगदग इत्यादि कारणामुळें आपल्या प्रवासा बद्दल लोकांस फारच काळजी वाटत आहे, असें म्हटल्यावरून लोकमान्यांनीं महाभारतांतील पुढील श्लोक म्हणून दाखविला —

"न साहसमनारुह्य नरो भद्राणि पश्यति।
साहसं पुनरारुह्य यदि जीवति पश्यति ॥"

प्रवासाची दगदग सहन होऊन इंग्लंडमध्यें कांहीं काम करता आलें तर देश सेवेचें तेवढेंच स्वधर्माचरण घडेल, पण प्रवासाची दगदग न सहन झाल्यामुळें मरण आलें तरी हरकत नाहीं कारण, कर्तव्य करीत असतांना कोठेंहि आणि केव्हांहि मृत्यु आला तरी तो काशीक्षेत्रांतील मरणाप्रमाणें मोक्षप्रदच होतो बरोबर वैद्य अगर डॉक्टर घेतला नाहीं, त्याबद्दल विचारतांना लोकमान्य बोलले कीं, हिंदु स्थानापेक्षां इंग्लंडातच डॉक्टर जास्त आहेत आयुष्याची दोरी तुटली तर इंग्लंडचे डॉक्टर व हिंदुस्थानचे वैद्य दोघेहि सारखेच!

---

## बाळकृष्ण शिवराम मुंजे

[ एल् एम् अँड एस् डॉक्टर, नेत्रवैद्य, राष्ट्रीय पक्षाचे व स्वराज्य पक्षाचे एक प्रमुख पुढारी, नागपूर ]

(१) १९०० सालाची गोष्ट असेल त्या वर्षी रायगडावर श्रीशिवाजीचा उत्सव मोठ्या प्रमाणावर लोकमान्यांच्याच प्रेरणेनें करण्यात आला होता त्या उत्सवास मी आणि माझे मित्र डॉ श्रीधर भिकाजी जठार, डॉ कृष्णराव मोरेश्वर पारधी ( हे हल्लीं दोघेही विलायतेस स्थायिक होऊन राहिले आहेत ) यासह हजर होतों मी आणि डॉ पारधी हे नुकतेच डाक्टरी पास होऊन मुंबई म्युनिसिपा लिटीमध्यें प्रेग ऑफिसर या जागेवर नोकर होतों तोंपर्यंत मी टिळकांना पाहिलें नव्हतें, निदान हेच टिळक म्हणून ओळखत नसे रायगडावर एक दिवस सकाळीं दहाच्या सुमारास आम्ही गगासागर तळ्यावर स्नानास गेलों पोहता येत होतें म्हणून पोहण्याच्या नादात होतों इतक्यात टिळक तेथें स्नानास आले त्या वेळेस रा तात्यासाहेब केळकर हे स्नान करून लाल सोवळें नेसून डोक्यावर छत्री धरून पाण्याजवळ घाटावर उभे होते लोकमान्य स्नान करू लागले तेव्हा त्याचें लक्ष आम्ही पोहत असताना आमच्याकडे गेलें त्यांनीं आमच्यासबंधीं विचारपूस केली व टिळक आले असें कळताच आम्हीहि तीरावर टिळकाजवळ आलों त्यांनीं आम्हास आमच्या पोहण्याविषयीं विचारलें टिळक आम्हास म्हणाले, ही नरसोपंताची छत्री दोनहि हातात धरून केवळ पायानें पोहत या तळ्याचे पार जावें आम्ही तसा प्रयत्न केला पण मध्यातूनच परत आलों, पार जाऊ शकलों नाहीं नतर लोकमान्यांनीं ती छत्री आपल्या दोनहि हातात धरून केवळ पायानें पोहत पर तीरास गले आणि परत आले आम्ही हें पाहून थक झालों पूर्वीपासूनच त्यांच्याविषयीं आदर, अभिमान व स्नेह आमच्यात होताच, परतु हें पाहून आमच्या मनात आश्चर्य व प्रेमाचें भरतें आलें

(२) १९०६ सालीं आम्ही—टिळक, खापर्डे, मी व इतर काहीं मडळी—कलकत्त्यास शिवाजीच्या उत्सवाकरिता जात होतों गाडींत बसल्यावर अनेक विषयावर चर्चा सुरू झाली गोष्टी चालता चालता के० गोपाळराव गोखले याज विषयीं गोष्ट निघाली पुण्याचे प्रेगसबधानें गोखले यांनीं विलायतेस जी विधानें केलीं होतीं तीं विनाकारण त्यांनीं हिंदुस्थानात परत आल्यावर परत घेतलीं ही मोठी चूक केली त्यांच्यावर काहीं तोहमत आली असती तर सर्व प्रकारचा पुरावा त्यांच्या समर्थनार्थ सादर करण्यात आला असता हीच गोष्ट पुढें चर्चेत चालू असता टिळक म्हणाले, " गोखले हे मनाचे थोडे कोवळे आहेत, निर्धास्त

नाहींत. स्वराज्यामध्यें यांना Foreign Secretary ची जागा कधीं देण्यांत आली नसती. Home Member चें काम यांनीं उत्तम प्रकारें केलें असतें."

(३) या शिवाजीच्या उत्सवप्रसंगीं कलकत्त्यास एकदा अलाहाबादच्या बंगाली हायकोर्ट जजाच्या मुलानें टिळकांस मेजवानी दिली होती. त्या वेळेस पान सुपारी घेत असतां शेजारचाच एक बंगाली गृहस्थ तेथें आला आणि टिळकांस बाजूस नेऊन मोठ्या नम्रपणें म्हणाला, मी ज्योतिषाचा अभ्यास केला आहे आणि तुमची पत्रिकाहि पाहिली आहे. माझ्या गणितावरून लवकरच एकदोन वर्षांच्या आंत आपणास तिसरा बंधनयोग आहे मी हेंच सांगण्याकरितां येथें आलों आहे माझा मुलगा आजारी असून मरणचरण स्थितींत आहे मी आतां जातों, असें म्हणून नम्रपणें नमस्कार करून तो निघून गेला मी या भाषणाचे प्रसंगीं टिळकांबरोबर होतों आणि हें सर्व भाषण माझ्या समोर झालें

(४) बेळगांव कॉन्फरन्सच्या वेळेस आम्ही सर्व मवाळांशीं तडजोड करण्याचे विरुद्ध होतों. आमचें म्हणणें असें होतें कीं, मवाळांकडून भरविण्यांत येत असलेली कॉंग्रेस ही कांहीं खरी व सर्व पक्षांची राष्ट्रीय कॉंग्रेस नव्हे सर्व पक्षांची मिळून खरी राष्ट्रीय कॉंग्रेस भरविण्यास येईपर्यंत कॉंग्रेसचें क्रीड जें मवाळांनीं ठरविलें आहे तें सर्वमान्य क्रीड होऊं शकत नाहीं आणि त्यांनीं आमच्या गैरहजेरींत केलेले नियम आम्हांस मान्य नाहींत टिळकांचें म्हणणें पडलें कीं राष्ट्रांत दोन कॉंग्रेस सभा भरविणें चूक होईल तेव्हां मवाळांशीं समेट करून त्या कॉंग्रेसमध्यें आपण आपला पहिल्या प्रथम शिरकाव करून घ्यावा, आणि नंतर आपल्या बहुमतानें आपल्या मनाप्रमाणें सर्व पुढें घडवून आणावें. हा अशा प्रकारें समेट करणें आम्हांस अपमानास्पद वाटे अशा स्थितींत आम्हांस बोलावणें आल्यावरून मी दादासाहेब खापर्डे यांजबरोबर पुण्यास गेलों. लोकमान्यांनीं माझी समजूत घालण्याचा पुष्कळ प्रयत्न केला, परंतु मी आपलें मत बदलूं शकलों नाहीं पुढें बेळगांवास आम्ही सर्व मिळून गेलों माझी लोकमान्यांचेच बंगल्यावर राहण्याची व्यवस्था करण्यांत आली तेथेंहि बळवंतरावांनीं माझें मन वळविण्याचा पुष्कळ प्रयत्न केला, परंतु व्यर्थ शेवटीं, ज्या दिवशीं हा समेटाचा ठराव येणार होता, त्या दिवशीं अगदीं सकाळीं प्रातर्विधि उरकण्याकरितां मी तयारींत असतां मला एके बाजूस एकटा पाहून बळवंतराव माझ्याजवळ आले आणि म्हणूं लागले, पहा, हा समेटाचा ठराव पास केल्यानें आपल्या पक्षाची पुढें सरशी होण्याचा फार संभव आहे. तरी, मध्यप्रांततर्फे मी या ठरावाचें समर्थन केलें पाहिजे. मी निक्षून म्हणालों, हें शक्य नाहीं माझ्या बुद्धीस पटत नाहीं, आणि मन मोकळें करून बोलावें तर मला असें वाटूं लागलें आहे कीं, कदाचित् आतां आपलें अवतारकृत्य संपलें. परशुरामाचा किंवा कृष्णाचा पराभव जसा झाला

सहीच वेळ आपलीहि आली आहे असें वाटतें आपली ही मोठी चूक होणार आहे, हें आपणास निक्षून सांगतो आता मात्र झालें आहे आताहि आपण सर्वांच्या विचाराप्रमाणें आपला विचार बदलावा बळवतराव म्हणाले, तुम्हाला अजून राजकारण समजत नाहीं मा म्हणतों तेंच करणें श्रेयस्कर होइल मी मनाचा उद्वेग आवरून म्हणालों, बळवतराव, आपण माझे गुरु आतापर्यंत अपाल्या विचारानें आमचें कल्याणच झालें आहे माझ्या बुद्धीला जरी आपलें म्हणणें बिल्कूल पटत नाहीं तरी आपण माझ्यापेक्षा अनत पटींनीं शहाणे आहात आपल्या शहाणपणावर आणि मुत्सद्दीपणावर माझा पूर्ण विश्वास आहे ही परीक्षेची वेळ आहे मी आपल्याविरुद्ध जाणार नाहीं अकल्याण होणारच असल तर होईल पण आपण ही चूक करात आहात, असें जरी मला वाटतें, तरी आपला इतका आग्रह आहे तर मी वचन देतो कीं मी आपल्याविरुद्ध जाणार नाहीं आणि या कॉंफरन्समध्यें आपल्याविरुद्ध जो पक्ष जोमान उभारण्यात येत आहे त्यात मी सामील होणार नाहीं परंतु सभेत मी भाषण करणार नाहीं बळवतराव म्हणाले, तुम्हाला व्यक्तश प्रत्यय यहल कीं या वेळस हट्ट करणें शहाणपणाचें आहे या धोरणानें गेल्यास दग होन वर्षांत आपल्या पक्षाची सरशी झाल्याशिवाय राहत नाहीं

कॉंफरन्स पुढें सपला लोक आपापल्या घरीं चर्चा करू लागले तिसऱ्या दिवशीं मुंबईच्या "टाइम्स" पत्रात अग्रलेख आला त्यानीं बळवतरावाचा मुत्सद्देगिरीचा कावा उघडकीस आणला आणि टाइम्सकार म्हणाला कीं, त्या सभेटाच्या ठरावानें टिळकानें कॉंग्रेस काबीज केली माझे डोळे उघडले बळवतरावाकडे जाऊन मी आपल्या थापड्रीत मारून घेतली आणि माझी चूक कबूल करून क्षमा मागितली बळवतराव हसले, आणि हें प्रकरण मिटलं

---

## मनोहर विष्णु काथवटे

[ बी ए एल्एल बी या टिळकांचे सहाध्यायी पेन्शनर सबजज्ज माइ ]

लोकमान्याचा व माझा विद्यार्थिदशेंतलि फार निकट सबंध आम्ही दोघेहि डेक्कन कॉलेजात असता त्या वेळीं हे पुढें असामान्य पुरुष होतील अशी कल्पना नव्हती तरी पण इतर विद्यार्थ्यांपेक्षा यांच्यात अलौकिक गुण होते हें त्या वेळींहि लक्षात आल्यावाचून राहिलें नाहीं कॉलेजात ते आले तेव्हा त्यांची शरीरप्रकृति

अत्यंत क्षीण होती, म्हणून त्यांनीं सर्व भर शरीरसंपत्ति मिळविण्याकडे दिला, व यामुळें त्यांस कधीं औषधाचें नांवहि घ्यावें लागलें नाहीं, व त्यामुळेंच अखेर-पावेतों त्यांना अचाट कामें करतां आलीं.

त्यांच्या व इतर विद्यार्थ्यांच्या वाचनाच्या रीतींत फरक होता. इतर विद्यार्थी ग्रंथ समजला म्हणजे तृप्त होतात, परंतु यांची तेवढ्यानें कधींहि तृप्ति होत नसे. ग्रंथकर्ता कितीहि जाडा विद्वान् असला तरी त्याचे विचार बरोबर आहेत किंवा नाहींत हें पाहण्याकडेच त्यांचें विशेष लक्ष असे. कोणी सहाध्यायी त्यांना म्हणे कीं, हा ग्रंथकर्ता जबर विद्वान् व दांडगा अधिकारसंपन्न असतांना त्याच्यापेक्षां तुम्ही जास्त शहाणे कीं काय? तर ते स्पष्ट सांगत कीं, होय, तोहि मनुष्य, मीहि मनुष्य; तो चुकीस पात्र नाहीं असें धरून कां चालावें? त्यानें म्हणणें सयुक्तिक आहे किंवा नाहीं हें आपण आपल्या बुद्धीनेंच ठरविलें पाहिजे. नाहींतर मग परमेश्वरानें दिलेल्या बुद्धीचा उपयोग काय? कॉलेजांत असतांना आपल्या मित्र-मंडळींनीं विड्या ओढलेल्या पाहून त्यांस त्याबद्दल अत्यंत तिटकारा येई. प्रेमानें ते त्यांचा निषेधहि करीत. पण तेच टिळक पुढें पोक्त वयाचे झाल्यावर आपला विडीबाज स्नेही घरीं आल्यास त्याकरितां बाजारांतून विड्या आणून ठेवीत! एलूएल्. बी चे अभ्यासासाठीं उपासनी, अप्पासाहेब शारंगपाणी, टिळक व मी असे डेक्कन कॉलेजांत कांहीं दिवस राहिलों होतों. तेव्हां त्याच वेळीं त्यांनीं आपला आयुष्यक्रम बहुतेक ठरवून टाकला होता. लोकांत राजकीय विषयाची जागृति करण्याकरितां शिक्षणाची स्वतंत्र संस्था स्थापून, जोडीला वर्तमानपत्र काढून, त्याची पूर्तता करणें हाच त्यांचा भावी आयुष्यक्रम निश्चित ठरला होता.

ते स्वभावानें निश्चयी व आग्रही होते तरी आपल्या स्नेह्यासंबंधानें फार कोंवळ्या मनाचे असत. प्रसंगविशेषीं अतिशय झीज सोसणारे होते. आमच्या स्नेह्यांत कृष्णाजी सदाशिव मराठे या नांवाचा एम्. ए. चा अभ्यास करणारा एक विद्यार्थी होता. मुंबईस वाळकेश्वरच्या रस्त्यावर एका भाड्याचे घरांत हुव करून सदर मराठे व आम्ही रहात होतों. एकदां मराठे हा शीतज्वरानें आजारी पडला. त्याला कै० डॉ० अण्णासाहेब पटवर्धन हे औषध देत होते. त्यांनीं आम्हां सर्वांस बजावलें कीं, याची शुश्रुषा फार काळजीनें करावयास पाहिजे. टिळक तेव्हां दुसऱ्या घरीं रहात होते. परंतु हें त्यांना कळल्याबरोबर ते आमच्या घरीं येऊन मराठे यांची शुश्रुषा करण्याकरितां अहोरात्र जागत असत व सर्व प्रकारची मेहनत स्वतः करीत. परंतु शेवटीं त्या दुखण्यांत त्याचा अंत झाला. टिळकांच्या मानसिक धैर्याचा एक मासला पाहण्यास सांपडला. तो असा कीं, सोनापुरांत (स्मशानभूमि) मराठे यांचें प्रेत नेल्यावर दहनाचे वेळेस सरणावर त्याच्या शरीराचा—गुडघ्याखालचा—भाग बाहेर पडला त्यावरही सर्व एकमेकांकडे टकमक पाहूं लागले; पण पटकन् टिळक मात्र पुढें होऊन त्यांनीं तो भाग

बोहून दुःखानें सरणांत टाकून दिला ! आम्ही २०–२५ जण तेथें होतों, पण त्यांपैकीं कोणाचेहि हातून ही गोष्ट झाली नाहीं. सांगण्याचा मुद्दा असा कीं, लोण्यापेक्षा मृदु व वज्रापेक्षा कठिण असें साधुसंताचें लक्षण कवि सांगतात हें या थोर पुरुषाच्या उदाहरणानें स्पष्ट होणारें आहे !

---

## लक्ष्मणशास्त्री लेले

[ प्रोफेसर न्यू पूना कॉलेज, व लोकमान्यांचे एक चहाते. ]

(१) साईमहाराजाच्या खटल्यांतून टिळक सुटले तेव्हां अभिनंदनार्थ मी त्यांना आग्रहानें भोजनास बोलाविलें. ते आल्यानें धन्यता वाटली. तेव्हां मी कै० परशुरामपंततात्या गोडबोले यांच्या घरीं राहत होतों, म्हणून त्यांच्या गोष्टी निघाल्या. तेव्हां टिळक म्हणाले, मी लहान असतां मोरोपंतांच्या कठीण आर्या घेऊन परशुरामपंततात्यांकडे पुष्कळ वेळां याच घरांत आलों आहे. तात्या हे मोठे काव्यभोक्ते व वाङ्मयव्यासंगी. त्यांच्या नाटकांच्या अनेक हस्तलिखित प्रती मीं पाहिल्या. त्यांचीं संस्कृत नाटकांचीं भाषांतरें अप्रतिम आहेत. मजजवळील काव्यप्रेमाचा भरणा पाहून टिळक म्हणाले, "हा आनुवंशिक संस्काराचा परिणाम आहे. बापाचा धंदा मुलानें करावा या मतांत पुष्कळच अर्थ आहे."

(२) नाशिक येथें प्रॉव्हिन्शियल कॉन्फरन्सचे वेळीं टिळकांचें एक व्याख्यान यशवंतराव महाराजांच्या छत्रीजवळ पटांगणावर झालें. त्या वेळीं टिळकांचे एक जुने मित्र बाबा कुलकर्णी यांनीं टिळकांच्या अभिनंदनार्थ काहीं कविता रचून आणलेल्या एका गृहस्थांनीं वाचून दाखविल्या. त्यावर टिळक बोलावयास उभे राहत असतां बाबा कुलकर्णी त्यांस म्हणाले, माझ्या नावाचा उल्लेख करूं नका. टिळक म्हणाले बरें आहे ! पण भाषणाच्या आरंभींच ते म्हणाले, "आताच कांहीं माझ्या स्तुतीनें भरलेलीं पद्यें येथें म्हणण्यांत आलीं. पण 'बाबा वाक्यम् प्रमाणम्' मानणारा मी नाहीं." अशा खुबीनें टिळकांनीं बाबा कुलकर्ण्यांची समाधाना केलीच ! !

---

## लक्ष्मण रघुनाथ भिडे

[ सत्याग्रहाश्रम, साबरमती, अमदाबाद. ]

मी पूर्वी एक महाराची शाळा चालवीत होतों. सांगलीच्या ज्योतिषसंमेलनाचे वेळीं माझ्या निमंत्रणावरून वेळांत वेळ काढून हरिपुरास जातांना लोकमान्य टिळक महारवाड्यांत आले, व त्यानें माझ्या कार्यास इतकें उत्तेजन मिळालें कीं, त्यामुळें अस्पृश्योन्नति हें माझें एक जिव्हाळ्याचें काम होऊन बसलें आहे. आज महात्माजींच्या चळवळींत मी जो थोडा भाग घेत आहें, त्याचें सर्व बीज लोकमान्यांच्या या परिचयांतच आहे.

---

## दत्तात्रय शिवराम शाळिग्राम

[ जपानला गेलेले स्कॉलर व करवीर सरकारचे एक नोकर. ]

मी शिक्षणाकरिता जपानला जाण्यास निघालों तेव्हा मी टिळकांची गांठ घेतली. तेव्हा उपदेश म्हणून त्यांनीं मला सांगितलें कीं, ज्याच्या योगानें स्वदेशाची संपत्तिक प्रगति होईल तेंच शिक्षण खरें उपयोगी. जपानांत तुम्ही शिक्षणाशिवाय इतर राजकीय उलाढालींत लुर्त पडूं नये. आमच्यासारख्यांनीं त्याकरिता आपलें आयुष्य वाहिलेलें आहे. तुमची विद्यार्थिदशा संपल्यावर तुम्हांसहि तें करणेंच आहे; पण त्याचा विचार मग करता येईल. परदेशांत स्वतंत्रपणें बोलावें, वागावें असें तरुण विद्यार्थ्यांना वाटतें, परंतु तो मोह तुम्ही तूर्त आवरला पाहिजे.

एके दिवशीं मी टिळकांकडे बसलों असतां "केसरींत" प्रसिद्ध करण्याकरितां बुद्धिबळाचा एक डाव त्यांचेकडे आला, तो त्यांनीं भूमितीच्या प्रश्नाप्रमाणें कागदावर पाहूनच तोंडानें सोडविला. पुढें गोष्टीवरून गोष्ट निघतां "सचित्र लंडन टाईम्स" मध्यें असे डाव येतात त्यावर "व्हाइट टु प्ले अँड मेट इन थ्री मूव्ह्ज"–पांढऱ्यानें प्रथम खेळून काळ्यावर तीन डावांत मात करावी–असें लिहिलेलें असतें असें मी म्हणालों. तेव्हा टिळक थट्टेनें म्हणाले, खेळांतसुद्धा पांढऱ्यानें काळ्यावरच मात करावी हें काय म्हणून ? खेळांतहि काळ्याचा पांढऱ्यावर डाव होऊ नयेच कीं काय ? आणि "केसरींत" येणाऱ्या डावाची परिभाषाहि या बाणेदार उत्तरांतील धोरणास अनुसरूनच असे.

---

## नीलकंठराव पाटणकर

[ बी. ए. एलएल्. बी. वकील, नाशिक; टिळकांचे एक जुने शिष्य. ]

टिळकांच्या कायदेपंडितगिरीचा मला ज्या खटल्यांत अनुभव आला तो विठ्ठलराव विरुद्ध रामराव विंचूरकर ( २ मुंबई लॉ-रिपोर्टर पान १२९ ) या कामीं मिताक्षरेनें सावत्र आणि सख्खा असा फरक भावांच्या वारसहक्कांत करून सख्खा भाऊ हा अधिक जवळचा वारस व तो नसल्यास सावत्र भाऊ वारस होतो असा नियम ठरविलेला आहे. या नियमांतील मूळ तत्व धरून सख्खा चुलता अधिक जवळचा व तो नसल्यास सावत्र चुलता, असा वारसाचा निर्णय करावा, किंवा सख्खा आणि सावत्र हा भेद न करतां सख्खा व सावत्र चुलता हे दोघेहि एकाच स्थानावर असल्यामुळें दोघेहि समसमान हक्कानें वारस व्हावे, असा कायद्याचा प्रश्न या मुकदम्यांत होता व मिताक्षरेनें काढलेला भेद किती लांबपर्यंत म्हणजे कोणकोणत्या नात्यातून किंवा पिढ्यातून मानाया असा उहापोह मीमांसापद्धतीनें मिताक्षरेच्या शब्दार्थावरून व इतर धर्मग्रंथांच्या आधारांवरून केलेला या कामीं आढळून येईल. या कामांतील ही तक्रार कशी करावयाची याबद्दल सर्व श्रम लोकमान्यांनीं करून, त्यांनीं सर्व शास्त्रग्रंथांवरून तयार केलेलें आर्ग्युमेंट मी व नानासाहेब पेंडसे ( हल्लीं जुनागड येथें प्रोफेसर आहेत ) या दोघांस, आम्ही पक्षकार रामराव यांचे वकील असलेमुळे, त्यांनीं समजावून दिलें व नंतर हायकोर्ट वकील चंदावरकर यासहि समजावून दिलें व मग तें आर्ग्युमेंट चंदावरकर यांनीं कोर्टापुढे मांडलें. धर्मग्रंथ पाहण्यासाठीं टिळक, मंडलीक यांचे लायब्ररींत जात तेव्हा मीहि बरोबर असे. टिळकांनीं तयार केलेलें हें आर्ग्युमेंट धर्मशास्त्रग्रंथाचा अर्थ करण्याच्या शास्त्रीय पद्धतीने तयार केलेलें पाहून त्यावरून त्यांची बुद्धि व विद्वत्ता याबद्दलचा माझा आदर दुणावला.

---

## भाऊसाहेब आठल्ये

[ बी. ए., लो. टिळकांचे स्नेही व कै. बापूसाहेब आठल्ये यांचे कनिष्ठ बंधु, हल्ली मुक्काम गोमांतक. ]

(१) बापूसाहेब मुंबईस हायकोर्ट वकील असल्यावेळेपासून टिळक व दाजीसाहेब खरे यांचा व त्यांचा स्नेह होता. टिळक व नानासाहेब देशमुख यांचा स्नेह आठल्ये यांच्या कारणानेंच प्रथम झाला. टिळकांचे वडील व आठल्यांचे वडील हेहि स्नेही होते. आठल्ये हे पूर्वी आबासाहेब कागलकर यांचे ट्यूटर असून त्यांचा व दिवाण माधवराव बर्वे यांचाहि स्नेहसंबंध होता. टिळक, आठल्ये यांजकडून कायद्याची पुस्तकें केव्हां केव्हां अभ्यासाकरितां नेत व त्यांच्याशीं त्या विषयाची चर्चा करीत. कोल्हापूरप्रकरणीं टिळकांवर फिर्याद झाली. तेव्हां आपणातर्फे आठल्ये यांनीं वकीलपत्र घेऊन बॅरिस्टर यास मदत करावी अशी बर्वे यांनीं त्यांस विनंति केली. पण आठल्ये यांनीं ती नाकारली, व सांगितलें कीं, या कामीं मी तुम्हास मदत करणार नाहीं. कारण टिळक तुरुंगांत गेल्यानें मला संतोष नाहीं. यामुळें पुढें आठल्ये व बर्वे यांचें वैमनस्य आलें. नंतर टिळक, आठल्ये यांना भेटण्यास गेले, तेव्हां आठल्ये म्हणाले कीं, " तुम्ही इतर गोष्टींप्रमाणें या कामीं माझा सल्ला आधीं घेतेत तर उपयोग झाला असता. बर्वे यांच्या व तुमच्या स्नेहामुळें मला त्यांच्याप्रमाणें तुमचेंहि वकीलपत्र घेतां येत नाहीं तथापि त्यांनीं मंडलीक व मेथा यांना डिफेन्सचे कामीं आंतून मदत केली. "

पुढें १८८७ सालीं आठल्ये हायकोर्ट वकिली सोडून बडोद्यास नोकरीवर गेले. त्यांनंतरहि टिळक व दाजीसाहेब खरे यांना घेऊन डे. ए. सोसायटीचा राजीनामा द्यावा कीं नाहीं याविषयीं आठल्ये यांचा सल्ला घेण्यास मुंबईस गेले होते. त्या वेळीं सर्व हकीकत ऐकून " आणखी एक वर्ष राजीनामा देऊं नका. अजूनहि निभलें तर निभावून घ्या " असें आठल्ये यांनीं सांगितलें व पुढें एक वर्षानंतरीह टिळकांनीं राजीनामा दिला तत्पूर्वी पुनः हकीकत ऐकून घेऊन आतां राजीनामा द्या, रहाण्यांत अर्थ नाहीं असा सल्ला आठल्ये यांनीं दिला व त्याप्रमाणें टिळकांनीं सोसायटी सोडली.

धर्माचे बाबतींत टिळक व आठल्ये यांचीं मतें जुळत. १८९०–९१ सालीं संमतिविलाच्या विषयावर आठल्ये यांनीं टिळकांच्या पक्षास मान्यता देऊन 'केसरींत' एकदोन पत्रें लिहिलीं आहेत. धर्मशास्त्र हा आठल्ये यांचा आवडता विषय असे. त्यांनीं व राजारामशास्त्री बोडस यांनीं रा. सा. मंडलीक यांना धर्मशास्त्रावरील त्यांचें पुस्तक लिहिण्यास बरीच मदत केली. आठल्ये बडोद्यास गेल्यानंतर त्यांनीं श्रावणमासदक्षिणेच्या फंडांतून धर्मशास्त्रांतील कांहीं बिकट मुद्यांवर निबंध

लिहवून व शास्त्री लोकाकडून ते तपासवून बक्षिसें देण्याकरिता श्रावणमास दक्षिणेच्या फंडांपैकीं काहीं रकम सयाजीमहाराजाकडून वेगळी काढविली होती त्यापैकीं एक निबंध टिळक यानीं लिहून बक्षिसहि मिळविलें होतें या निबंधाचे परीक्षक महामहोपाध्याय मोडकशास्त्री व बाळशास्त्री आगाशे रत्नागिरीकर हे होते तसेंच, बडोदें संस्थानच्या खर्चानं जर्मनी वगैरे ठिकाणीं एकदान तरतरीत तरुण गृहस्थ पाठवून व्यापार व राजकारण यासबधीं माहिती आणवावी अशी एक योजना आठल्ये याच्या संमतीनें महाराजानीं मुकर केली होती आणि व. बा. प्रा गज्जर याना व्यापारविषयक आणि बळवंतराव टिळक याना राजकारणविषयक माहिती मिळविण्याकरिता युरोपात पाठवाव असें ठरलेंहि होतें परंतु ही योजना पुढें तशीच राहिली पण "सयाजी ज्ञानमंजुषा" ही पुस्तकमाला व कलाभुवन ही संस्था याच योजनेंतून निघाली

आठल्ये त्याच्यामुळेंच टिळक व सयाजीरावमहाराज याचा परिचय झाला १८९३ सालीं बापटप्रकरण सुरू होण्याचे आधीं टिळक हे बडोद्यास गेले व त्याची व आठल्ये याची सर्व्हेसेटलमेंट खात्यासबधानें आणि महाराजाविरुद्ध बडोद्यात चाललेल्या कारस्थानासबधानें बरीच सल्लामसलत झाली, आणि बापट याच्या जोडप्रमाणेंच आठल्ये याचा रुकहि टिळकानीं बापटप्रकरणात पडण्यास कारणीभूत झाला

(२) वरील आठवणी पुरीजकडून स्वत वी म्हणून एक आठवण खालीं देत आहे कोल्हापूरप्रकरणीं डोंगरीचे तुरुगातून टिळक आगरकराची सुटका झाली, त्या वेळीं मीहि आठल्ये याचबरोबर तुरुगाचे दारात गेलों होतों येथें सुमारें दाभरसवारी गाड्या आलेल्या असून लोकसमाज सुमारें दोन हजारावर जमला होता परंतु कोणी एक जुन्नरवा उपदेशक पहाटें चार वाजताच मोठी दोन घोड्याची गाडी, टिळक व आगरकरास पागोटें, शालजोडी, पोपाक घेऊन तुरुगाचे दारापाशीं आला बरोबर तो एक न्हावीहि घेऊन गेला होता सुपरिंटेंडेंटाचे परवानगीनें त्यानें उभयताची हजामत, स्नान, पोषाक वगैरे त्यास करवून आपल्या गाडींत आणून बसविलें होतें परंतु स्वागताची सर्व तयारी व श्रम जुन्नरकर या गृहस्थानीं केले असल्यामुळें त्यांचे विनतीस मान देऊन टिळक व आगरकर त्याचे गाडींत बसले सूर्योदयास मिरवणूक चालू झाली मिरवणुकींत सर्व मडळी पायींच चालत होती नंतर मिरवणूक दास याचे वाडींत आल्यावर मडळींचे आभारप्रदर्शनार्थ टिळक व आगरकर चारशब्द बोलले नंतर दोघेहि दोन दिवस मुबईस राहून पुण्यास आले

असल्यानें, व टिळक फायदेपंडित, त्याचा पक्ष त्याना अवगत, म्हणून मी एक वेळ त्यास प्रश्न केला कीं, " कायद्यानें अशी टीका चालू शकते काय ? " त्याचें उत्तर असें मिळालें कीं, " कायद्याच्या शब्दाचे सामर्थ्याचा आम्ही उपयोग करू शकतों, व तो केला पाहिजे "

एक तत्त्व सहज टिळकाचे तोंडून ऐकण्यात आलें, त्याचा विद्याभिलाषी मनुष्यास उपयोग आहे म्हणून मी त्याचें महत्त्व मानतों तें हें—" कांहीं तरी एका अध्येय विषयाची जो पुरती आस्था धरील, त्यास अनेक प्रकारें नूतन ज्ञान व त्या विषयाची नवीन शास्त्रामुळें उपलब्ध होईल "

मी अज्ञानपरवशतेनें एके समयीं माझे येथें माझे चुलत बंधूच्या मृत्युसमयीं शेजारधर्मानें आपल्यासहवर्तमान टिळक याना प्रेतवाहक योजिलें तें काम त्यानीं घरच्या माणसाप्रमाणें केलें !

## गोविंद काशिनाथ गाडगीळ

[ बी ए, बॅरिस्टर, नेमस्त पक्षाचे व डेक्कन सभेचे एक प्रमुख सभासद, पुणे ]

(१) कै. लो० टिळक याची मी कॉलेजमध्ये असताना इ. स १८८९ ९० साली ओळख झाली त्या वेळी ते "प्रोफेसर टिळक" म्हणून फर्ग्युसन कॉलेजातील गणिताचे विषयात एक नावाजलेले प्रोफेसर होत. मी त्याचा विद्यार्थी नव्हतो, तरी आमचे डेक्कन कॉलेजातील प्रोफेसराच्या विद्वत्तेचे मानानें त्याची गणितातील प्रगति फारच विलक्षण होती माझे सहाध्यायी व स्नेही फर्ग्युसन कॉलेजमध्ये १८८९ ९० साली त्याचे विद्यार्थी होते. त्यात त्याची तक्रार, रा. बळवंतरावजी याची स्मरणशक्ति व बुद्धि फार विशाल असल्यामुळें विद्यार्थ्यांस त्याचीं गणिताचीं लेक्चरें समजण्यास फारच अडचण पडते अशी होती. बळवंतरावजी अल्जिब्रातील "Binomial Theorem" वगैरेवरची उदाहरणें तोंडानें सोडवीत, व ज्या विद्यार्थ्यांस तीं उदाहरणें बोर्डावर लिहावयास सागत त्या विद्यार्थ्यांचे दोनदोन बोर्ड भरून निघत. पण ते तिकडे न पाहता क्लासाकडे पाहत असत, व तोंडानें उदाहरणाच्या Steps सागत. याप्रमाणें "गणितशास्त्रविशारद" म्हणून रा. बळवंतरावाचा लौकिक आम्हा विद्यार्थ्यांमध्यें एल्फिन्स्टन कॉलेजचे गणितशास्त्राचे प्रोफेसर हॅथॉर्नथ्वेट याचेपेक्षाहि जास्त पसरला होता.

(२) इ० स० १८९१ साली आपले इकडे संमतिबिलाचे कायद्यासंबधीं फारच पळापळ उडाली त्या वेळी रा बळवंतरावजी यानीं त्या बिलास सक्त विरोध केला, व त्या वादात त्यानीं डॉ. भांडारकर यास धर्मशास्त्रावरून अर्थ लावून, हार खाण्यास लाविली अशी सार्वत्रिक समजूत झाली होती डॉ. भांडारकर यांचेसंबधीं डेक्कन कॉलेजचे विद्यार्थ्यांस साहजिकच अभिमान वाटत होता. म्हणून या मतानुयायी विद्यार्थ्यांनीं एक यादी तयार करून, त्यावर "आम्ही यापुढें आमच्या मुलींचीं लग्नें १२ वर्षांचे वयाचे आत करणार नाहीं, कारण तें अशास्त्र होय" अशी शपथ घेऊन, ती यादी प्रसिद्ध करण्याचें ठरविलें. परतु बळवंतरावजींनीं आपल्या सर्कवादास लोकमताचा एवढा मोठा पाठिंबा मिळविला कीं, त्यापुढें डेक्कन कॉलेजमधील वरील विद्यार्थी मडळीस आपला प्रयत्न अजीबात सोडून द्यावा लागला.

(३) बळवंतरावजींच्या ज्येष्ठ कन्येचा नाशिकचे वकील रा. विश्वनाथ गगाधर केतकर यांचेशीं विवाह झाला, त्या वेळचा एक प्रसग आठवतो. बळवंतरावजी हे एक जुन्या मताचे व पुराणमताभिमानी गृहस्थ आहेत, अशी पुण्यातील लोकाची समजूत होती. कारण, कै. वा. सरदार बाळासाहेब नातू, अण्णाराव वैद्य, वकील वगैरे जुन्या मताचे म्हणजे "सुधारक विरोधी" मडळींशीं त्याचा

विशेष संबंध असे. यांचे वडील के. व. काशिनाथपंत गाडगीळ हे इ. स. १८८९ सालीं विलायतेहून बॅरिस्टर होऊन आल्यापासून त्यांनीं प्रायश्चित्त न घेतल्यामुळें रा. बाळासाहेब नातू, रा. अप्पाराव वैद्य वगैरे पुण्यामधील पुराण मताभिमानी मंडळी त्यास बहिष्कृत लेखीत असत. रा. बळवंतरावजी यानीं काशिनाथपंतास आपल्या मुलीचे लग्नाचे मेजवानीस येण्याबद्दल आग्रहाचें निमंत्रण दिलें. त्या वेळीं रा. काशिनाथपंत यानीं तें निमंत्रण स्वीकारण्यापूर्वी, " तुमची जुन्या मताची स्नेही मंडळी मी बहिष्कृत आहे अशा मुद्यावर मला पंक्तीस बसण्यास हरकत घेतील, तुम्ही आयत्या वेळीं त्याच मोहबतीखातर माझें निराळें पान मांडाल तर तें मला सहन होणार नाहीं. करितां तुम्ही मला मेजवानीस येण्याचा आग्रह करूं नका, " असें रा. बळवंतरावजीस सांगितलें. त्यावर रा. बळवंतरावजींनीं काशिनाथपंतास उत्तर दिलें कीं, ' मी तुम्हास निमंत्रण करण्यास येण्यापूर्वीच या सर्व गोष्टींचा विचार केला आहे. जें होणार असेल तें होवो ! ! मी निश्चयी माणूस आहें व आपल्या शब्दाची किंमत जाणणारा आहे. मी तुमच्या म्हणण्याप्रमाणें सर्व व्यवस्था करतों. ' असें काशिनाथपंतास सांगून त्यांचेकडून त्यांनीं आपल्या आमंत्रणाचा स्वीकार करविला. पुढें भोजनाचे वेळीं काशिनाथपंत मेजवानीस गेले ते हा जुन्या मंडळींत तक्रार निघते अगर गडबड होते असें दिसून आल्याबरोबर रा. काशिनाथपंत यास आपल्या हातानें धरून भरपंक्तींत बळवंतरावजींनीं बसविलें ! पुढें त्याबद्दल गावांत बरीच कुरकूर झाली. परंतु बळवंतरावजी यानीं आपल्या बोलण्याप्रमाणें आपला निश्चय तडीस नेला व आपला शब्द खरा केला. यावरून दिसून येईल कीं ' रा. बळवंतरावजी हे केवळ जुन्या मताचे होते व त्यांचेजवळ सामाजिक बाबतींत प्रागतिक विचार नव्हते " असें म्हणणारास अगर समजणारास त्याची दिशाभूल होत होती असें या एका गोष्टीवरून दिसून येईल.

झाला. रा. सा. रानडे यांचे नेहमींचे सामोपचाराचे रीतीप्रमाणें "टिळक यास वगळून कॉंग्रेस यशस्वी होणार नाहीं" असें त्यांनीं आपले मडळीस सांगितलें. तेव्हा "रा. बळवतराव यास बोलावून तडजोडीनें काम करावें," असें त्यास सुचविलें, व रा. बळवतराव यास कॉंग्रेसचे एक सेक्रेटरी करावें असा त्यांनीं आपला मनोदय प्रगट केला. त्या वेळीं रा. माधवरावाविषयीं एक गृहस्थ असें बोलले कीं, 'Either Mabhavrao Ranade or Madhavrao Namjoshi must rule Poona" अशा स्थितींत रानडेपक्षीय मडळीस टिळकाविषयीं रानड्याचे चाललेले सलोख्याचें अगर तडजोडीचें वर्तन विशेष आवडलें नाहीं. रा. सा रानडे यांनीं "आमच्या पक्षातील ज्या माणसाशीं तुम्हीं मनापासून काम कराल असा जोडीदार सेक्रेटरी तुमचा निवडून काढा, व काम करण्यास लागा," असें बळवतरावजींस सांगितलें. त्यावर रा बळवतरावजींनीं पुढें कळविलें कीं, "वें काशीनाथपत गाडगीळ याचे सेरीज दुसऱ्या कोणाशीं माझें जमणार नाहीं; व कळकळीनें काम होणार नाहीं." म्हणून रा. माधवराव रानडे यांनीं रा. टिळक व रा. गाडगीळ यास तडजोडीनें रिसेप्शन कमिटीचे सेक्रेटरी नेमिलें. रा. गाडगीळ यांचे नेमणुकीमुळें रानडेपक्षातील ज्या मडळीस आपणास रा. सा. रानडे सेक्रेटरी नेमतील अशी अपेक्षा वाटत होती, त्याचा बराच हिरमोड झाला, व कुरबूर सुरू झाली.

(५) इ. स. १८९६ सालीं मुबईस सप्टेंबर आक्टोबर महिन्यात प्रथम ब्यूबॉनिक प्लेग हा नवीन भयंकर सांथीचा रोग उद्भवला आहे अशी बातमी चोहोंकडे पसरली. त्या वर्षी युनिव्हर्सिटीच्या परीक्षा मुबईस न होता दुसरे कोणते तरी ठिकाणीं घेण्यात याव्या अशासबधीं या इलाख्यातील सर्व कॉलेजातील विद्यार्थ्यांत फार चळवळ उडाली, परतु ही गोष्ट साध्य कशी व्हावी याबद्दल पुण्यातील फर्ग्युसन, डेक्कन व इजिनियरिंग कॉलेजातील विद्यार्थ्यांनीं पुढाकार घेऊन मुबईहून सर्व परीक्षा हलवावयाच्या असा निश्चय केला. यात L L B परीक्षेचे विद्यार्थीहि बरेच सामील झाले, व त्यांनीं या इलाख्यातील कॉलेजातील विद्यार्थ्यांचा पत्रद्वारें व तारांच्या द्वारें विचार अजमाविला. University ही विद्यार्थ्यांचे भीतीकडे अगर तक्रारीकडे लक्ष देण्यास तयार नव्हती असें दिसून आलें. पुणें येथें या कामाकरिता व खर्चाकरिता सुमारें चार पाचशें रुपये फड तयार झाला रा. बळवतरावजी हे त्या वेळीं प्रथमच युनिव्हर्सिटीचे निवडलेले फेलो झाले होते व त्यांचेकडे विद्यार्थीमडळाचे पुढारी "तुम्हीं या कामीं मदत द्यावी व खटपट करावी," म्हणून आपलीं गाऱ्हाणीं घेऊन सल्ला मागण्यास गेले. बळवतरावजी यांनीं विद्यार्थीमडळींचें म्हणणें ऐकून घेतल्यावर त्यास मदत करण्याचें कबूल केलें, व "मीं या कामीं अर्ज तयार करतों, व आणखी चार फेलोजच्या सह्या मिळवून हा प्रश्न सीनेटपुढें वादविवादाकरिता आणतों" असें

आम्हास आश्वासन दिलें. त्याप्रमाणें त्यांनीं अर्ज तयार करून कै. दाजीसाहेब नगरकर वगैरे पांच फेलोंच्या सह्या मिळविल्या; परतु बळवंतरावजींस आपणास बहुमत बिलकूल मिळणार नाहीं असें वाटल्यामुळें आमचे हितासाठीं त्यांनीं आम्हा विद्यार्थ्यांस असा सल्ला दिला कीं, न्यायमूर्ति रानडे हे सिंडिकेटचे एक सभासद आहेत; त्यांचे मार्फत ही खटपट करा. या वेळीं कै. प्रो. गोपाळराव गोखले व बळवंतराव यांचें विशेषसें नीट नव्हतें. विद्यार्थ्यांतील काहींचा व गोपाळरावांचा विशेष परिचय होता, व " रा. सा. रानडे, शेविअर कॉलेजचे प्रि प्रो. डेकमन वगैरे सिंडिकेटचे सभासदाकडे गोपाळराव गोखले यांचे मार्फत "आम्ही खटपट करू का ? व जर आम्ही रा. गोपाळरावांची या कामीं मदत घेतली, तर आम्ही तुमचे सहानुभूतीस व खटपटीस मुकू कीं काय ? " असा प्रश्न आम्ही त्यास विचारला. त्यावर बळवंतरावांनीं उत्तर दिलें कीं, " रा. गोखल्याचा व माझा सार्वजनिक संबंध कसाहि असो, पण गोपाळरावांचे मार्फत तुमचें काम होण्यास मदत होत असेल, तर त्याबद्दल मी मुळींच विषाद मानणार नाहीं. मला जी तुम्हास मदत करावयाची ती मी अवश्य करीनच ! तरी तुम्ही काहींही संकोच न बाळगतां रा. गोपाळरावांकडे जा, व काय होतें तें मला कळवा. " विद्यार्थीमंडळी पुढें प्रो. गोखले यांचे मार्फत रा. सा. रानड्यांकडे गेली व " मुंबईहून परीक्षा बदलावी " अशी त्यास विनंति केली त्यावर न्यायमूर्तींनीं तत्ववेत्यास साजेसें उत्तर दिलें, तें आमच्या हृत्पटलावरून कधींही हलणार नाहीं. तें उत्तर असें, "Life is such a precarious chance, that it is a wonder we living to-day (जन्ममरण आपल्या हातीं नाहीं, तर मुलूख आपण का त्यावें !) हें उत्तर जरी तत्वज्ञानपरिपूर्ण होतें, तरी त्यामुळें विद्यार्थ्यांचें समाधान न होता उलट त्यांची निराशाच झाली, व त्यांचे अल्प वयात त्यांचे मनावर तें तत्वज्ञान बिंबेना ! न्यायमूर्तींनीं हें उत्तर जरा थट्टेनेंच दिलें असावें असें त्यांनीं " काहीं खटपट करून पाहू " असें शेवटीं सांगितलें त्यावरून वाटतें. ही सर्व हकीकत रा बळवंतरावास सांगितल्यावर, "या मंडळीकडून शेवटीं कितपत पाठिंबा मिळेल याचा भरंवसा नाहीं, करितां आता मी आपली खटपट जोरानें चालवितों, परतु हल्लींच्या सीनेट व सिंडिकेटपुढें मला कितपत यश येईल याची मला खातरी नाहीं, असें त्यांनीं सांगितलें. इकडे पुण्याचे विद्यार्थीकमिटीनें, सीनेटनें व सिंडिकेटनें काहीं निकाल न दिल्यामुळें सिंधमधील कॉलेजातील विद्यार्थ्यांस थोपवून धरलें, व ते तेथून परीक्षेकरितां निघाले नाहींत. रा. बळवंतरावजींचा ठराव University पुढें येणार होता. विद्यार्थीवर्गात फार मोठी चळवळ उडाली होती. परतु परीक्षा सुरू होण्याचे अगोदरच परीक्षेचे मंडपास मुंबईस आग लागून तो जळून गेला, यामुळें University चे अधिकारी व सभासद विद्यार्थीवर्गावर फार खवळले ! सर्व

परीक्षा साहजीकच पुढें ढांसल्या. हा मंडप कोणी जाळला याबद्दल पुढें दामोदर चापेकर यानें रँडसाहेबाचे खुनाबद्दल विस्तृत कबुलीजबाब देऊन त्यात खुलासा केला. यामुळें रा. बळवंतरावजी टिळक याजवर त्यांनीं विद्यार्थ्यांचा पक्ष घेतल्या-बद्दल युनिव्हर्सिटीकडून खासगी रीतीनें शिंतोडे उडविण्यांत आले होते, त्याचें व पुण्याचे विद्यार्थीकमिटीवर त्यांनीं मंडप जाळला म्हणून जो आळ घेतला होता त्याचें यथायोग्य निरसन झालें ! या एका गोष्टीवरून रा. बळवंतरावजी सार्वत्रिक कार्य साधण्याचे बाबतींत आपलें मत अगर पक्षभेद विसरण्यास कसे तयार असत हें दिसून येईल !!!

---

## विश्वनाथ बळवंत नाईक

[ एम्. ए., प्रोफेसर व लाइफ मेंबर डे. ए. सोसायटी व शुद्ध पंचांगप्रवर्तनकमिटीचे अधिकारी, पुणें. ]

थोर पुरुषांशीं थोडा जरी संबंध घडून आला तरी तेवढ्यानेंच मनुष्यास एक प्रकारची धन्यता वाटत असते. यामुळें अशा प्रसंगाची स्मृति तो आपल्या मनात जागृत ठेवतो. मनुष्यस्वभावाच्या या विशेषास अनुसरून कै. लो. टिळका-बरोबर सहकार्य करण्याचे जे थोडे प्रसंग मला लाभले, त्यांच्या आठवणींचें

आवश्यकता व इच्छा मला वाटली नसल्यामुळें, मला या ज्योतिषविषयक कार्यांत कोणाशींही सहकार्य करण्याची अडचण नव्हती व आजपर्यंतही कधीं उत्पन्न झाली नाहीं तथापि कांहीं लोकांस तरी ला टिळक व मी एकत्र काम करीत असल्याचें पाहून थोडें नवल वाटलें असेल यांत शंका नाहीं असो, संमेलनाची हकीकत देण्याचें हें स्थळ नव्हे त्यांतील सांगण्यासारखी गोष्ट म्हणजे संमेलनांतील आरंभींचीं भाषणें झाल्यानंतर विषयनियामक कमिटींत जी चर्चा झाली त्या चर्चेच्या वेळेस लो टिळकांनीं अंगिकारिलेलें धोरण हें होय त्यांच्या कार्य करण्याच्या पद्धतीचें रहस्य त्या एकदोन दिवसांच्या सहवासांत माझ्या चांगलें प्रत्ययास आलें ज्ञानी गेलेल्यास त्याप्रमाणें स्वतः वाकून जागें करावें त्याप्रमाणें सामान्य लोकांत मुरलेलें विचारशैथिल्य आपल्या स्पष्ट व लोकांस समजें पटेल अशा भाषणानें आधीं दूर करावयाचें, मग त्याचें अवसान पाहून त्या बेतानें त्यांना आपल्याबरोबर जितका लांब नेववेल तितकें लांब कार्यसिद्धीचे दिशेनें न्यावयाचें, व हें करतांना त्यांच्या मार्गांतील अडचणी दूर करण्याची जबाबदारी आपण स्वतः पुढें होऊन पत्करावयाची, अशी त्यांची पद्धति या ज्योतिष संमेलनाचे कामीं माझ्या अनुभवास आली

(२) संमेलनाचा पहिला दिवस संपल्यावर रात्रीं मी, रा केळकर, रा कोंडोपंत छत्रे व आणखी १-२ गृहस्थ गायकवाडवाड्यांत दुसऱ्या दिवसाच्या कामासंबंधीं विचार करण्यास गेलों त्या वेळेस त्यांनीं आम्हांस जो उपदेश केला तो हाच कीं प्रथमतः तुम्ही ग्रहलाघवी पंचांग सोडून देण्याचें लोकांकडून ठरवा, मग नवीन काय घ्यावयाचें तें जसें ठरवितां येईल तसें ठरवू ग्रहलाघवी पंचांग सुटून आज जर एकमुखी पंचांग सुरू करतां आलें—मग तें कोणत्याहि पद्धतीचें का असेना—तर पुढें यांत योग्य तो फरक केव्हांही करणें कठीण पडणार नाहीं तुम्ही जें नवीन पंचांग सुरू कराल तें सर्व प्रसृत व्हावें याकरितां त्याच्या चार पांच लाख प्रतींहि मोत कमी किंमतीनें देण्यांत जें नुकसान होईल तें सोसण्यास मी तयार आहे केव्हां आज केरोपंती, का कटका, का सा न या विचारांत वेळ न घालवितां गणितशुद्ध असें जें कांहीं बहुमतानें ठरवितां येईल तें ठरवून घ्या निरयन पंचांगच घ्यावयाचें तर करंदीकराचा अथवा केतकराचा रैवतपक्ष घ्यावयास पाहिजे व एकदां एकमुखी पंचांग सुरू झाल्यावर आपण हा गोष्ट सहज घडवून आणू पण प्रथम ग्रहलाघवी पंचांग बंद करावयास पाहिजे त्याच वेळेस त्यांनीं केतकरांसहि सांगितलें कीं होईल तितकें करून आता शुद्ध पंचांग सुरू करावयाचें त्यास तुमचा प्रश्न त्यांत आवश्यक आहे, त्यांतील रैवत व चैत्र या दोहोंपैकीं कोणताहि बहुमतानें पसंत झाला तर फारच उत्तम, पण तसें न झालें तर मुंबईसंमेलनांत जो अयनांशाविषयीं ठराव केला आहे त्यास अनुसरून अयनांश घेण्याचा ठराव करू अथवा ग्रहलाघवाचे आजचे अयनांश घेऊन तुमच्या

ग्रंथातील गणितानें शुद्ध पंचांग काढण्याचें ठरवूं. ग्रहलाघवी पंचांग रद्द करण्यास आज इतर मतभेद बाजूस ठेवून बहुमतानें ठरेल त्या कोणत्याहि पंचांगास तुम्ही आज विरोध करूं नका. मग एक पंचांग सुरू झालें कीं, आपण पुनः संमेलन भरवून योग्य ते फरक घडवून आणूं. रा. केतकर यांना व मला स्वतःला प्रथमतः हा उपदेश फारसा पटला नाहीं. रैवतपक्षाच्या शुद्धतेची माझी खात्री होती, तशीच रा. केतकर यांचीहि होती. दुसऱ्या दिवशीं विषयनियामक कमिटींत आपण लोकांस आपलें मत सांगूं व त्याजकडून रैवतपक्षास संमति मिळण्यास फारशी अडचण पडणार नाहीं अशी माझी समजूत होती. कांहीं तरी अयनांश घेऊन पंचांग सुरू करावें असें माझ्या मनास वाटेना. दुसऱ्या दिवशीं भाऊमहाराजांचे वाड्यांत चर्चा झाली. ती ऐकून या बाबतींतील माझा भ्रम दूर झाला. जमलेल्या मंडळींत ज्यांना ज्योतिषाचें सोपपत्तिक ज्ञान आहे अशीं माणसें दहापांचच होतीं. तीं बहुतेक आपापला पक्ष स्थापावयाच्या या आग्रहानेंच थालीं होतीं. इतर मंडळी ग्रहलाघवी पंचांग चुकतें एवढें कबूल करणारी, परंतु केरोपंती अथवा केतकी पंचांगाचें नांवही घेणार नाहीं अशा निश्चयाची, यांचाच भरणा अधिक. या मंडळींस आम्ही विषय समजावून सांगण्याचा प्रयत्न केला. परंतु जगांत अगदीं अज्ञान मनुष्यापेक्षां अर्धवट ज्ञान असलेल्या मनुष्याची समजूत करणें फार कठीण, यामुळें केरोपंती अथवा केतकी यापैकीं कोणतेंच पंचांग त्यांच्या दुराग्रहापुढें टिकणें शक्य नव्हतें. जेथें या दोनही पक्षांच्या लोकांचा नगारा लोकांत ऐकूं जाईना तेथें थे. शा. स. घोंडशास्त्रयासारख्याच्या ग्रंथाची टिमकी काय

घ्या " वास्तविक केतकराच्या चैत्रपक्षाचे अयनांश सुमारें २२-४६ असल्यामुळे मंडळीस ते घेतां आले असते पण ते घ्यावयाचे नाहींत हा बहुतेकांचा आग्रह मग ग्रहलाघवाच्या अगदीं जवळचे व मुंबईच्या ठरावास अनुसरून असलेले २३ अयनांश घेण्यास मंडळी कबूल झाली वास्तविक या २३ अयनांशास कसलाच आधार नव्हता पण बहुमतानें ते ग्राह्य म्हणूनच ग्राह्य मानावयाचे अशी स्थिति होती

याप्रमाणें ग्रहलाघव सोडण्यास टिळकांनीं बहुमत मिळविलें परंतु त्यामुळें केरोपंती अथवा केतकी पक्षाचे लोकांचें समाधान होणें शक्य नव्हतें, व या दोन पक्षांतच खरोखरी ज्योतिषाचें मर्म समजणारे लोक होते त्यांची अनुकूलता मिळाल्यावाचून काम करणें कठीण तेव्हां त्यासाठी त्यांनीं एक तोड काढिली ती अशी कीं, राशिचक्राच्या आरंभस्थानाविषयीं एक ठराव वे. शा. रा. विनायक शास्त्री रानापूरकर यांचे संमतीनें पुढें मांडला तो म्हणजे राशिचक्राचे आरंभस्थानीं निरयन रेवती योगतारा आहे असा निर्णयाचा होता सूर्यसिद्धांतादि सर्व ग्रंथात रेवती योगताऱ्याचा भोग शून्य किंवा जवळजवळ शून्य असल्यामुळें यास जुन्या पक्षाच्या लोकांचा विरोध होऊं नाहीं याचा अर्थ असा कीं, त्या लोकांस ती तारा आरंभस्थानीं मान्य परंतु त्यावरून प्राप्त होणारे अयनांश मात्र अमान्य हा विरोध पुष्कळांस कळलाहि नाहीं तेव्हां मी लो. टिळकांस एकीकडे विचारलें कीं, " असे परस्पर असंबद्ध ठराव कसे करावयाचे ? त्यांतील विरोध अगदीं ढळढळीत आहे ते म्हणाले " विरोध आहे, हें तर मला दिसतेंच आहे, व तो ढळढळीत आहे हें तर फारच चांगलें कारण त्यामुळेंच पुनः लवकर तो नाहींसा करण्याची इच्छा उत्पन्न होईल आज त्या ठरावानें केरोपंताच्या अनुयायांचें समाधान होत आहे व इतरांचा त्यास विरोध नाहीं मग उगीच घोळ पाण्यात शिरण्यात अर्थ काय ? हे ठराव पास होऊं द्या त्याप्रमाणें आपण शुद्ध गणितांचें पंचांग तर सुरू करूं मग पुढें जुन मागें पडलें म्हणजे नवीन पंचांगात योग्य तो फरक करूं "

वर निर्दिष्ट केलेल्या ठरावास जुन्या पक्षाच्या लोकांची व केरोपंताच्या अनुयायांची लेखी संमति मिळाली आरंभस्थानाच्या ठरावानें रैवतपक्ष ध्येयरूपानें मान्य झाल्यासारखा झाला म्हणून के. रानापूरकर, रा. कोंडापंत वगैरे मंडळीस बरें वाटलें रा. केतकरांनींहि ह्या ध्येयाकडे नजर देऊन संमति दिली असती तर बरें झालें असतें पण ते नाखूष होऊन उठून गेले पुढें त्यांनीं वर्तमानपत्रांतून टिळकांनीं अशी दांडगाई केली, तशी दांडगाई केली, वगैरे चर्चा सुरू केली तिचें वैय्यर्थ्य वरील हकीकतीवरून स्पष्ट होईल.

याप्रमाणें ज्या स्थितींत कांहींच निष्पन्न होणार नाहीं अशी भीति आम्हास वाटत होती तिच्यांतूनच कार्यभाग साधण्याचें श्रेय लो. टिळकांनीं संपादन

केलें व पुढील कार्यास सुरवात झाली. त्यांनीं जें धोरण स्वीकारलें तें स्वीकारलें नसतें तर शुद्ध पंचांगाच्या प्रश्नास चालनाच मिळाली नसती.

(३) पुण्यातील संमेलनानें केलेल्या निर्णयानुसार पंचांग तयार करून तें प्रसृत करण्याकरितां पंचांगप्रवर्तन कमिटी नेमण्यांत आली. तिचे अध्यक्ष व उपाध्यक्ष कै. टिळक व मी असे नेमिले गेलों. प्रसारासंबंधाची सर्व जबाबदारी आपल्या वचनाप्रमाणें लो. टिळक यांनीं अंगिकारिली. पंचांगातील गणिताच्या शुद्धतेबद्दल खात्री करून घेण्याचें काम माझ्याकडे आलें. पंचांग तयार करण्याचें काम पंडित रघुनाथशास्त्री, वे. शा. स. मोघे व मुंबईचे भिडे यांनीं पतकरलें. या कमिटीसंबंधानें मला लो. टिळक यांचेकडे अनेकवार जावें लागे. पुढें लवकरच लो. टिळक यांस विलायतेच्या प्रवासासाठीं जावें लागलें. तेव्हां पंचांग विषयक बाबतींतील सर्व कामाचा भार सर्वस्वी त्यांनीं मजवर टाकला व केसरींत त्या विषयावरील चर्चा माझ्या मतानें होत जावी अशीही त्यांनीं व्यवस्था केली. विलायतेस गेल्यानंतरही कमिटीच्या कार्याची ते काळजीपूर्वक चौकशी करीत.

कॉलेजच्या विद्यार्थ्याचें असें म्हणण्याचा अधिकार विद्यार्थ्यास प्राप्त होत नाहीं, असें मला वाटतें "फर्ग्युसन कॉलेजाचे विद्यार्थी" या नात्यानें जी जी गोष्ट विद्यार्थ्यांस करावयाची असेल त्या त्या गोष्टीस प्रिन्सिपालची संमति मिळाल्या वाचून त्यानीं ती करणें हें शिस्त व शिष्टाचार या दोहोंस विरुद्ध आहे " त्यावर टिळक म्हणाले कीं, "मलाहि असेंच वाटतें परांजपे व मी यांचें कांहींहि भांडण असलें तरी ते व विद्यार्थी यांच्या परस्परसंबंधात विघाड उत्पन्न करण्याची माझी इच्छा नाहीं, व मीं विद्यार्थ्यांना असेंच सांगणार आहे "

(५) पुढें माझे बंधु माझे बरोबर होते, त्यानीं मानपत्रासंबंधीं पुण्यात झालेल्या प्रकारावद्दल खेद प्रदर्शित केला व असा विरोध करण्यात विरोधकाना काय साधावयाचें होत, असा प्रकारचे उद्गार काढले यावर लो टिळक म्हणाले कीं, "वास्तविक मानपत्र देणें ही एक शिष्टाचाराची गोष्ट आहे, व मतें भिन्न असलीं तरी हा शिष्टाचार सोडण्याचें कारण नाहीं गोखले इग्लंडहून आले तेव्हां आमचीं त्यांची भांडणें होतीं तरी मी त्यास मानपत्र देण्यात पुढाकार घेतला व आताहि शास्त्री येतील तेव्हां त्यानाहि मानपत्र देण्यास जरूर तर मी तसाच पुढाकार घेईन. बरें, विरोधच करावयाचा तर मग अगदीं सभेंत येऊन, विरुद्ध भाषणें करून, प्रतिकूल मतें देऊन पद्धतशीर करावयाचा अशा गोष्टीला माझी पूर्ण तयारी होती, पण तसेंहि झालें नाहीं !" पुढ आमचे बंधूनीं पुढाऱ्या तील व्यक्तिविषयक दुहीचा उल्लेख केला त्यासंबंधीं बोलताना मी बोलण्याचे ओघात बोलून गेलों कीं, "आपण केसरींत जी टीका करता ती कधीं कधीं इतकी झोंबणारी असते कीं, ती माणूस कधीं विसरत नाहीं परांजपे इंग्लंडहून परत आल्यानंतर त्यांच्यावर केसरींतील एका लेखात जी कडक टीका आली ती व त्या लेखावरील मथळ्याचा श्लोक हा गोष्टींचा त्याच विसर पडणं शक्य नाहीं " तेव्हां लो टिळक म्हणाले "काय ? अजून परांजप्याना त्या लेखाचें विस्मरण पडलें नसेल ? सार्वजनिक आयुक्रमात इतकी नाजूक वृत्ति असून भागावयाचें नाहीं मी स्वत 'दोन घावे दोन घ्यावे' या मताचा आहे रानडे, आगरकर वगैरे मंडळी कितीहि टीका झाली तरी फिकीर करीत नसत टीकेस प्रतिटीका करण्यास ते तयार असत परांजप्यावरील लेख मीं लिहिला नसता परंतु लेख मी वाचिल्यानंतर त्यातील मथळ्याचा श्लोक मात्र मला सहज सुचला व तो मी त्यावर घातला अशा श्लोकाचा शब्दार्थ घ्यावयाचा नसतो "

(६) यानतर नवीन रिफॉर्म्ससंबधानें बोलणें निघालें त्यात त्याचा आपण स्वीकार करणार कीं नाहीं असें माझ्या बधूनीं विचारलें लो टिळक म्हणाले, "जें मिळत आहे तें पदरात पाडून घ्यावयाचें, तें घेतल्याने नाहीं म्हणत तेवढ्यानें आमचा संतोष झाला असें आम्ही म्हणणार नाहीं त्यापेक्षां आम्हास अधिक दिलें पाहिजे अशी चळवळ आम्ही सुरु करणार आमच्यात व नेमस्त मडळींत

मुख्य फरक येथेंच आहे जेवढें मिळालें तेवढें अमलांत आणून पाहूं, मग अडचण आली म्हणजे अधिक मिळविण्याची तयारी करूं हें त्यांचें धोरण. मिळालें तें अगदीं अपुरें आहे, तें आम्ही टाकलें नाहीं तरी त्यानें आमचें आजहि भागणार नाहीं म्हणून आजच जोराची चळवळ सुरू करावयाची हें आमचें धोरण " असो याप्रमाणें ते दिवशीं संभाषण झालें

(७) पुढें लवकरच लो टिळकांनीं पुण्याच्या ज्योतिषसंमेलनांतील निर्णया संबधानें जी अटकळ बांधली होती ती खरी ठरण्याचा योग आला ती येण्यास वे शा स घोंडशास्त्री कारणीभूत झाले पुण्याचा निर्णय आपले मताप्रमाणें बदलून घेण्यासाठीं संमेलन सांगलीस भरविण्याची खटपट त्यांनी केली त्यास सांगलींतील काहीं प्रमुख सद्गृहस्थांचें साहाय्यहि मिळालें रा श्री कृ कोल्हट करांसारख्या विद्वान् गृहस्थाची अध्यक्षस्थानीं योजना केली व पुण्यांतील व इतर ठिकाणच्या ज्योतिष्यांस निमंत्रणेंहि गेलीं मला अन्य कार्यामुळें त्या संमेलनास जातां आलें नाहीं लोकमान्य टिळक व पंचांगप्रवर्तन कमिटीचे इतर सभासद संमेलनास गेले तेथील सर्व हकीकत केसरींत प्रसिद्ध झालीच आहे पुण्याच्या निर्णयांतील सर्व दोष सांगलीस काढून टाकण्यांत आले व नवीन करणग्रंथ करून रैवतपक्षाचें शुद्ध निरयन पंचांग सुरू करण्याची कामगिरी पंचांगप्रवर्तन कमिटीकडे आली

(८) ही कामगिरी कशी पार पाडावयाची ह्याच्या विचाराकरितां लो टिळक यांचे येथें मी, रा कोल्हटकर, रा नानासाहेब आगाशे, वगैरे मंडळी जमलों मुख्य प्रश्न नवीन करणग्रंथ तयार करविण्याचा त्याबद्दल नवीन ग्रंथ करून देणारास १००० रुपयांचें बक्षीस देण्याचा ठराव केला कमिटीजवळ अर्थातच काहींच पैसे नव्हते तेव्हां टिळकांच्या पद्धतीप्रमाणें हीहि जबाबदारी त्यांनीच स्वीकारली व त्याप्रमाणें केसरींत जाहिरात दिली लो टिळकांवर पंचांगाचे बाबतींत वाटेल ते आरोप करणाऱ्यांनीं त्यांनीं या कामांत किती झीज सोसली याचा विचार करावयास पाहिजे मला तर वाटतें कीं, पंचांगाचे प्रश्नास आज जें निश्चयात्मक स्वरूप प्राप्त झालें आहे व नवीन शुद्ध निरयन पंचांगाचा जो जोरानें प्रसार होत आहे त्याचें सर्वस्वी श्रेय त्यांचेकडेच आहे

---

## गोविंद कृष्ण टिळक

[ वकील, लोकमान्यांचे एक शिष्य व अभिमानी वार्शी ]

(१) सन १८८६ साली फर्ग्युसन कॉलेजात प्रोफेसर म्हणून शिकविताना टिळक यास मीं पाहिलें संस्कृत मेघदूत काव्य ते शिकवीत त्यात श्लोकाचें गोड भाषांतर करून देण्यापेक्षा मुख्यत ग्रंथाचें रहस्य व काव्याची महति कशात आहे हें समजावून देण्याकडे त्यांचा विशेष कटाक्ष असे दुसरा विषय बीजगणित ते शिकवीत त्यात विषयाचें पृथक्करण करून उपपत्ति सुलभ करून दाखविण्यात त्यांचा हातखंडा असे या गणिती प्रोफेसरास अडविण्याकरिता बुद्धिवान् विद्यार्थ्यांनीं नाना प्रकारच्या बिकट शंका विचारून आपली शिकस्त करून पाहावी, परंतु स्वत टिळकांनीं उदाहरणातील निरनिराळ्या टप्प्यांचा ( Steps ) तोंडानेंच फडशा पाडावा, व क्षणात उत्तर आणून देऊन सर्व वर्गास चकित करावें।

(२) सन १८८९ साली कोल्हापूरप्रकरणावर मीं एक नाटक लिहिलें सदर प्रकरणातील कांहीं विशिष्ट व्यक्तींवर नाटकात मीं हल्ला केला होता त्यामुळें कायद्याचें उल्लंघन झालें आहे व अब्रूनुकसानीची फिर्याद होण्याचा संभव व भय आहे अशी कित्येक छापणारानीं शंका काढली व त्यामुळें नाटक प्रसिद्ध करण्यास कोणी धजना कायदेपंडिताचें मत घेऊन काय तें करावें म्हणून मी कै माधवरावनी रानडे यास तें दाखविलें त्यानीं तें वाचून पाहिलें व नाटक छापणें फार धोक्याचें आहे असा अभिप्राय दिला पुढें मी तें पुस्तक टिळकाना दाखविलें, त्यानीहि साग्र वाचून पाहिलें पण ते म्हणाले, छापण्यास काहींच हरकत नसून धोका मुळींच नाहीं व हा आपला अभिप्राय त्यानीं लिहूनहि दिला रानडे यांचा अभिप्राय काय पडला हें त्यास मी कळविला "रानडे ओव्हरकॉशस् ( फाजील सावध ) आहेत म्हणून त्यानीं तसा अभिप्राय दिला, तुम्ही नाटक खुशाल छापा" असें हसत म्हणून त्यानीं मला उत्तेजन दिलें.

(३) सन १८९७ साली "जस्टिस" या सहीनें "टाइम्स ऑफ इंडिया" पत्रात कांहीं पत्रें छापलीं होतीं त्यात कोणीकडून तरी टिळकास राजद्रोही ठरवावें हा लेखकाचा उघड हेतु होता सदर पत्रें वाचून व त्यात व्यक्त झालेली खोडसाळ व दुष्ट बुद्धि पाहून मला अत्यंत चीड आली, व म्हणून एके दिवशीं संध्याकाळीं मीं टिळकांची गाठ घेतली व 'ह्या जस्टिसला कोर्टात खेंचून तुम्ही त्याचा समाचार का घेत नाहीं' असें त्यास विचारिलें लगेच ते म्हणाले, "मी त्याच गोष्टीचा विचार करीत आहे आजच रात्रीं मुंबईस जात आहे व तेथील सल्लागाराचें मत घेऊन पुढें कामास लागणार आहे" ते मुंबईस गेले, पण दुर्दैवानें राजद्रोहाच्या आरोपावरून त्यांस तेथ अटक करण्यात आली यामुळें जस्टिसचें मरण कायमचें टळलें.

(४) १९०० सालीं टिळक बातुरास बात असतां घार्टेत वारांस माझे घरीं उतरले होते. त्यांच्याशीं बोलतांना स्पेन्सरची "अज्ञेय मीमांसा," शंकराचार्यांचा अद्वैत सिद्धांत, वगैरे विषयांवर त्यांचीं मतें काय आहेत, हें जाणण्याच्या बुद्धीनें मी त्यांस प्रश्न विचारावे व त्यांनीं सरळपणानें उत्तरें द्यावीं, असा क्रम चाले. मध्येंच मीं त्यांस विचारलें "तुम्हास राजद्रोहाचे खटल्याचे वेळीं मुंबईंत पकडलें व अटकेंत ठेविलें त्या वेळीं दाजीसाहेब खरे तुम्हास जामीन मिळावा म्हणून प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेटकडे जाऊन खटपट करून परत तुम्हांस जामीन मिळत नाहीं असें फलविण्यास आले तों तुम्हांस गाढ झोंप लागल्याचें त्यांस आढळून आलें हें खरें काय ! व खरें असेल तर तुम्हांला अशा प्रसंगीं झोंप कशी लागली !" ते म्हणाले, "ही गोष्ट खरी आहे; एकदां अमुक गोष्टीचा निश्चित परिणाम अमुक होणार असें मनानें मी ठरविलें म्हणजे मला त्याची काळजी मुळींच लागत नाहीं व माझ्या मनाची स्वस्थता ढळूं शकत नाहीं. त्यांतलाच हा प्रकार, म्हणून झोंप लागली." त्यावर मी मुद्दाम त्यांस आणखी एक काल्पनिक प्रश्न विचारला कीं, "तुमचा मुलगा (त्यांचे ज्येष्ठ चिरंजीव कै. विश्वनाथपंत हेहि तेथें होते) असाध्य आजारानें मृत्युशय्येवर पडलेला आहे, तुम्ही त्याचे शेजारीं रात्रीं निजण्याकरितां आपलें अंथरूण घालून पडला आहां, अशी कल्पना करा. तेव्हां अशा वेळीं तुम्हांस झोंप येईल काय ! सांगा." चटकन् त्यांनीं उत्तर दिलें, "हो ! झोंप येईल !" हें ऐकून मी तर चकित झालों व त्यांस विचारलें, "आपण अशी शांति संपादन करण्यास काय परिश्रम केलेत ?" ते म्हणाले, "मी परिश्रम केव्हांच केले नाहींत. माझ्या अंतःकरणाचा कठोरपणा उपजत आहे." नंतर बुद्धिमत्तेच्या गोष्टी निघाल्यावरून त्यांची प्रशंसा मी केल्यावरून ते म्हणाले, "रानडे व डॉ. नानासाहेब देशमुख हे "व्हर्सेटाईल जीनियस" चे लोक होत; मी कसचा ?"

(५) १९०६ सालीं समर्थविद्यालयाकरितां डॉ. नानासाहेब देशमुख, रा. ब. वैद्य, प्रो. विजापूरकर व वासुकाका जोशी, वगैरे मंडळींसह टिळक येथें आले होते. ते येथील खोजाच्या बंगल्यांत उतरले होते. तेथें त्यांस मेजवानी देण्यांत आली. जेवण चालू असतां सामाजिक सुधारणेचा विषय निघाला. तेव्हां मी वैद्यांकडे वळून म्हणालों, "पुनर्विवाहास टिळकांचें मत अनुकूल होतें तर त्यांनीं 'केसरी'त तसें प्रतिपादन कां केलें नाहीं ?" हें ऐकून टिळक म्हणाले, "अहो, आम्ही केवळ राजकारण हा विषय घेतला आहे. त्यावरच आम्ही मुख्यत्वें भर देतो व लोकमत तयार करतो. लक्षांत ठेवा, सामाजिक सुधारणा आमच्या पत्राचा मुख्य विषय नाहीं."

(६) चिरोलकेसकरितां टिळक विलायतेस जाण्याचें ठरल्यावर मी त्यांस मुद्दाम भेटलों व म्हणालों, "समुद्रांत प्रवासी बोटीहि बुडविण्याचा जर्मनीचा सपाटा लक्षांत घेता विलायतेस जाणें किती धोक्याचें आहे हें आपणहि जाणतां, म्हणून

जाण्याचा बेत रहित केल्यास काय हरकत ? " तेव्हा ते म्हणाले, " ज्या दिवशीं चिरोलवर फिर्याद दाखल केली त्याच दिवशीं ती चालविण्याकरितां स्वतः विलायतेस जावयाचें असा माझा निश्चय झाला तो आतां वरून आकाश कोसळलें तरी बदलणें शक्य नाहीं स्टीमर बुडण्याचें भय मला एकट्यालाच आहे असें नाहीं व्हाइसरॉयासारखे जर अशा भयप्रद स्थितींत प्रवास करूं शकतात तर त्यांत मी आपल्या जीवास एवढें भिण्यासारखें तें काय आहे ! '

(७) अमृतसर काँग्रेसनंतर मी एकदा त्यास म्हटलें, तेव्हां ते म्हणाले, " काँग्रेसनें रिफॉर्मबद्दल केलेल्या मुख्य ठरावास गांधीजींना अनुकूल करून घेणें कठीण झालें होतें. परंतु विषयनियामक कमिटींत जालियनवाला बागेंतील अत्याचाराबद्दल सरकारी अधिकाऱ्यांचा जसा निषेध करावयाचा तसाच लोकांचाहि केला पाहिजे असा गांधींचें आग्रहाचें म्हणणें होतें पण ते आम्हांस बिल्कुल मान्य नव्हतें आमच्याच मताचें प्रचंड बहुमत होतें तरी या बाबतींत त्यांचें म्हणणें समेटाच्या व राष्ट्रैक्याच्या बुद्धीनें मान्य करून सुधारणा नापसंत असल्याचा जो मुख्य ठराव त्यास त्यांचा हेका सोडावयास लावून त्याचें अनुकूल मत करून घेतलें याप्रमाणें गांधींचा उपयोग आम्ही करून घेतला गांधी एकादा निश्चय पहिल्यानें करून बसतात व मग शेवटीं परतावतात ! "

---

## रघुनाथशास्त्री पटवर्धन

[ पंडित, ज्योतिषी व शुद्ध पंचांगप्रवर्तनकमिटीचे चिटणीस, पुणें ]

(१) पुण्याच्या ज्योतिष संमेलनाच्या वेळची गोष्ट लोकमान्यांनीं कोणतेंही निश्चित कार्य हातांत घेतलें म्हणजे त्यांत ते माघार म्हणून घ्यावयाचे नाहींत, तर कार्य पूर्णतेस कसें जाईल या गोष्टीकडे त्यांचें सर्व लक्ष वळलेलें असावयाचें पुण्यास संमेलन भरण्याचें निश्चित होऊन लोकमान्यांना अध्यक्षस्थान द्यावयाचें ही गोष्ट ठरली, त्या वेळीं लोकमान्य पुण्यास नसून हायकोर्टांत चाललेल्या चिरोल केसमध्यें गुंतलेले होते पुण्यास आल्यावर सर्व हकीकत त्यांना समजली अध्यक्ष स्थानाकरितां ३-४ नांवें सुचविण्यांत आलीं होतीं, पण सर्वानुमतें लोकमान्यांनाच अध्यक्ष निवडण्यांत आलें कारण पौर्वात्य आणि पाश्चिमात्य अशा दोनही बाजूंची माहिती असलेला अध्यक्ष पाहिजे होता या अध्यक्षनिवडणुकीच्या कामांत श्री हरि नारायण आपटे, वे शा. सं व्यंकटशास्त्री, प्रो शि. म. परांजपे,

रा केतकर, वगैरेंनीं लोकमान्याच्या नियहणुकीसच समति दिली. यावरून लोकमान्याची ज्योतिषशास्त्रातील तज्ज्ञता किती उच्च दर्जाची होती हें सहज कळेल

(२) पुण्याच्या संमेलनाचे वेळीं लोकमान्याना अतिशय दगदग झाली. कारण परगावाहून आलेले ज्योतिषी वादग्रस्त विषयाची चर्चा करण्याकरिता रात्रीं बाराबारा वाजेपर्यंत त्याच्या वाड्यात चर्चा करीत बसावयाचे व पुन सकाळीं ६–३० ला सबजेक्टस् कमिटीचें काम सुरू व्हावयाचें. पण लोकमान्यानीं कोणताहि नकार दर्शविला नाहीं सर्वांना योग्य प्रकारें वादग्रस्त विषय व त्यातील महत्त्वाचे मुद्दे ते समजावून सागत, व त्यामुळें सत्वकार्यें समाधान होई.

(३) मुंबईचें ज्योतिषसमेलन यशस्वी करण्याचें महत्कार्य लोकमान्यानींच केलें, पण त्या वेळीं अध्यक्ष जगद्‌गुरु श्रीशंकराचार्य होते. पुण्याच्या संमेलनाचे अध्यक्ष लोकमान्यच असल्यानें त्याच्यावर विशेषच जबाबदारी आली लोकमान्याची सर्वांगीण विद्वत्ता माहीत नसल्यानें परगावचे काहीं ज्योतिषी अशा वृत्तीनें आले होते कीं, आपल्या विद्वत्तेनें आपण लो टिळकाना कुठित करू. पण लोकमान्यहि काहीं कच्च्या गुरूचे चेले नव्हते वादविवादप्रसगीं, लोकमान्याना कुठित करण्याकरिता सदर ज्योतिष्यानीं जे प्रमाधार व वचनें हुडकून काढून आणलीं होतीं तींच वचनें त्याच्याच पद्धतीनें व विचारसरणीनें लोकमान्यानीं त्याच्या गळ्यात बाधलीं व त्याचें म्हणणें चुकीचें असल्याचें सिद्ध केलें अर्थात् मोठ्या अभिमानानें आलेले सदर ज्योतिषी कुठित होऊन लोकमान्याच्या विद्वत्तेपुढें त्याना मान वाकवावी लागली ह सागावयास नकोच

(४) सर्वांना बरोबर घेऊन जाय परता येईल तितकी प्रगति करावयाची असें लोकमान्याचें धोरण हेंच धोरण ज्योतिषसंमेलनातहि त्यानीं ठेवलें होतें, व त्यामुळेंच ५०–६० ज्योतिष्याची एकवाक्यता झाली कोण याहि गोष्टींत दोष राहिला असेल तर तो ढळढळीत व स्पष्ट उद्देशपूर्वक राहू द्यावयाचा, त्यात गुप्तपणा अगर लपवालपवी करावयाची नाहीं, असे लोकमान्य नेहमीं म्हणत, व त्याला अनुसरून पुण्याच्या संमेलनात पचांगात सूक्ष्मता व गणितशुद्धता या गोष्टी त्यानीं घडवून आणल्या व अयनाशाची चूक राहू दिली पण ठरावात स्पष्ट लिहिलें कीं, आज अयनाश २३ घेतले आहेत, पण ल.करच बदलावे लागतील.

(५) पुण्याच्या संमेलनानतर ठरावाच्या वेळेचा लो टिळकाचा म्हणून एक मोठा काल्पनिक सवाद ज्ञानप्रकाशात आला तो लोकमान्यानीं वाचला होता. एके दिवशीं त्याबद्दल सहज चर्चा निघाली असता ते म्हणाले, अहो, यात काय आहे ? या अशा गोष्टी विरोधीवसमेलनावर रुसलेल्या लोकाकडून नेहमीं व्हावयाच्याच. ज्योतिषसंमेलनाशीं माझा संबध आल्यामुळें ज्ञानप्रकाशाला हें आयती एक साथ मिळाली आहे. एरवीं "ज्ञानप्रकाश" या विषयाकडे कधींहि पाहताना, कारण ज्ञानप्रकाश पत्राला धर्माचेंच जर्थे वावडें आहे तेथें पचांगासारख्या

विषयात लक्ष घालण्याचें त्यांना कारणच नाहीं. पण टिळकांचा संबंध आल्यानें आता ज्ञानप्रकाश या विषयावर खोटेनाटे अग्रलेखसुद्धा छापून काढील!

(६) पाडवा गुरुवारींच करावा अशाबद्दल लोकमान्यांनीं २।३ लेख 'केसरी'त दिले होते. पाडव्याच्यापूर्वी विलायतेस जाण्याकरिता ते कोलंबोला गेले. पण तेथून त्यांनीं पुण्यास 'केसरी'चे म्यानेजर रा. धोंडोपंत विद्वांस यांना पत्र लिहिलें कीं, सूक्ष्म पंचांगाप्रमाणें पाडवा गुरुवारींच आहे. आपल्या वाड्यात पाडव्याचा सण गुरुवारींच झाला पाहिजे. विलायतेस जाण्याच्या ऐनगर्दीतसुद्धा ही गोष्ट लिहिण्यास ते विसरले नाहींत. यावरून विशिष्ट कार्याकडे त्यांचें लक्ष किती बारकाईनें राहत असे याबद्दल आश्चर्य वाटतें.

(७) कोणत्याही महत्त्वाच्या कागदास लो. टिळक फार जपत असत. सांगली–संमेलनात झालेल्या ठरावाचा व त्यावर असलेल्या सह्यांचा कागद अध्यक्ष रा. कोल्हटकर यांच्याजवळ होता. तो त्यांनीं आपल्याजवळ मागून घेतला व सेक्रेटरी प. रघुनाथशास्त्री यांना सांगितलें कीं, हा कागद जपून ठेवा. हा कागद म्हणजे सांगली–संमेलनाचें सार आहे. यासंबंधीं वाटाघाटींत एके दिवशीं त्यांनीं असें सांगितलें कीं, तो कागद कमिटीजवळ असणेंच जरूर आहे. तो कागद तेथेंच राहिला असता तर मागेंपुढे विरोधी लोकाकडून त्या कागदाचा नाश होण्याचा संभव जास्त. तो कागद एकदा नाहींसा झाला म्हणजे असा ठराव झालाच नाहीं असें म्हणण्यापर्यंत विरोधी पक्षाचा विरोध येणार. म्हणून विरोधाचें बीज समूळ नाहींसें करणारी ठरावरूपी शेंडी आपल्या हातात पाहिजे! विरोधकांनीं पुढें जे अनेक चमत्कार केले व सांगलीचे ठराव उखडून लावण्याचा कट केला त्यावरून ठरावाचा मूळ कागद आपल्याजवळ ठेवण्याचें लो. टिळकांचे दूरदर्शित्व लक्षांत ठेवण्यासारखें आहे यात शंका नाहीं.

(८) सांगलीस श्रीशंकराचार्यांच्या अध्यक्षतेखालीं लोकमान्यांचें व्याख्यान झालें. लोकसमुदाय १५।२० हजार असेल. व्याख्यानासाठीं उंचासन तयार केलें होतें. लोकमान्यांचें भाषण संपून जगद्गुरु बोलणार इतक्यात कोणीं साप, साप किंवा आग लागली अशी हूल उठविली. जिकडे तिकडे धावपळ सुरू झाली आणि उंचासन डळमळू लागून खालीं पडतें कीं काय अशी स्थिति आली. लोकमान्यांना धक्का लागू नये म्हणून लोकांनीं त्यांना सुरक्षित स्थळीं जाण्याबद्दल विनंति केली. पण लोकमान्यांनीं तेथून हलण्याचें साफ नाकारलें व सांगितलें कीं, "हजारों लोकांचें जें होईल तेंच माझेंही होईल. हजारोंच्या जीवापेक्षा माझ्या जीवाची किंमत मी जास्त समजत नाहीं. भिण्याचें काहींएक कारण नाहीं. संकट निवारण करण्यास ईश्वर समर्थ आहे. १०।१५ मिनिटांनीं सर्व स्थिरस्थावर झालें. श्रींचें भाषण झालें. नंतर लोकमान्यांनीं सांगितलें कीं, तुमची सापाची हूल ऐकून तुम्ही

इतके भेदरला ! असली भीति राष्ट्रकार्याला घातक होय. खरोखरी साप आला तरी त्याची दोरी बनविण्याचें सामर्थ्य तुमच्यात आहे.

(९) लोकमान्य विलायतेस गेले तरीही पचांगप्रवर्तनाचें कार्य कसें काय चाललें आहे याची वारवार ते चौकशी करीत असत व माहिती मागवीत. शके १८४१ १८४२ चीं पचांगें त्यांच्या गैरहजेरींत प्रसिद्ध झालीं. पण प्रत्येक वेळीं त्याचीं पत्रें येत कीं, पचांग छापण्याची व्यवस्था करा. कार्य शिथिल होऊ देऊ नका

(१०) स्पष्ट व निर्भीडपणें योग्य अभिप्राय देण्याचे बाबतींत लोकमान्यांची ख्याति होती एकदा केतकी पक्षाचे एक पचांगकर्ते काहीं विशिष्ट हेतूनें अभिप्राय मागण्याकरिता आले त्यांच्या सारिण्या वगैरे त्यांनीं तपासल्या व अभिप्राय दिला कीं, "केतकी प्रथाप्रमाणें यातील गणित सूक्ष्म असून हें परिश्रमपूर्वक तयार केलं आहे." अभिप्राय मागण्याच येणाराचा उद्देश हा होता कीं, हेंच पचांग सर्वस्वी शास्त्रशुद्ध आहे, असा अभिप्राय मिळावा. पण लोकमान्यांच्या मतें हीटापिशियम हें राशिचक्राचें आरंभस्थान असल्यानें त्यांनीं स्पष्ट तोच अभिप्राय दिला व लोकमान्याना लेखी अभिप्रायरूपानें विलापक्षात गुरफटविण्याचा केतकी पक्षाचा डाव फसला !

• (११) लो टिळक याना त्यांचे गुरु कै. केरूनाना छत्रे याच्याबद्दल अत्यत आदर असे. पुण्याच्या समेलनातील भाषणात पचांगशुद्धीचें कार्य नानाच्या देशतत्व पूर्ण व्हावयास पाहिजे होतें व आजचें समेलन व त्यातील ठराव म्हणजे गुरुवर्य कै केरूनानाच्या उद्योगाचेच फल, असें त्यांनीं सांगितलें. त्या वेळीं त्यांच्या नेत्रात अश्रुबिंदु चमकले व कठ दाटून आला. सागली समेलनाहून सकाळीं परत आल्याबरोबर प्रथम त्यांनीं रा कोंडोपत छत्रे याना चिठ्ठी धाडली कीं, कै नानाच्या उद्योगास पूर्ण यश येऊन आज चीज झालें, व मी त्यांच्या ऋणातून मुक्त झालों. गुरूच्या कार्याबद्दल इतका जिव्हाळा, प्रेम व तळमळ क्वचितच पाहावयास सापडेल.

(१२) महत्कार्य सिद्धीस नेणें हें लोकमान्यांचें ध्येय. मग त्याकरिता कितीही नुकसान सोसावें लागलें तरी हरकत नाहीं. प्रथमत २–३ वर्षें पचांग त्यांनीं स्वत च्या खर्चानेंच छापलें नतर करण ग्रथाकरिता १ हजार रु. बक्षीस व इतर खर्चही त्यांनींच केला. नागपूर येथील के. ल. दप्तरी याना पुण्यास बोलावून घेऊन ग्रथाचें काम त्यांच्यावर सोंपविलें व त्यांच्या मदतीस मोघे व बाघोलीकर याना मुद्दाम पाठविलें आणि करण ग्रथ कमिटीही नेमली, व सर्व काम पूर्णत्वास नेलें.

(१३) शेवटच्या आजारात करण ग्रथ अथवा पचांगाबद्दल लोकमान्यांच्या तोंडून वारवार उद्गार निघत असत. यावरून शुद्ध पचांगकार्याचा जिव्हाळा

त्यांना विशेष होता हें सिद्ध होतें. महाराष्ट्रातच नव्हे तर सबंध हिंदुस्थानात एकमुखी शुद्ध पंचांग अमलात आणण्याची त्यांची इच्छा होती. पण अकस्मात् मृत्यूनें हेंच दर्शविलें कीं " कालाधीन जगत् सर्वम्. "

---

## रामचंद्र विनायक पटवर्धन

[बी ए एल्एल्. बी , कै महर्षि अण्णासाहेब पटवर्धन यांचे चिरंजीव, मराठा पत्राचे माजी सहसंपादक, पुणें. ]

(१) सन १९१७ सालीं पुण्यास वैद्यक-संमेलन झालें त्या वेळीं आयुर्वेदासंबंधीं कांहीं शास्त्रीय लेख ' मराठा ' पत्रात देण्यास हरकत नाहीं असें लोकमान्यानीं सांगितलें. त्या वेळीं ते म्हणाले कीं, " अहो, त्यात अडचण कसली ! माझा तर शिरस्ता असा आहे कीं, ज्यात लोकाचें हिताहित आहे असे मला सुचतील ते विचार ' केसरी ' व ' मराठा ' ह्या माझ्या पत्रांतूनच लोकांसमोर ठेवावयाचे आणि नवीन कल्पना तर आपल्या पत्रांतूनच प्रथम पुढें यावी हेंच पत्रकर्त्यांचें काम. मीं आजपर्यंत जे जे लेख लिहिले ते सर्व 'केसरी'तून प्रसिद्ध झाले आहेत आज पसतीस वर्षांत मी इतर ठिकाणीं फार तर तीनचार लेख काय ते दिले असतील, ह्यावरून काय तें समजा. "

(२) राजकीय चळवळीशीं आणि राजकीय उलाढालीशीं अगदीं विसंगत असे विषय म्हणजे गणित, धर्मशास्त्र, तत्त्वज्ञान, ज्योतिष आणि प्राचीन इतिहास हे होत लोकमान्यांना तर ह्या सर्व विषयाची अतिशय आवड, आणि राजकीय पुढाऱ्यांना साधारणपणें या विषयाचा तिटकाराच असतो, तेव्हा हें कसें असा लोकमान्यांना एकदा सहज प्रश्न केला. तेव्हा त्यानीं उत्तर दिलें. " हें पहा, राजकीय चळवळ मला आवडते म्हणून मी करतों असें नाहीं. आपल्या लोकाची स्थिति फार कठीण झाली आहे, म्हणून माझे हे आवडते विषय बाजूस ठेवून मला राजकीय चळवळींत पडणें भाग झालें ! आपल्या लोकांची व देशाची वाईट दशा पाहिली म्हणजे मला राजकीय भानगडींत पडल्याशिवाय राहवत नाहीं. राजकीय चळवळींत पडलों नसतों तर मी आपलें आयुष्य निश्चितपणें शिक्षण आणि ग्रंथलेखन ह्यातच घालविलें असतें. "

(३) १९१९ सालच्या अखेरीस लोकमान्य विलायतेहून परत आले आणि त्यांना आणि तात्यासाहेब केळकरांना सर्व शहरवासीयातर्फे जाहीर सभेंत मानपत्र

चार्चे असें ठरलें, व मानपत्र स्वीकारण्याचें लोकमान्यांनीं कबूल केलें. पुढें आदलें दिवशीं अशी दाट बातमी पसरली, कीं, कांहीं विघ्नसंतोषी लोक सभेंत विरोध करण्याचा बहाणा करून दंगा करण्याच्या विचारात आहेत. लोकमान्यांच्या कानावर ही बातमी घालण्याकरितां सभेचे चालक गेले. तेव्हां लोकमान्यांनीं विचारलें कीं, "ह्याबद्दल तुम्ही तजवीज काय केली आहे?" चालक म्हणाले कीं, त्याच विचारात आम्ही आहों, पण आम्हाला अजून योग्य तजवीज सुचली नाहीं. त्यावर लोकमान्य म्हणाले "ह्यात एवढी अडचण कसली! विरोध करणाराकरितां निराळी जागा राखून ठेवा म्हणजे झालें. त्यांना सभेंत लबाडीनें गोंधळ करता येणार नाहीं. सर्व शहराचें हें मानपत्र म्हणूनच मी तें स्वीकारणार आहे. पुणें शहरांत माझ्या आयुष्याचीं चाळीस वर्षे लोकांच्या सेवेंत गेलीं आहेत. त्यांना माझ्या सेवेची कांहींच जाणीव नसेल असें समजतां काय तुम्ही? विरोधाबद्दल तुम्हीं काळजी घेऊ नका. मला पहावयाचें आहे कीं, विरोध तरी करतात कोण? येवढें धैर्य जरी विरोध्यांना झालें तरी मला त्यात आनंद आहे." हा आत्मविश्वास पाहून चालक मंडळी स्वस्थचित्त झाली. आणि लोकमान्यांनीं भाकित केल्याप्रमाणें १०।१५ हजार लोकांची जंगी सभा मोठ्या उत्साहानें आणि एकमतानें पार पडली.

(४) १९१४ साली लोकमान्य मंडालेहून परत आल्यावर सर्व शहरानें जाहीर रीतीनें त्यांचें मनःपूर्वक स्वागत केलें. पुढें काही मित्रमंडळी त्यास असा उपदेश करू लागली कीं "आतां तुम्ही राजकीय चळवळ सोडून द्या. तिच्यावांचून तुमचें काय अडलें आहे? तुम्ही आतां नीति, तत्वज्ञान ह्या विषयावर ग्रंथ लिहून काळ घालवाना." तेव्हां लोकमान्य म्हणाले "वाहवा! तुरुंगाबून बाहेर आल्यावर देखील जर आपल्याला प्रशस्त वाटेल तें लोकहिताचें काम करावयाचें नाहीं तर जन्मभर तुरुंगातच राहिलेलें काय वाईट?"

(५) महर्षि अण्णासाहेब पटवर्धन यांच्या ज्ञानसंध्येसंबंधानें सहज गोष्ट निघाली असतां लोकमान्य थट्टेनें म्हणाले "ह्या बाबतींत आमच्या वांटण्या झाल्या आहेत. त्यांनीं ज्ञानसंध्या करून राजकारण करावें, आणि मी लोकजागृति करून राजकारण साधावें."

(६) श्रीगणेशोत्सवासंबंधानें एकदा वाद निघाला. धार्मिक उत्सवांत राजकीय परिस्थितीसंबंधानें चर्चा व टीका करणें बरें नव्हे, असा एक मुद्दा निघाला. हा मुद्दा नवीन नव्हता. पण राजकारणांत न पडणाऱ्या लोकांना उत्सवांत सामील होता यावें म्हणून उत्सवांत धार्मिक गोष्टींचीच चर्चा असावी असें कांहींचें म्हणणें होतें. त्यावर लोकमान्य म्हणाले, "तुम्हीं चुकतां सरकार काय करतें तें पहा. कोणतेंहि खातें असो, शिक्षणाचें असो, आरोग्याचें असो, किंवा

धर्माची असो, त्याचें खरें स्थ एकाद गोष्टीकडे आणि ती ही की, आपला अमल येथें कायम कसा राहील, आणि आपला हुकूम बिनतक्रार कसा अमलांत येईल ? म्हणून आम्ही त्याचेंच अनुकरण करणार—कोणताहि प्रसंग असो त्याचा उपयोग लोकजागृतीकडे कसा करता येईल इकडेच आम्ही पाहणार नाहीं तर सरकार आमच्यावर हा हा म्हणता मात करील "

(७) लोकमान्याच्या सुटकेच्या आनंदाच्या वेळी त्याच्यावर नोटीस बजावण्यात आली तेव्हा पुष्कळ लोकांस वाटलें, लोकमान्यास पुन कारागृहांत पाठविण्याचा सरकारचा विचार आहे म्हणून ते चिंताक्रांत झाले आणि त्यापैकीं एकानें तर लोकमान्याजवळ तसें बोलून दाखविलें तो गृहस्थ चिंताग्रस्त पाहून लोकमान्य म्हणाले, " अहो, माझ्या तुरुंगांत जाण्याची तुम्ही येवढी कसली भीति धरता ? अहो, तुरुंग म्हणजे माझी विश्रांति आहे आणि तेथेंसुद्धा मला किती कामें करता येतात झालेल्या कामाचा आढावा काढून पुढली दिशा स्पष्टपणें ठरवता येते नवीन ग्रंथ करता येतात आणखी काय पाहिजे ? आणखी तुरुंगांत गेलों तर माझ्या मनांत मनुस्मृतीवर कांहीं लिहावयाचें आहे, तें लिहीन " हें ऐकून तो गृहस्थ आणि इतर मंडळीसुद्धा लोकमान्याच्या चित्ताची अद्भुत स्थिरता पाहून अगदीं चकित झाली

---

## विनायक बळवंत चोकर

[ लोकमान्याचे सहाध्यायी व स्नेही, वकील, नगर ]

(१) सन १९०६ एप्रिल महिन्यातील गोष्ट त्या वर्षी रायगडावर जो पंचवार्षिक श्रीशिवजयंत्युत्सव होत असे त्यापैकीं तो उत्सव होता त्याकरिता कै दाजीसाहेब खरे, लो टिळक वगैरे मंडळी जलमार्गानं मुंबईहून महाडास गेली त्या उत्सवाचे दाजीसाहेब हे अध्यक्ष होते तोच शेवटचा रायगडवरचा लोकमान्य हजर असलेला उत्सव महाडाहून आम्ही दुसरे दिवशीं गडावर गेलों. तेथें अध्यक्षाचे झोंपडींतच लोकमान्याची व्यवस्था केली होती मी कंत्राटदाराचे स्वत चे चाळींत उतरलों होतों आमची जेवणाची व्यवस्था पृथक् होती जयंतीचा कार्यक्रम यथासांग पार पडल्यावर मंडळी जेवणाकरिता आपआपल्या ठिकाणीं जाण्याकरिता परतली नंतर मावळी लोकांचें जेवण होतें मी पहिल्यानेंच उत्सवास

गेलों असल्यामुळें सर्व गोष्टी पाहण्याची उत्सुकता म्हणून मावळे लोकांची जेवणाची व्यवस्था कशी ठेविली जाते हें पाहण्यास गेलों. व्यवस्था उत्तम होती. परंतु कांहीं मंडळींचे उद्गार माझे कानावर आले कीं, आपणास टिळकमहाराजांचें दर्शन झालें नाहीं, महाराज कोठें आहेत, व जेवणापूर्वी त्याचें दर्शन कसें होईल ? हें ऐकून मला अतिशय विस्मय वाटला. म्हणून मी तडक अध्यक्षाचे झोंपडीकडे गेलों. मावळे जेथें जेवावयास बसणार तेथून ही झोंपडी बरीच अंतरावर होती. ऊन कडक पडलें होतें. मी त्याचे झोंपडींत गेलें तों अध्यक्ष, त्याचें सुहृद्व व लोकमान्य गप्पा मारीत होते. लोकमान्यांनीं मला पाहताच प्रथम माझ्या जेवणाखाण्याच्या सोयीबद्दल प्रश्न विचारला. त्याचें उत्तर न देता मी म्हणालों 'मावळे लोक जेवावयाला बसले आहेत, आणि म्हणत आहेत कीं, आम्हास अजून टिळकाचें दर्शन झालें नाहीं आणि येथें तर आमचे टिळकमहाराज खुशाल गप्पा ठोकीत आरामात बसले आहेत. या! ठीक आहे!' असे शब्द मीं उच्चारले मात्र तों लोकमान्याना ती गोष्ट इतकी लागली कीं, तापदतोब अगदी विजेचा धक्का बसावा त्याप्रमाणें त्यास होऊन तशीच आंगरखा घालून व पगडी डोक्यावर ठेवून आंगरख्याचे बंद वगैरे न बांधताच उपरणें सावरीत स्वारी एकदम धावतच सुटली. ते पुढें व मी त्यांचे मागें. जेवणाचे ठिकाणीं गेल्यावर ते सर्व पत्रावळीतून फिरले, सर्वांची विचारपूस त्यांनीं केली यामुळें सर्व मावळ्यास

म्हणण्यास हरकत नाहीं. तात्पर्य, हा एकच मार्ग आता आहे. दोन निरनिराळ्या काँग्रेस करणें आणि राष्ट्रांत फूट पाडणें हें अगदीं गर्ह्य आहे. मला तें नको आहे." शेवटीं मीहि त्याचे म्हणण्यास संमति दिली.

---

## विष्णु महादेव भट

[ बी.ए. एम्. बी. बी. एस्., मराठा पत्राचे माजी उपसंपादक, डॉक्टर–येवलें ]

(१) चिरोल–केसच्या वेळची गोष्ट. चिरोल–केससंबंधीं टिपणें लिहून काढण्याचें बहुतेक काम लो. टिळकांनीं मजवर सोंपविलें होतें. "मराठा" लिहिण्याचें काम संभाळून शिवाय मला तें करावें लागत असल्यानें माझी मोठी तिरपीट उडे. पण खुद्द लोकमान्यांची कर्तव्यतत्परता इतकी दांडगी होती कीं, रात्रीं जळ-ल्यानंतरहि, एखादें जरूरीचें काम अंगीकृत केल्यास, एका बैठकीवर ११।१२ तास ते एकसारखे बसून त्या कामाचा पिच्छा पुरवीत. मला मदतीला घेऊन एक दिवस सकाळीं ११ पासून तों रात्रीं ११–४५ चे गाडीनें मुंबईस जावयास ११ वाजता निघेपर्यंत चिरोल–केसचें काम एकसारखें पाहत बसले होते. ही त्यांची कर्तृत्वशक्ति पाहून आम्हांस खरोखरच विस्मय वाटे "मराठ्या" चें व चिरोल–केसचें अशीं दोनही कामें करणें जड जातें, असें म्हणण्याची होत असलेली बुद्धि, त्यांची ही काम करण्याची चिकाटी पाहून, तेथल्या तेथेंच जिरून जाई. इतक्या वयस्कपणात जर ह्या गृहस्थाच्यानें इतकें काम करवतें तर भर तारुण्यात त्यांची कर्तृत्वशक्ति किती दांडगी असेल हें कळण्याची माझी जिज्ञासा तृप्त करण्याकरिता मी त्यांस त्यासंबंधीं सहज विचारलें. तेव्हां ते म्हणाले कीं, मुंबईच्या एका राष्ट्रीय सभेच्या बैठकीचे वेळीं "मी एकसारखा एका खुर्चीवर ३६ तास बसून काम करीत होतों," आणि माझ्या भोंवतीं माझ्या माडीला माडी भिडवून काम करणारा एकहि गृहस्थ मला भेटला नाहीं, आणि सुविचारी, स्वार्थत्यागी व नेटानें, इमानानें आणि चिकाटीनें काम करणारीं माणसें जमविण्याचा मीं तीनदां प्रयत्न केला पण हें माझें सततोद्योगाचें दृढ मत पाहून आरामप्रिय व हटपट रंगाऱ्याप्रमाणें हटपट पुढारी माझ्याशीं फटकूनच वागू लागले, असेंहि ते म्हणाले.

(२) चिरोल खटल्यांतील दुसरीहि एक आठवण नमूद करून ठेवण्यासारखी आहे. ज्या नाशिकच्या कटाच्या खटल्यांत मला पांच वर्षांची शिक्षा झाली होती त्या खटल्यांत गणू वैद्य म्हणून एक माफीचा साक्षीदार होता. नाशिकच्या कटाच्या खटल्यांत कोठेंहि पुरावा मिळेनासा झाला म्हणजे गणू वैद्यानें त्याची भरपाई करावी ह्या त्याच्या कृतीमुळें आमच्या खटल्यांतील आमचे बॅरिस्टर बाप्टिस्टा यांनीं त्याला missing link म्हणजे (तुटलेल्या साखळींतील) 'हरवलेला दुवा' असें नांव ठेवलें होतें. बिचारा गणू आपला जीव बचावण्याकरितांच ह्या गोष्टी करीत होता त्याचें मन निर्मळ होतें, पण शरीर दुबळें होतें आणि शारीरिक क्लेश, भावी आपत्ति आणि कांहीं अंशीं त्याच्या स्वभावाची चुकीची शिकवण व कांहीं अंशीं केवळ दुर्दैव, ह्या चौरंगी सामन्यांत गणूची गाळण उडून त्यानें अधिकाऱ्यांच्या मर्जीप्रमाणें अनेक गोष्टी आपल्या देशबांधवांच्या विरुद्ध सांगितल्या, आणि आपली २५ वर्षांची झालेली शिक्षा तीन वर्षांच्या सपुष्टांत सरकारी मेहरबानीनें आणली, व पुढें त्याला अधिकाऱ्यांनींही पुण्यासच युरोपियन फर्मांत एक २५ रुपयांची लहानशी नोकरीहि दिली सरकारी मेहरनजरेवर, कासवीच्या पिलाप्रमाणें जगत असलेला गणू, आपणास टिळकांचा व नाशिकच्या बहुतेक लोकांचा वचपा काढण्यास उपयोगी पडेल असें सरकारी गोपराज वाटत असल्यामुळें चिरोलला त्यांनीं गणूची साक्ष काढण्यास सल्ला दिला असावा असें वाटतें सरकारी गुप्तखात्याचा हा प्रयत्न आमच्या खटल्याचे वेळींहि झाला होता पण तो टिळकांविषयीं असलेल्या शुद्ध व अकृत्रिम स्नेहामुळेंच एका अधिकाऱ्याकडूनच हाणून

त्याच्या मुक्याच्या कबुलीजबाबाचा आम्हास कांहींच उपयोग नव्हता पण कर्मधर्मसंयोगानें तो टिळकांस मात्र उपयोगी पडला गणूस समन्स आल्याबरोबर त्यानें तें मला दाखवलें, न आता काय करू पुन ही मामी गळेचेपी होते आहे, मला ते टिळकाविरुद्ध साक्ष देण्याचें सकट घालताहेत, ह्यातून निसट ण्याचा मार्ग सांगा झालें तुमच्याविरुद्ध साक्ष देऊन केलें तेवढें पाप पुरे, आतां ह्या पुण्यपुरुषाविरुद्ध तरी साक्ष देण्याचें पाप माझ्या हातून होऊ देऊ नका, म्हणून त्यानें सद्गदित अत करणानें मला सांगितलें मीहि त्यास तसें करतों म्हणून आश्वासन देऊन टिळकांस ही गोष्ट सांगितली ते मला म्हणाले कीं, "तुमच्या कटात मी नव्हतों इतकेंच नव्हे तर तुम्ही असला प्रयत्न एव्हा करू नका असें मी १९०६ मध्यें तुम्हास स्पष्ट बजावून सांगितलें होतें, हें तुम्हास माहीत आहेच गणूसही ही गोष्ट माहीत आहे ही एवढी खरी गोष्ट त्यानें सांगितली म्हणजे माझें काम झालें हें सांगण्याबद्दल त्याला त्याच्या नोकरीस मुकावें लागेल पण नोकरी गल्यास मी त्याची स्वत तरतूद करीन असें त्यास माझेतर्फे आश्वासन पूर्वक सांगा" मी गणूस त्याप्रमाणें कळविलें गणूनेंहि स प कथन करण्याचें कबूल केलें आणि त्याप्रमाणें कमिशनपुढें सांगितलेंहि ह्या गणूच्या साक्षीवरती टिळकांचा क्रांतिकारकांशीं संबंध होता हें ठरविण्याचा कांहीं सरकारी पोलिस अधिकाऱ्याचा प्रयत्न अशारीतीनें व्यर्थ गेला गणू ह्या वेळेस तरी सत्यास जागला आणि आमच्याविरुद्ध साक्ष देऊन आम्हास तुरुगात टकलण्याच्या पापाचें अशत तरी त्यानें प्रायश्चित्त घेतल

पण ह्यातहि आणखी एक मौजेची गोष्ट आहे ठरल्या तारखेस गणू कमिशनपुढें आला, आणि गणूनें आम्हास जरी इतकें आश्वासन दिलें होतें तरी एकदा फितूर झालेल्या मनुष्यावर भरवसा कितपत ठेवावा, हाहि प्रश्न आमच्या पुढें होताच ह्या प्रश्नामुळें टिळकांचे वकील दादासाहेब करंदीकर हे आडून आडून गणूस प्रश्न विचारू लागले गणूच्या साक्षीवर सर्व भिस्त असल्यानें "नाशिकच्या कटाचा व माझा सबंध नव्हताना" असा रोख, सरळ प्रश्न विचारा म्हणून टिळकांचा आग्रह होता आम्ही सर्वजण त्यास प्रतिकूल होतों. करंदीकरहि तो विचारण्यास धजेनात कदाचित् मागें एकदा फितूर झालेला गणू फिरून फितूर होऊन 'होय होता" असें म्हणाला म्हणजे सगळाच खटला फसला असें व्हावयाचें, म्हणून दादांनींहि तो न विचारण्याचें ठरविलें टिळकहि आग्रहास पेटले, आणि आयत्या वेळेस त्यांनीं स्वत होऊनच हा भयकर प्रश्न गणूस टाकला! आम्ही अगदीं चित्रासारखे क्षणभर सटस्थ बसलों, आणि गणू जेव्हा 'नव्हता' असें उद्गारला तेव्हा आमच्या जिवात जीव आला क्रॉस एक्झॅमिनेशनच्या तत्त्वाविरुद्ध हा प्रश्न होता त्यांतून गणूसारखा एकदा अविश्वसनीय ठरलेला साक्षीदार, आणि त्यातहि ह्या प्रश्नाच्या उत्तरावर सर्व खटल्याची मदार,

अशा प्रसंगात टिळकासारखा निधड्या छातीचा मनुष्यच ही जोखीम घेऊ शकला. घरीं आल्यावर आम्ही त्यास वकिली तत्त्वाच्या विरुद्ध आपण हें साहस कसें केलेंत म्हणून विचारलें. तेव्हां टिळक म्हणाले कीं, तुम्ही फक्त वकीली तत्त्वाकडे नजर दिलीत, पण मानसशास्त्र विसरलां. गणूच्या समोर—पश्चात्तप्त आणि आश्वसित गणूच्या समोर—त्याचा जन्माचा प्रत्यक्ष पोशिंदा होणारा टिळक उभा होता, हें तुम्ही विसरलां. मला ती खात्री होती, आणि म्हणूनच मीं हें साहस केलें. टिळकासारखीं माणसेंच हें साहस करू शकतात हेंच खरें.

(३) सन १९०८ मधील गोष्ट. महाराष्ट्रांत धगधगाच्या अपूर्व चळवळीमुळें हलून गेलें होतें. नुसत्या ब्रिटिशसाम्राज्यांतर्गत स्वराज्याच्या ध्येयापेक्षा पूर्ण स्वातंत्र्य मिळवावें असें म्हणणारा पक्ष उदित होत होता. भिक्षा देहीच्या मवाळशाही उपायांनीं काहीं मिळत नाहीं, त्यापेक्षा जास्त जाज्वल्य काहीं तरी, कोणता तरी उपाय योजावा असें म्हणणारा हा पक्ष होता, इतिहासांतील उदाहरणावरून हिंदुस्थानानें धडा घ्यावा, घेतला पाहिजे, त्याशिवाय गत्यंतर नाहीं, असें ह्या पक्षाचें इतिहासावलोकनावरून मत झालें होतें. हिंदुस्थानांत ३० कोटि लोक आहेत ते जर नुसते थुकले, फुंकले तर त्या प्रवाहांत २ लाख ब्रिटिश लोक गडप होतील, त्याची विशाद काय, असें काहीं अविचारी पुढारी—युव म्हणत होते. विचारी व अविचारी पण देशाभिमानी मनें ह्या साध्या त्रैराशिकानें हुरळून जात होतीं. अशा स्थितींत लो. बळवंतरावजींचा "केसरी" ह्या अविचारी प्रलापास थारा देत नव्हता. इतर काहीं वर्तमानपत्रें मन मक्षोभक असे लेख लिहून तरुणांच्या स्वातंत्र्यप्रीतीला प्रोत्साहन देत होतीं. 'केसरी" तें सारासार विचारपूर्वक करीत होता. त्यामुळें इतर काहीं वृत्तपत्रांच्या मार्गें त्याचें पाऊल आहे, असें ह्या स्वातंत्र्याभिमुख तरुणास वाटत होतें ह्या पक्षांतलेंच आम्ही काहीं तरुण नाशकास होतों लोकमान्य त्यावेळेस नाशि काम आले होते. तेव्हां त्याचें ह्या बाबतींत मत काय आहे तें स्पष्टपणें कळावें म्हणून आम्ही त्याची खासगी भेट घेतली. ही गुप्त राहिली नाहीं, त्यांतच एक चोरटा पोलीस होता, ही गोष्ट निराळी, पण आम्ही आपल्या परीनें शक्य तितक्या कसोटीनें निव

धरा व सावधपणें चाला " असें त्यांनीं आग्रहानें कळवळून सांगितलें. ह्या त्यांच्या भेटींत एकच गोष्ट उघडकीस आली कीं, बंगाली किंवा महाराष्ट्रांतील तरुणांनीं १९०५-१९१०-पर्यंत जे प्रयत्न केले तसलेच प्रयत्न तरुण असतां लोकमान्यांनींहि केले होते. त्या त्यांच्या प्रयत्नांतील सहकारी मंडळी आतां आहेत कीं, नाहींत हें माहीत नाहीं. पण लोकांची तयारी नाहीं, हें पाहून त्यांनीं ते प्रयत्न सोडून लोकांची मनःक्रांति घडवून आणण्यांत आपलें आयुष्य खर्च केलें. चिरोलनें त्यांना Father of Indian Unrest म्हणजे ' हिंदी राजकीय चळवळीचे जनक ' म्हणून जें म्हटलें ते यावरून यथार्थ आहे असें ठरतें. ही जी वर आमची खासगी भेट झाली हीच गणू वैद्यानें चिरोल-केसमध्यें सांगितली.

(४) १९२० सालीं लोकमान्यांची कांहीं पुढारी लोकांशीं सरदारगृहांत एकदां भेट झाली. राष्ट्रांतील लोकांची तयारी कितपत आहे ह्यावर गप्पा चालल्या होत्या. त्या वेळेस मीहि तेथें होतों. एक पुढारी म्हणाले कीं, राष्ट्राची तयारी अगदीं जय्यत आहे, आणि पुढारी काय सांगतील तें लोक करतील, असें मला वाटतें. लोकमान्य म्हणाले कीं, ही तयारी नुसती वरपांगी आहे. प्रसंगीं, मार्शल लॉला, लोक टिकतील असें मला वाटत नाहीं. लोकांची शेंकडा ५० टक्के खरी तयारी मला दाखवा, म्हणजे मी बाकीचा हवाला ईश्वरावर ठेवून उद्यां बंड पुकारतों. आपल्याला निःशस्त्रच बंड करावयाचें आणि सशस्त्र करावयाचें नाहीं, असा कांहीं माझा हट्ट नाहीं. साधेल तें करावयास मी तयार आहे. मग आहे का तयारी ? ह्यावर ते पुढारी गप्पच बसले.

(५) लोकमान्य हे स्वतः जसें कोणतेंहि काम करावयास बसले म्हणजे स्वतःच्या शरीराकडे किंवा पैशाकडे पाहत नसत, त्याचप्रमाणें इतराकडून काम करवून घ्यावयाचें असलें म्हणजे इतरांनाही त्यांच्याचप्रमाणें वागावें लागे जर्मन सेनापति हिंडेनबर्ग किंवा म्याकेन्सन ह्यांच्याप्रमाणें लोकमान्यांची घडाडी असे. स्वीकृत कार्य फत्ते करण्याकरितां उपलब्ध सर्व शक्ति त्या कार्यांत ते केंद्रीभूत करीत. ह्या त्यांच्या तडफीपुढे व घडाडीपुढे त्यांच्या हाताखालचीं माणसें कित्येक वेळेस अगदीं मेटाकुटीं येत. त्यांचे भाचे रा. विद्वांस ह्यांना कित्येक वेळां लोकमान्यांनीं घरांत पाणीसुद्धां प्यावयास फुरसत दिली नाहीं. त्याचप्रमाणें खर्चाच्या अतिशयतेमुळें एखादें काम करावयास जर कोणी कचरला तर तेंहि त्यांस सहन होत नसे. वेळेवर ठराविक काम झालेंच पाहिजे, मग तेवढ्याकरितां हवीं तितकीं माणसें व हवा तितका खर्च केला तरी त्याबद्दल त्यांची तक्रार नसे. चिरोल-केसच्या वेळेस मला हा अनुभव पुरा आला. त्या खटल्याचे कागद त्यांना ठराविक मुदतींत टाईप करून पाहिजे होते. टायपिस्टांनीं ते देतों म्हणून आश्वासनहि दिलें होतें. पण त्यांच्याच्यानें तें काम रेटेना. तेव्हां मी कांहीं

दिवसपर्यंत एकसारखे ८ टायपिस्ट ठेवून त्याना लेवावयासहि वाड्यांत किंवा सरदार गृहातच घालून त्याचेकडून सव्वल १८ तास काम करून घेऊन तें पुरें केलें ! "काम झालें नाहीं" हें म्हणण्याची त्याच्यापुढें सोयच नव्हती. कुचारतडूंना त्याच्याजवळ थाराच मिळणें शक्य नव्हतें

(६) १९१६ सालीं बेळगावास प्रातिक परिषद भरवून लोकमान्यानीं राष्ट्रीय सभा पक्षाशीं सहकार्य करण्याचें ठरवून राष्ट्रीय सभा काबीज करण्याचें ठरविलें त्या वेळेसहि कांहीं कट्टर नाफेरवाले त्याच्या गोटात होतेच, आणि विशेष मौज ही कीं, आज जे सनातन नाफेरवाले आहेत त्यापैकींच कांहीं लोक मान्याच्या मताला उघड नव्हे–उघड विरोध करण्याची त्याना छातीच नव्हती–प्रच्छन्न विरोध करणारे होते लोकमान्यासहि हें माहीत होतें ज्या दिवशीं हा समेटाचा ठराव यावयाचा होता, त्याचे आदले रात्रीं ह्या कट्टरानीं एक खाप आपसात बैठक भरवली मतें घणें चाललें तेव्हा एक वृद्ध पुणेरी वकील [हे हल्लीं मयत आहेत] I Am Opposite [म्हणजे मी विरुद्ध आहें ह्या अर्थी] ओरडले त्याच्या इग्रजीच्या ज्ञानाचें हें माढवल फुटताच हशा पिकला, हें सागणें नकोच. असो, मतें घेता समेटाच्याविरुद्ध बरीच मडळी दिसली पण भरसभेंत विरोध करावा कोणी हें ठरेना. 'माजराच्या गळ्यात घाट बाधण्यास' त्या सभेंत कोणीहि तयार होईना. लोकमान्याना ही वार्ता समजली दुसरे दिवशीं ठराव पुढें माडताच लोक मान्यानीं ह्यापैकीं प्रत्येकास हटसून–खडसून विचारलें, आणि विरोध करावयाचा असेल तर 'या आता पुढें' असें म्हणून एकेकाला पाचारण केलें लोकमान्याची ती रागावलेली मुद्रा पाहून विरोधक जागच्या जागींच जिरले, आणि समेटाला विरोधक असणारे एकेक हळूच उठून, लोकमान्यानीं पाचारल्याबरोबर समेटाला अनुकूल बोलू लागले. कोणी एक वाक्यातच "मी या ठरावाला अनुमति देतों" असें म्हणून बसले, तर कोणी पाल्हाळिक भाषणेंहि केलीं. अशा रीतीनें समेटाचें और्ध्वदेहिक करावयाला आलेली मडळी त्याचा वाढदिवस साजरा करून गेली ! लोकमान्याचें हें धोरण पुढें कॉंग्रेस काबीज करण्यास कसें उपयोगी पडलें, व ह्या कूपमडुकाचें कसें हसें झालें, हें वाचकास विदित आहेच

---

## लक्ष्मण रामचंद्र पांगारकर.

[ धी ए न्यू इ स्कूलमधील एक जुने विद्यार्थी, स 'मुमुक्षु,' हल्ली मु पंचवटी–नाशीक ]

(१) इ स १८८६ च्या जून महिन्यात इंग्रजी शिकण्यासाठीं मी पुण्याच्या न्यू इंग्लिश स्कूलमध्यें नाव दाखल केलें न्यू स्कूल तेव्हा स्थापन होऊन ६ वर्षे व विष्णुशास्त्री वारून ४ वर्षे झालीं होतीं टिळक, आगरकर, आपटे, धारप, नामजोशी, नदर्गीकर इ० शिक्षकाचीं नावें सर्व विद्यार्थ्यांच्या तेव्हा तोंडीं होतीं मी १८८९ सालीं पाचवींत आलों, तेव्हा टिळक–आगरकराचा आपला सहवास होईल अशी इतर मुलाप्रमाणें मलाहि उत्कंठा लागली, पण न्यू स्कूलमधील शिक्षकवर्गांत दुमत होऊन टिळकानीं शाळा सोडली १८९१ सालीं तरी मॅट्रिक मध्यें टिळकाच्या हाताखालीं गणित शिकावयास मिळेल अशी आशा होती, पण तसा योग नव्हता का कीं, १८९० च्या अखेरीस राजीनामा देऊन ते गेले. आगरकर, गोखले, आपटे हे एका बाजूला व टिळक, नामजोशी, धारप, पाटणकर हे दुसऱ्या बाजूला, गद्रे याच्या वाड्यात तिसऱ्या मजल्यावर या दोन पक्षात जीं भाडणें होत त्याचे प्रतिध्वनि तळमजल्यापर्यंत येत आम्हा विद्यार्थ्यांना ती भाडणें थोडीथोडीं ऐकू येत, पण विद्यार्थ्यांचें एकजात मत टिळकाच्या बाजूचें होतें एवढ मला स्मरतें

(२) मी पाचवींत असताना युक्लिडचे १० सिद्धात झाल्यावर एके दिवशीं आमचे गणितमास्तर आजारीपणामुळें शाळेंत आले नाहींत व त्या तासाला त्याच्याऐवजीं टिळक आले मला युक्लिडचे शुद्ध परिचयाचे झाले, पण विषय डोक्यात शिरेना यामुळें वर्गांत पहिल्या आकावरचा, पहिल्या–दुसऱ्या नबरचा विद्यार्थी मी असून गणितात खालीं चाललों, किंबहुना गणित कच्चें राहून पुढचा कोर्स पचकतो की काय, अशी मला भीति वाटू लागली सुदैवानें त्या दिवशीं टिळक आले व त्यानीं एका तासात पहिल्यापासून १० सिद्धात इतक्या उत्कृष्ट रीतीनें समजावून दिले कीं, मला ते समजले व शाळा सुटताच घरीं जाऊन ते मी आपलेसे केले 'एका रात्रींत तुला युक्लिड समजू लागलें' याबद्दल दुसऱ्याच दिवशीं मास्तरानीं आश्चर्य प्रकट केलें व मी गणितात वर्गाबरोबर चालू लागलों!

(३) बळवतरावाचा पहिला मुलगा विश्वनाथ हा 'न्यू प्रिपेरेटरी क्लासेस' नामक शाळेंत मी शिक्षक असताना इंग्रजी ४ थी व ५ वी इयत्ता माझ्या हाताखालीं शिकत होता मी तेव्हा वरील शाळेंत मास्तर होतों व इकडे फर्ग्युसन कॉलेजात इटरचा अभ्यास करीत होतों घरीं विश्वनाथाच्या तोंडून पांगारकर मास्तराचें नाव अनेकवार ऐकून बळवतरावानीं माझी चौकशी केली व विश्वनाथाच्या बाबतीत

अनेक संस्कृत सुभाषितें, मराठी कवितेचे उतारे, इतिहासाच्या गोष्टींची टांचणें वगैरे चाळीत असता माझ्या विद्याव्यासंगाची त्यांनी कांहीं कल्पना केली; इतक्यांत डेक्कन कॉलेजांत 'शिवपूर्वकालीन महाराष्ट्र' ह्या विषयावर झालेल्या माझ्या पहिल्या व्याख्यानाचा रिपोर्ट केसरींत डॅ. कॉ. चे केलो गोखले यांनी दिलेला अर्थातच त्यांनी पहिला. लवकरच आलेल्या गणेशोत्सवांत (हें उत्सवाचें पहिलें किंवा दुसरेंच वर्ष होतें) आपल्या लॉ क्लासमधील दोनतीन विद्यार्थी पाठवून त्यांनी माझें व्याख्यान ठरविलें व याप्रमाणें विंचूरकराच्या वाड्यात त्यांच्याच अध्यक्षतेखालीं 'महाराष्ट्राचें विशिष्टपण' या विषयावर माझें पहिलें सार्वजनिक व्याख्यान झालें. बळवतरावाचीं व्याख्यानें १८९१ पासून झालेलीं मीं ऐकलीं होतीं. रामति वयाच्या कायगाच्या लढाईत दानवाराडपासमोर टिळकांचें पहिलें मोठें जाहीर व्याख्यान झालें होतें. त्यानें बळवंतरावाची कळकळ सर्वदा प्रत्ययास येत असे. विश्वनाथाचीं मला पत्रें येत व माझीं उत्तरें जात. मी ज्या परीक्षेस बसावयाचा त्याचा रिझल्ट जाहीर होतांच पासारकर पास झाला कीं नाहीं हें बळवंतराव आधीं पाहत. शिकवण्यावर माझा योगक्षेम नीट चालतो कीं नाहीं हें त्यांनीं मला ३।४ वेळ विचारलें. तरुण, होतकरू माणसाना आपलेपणाच्या प्रेमानें मनें ओढून घ्यावयाचें हें रानडे व टिळक दोघेही उत्तम जाणत.

(४) कोणत्याहि विषयात गति नाहीं असें नाहीं, तथापि गणितात हातखंडा अशी बळवंतरावांची शिक्षक यानात्यानें प्रसिद्धि होती. माझें 'मोरोपंतचरित्र' या ग्रंथाचें संशोधन व लेखन चालू असता (१८९८–१९०८) माझें व त्यांचें त्याचे घरीं पुष्कळ वेळ 'वाङ्मय व काव्य' यासंबधीं भाषण होत असे. एकदा मी त्यांजकडे सकाळीं ८॥ वाजता गेलों तों १२ वाजता उठलों. प्रहरभर महाभारत यावरते बोलत होते. महाभारत हा त्याचा अत्यंत आवडीचा विषय. मी मुक्तेश्वर, मोरोपंत, श्रीधर वगैरे मराठी कवींचे भारतावरील ग्रंथ पाहिले होते. मला त्यांनीं मूळ महाभारत ग्रंथ पाहाण्याचा उपदेश केला, व महाभारताची योग्यता काय हें मला सागत होते. दोन–तीन वेळा मुलगा दारात येऊन 'दादा, भात वाढला आहे' म्हणून सांगून गेला, पण दादा भारतव्याख्यानात इतके तल्लीन झाले होते कीं, 'केवलैरिन्द्रियैरपि योगिनः कर्म कुर्वन्ति' या न्यायानें 'हं, येतों अ' इतके शब्द त्यांच्या तोंडून बाहेर पडत, पण जेवायला उठायचें आहे ही वृत्ति कांहीं जागृत झाली नव्हती. त्यांनीं भारतग्रंथाचें मुख्य गुणवर्णन केलें तेव्हा मला पंताची एक ओंवी आठवली व ती मीं म्हणून दाखविली, तेव्हा त्याना फार आनंद झाला. पुण्यास दरसाल पंताच्या कवितेवर माझीं एकदोन व्याख्यानें होत व बहुधा प्रत्येक व्याख्यानास आपलेपणाच्या बुद्धीनें बळवंतराव हजर राहून अध्यक्ष होत असत. एके वेळीं माझें व्याख्यान तीन तास लांबलें. दुसरे दिवशीं बळवंतराव मला म्हणाले 'काय हें व्याख्यान! व्याख्यान म्हणजे तास किंवा फार

तर दीड तास असावें ' यावर मी म्हणालों ' पण श्रोत्यांपैकीं एकही श्रोता उठून गेला नाहींना ! ' बळवंतराव म्हणाले " तें खरें तुम्ही भरामर आर्या म्हणता त्या व त्यांचें विवरण ऐकून श्रोते तल्लीन होतात हें मला ठाऊक आहे, पण नियमित वेळांत काम करायला शिकलें पाहिजे वेळ्हटराई पाहा, तासभर व्याख्यान द्यायचें ठरवून तासात संपविते हा विचा गुण घेतला पाहिजे." यावर मी म्हणालों, ' 'मध्यें मध्यें जें जें आठवतें तें तें मी बोलत जातों, यामुळें विषय श्रोत्यांना पुरा ऐकायला मिळून रसनरंग उभा राहतो आपण काहीं घड्याळाचें गुलाम नाहीं " यावर ते पुन म्हणाले " आते वेडे, तुम्ही वेडे ! नियमितपणें काम करायची सवय लागली पाहिजे आम्हाला काय मध्यें दुसरे विषय आठवत नाहींत ! पण जेवढे मुद्दे सांगायचे अगोदर ठरविलें असल त्याच्या बाहेर जायचेंच नाहीं असा निग्रह पाहिजे " ' काव्यविषयाला असा निर्बंध घातल्यास रसभग होईल ' असं मी म्हणालों यावर ते पुन म्हणाले " नियम सर्वत्र सारखेच पाळले पाहिजेत आम्हाला केसरींत एखादा विषय लिहावयाचा असला तर आम्ही पाच ओळी पासून पाच कॉलमापर्यंत लिहू शकतों सोमवारीं एखाद्या विषयावर लिहावयाचें असलें तर नागा किती आहे हें विचारून आम्ही अर्धा कॉलम जागा असेल तर अर्ध्या कॉलमात, तीन कॉलम असेल तर तीन कॉमात तोच विषय लिहू शकतो " दुसऱ्या एका प्रसगीं मी आपल्या भाषणात सहज ' गणित विषय रुक्ष आहे, काव्यरसाची गोडी त्याला कोठून येणार ! ' असें म्हणाला होतों पुन बळवत रावाची गाठ पडल्यावर ते म्हणाले, " तुम्ही परवा म्हणाला कीं, गणित विषय रुक्ष आहे व त्यात काव्य नाहीं म्हणून पण हं म्हणणें बरोबर नाहीं " मी मेकॉले व विष्णुशास्त्री याचीं उदाहरणें पुढें केलीं तेव्हा ते म्हणाले, " गणिताची ज्याला गोडी नाहीं किंवा गणितात ज्याचें डोक शिरत नाहीं त्याची विचारसरणी एक प्रकारें अपक्व ( Defective ) राहते गणिताच्या योगानें विचाराची साखळी अत्रुटित व सुसंबद्ध होते गणितात काव्य नाहीं हे खोटें आहे शाळातून किंवा कॉलेजातून जें गणित शिकवितात तें खऱ्या गणितशास्त्राची पहिली पायरी आहे तुम्ही जसे काव्यात तल्लीन होता तसे आम्ही गणितात तल्लीन होतों मुळाशीं पाहिलें म्हणजे सर्व शास्त्रें एकरूप आहेत माणसानें आपल्या सोयीसाठीं शास्त्रें निरनिराळीं कल्पिलीं, पण सर्व शास्त्रें मुळात एक आहेत गणितात काव्य आहे व काव्यात गणित आहे ! " काव्यात गणित कसें आहे हें दुसऱ्या एका प्रसगानें स्पष्ट होतें फर्ग्युसन कॉलेजात टिळकांना एकदा प्रीव्हिअसच्या विद्यार्थ्यांना कालिदासाचें ' मेघदूत ' शिकविण्याचा प्रसग आला होता बळवतरावानीं मल्लिनाथी न पाहता आपल्या बुद्धीनें कोणाचें साह्य धरून ' मेघदूत ' शभर वेळा वाचलें व स्वत ऱ्या बुद्धीनें सारा ग्रथ लावला गणिताच्या किंवा भूमितीच्या जशा पायऱ्या असतात त्याप्रमाणें पहिल्या श्लोकातून दुसरा कथा निघाला,

पुरुष हिंदुस्थानात आहेत, त्यांच्या दावून देशकार्य रेटत नाही असें दिसू लागलें कीं, नायका देशाचें जू सायावर घ्यायला तयार आहेत. तुम्हाला समजून काय दिवे लावता येतात ते लावा, नाहीं तर नायका आहेतच ! "

(१०) बळवंतरावांना नटनाट्य, गायनविद्या इ. ललितकलांची प्रीति कितपत होती हें सुप्रसिद्ध आहे ! १९०७ च्या शेवटीं शेवटीं उत्तरहिंदुस्थानांतला एक गायनविद्याप्रवीण असा मनुष्य गायनशास्त्रावर एक ग्रंथ लिहून तो बळवंतरावांना दाखविण्यासाठीं पुण्यास आला होता. मी त्याला घेऊन त्यांजकडे जावें म्हणून तो मजकडे आला. 'बळवंतरावांचा वाडा म्हणजे खुला दरबार आहे. तेथें ओळख नको, वशिला नको. पाहिजे त्यानें त्यांना भेटावें. ते अतिशय मोकळ्या मनानें बोलतात. माझी तुमच्याबरोबर यायला मुळींच हरकत नाहीं, पण त्याची तादृश गरज नाहीं ' असें सांगून मी त्याला बळवंतरावांकडे पाठविलें त्यांची भेट घेऊन तो सायंकाळीं मजकडे आला व म्हणाला, " काय या पुरुषाची बुद्धि अचाट ! टिळकांना गायनविद्या माहीत नाहीं असें मी तरी कांहीं म्हणणार नाहीं. माझें पुस्तक चाळून पाहता पाहता व मजशीं बोलता बोलता त्यांनीं मला गायनासंबंधीं ज्या मार्मिक सूचना केल्या त्या ऐकून मी तर थक्क झालों. टिळक म्हणजे एक अष्टपैलू हिरा आहे यांत कांहीं शंका नाहीं. त्यांच्या बुद्धिमत्तेप्रमाणें त्यांचा साधेपणा व निगर्वीपणा कांहीं अनुपम आहे. एवढा मोठा मनुष्य पण किती साधा. त्यांचा माझा जसा अनेक वर्षांचा परिचय आहे इतक्या मोकळेपणानें ते मजशीं एकदोन तास बोलत होते. "

(११) पैठणचे भगवंतराव तोंडेवाले हे मनुष्याची तोंडावरून कुंडली मांडणारांना सभा भरवून कांहीं बक्षिसें देण्यासाठीं एकदां पुण्यास आले होते. सार्वजनिक सभेच्या मागील दिवाणखान्यांत सभा भरली होती. सभेस कांहीं ज्योतिषी व कांहीं इतर सभ्य गृहस्थ आले होते बळवंतराव अध्यक्षस्थानीं होते. आठ दहा उमेदवार होते त्यांच्या कुंडल्या मांडून झाल्यावर परीक्षक नेमले गेले, त्यांत मी व माझ्यासारखे पांच-सहा ज्योतिषाविषयीं पूर्ण अनभिज्ञ असे गृहस्थ होते. शिवरामपंत परांजपेही परीक्षकांत होते टिळकांशिवाय बाकीचे सारे नामधारीच होते ! कागदांची पुडकीं घेऊन बळवंतराव व आम्ही सर्वजण तिसऱ्या मजल्यावर गेलों. बळवंतराव मध्यें बसले व इतर मंडळी सभोंवार बसली. कागद उघडून इतरांनीं त्यांतील माहिती वाची व टिळकांनीं रिझल्ट शीट तयार करावा असें चाललें होतें. दहा मिनिटांत सर्वजण कंटाळून गच्चीवर एकेक उठून गेले, व गप्पाटप्पांत दंग झाले. टिळकांवर सर्व काम पडलें. प्रत्येकाच्या नांवचे कागद घ्यायचे, ते तपासायचे, रिझल्ट लिहावयाचा, सर्व काम सायंत पाऊण तासपर्यंत त्यांनीं एकट्यानीं केलें. बाकीचे सारे अनभिज्ञ होतेच, पण त्यांना साह्य करण्यास आगेवर कोणी राहिला नाहीं. बळवंतराव ह्या कामांत इतके गर्क झाले होते कीं,

जणु काय ह्या सभेच्या निर्णयावर हिंदुस्थानचें मोठें राजकारण अवलंबून होतें ! गोष्ट क्षुल्लक आहे पण मोठ्या मनुष्याचें मोठेपण क्षुल्लक गोष्टींत जितकें स्पष्ट दिसतें तितकें तें कित्येकदा मोठ्या गोष्टींत दिसत नाहीं सिंह हा सर्वकालीं सिंहच असतो, राजाचें राजेपण त्याला पळभरही सोडून जात नाहीं त्याप्रमाणें थोर पुरुषाचें थोरपण त्याच्या प्रत्येक लहानमोठ्या कृतींत प्रकट होत असतें ह्या प्रश्नाचा उद्यापासून कोणी विचार करणार नाहीं असें सर्व बोलत होते, टिळकानाहि हें दिसत नव्हतें असें नाहीं पण ज्या वेळीं जें काम अंगावर घेतलें तें आपली सर्व बुद्धिशक्ति खर्चून श्रमाची पराकाष्ठा करून करायचें, त्यात चुकारतट्टूपणा यत्किंचित् करावयाचा नाहीं हें कर्मयोगाचें रहस्य त्यांच्या अंगीं पूर्ण बाणलं होतें घोंवती कुचरपणा करीत आहेत हे जाणून टिळकाची स्वारी त्या कामात इतकी दंग झाली होती कीं मस्तकावरून घामाच्या धारा चालल्या होत्या याची त्याना शुद्धीहि नव्हती ! 'लहानथोर काम नाहीं । केल्यावीण होत नाहीं' हें समर्थांचें वचन त्यांच्या आचरणात दिसत होतें रिझल्टशीट तयार झाल्यावर आम्ही सर्व खालच्या हॉलमध्यें आलों निम्मे भोंते गेले होते टिळकानीं अध्यक्षपणाचें भाषण करताना 'परीक्षकानीं असा निकाल दिला आहे' इ० गौरवपर भाषा त्यांच्या तोंडून आली ती ऐकून परीक्षकाना आपल्या कुचरपणाची मनात लज्जा वाटली असल ! खरे श्रम आपण करायचे व त्याच्या गौरवाचें फळ मात्र आपल्या सोबत्यास वाटून द्यायचें हेंहि मोठेपणाचेंच लक्षण होय

(१२) एकदा न्यू स्कूलमधील शिक्षक व रघुवंश, जानकीहरण वगैरे संस्कृत ग्रंथ इंग्रजी भाषांतरासह प्रसिद्ध करणारे नदगींकरशास्त्री बळवंतरावांशीं बोलत बसले असताना मी तेथें गेलों कालिदासाच्या रघुवंशाची छाया जानकीहरणादि ग्रंथावर कशी पडली आहे हा विषय चर्चेचा होता उभयता विद्वान् जानकी हरणातला एक श्लोक नदगींकरानीं सुंदर म्हणून काढला तो ऐकताच बळवंत राव म्हणाले 'अहो ! ह्या श्लोकातली कल्पनाही कालिदासापासून उचलली आहे तो श्लोक अमक्या प्रसंगीं आहे' दोघेही श्लोक आठवू लागले चारपाच मिनिटात बळवंतरावानीं प्रथम श्लोक आठवून त्यानीं म्हणून दाखविला ! शास्त्रीबोवाही चकित झाले एकदा प्रि सेल्बीवर 'हे आमचे गुरुच नव्हत' या मथळ्याखालीं बळवंतराव अग्रलेख लिहीत बसले होते वामनपंडिताच्या कोठल्याशा काव्यात अनुरूप श्लोक आहेत एवढें त्यास आठवलें, पण वामनाचे ग्रंथ जवळ नसल्या मुळें त्यानीं तावडतोब लवाट्याना मजकडे पाठविलें लवाटे म्हणाले, 'वामनाचे ग्रंथ आतांच्या आता बळवंतरावानीं मागितले आहेत' कशासाठीं पाहिजेत हें मी त्याना विचारलें 'तें तुम्हाला काय करावयाचें ? पुस्तकें द्या' असें लवाट्यानीं उत्तर केलें 'कशासाठीं पाहिजेत हें कळलें म्हणजे बळवंतरावाना पानें चाळविण्याचे श्रम पडणार नाहींत' अशी मीं गळ घातली तेव्हा त्यानीं अग्रलेखाचा

विषय मला सांगितला. मी प्रल्हादाख्यानांतील 'हे तों गुरू पापतरू म्हणावे' हा व दुसरा असाच श्लोक—त्यासाठीं तांबड्या पेन्सिलीच्या खुणा करून त्यांत खुणेचें पान घालून पुस्तक दिलें. बळवंतराव संतुष्ट झाले. तेच दोन श्लोक त्यांना पाहिजे होते, व तेच त्या लेखांत नेमके आले.

(१३) निरपेक्ष ज्ञानदान करणारा ज्ञानी पुरुष हें आपलें ज्ञानदान भस्मासुराप्रमाणें आपल्याच डोक्यावरून हात फिरवील हें माहीत असूनही सढळ हातानें ज्ञानदान करीत असतो, हें बळवंतरावांच्या संगतींत मला एकदा आढळून आलें. १८९६ च्या दुष्कांळात दुष्काळाची चोहोंकडची भरपूर माहिती गोळा करून तिच्या आधारें त्या वेळीं आपलें तीव्र लेखनशास्त्र त्यांनीं सरकारावर परजिलें होतें. सार्वजनिक सभा टिळकपक्षीयांच्या हातीं गेल्यामुळें रानडे-गोखले पक्षानें चिडून वेगळी डेक्कन सभा काढली होती व 'हा म्हातारचळ का पोरखेळ' हा तिखट लेख केसरीनें प्रसिद्ध केला होता. गणेशोत्सव व शिवाजीचा उत्सव नव्या जोमानें भरभराटीस आले होते. टिळकांच्या कर्तृत्वाचा मध्यान्ह झाला होता. अशो; रघुनाथ दाजी नगरकर, वकील, हे टिळकांच्या प्रतिपक्षीयांत म्होरक्येपणानें वावरत होते. डेक्कन सभेनें सरकाराकडे दुष्काळाच्या माहितीच्या आधारावर एक अर्ज केला व टिळकांची सार्वजनिक सभा कांहींच करीत नाहीं, असा तत्पक्षीयांनीं आपल्या वर्तमानपत्रात गिल्ला केला. आश्चर्याची गोष्ट ही कीं, डेक्कन सभेनें केलेल्या अर्जाला आधारभूत माहिती टिळकच पुरवीत होते! दोन दिवस सदर नगरकर वकील टिळकांच्या घरीं येत होते, व कांहींहि चोरून न ठेवितां टिळक आपलीं पुस्तकें, रिपोर्ट, खासगी येणारीं पत्रें वगैरे त्यांना दाखवीत होते हें मी स्वतः त्या दोनही प्रसंगीं हजर असून समक्ष पाहिलें आहे.

(१४) बहुजनसमाजाच्या थोड्याफार कलानें घेतल्याशिवाय लोकांत प्रीति उत्पन्न होत नाहीं व लोकांचा सप्रेम पाठिंबा असल्याशिवाय परकीय सरकाराशीं झगडण्याचें सामर्थ्य पुढाऱ्यांत येत नाहीं हें तत्त्व टिळकांनीं बरोबर ओळखलें होतें. रानड्यांचीं सामाजिक मतें या लोकप्रियतेच्या आड आलीं व गोखले लोकसमाजाशीं सामान्यतः फटकून वागत असल्यामुळें त्यांना ती मिळाली नाहीं. दोघेहि कर्तृत्वाचे थोर पुरुष होते, तथापि टिळकांची लोकप्रीति त्यांना मिळाली नाहीं. टिळकांचीं कांहीं मतें सुधारणेला अनुकूल होतीं, पण लोकाराधनेचें तत्त्व त्यांनीं सांभाळल्यामुळें त्यांची लोकप्रीति वाढत्या प्रमाणांत होती. पुण्यातून आळंदी-देहूच्या पालख्या पंढरपुरास ज्येष्ठ वद्यांत जातात. एक साल वारकऱ्यांच्या आग्रहावरून टिळक पालख्यांबरोबर पुण्यातून हिंडले व लोकांनींहि जागोजाग त्यांच्या गळ्यांत हार घालून त्यांचा सत्कार केला. एक साल पुण्याच्या हजारों तरुणांनीं शिमग्याची धुळवड गायकवाडवाड्यांत गाजविली.

बळवंतरावाच्या जवळ बसलेल्यांपैकीं एकानें लावणी म्हणण्याची आपली इच्छा प्रगट केली ! त्या गृहस्थानें लावणी म्हटली. पण ती संपताच बळवंतरावांनीं सर्वांस गुलाल लावून रसपान करविण्याची आज्ञा केली. समारंभ सभ्यतेनें पार पडला, पण ज्ञानप्रकाशानें त्या प्रसंगावर आपल्या लेखणीची धूळ उडविलीच ! 'आपले लोक आहेत ' असे घेऊन राजकारणाचा गाडा पुढें ढकलायचा हें टिळकांचें तत्त्व होतें म्हणून ते लोकांत इतके प्रिय झाले. कायदेकौन्सिलचे सभासद ते निवडले गेले त्या वेळीं हिराबागेंतल्या समारंभांत पुण्याच्या एका मुख्या पगडबंदानें पूज्यबुद्धीनें त्यांच्या डोक्यावर पगडी ठेवली व कित्येकांनीं ते सुटले त्या रात्रीं आपल्या दुकानांतली मेवामिठाई व दूध रात्रभर येतील त्यास फुकट वाटलें, या गोष्टीचें बीजही वरीलप्रमाणें आहे

(१५) टिळकांचा वाढता उत्कर्ष बऱ्याच सुधारकांना सहन न झाल्यामुळें साहजिकच टिळकांबद्दल त्यांच्यांत वैरभाव वाढू लागला टिळक हे पहिल्यापासून कर्मठ नव्हते, तथापि पुष्कळ सुधारकांमध्यें दिसणारा आचरटपणा मात्र त्यांनीं केला नाहीं त्यांनीं आपल्या तीनही मुलींचे विवाह उशीरा केले, व त्यांना हिंदुपद्धतीचें शिक्षण दिलें. तिसरी मुलगी १२ वर्षांची असता म्हणजे विवाहाचे अगोदर आम्ही त्यांचे घरीं बोलत बसलों होतों बळवंतराव महाभारतांतील काहीं गोष्टी सांगत होते मुलगी शेजारींच होती त्यांनीं आम्हास विचारलें, या मुलीला आम्ही किती शिक्षण दिलें आहे हें तुम्हास माहीत आहे काय ? आम्ही नाहीं म्हणताच बळवंतरावांनीं तिला सावित्रीगीत म्हणून दाखविण्यास सांगितलें ते म्हणाले, मीं हिच्याकडून मोरोपंतांनीं मुलींसाठीं केलेलें सावित्रीगीत व रुक्मिणीगीत पाठ करवून घेतलें आहे सध्या सीतागीत चालू आहे रामायण, भारत यामधील सर्व कथा हिला ठाऊक आहेत आमच्याकडे कथा-कीर्तन झालें, किंवा व्याख्यान झालें तर तें हिला समजण्यास पंचाईत पडत नाहीं

## गणेश महादेव जोशी.

[ कै. माधवराव नामजोशी ( टिळकाचे परम मित्र ) यांचे चिरंजीव, मे. इंजिनियर. विलायतचे डेप्युटेशनचे वेळीं लोकमान्यांबरोबर गेलेले त्यांचे प्रायव्हेट सेक्रेटरी, मु. अंबरनाथ. ]

(१) वडील नुकतेच वारले होते व घरात कोणाचाच दाब नसल्यामुळें गावातून भटकत होतों; तों सुमारें सकाळचे अकरा वाजता सदाशिव पेठेंत कुंट्याच्या वाड्यासमोर दादा व बाबा भेटले. मी अनवाणीच होतों. लगेच पायाना जोडा खरेदी करून देण्याचा हुकूम सुटला. घरातल्या गोष्टींत इतकें लक्ष घातलेलें कोणालाच आठवत नाहीं. परंतु माझ्या पायतींत का घातलें याचें उत्तर कोण देणार ?

माझे वडील वारल्यापासून तों स्वत: लोकमान्यांच्या मरणापर्यंत माझ्या कुटुंबाचा सर्व खर्च चालविला. त्यात तीन बहिणींचीं लग्नें, माझें लग्न व भावाची मुंज इतकीं कार्यें झालीं. शिक्षण आम्हा दोघांचे मॅट्रिकपर्यंत व वडील जिवंत असताना ज्या रीतीनें राहिलों असतों किंवा नाहीं याची आम्हा सर्व कुटुंबाला शंकाच आहे. बहिणींच्या लग्नानतर त्यांचा भार हलका झाला नाहीं हें सागण्याची आवश्यकता आहे व दोनहि तुरुगवास याच कारकीर्दीत दादानीं भोगले हें सागणें अवश्य आहे. शिवाय त्यांच्याबरोबर विलायतेला गेलों म्हणून कार्डी तरी रकम उचलून देण्याचा मानस होताच

(२) पुण्यास वडील मुलगा अत्यवस्थ पडलेला असताना रायगडाला उत्सवाला गेले होते. येताना भोराहून लौकर पुण्यास येऊन पोंचतील म्हणून तिकडून येण्याची व्यवस्था केली होती. याच प्रवासात भोरला मुक्काम करणें भाग होतें, व तेथें जेवण्याची व्यवस्था करण्याविषयीं रायगड उत्सवकमिटीकडून तार गेलेली, तेव्हां दादा कोठें उतरणार अशी चर्चाईतच होती. जसा गाव जवळ आला तशी मंडळी सामोरी येऊं लागली व कोण कोण येत आहेत त्याची माहिती देणें मला भाग पडलें, तेव्हा मंडळी उतरावयास आपल्याकडे बोलावूं लागली. शेवटीं सर्वांना त्यांनीं एकच उत्तर दिलें कीं, तेथें माझें घर आहे, तेथें उतरणार व शेवटीं सर्वांतीं तें माझ्यास विऱ्हाडीं उतरावयास आले.

(३) यानतर सुरतेच्या कॉंग्रेसच्या वेळेला मी कॉंग्रेसला येऊं का, असा प्रश्न विचारला असता दादाच्या मॅट्रिक्स तुझ्यासारख्यानें न येणेंच बरें, कारण तेथें मारामारी होण्याचा रंग दिसत आहे, व तेथें तुझ्यासारख्यानें येणें म्हणजे मारामारीस प्रोत्साहन देण्यापैकींच आहे. तेव्हा तू तेथें येऊच नकोस असें निक्षून सांगितलें.

(४) यानतरचा प्रसग म्हणजे धाकट्या बहिणीच्या लग्नाच्या वेळेचा लग्नासारखें कार्य आपल्या मालकीचा वाडा असता दुसऱ्या जागेंत कोण करू देणार ! शिवाय वाडा किती तरी मोठा होता परतु या वेळेस त्याना स्वत वर खटला होईल असा सभव वाटत असल्यामुळें घरीं येऊन आईला सागितलें कीं, माझ्यावर खटला होण्याचा सभव दिसत आहे. तेव्हा निराळ्या जागेंत जानोसा देणें भाग आहे तरी पण सकाळपासून सध्याकाळपर्यंत माझा मुक्काम येथेंच होणार

(५) १९०८ सालीं खटल्याच्या वेळेस त्याचें जेवण घेऊन जाण्याचा मान कांहीं दिवस मजवर येऊन पडला होता त्या प्रत्येक वेळेस जर कांहीं बोलण्याचा प्रसग आला तर स्वत च्या वरच्या प्रसगासबधीं एक अक्षरही ते बालल नाहींत तर बहिणीच्या लग्नाच्या वेळेला बोललों तें खरें झालें किंवा नाहीं, किंवा असल्याच खासगी गोष्टींसबधीं बोलले तसेंच ह्या प्रसगीं आपल्याला या वेळेस अमुक पुस्तकाची गरज आहे व ती अमक्याला पाठवून आणावीं, दुसरें कोणीहि उपयोगी पडणार नाहीं, अशाविषयीं त्यानीं लिहून सागितलें कोणत्या कामीं कोणाची योजना करावी हें दादा चागल्या प्रकारें ओळखत व त्या माणसाची त्या ठिकाणीं योजना करीत त्या प्रसगीं पुण्याहून मुबईस येण्यास रेलवेंतून अडचण पडत असे अशा वेळीं पोलिसात माझी थोडीशी ओळख होती व तेणेंकरून मला येण्यास सुलभ पडेल हें ओळखूनच दादानीं मला पुण्याहून कांहीं वर्तमानपत्राच्या फायली व पुस्तकें आणावयास सागितलीं व अर्थातच मला पोलिसाच्या सहाय्यानेंच मुबईस यावें लागलें शेवटच्या दिवशीं तर माझी स्थिति फारच मजेदार झाली खटला आज सपणार हें पुष्कळाना कळलेंच नाहीं, त्यामुळें मडळी सर्व घरोघर निघून गेली, कांहीं मडळी आली नाहींत यावरून एथा येऊन काय आहे याची चौकशी करतो कोण ? तेव्हा अर्थातच जेवण आणणाऱ्याकडे कामगिरी सागावी असें सरदारगृहातल्या मडळींनीं ठरविलें इतक्यात बातमी येऊन थडकली कीं, खटल्याचा निकाल आजच लागणार, तेव्हा खरें काय त समजावून घेण्याकरिता सरदारगृहातल्या मडळींनीं मला पाठविलें अशा वर्ळी हातात रिकामी फराळाचा डबा घेऊनच बाहेर पडलों ! कारण त्या वेळेस जवावयाचें तयारच नव्हतें असो. कसा तरी हायकोर्टाच्यापुढें जाऊन पोलिस कमिशनरपर्यंत दाद लावल्यावर कोर्टाच्या आवारात जावयास मिळालें शेवटीं खटल्याचा निकाल झाला दोन मोटारी निघून गेल्या त्याच्यामागून दुसऱ्या तीन मोटारी निघून गेल्या तरी मला सोडलें नाहींच शेवटीं जिकडे तिकडे सामसूम झाल्यावर माझी सुटका झाली व कांहीं कारणास्तव तसेंच पुण्यास जावयास लागल्यामुळें खटल्याचा निकाल काय झाला हें पुण्यास सकाळीं समजलें

(६) तुरुगातून सुटल्यावर, सुटल्याबद्दलची तार पोंचल्याबरोबर रजेची व्यवस्था करण्यास लागलों परतु रजा न मिळाल्यामुळें नोकरीच सोडून दिली व भेटण्या

करितां पुण्यास आलों. आज दादांच्या भेटींत प्रेमळपणा किती तरी वाढलेला दिसला. आई मेल्याबद्दल व त्यामुळें पोरका झाल्याबद्दल त्यांना किती तरी वाईट वाटलें. शेवटीं नोकरी कां सोडली ह्याची चौकशी करतांना, अरे, माझी सुटल्याची तार आली म्हणून तर नोकरी सुटली नाहीं ! अशी त्यांनींच चौकशी केली. असो; यानंतर सिंहगडावर जाणार आहे तेथें दोन दिवस राहावयास येण्याचा आग्रह केलाच. परंतु मलाच नोकरीची फिकीर असल्यामुळें दुसऱ्या नोकरीकरितां निघून गेलों.

(७) यानंतरचा प्रसंग म्हणजे माझ्या लग्नाच्या वेळेचा. लग्न ठरविलें व नंतर गांठ पडल्यावर म्हणाले कीं, सर्व खरें, पण तुझें देवदेवक ठेवावयाचें कोणी ! तेव्हां अर्थातच मीं सांगितलें कीं, आपण. पण त्या वेळेस त्यांची प्रकृति बरी नसल्यामुळें त्यांनीं धायांनाच देवदेवक ठेवावयास सांगितलें. परंतु व्याही भेटीच्या वेळेस, लग्नाच्या वेळेस व शेवटीं सुनेच्या तोंडांत साखर घालण्याच्या वेळेस स्वतः हजर राहून नंतर सिंहगडावर निघून गेले. हें सांगण्याचें महत्त्व एवढेंच कीं, डॉक्टरांनीं याच्या आधींच त्यांना सिंहगडावर निघून जाण्यास सांगितलें होतें, परंतु कदाचित् मला व माझ्या घरच्या मंडळींना वाईट वाटेल म्हणून तेथें राहिले.

(८) विलायतेला जातेवेळेस मला बरोबर नेणार हें पुष्कळांना समजल्यावर वाईट वाटूं लागलें, व मी कोण उपटसुंभ म्हणून जो तो विचारूं लागला ! मला दादांनीं स्पष्ट बजावलें होतें कीं, मला पाठीमागें आशा ठेवून येणारीं माणसें नको आहेत. निव्वळ माझ्याबरोबर सारखा चोवीस तास राहणारा माणूस हवा आहे, व त्यामुळेंच तुला नेत आहे. तशीच माझीहि भावना तशीच होती. वर सांगितलेल्या मंडळीला त्यांनीं एकच उत्तर दिलें कीं " त्याचें पालन मी आपल्या मुलाप्रमाणें केलें आहे. तेव्हां त्याला बरोबर नेण्याचा माझा हक्क आहे. त्यानें जर नाकारलें तर मग दुसऱ्या माणसांचा विचार. " माझ्या कपड्यालत्त्यांचाहि सर्व खर्च त्यांनींच आपलेपणानें केला.

(९) स्टेशनवरची गर्दी पाहून यांतून दादा कसे येऊं शकतील याचीच आम्हांस काळजी वाटूं लागली. असो; स्वयंसेवकांच्या पथकांतून दादा गाडींत आले व शेवटीं गाडी चालू झाली. कोठल्या स्टेशनवर कोणी पोर्टरच येई व स्वराज्यसंघास मदत म्हणून दोन पैसे, चार आणे किंवा त्यांच्याजवळ जें काय असेल तें दादांच्या हातांत देई, पायावर डोकें ठेवी कीं चालला. अशा रीतीनें निघाल्यापासून तों मद्रासपर्यंत दादांना किंवा त्यांचेबरोबर असलेल्या मंडळींना झोंपच आली नाहीं. वाटेंतली मजा सांगण्यासारखी म्हणजे ज्या स्टेशनावर गाडी उभी राहत नसे, त्यावर देखील लोकांची अतोनात गर्दी असे व रात्रीचे मशाली लावून "टिळक-महाराजकी जय" ओरडण्यांत व झुकझुक पळणारी गाडी पाहण्यांत त्यांना काय मजा वाटत असे तें समजत नाहीं !

मद्रासहून धनुष्कोटीला धाटांपर्यंत प्रवासाची गर्दी मागें होतीच, परंतु प्रमाण थोडें कमी होतें. या सर्व प्रवासांत दादाचे इतके हाल झाले की, विचारूंच नका. उघड्या पायीं मरडन्हातून त्याची मिरवणूक काढली गेली, तरी पण कोणाला नाखूष करावयाचें नाहीं म्हणून ते सर्व त्यांनीं सोसले. उन्हामुळें कधीं कधीं त्यांना जेवणही जात नसे. अशा वेळीं निवळ चहावर दिवस किंवा उपवास. असो, धनुष्कोटीला बोटींत बसून पलीकडे तल्याभानारला जाऊन पांचेतों सगळे विचार रामाच्या सेतूबद्दल चालले होते. कोलंबोस आमचे पासपोर्ट रद्द करो झाले, याची हकीकत वर्तमानपत्रांतून आलीच आहे. मद्रासेहून मुंबईस येतांना प्रवासांत आलेला सर्व शीण त्यांनीं अल्पन येतांना घालविला. कारण आम्ही निघणार केव्हां हें कोणालाच कळविलें नाहीं. वाटेंत सोलापुरजवळ गुप्त पोलिसांचा एक हुद्देदार दादाजवळ बोलूं इच्छित होता व त्यानें तसें दादास कळविण्यास सांगितलें, व दोघांचें बरोबरी दोनतीस तास बोलणें झालें. येतांना आमच्या सामानापैकीं दादाचे थोडेसे कपडे चोरीला गेले. याशिवाय दुसरें महत्त्वाचें असें

गोविंदजी वसनजींनीं मुद्दाम करून दिलेल्या मालापैकीं कधीं पुऱ्या, कधीं खाज्या, कधीं तारफेणी व दूध, दहीं, भाजी वगैरे पदार्थ व शिवाय लोणचीं पाकसिद्धी आम्हीच करीत होतों. सामान मात्र बोटीवरून घेत असू. जरी आमच्या खाण्यांत फळें जास्त असावीं अशी अट आम्ही तिकिटें घेतांना घातली होती तरी तीं मिळण्यास थोडीफार अडचण पडली परंतु द्रव्याच्या किल्लीनें हात सढळ करीत असू. दादा कोणत्या कामाकरितां जात होते हें सर्व साहेब लोकांना माहीत होतें. त्यामुळें कधीं काळीं एखादुसरा साहेब चार शब्द बोलत असे. त्यांत हिंदु-मुसलमानांचें विटुष्ट, अठरापगड जाति, असल्याच गोष्टींना समावेश असे. असो. काहीं दिवस आम्हांला एक बंगाली बाबू म्हणजे करमणुकीचा विषय होऊन बसला होता. बाबूमहाशय शिक्षणाकरितां विलायतेला निघाले होते. अर्थातच पहिले दिवशीं त्यांनीं आपलें मन विशेष लावलू दिलें नाहीं. परंतु दुसरे दिवशीं दोनचार वेळ जीव देण्यास निघाले. एडनवरून परत जातों म्हणून म्हणू लागले. डोकें आपटीत, रडत, अशा तऱ्हेनें काहीं वेळ करमणूक म्हणून जरी वाटत होती तरी पुढें पुढें त्याचा त्रास होऊं लागला. दादांनीं त्यांना उपदेश करून पाहिला, परंतु काहीं उपाय नाहीं. शेवटीं त्यांना सर्वांनीं स्पष्ट बजावलें कीं, आतां जर गप्प राहिला नाहींत तर कॅप्टनकडे तक्रार करून कोंडून ठेवण्याचा प्रसंग येईल तेव्हां जरा प्राणी शांत झाले. असो, अशा रीतीनें पहिले तीनचार दिवस गेले. जसजसें एडन जवळ येत चाललें तसतसे घरीं पत्र लिहून आम्ही येथपर्यंत खुशाल आलों हें कळविण्यांत व दुसऱ्या अनेक ल्हान मोठ्या गोष्टी कळविण्याकरितां लिहिण्यांतच आमचा वेळ गेला. बंदरावर बोटीची डॉक्टरची तपासणी होते व त्या वेळीं क्वारंटाईन वगैरेसंबंधीं हुकूम सुटतात. या वेळेला आजार वगैरे काहीं नव्हता. परंतु इंडियन पॅसेंजर्सना फक्त उतरण्याची मनाई झाली व बाकीची सर्व मंडळी उतरली. अर्थातच सर्वांना वाईट वाटलें, परंतु उपाय काय ? ह्यांत काहीं तरी गुह्य हेतु होता. त्याशिवाय दादांना एडनला उतरण्याला बंदी करण्याचें कारण काय ? असो. येथें कॉंग्रेसच्या अध्यक्षाचा मान दादांना मिळाल्याची तार मिळाली आम्ही सुखरूप पोंचल्याबद्दल आम्हींही पुण्याला तार केली. व इतर गप्पा मारण्यांत वेळ घालविला. थोडेसे खाण्याचे पदार्थ घेतले व लगेच पुढील कार्यक्रम ठरविला. चिरोल-केसचे कागद काहीं वाचावयाचे राहिले होते. तेव्हां त्याची वाटाघाट करण्याकरितां पुस्तकें बाहेर काढून ठेविलीं. असो. या वेळेस मला ल्युलेखन येत असतें तर बरें झालें असतें असें वाटू लागलें. कारण पुष्कळसे संवाद टिपून ठेवण्यासारखे असत. एडन सोडल्यावर आमच्या घोतर नेसण्यासंबंधीं पॅसेंजर लोकांत कुरकुर सुरू झाली. दादांना पायाला सवय व्हावी म्हणून हळूहळू बूट घालण्यास सुरुवात करण्याचें ठरविलें होतें. तसेंच त्यांचे कपडेही नीट वाढून साफ करून ठेविले होते. अशा वेळीं त्या बोटीवरील

चीफ एंजीनिअर मला विचारूं लागले कीं, टायलर, साहेब नाही ? साहेबांना सांगितलें कीं, त्याच्याजवळ इतके कपडे आहेत कीं, कदाचित् तूं तितके पाहिले नसशील एडन सोडल्यापासून हळुहळु म्हणजे दिवसाचे निदान दोनतीन तास तरी पाटलोणी घालूं लागलों.

पोर्टसैदला गेलों. येथेंही आम्हाला उतरूं दिलें नाहींच येथें आमचा मुक्काम तीनचार दिवस होता असो ह्या सुमाराला विरोल–खटल्यातील पुस्तकें मला पाहावयाची इच्छा झाली व त्यात दादानीं दिलेली आपली स्वत ची सगतवार तोटक हकीकत पहावयास मिळाली तसेच सावरकरबंधु यांच्या खटल्यासबधींहि काहीं कागद वाचावयास मिळाले त्या वेळेस ते शिक्षेच्या अमानुष प्रकारासबधीं बराच जवळ आपणाशींच बोलू लागले केवळ राष्ट्राचें कल्याण व्हावें ह्या हेतूनें प्रयत्न करीत असता जन्मठेपेची शिक्षा देण्यापेक्षा अशा माणसाला एकदम ठार मारून टाकला तर बरा तुरुगात आपलें आयुष्य कठीत असताना किती याला किती मानसिक यातना सोसाव्या लागत असतात.

दुसऱ्या एका प्रसगीं त्यानीं स्वत राष्ट्रकार्याकरिता माणसें मिळण्याविषयीं आपण कसकसे प्रयत्न केले ते सागत होते मी पुण्यामारख्यानंडे प्रयत्न केले परतु फर्स्ट क्लास मडळीपैकीं कोणीही मडळी माझ्याकडे यावयास तयारच होईना ज्याला त्याला स्वतत्र रीतीनें काम करण्याची हौस व त्यात राजकारणासारखा बिकट मार्ग नको होमरूललीग स्थापन केल्यावर माझ्यावर मानपत्रदीचा खटला झाला, व त्याच्याचा हायकोर्टात निकाल होण्यापूर्वी कित्येक मडळींकडून आमची नावें पटातून काढून टाका अशी पत्रें आलीं, तर कित्येकानीं आपले वर्गणीचे पैसेहि मागविले आमची परावलबी स्थिति पाहिली व अशा तऱ्हेचीं उदाहरणें पाहिलीं म्हणजे मनाची काय स्थिति होत असेल ! आणि त्यातच काम करण्याऱ्याची वाण !

पोर्टसैदला तीन–चार दिवस मुक्काम का होता व निघणार केव्हा हें आम्हाला कळलेंच नाहीं निघण्यापूर्वी बोटीवर एके दिवशीं सकाळीं नोटीस लागली कीं, अमक्या अमक्यानीं अमुक लाईफ बोटीशीं आपल्या गळ्यात लाईफ बेल्ट अडकवून दुपारीं चार वाजता हजर राहावें, व यदाकदाचित् जर बोटीला काहीं वाटेंत दगाफटका झाला तर धोक्याची सूचना देताच सर्वांनीं आपआपल्या नेमलेल्या जागीं हजर रहावें या वेळीं दादाची व माझी ताटातूट होत असल्यानें आम्हा दोघाना एकाच होडींत ठेवा असा कॅप्टनसाहेबाकडे अर्ज केला परतु एकदा लिहिलेलें तें ब्रह्मवाक्य अशीच व्यवस्था असल्यानें आमच्या अर्जाचा काहींच परिणाम झाला नाहीं शेवटीं दुपारीं रगीत तालीम झाली त्या वेळेला उभ्या दोराच्या शिडीवरून दादाना गळ्यात पट्टा बाधलेला असता एखाद्या

तरुणासारखे भराभर उतरता चढताना पाहून आम्हास तर अचंबाच वाटला, व या वेळेस कॅमेरा असता तर हिंदुस्थानातल्या लोकांना दादाचा फोटो खास दाखविता आला असता.

आता आमचा सरजाम वाढला. आमच्या मागेंपुढें दोन पाणबुड्या, एका बाजूला मॅन ऑफ वॉर, त्याच्यावर टेहळणी करण्याकरिता एक बलून शिवाय चार पाच विमानें, आणखी एक दोन आगबोटी अशा रीतीनें आमचा सरजाम झाला. वरील सर्व आगबोटींना चित्रविचित्र तऱ्हेचे रंग दिलेले होते. शिवाय सर्वच बोटी जवळ जवळ अर्ध्या गतीनें चालत होत्या व पुढें चाललेल्या टॉर्पेडो नागमोडी गतीनें चालत. त्याशिवाय रात्रींच्या वेळीं दिवा लागत नसे. त्याकरिता जेवणाचा तास बदललेला. सगळ्या विडी ओढणारांना सक्त ताकीद होती कीं, रात्रीं जी विडी ओढावयाची झाल्यास आपआपल्या केबिनमध्यें जाऊन ओढावयाची. जसा ह्या सर्व वरच्या गोष्टींत पालट पडला तसा बोटीवर ठेवलेल्या पहाऱ्यात फरक पडला. उतारू लोकांवरही माणसें बोलावून त्यांच्याऐवजीं मागेंपुढें पहारा ठेवला. उतारू लोकांच्या वर्तनांतही तसाच फेर पडला. सर्वांच्या तोंडावर काळजीची छटा दिसू लागली. जो तो आपला लाईफ बेल्ट आपल्याबरोबर बाळगू लागला, व जरा खुट्ट झालें कीं लगेच दचकू लागला. तारांतून आम्ही अमुक ठिकाणीं आहों किंवा अमुक दिवशीं अमुक मुक्कामाला पोंचू अशा प्रकारची बातमी द्यावयाची नसे. उतारू लोकांपैकीं पुष्कळांना लढाईच्या बातम्या कळत. परंतु आम्हाला मात्र जेव्हां बोटीवर लागतील तेव्हांच समजत. या वेळेस आम्ही जिब्राल्टरच्या बाजूनें गेल्यामुळें आमचा मुक्काम जिब्राल्टरशिवाय कोठेंही झाला नाहीं. जिब्राल्टरला कोणालाच उतरू दिलें नाहीं व तेथेंही फारसा मुक्काम झाला नाहीं. आता आम्ही लन्या वॉरझोनमध्यें शिरत होतों. तेव्हां तोफांची सरबत्ती कधीं कधीं कानावर पडत असे. अशाच रीतीनें आम्ही शेवटीं टीलबरी डॉक्समध्यें येऊन पोंचलों. इंग्लिश चानेलमध्यें तर अगदीं बोट जणू काय जीव टाकीत चालली आहे अशाप्रमाणें पळत होती. शेवटीं टील्बरीडॉक्समध्यें जाऊन पोंचलों. तेथें गेल्यावर एका थॉमस कुकच्या एजंटाकडून पत्र पोंचलें त्यांत आमच्याकरिता स्वतंत्र घराची व्यवस्था केली असल्याबद्दल उल्लेख असून त्यांत पत्ता दिला होता. बोटींतून चालचलाऊ सामान घेऊन उतरलों होतों, तेथून थोड्याच रेलगाडीनें प्रवास करून फेनचर्च स्टेशनवर येऊन पोंचलों. वाटेनें गाडीचे सगळे पडदे खालीं ओढून घेणें भाग पडलें होतें, व सुमारें पांचच्या सुमारालाच काळोख झाला. बोटींत आमचा विचार चालला होता कीं, उतरण्याची व्यवस्था काय करावयाची ही अनायासेंच पत्रामुळें जागा नवी झाल्यानें जितका आम्हास आनंद झाला, त्यापेक्षां घरपट जास्त आम्ही घरीं जाऊन पोंचल्यावर झाला. घरीं दादा उतरतांच बॅरिस्टर बापटांनीं त्यांचा फोटोत्यांच्या गळ्यांत मिठीच घातली.

(११) प्रेसिडेंट वुइल्सन याचा मुक्काम पारीस मुक्कामीं असतानाच self determination नावाचें चोपडें तयार होऊन वर्तमानपत्रकाराकडे रवाना होत होतें तसेंच मोठमोठ्या व्यक्तींकडे रवाना होत होतें एके दिवशीं दादाच्या मनात प्रे वुइल्सन व एम् क्लेमेंको यानकडे त्याच्या प्रती पाठविण्याची कल्पना आली झालें, लगेच दोन पत्रें लिहून त्या चोपड्याबरोबर रजिस्टर करून पोष्टात तर टाकलींच लढाईच्या वेळेला प्रत्येक पत्र सेन्सारकडून तपासून जात असावें हें उघडच आहे कदाचित् आपलें पत्र जर पोचलें नाहीं तर काय करावयाचें ? लगेच फ्रान्सला जाणारी काहीं मंडळी गाठून त्याच्याकडून तशाच अर्थाचीं पत्रें तयार करून खुद्द पारीसमध्यें पोष्टात पडावीं अशी व्यवस्था केली गेली पुढें काहीं दिवसानीं दोघानाहीं पत्रें पोंचल्याबद्दलचा दाखलाही आम्हाला मिळाला इतकेंच नव्हे तर दादाच्या पत्रानाहि उत्तर आलें कीं, योग्य वेळीं हिंदुस्थानच्या स्वयनिर्णयासबधीं योग्य विचारहि होईल अर्थात् हें पत्र त्या वेळीं आग्रहास अतिशय गुप्त ठेवावें लागलें याच सुमारास आणखी असेच एक पत्र तयार करून त्यात मॉंटेग्युसुधारणा व काँग्रेस लीग स्कीम याच्या रूपरेषेचा तुलनात्मक मजकूर प्रसिद्ध केला होता याचा उपयोग पार्लमेंटातील मेंबर लोकास व्हावा या हेतूनें तें लिहिलें होतें

(१२) याच सुमारास ज्या कार्याकरिता म्हणून दादाना पासपोर्ट दिले होते त्याकडे लक्ष वळविणे भाग पडलें आपल्याकडचा बॅरिस्टर नेमून त्याला आपली बाजू समजावून देणें हेंच कार्य मुख्य असे जरी सॉलीसिटर्स नेमले होते तरी त्याच्याकडून ज्या पद्धतीनें दादाना खटला समजावून घ्यावासा वाटत असे त्या पद्धतीनें होत नसे शिवाय खटल्यातले कागदपत्रच इतके होते कीं, त्याचें वाचन पुरें होण्यास पुष्कळसे महिने जावयाचे आपल्या खटल्याचें स्वरूप जितकें आपणास कळणें शक्य आहे तितकें दुसऱ्यास कळणें शक्य नाहीं खटल्याची रूपरेषा पाहताच वकिलानीं स्पष्ट सांगितलें कीं, खटला जिंकण्यासारखें यात फारसें नाहीं याशिवाय लढाई नुकतीच संपली आहे या वेळेस ब्रिटिशराज्यासबधीं ( सुमारें वीस वर्षांपूर्वी काढलेले ) उद्गार कोणालाहि आवडणार नाहींत त्याशिवाय ज्याच्यापुढें हा खटला निघण्याचा संभव आहे तोहि सरळ मनानें सर्वच गोष्टींकडे पाहील असा संभव कमी अशा रीतीनें सर्वच परिस्थिति विरुद्ध आहे असा तज्ज्ञ मत देऊन खटला चालवावयाचा का माघार घ्यावयाचा याविषयीं दादाना सवाल केला त्यावर दादानीं स्पष्ट सांगितलें कीं, मी जो इतक्या लाब आलो तो याच-करिता तेव्हा खटल्याचा निकाल काहींहि होवो, खटला हा चाललाच पाहिजे. शेवटीं घरीं येताना म्हणाले, पहा, ज्या वेळीं असें वाटलें कीं, हा खटला उभारावा त्याच्याच पूर्वी मुद्दाम दाजीसाहेबाना पाठवून विलायतेहून बॅरिस्टर लोकाची संमति मिळाल्यावरच खटला उभारला आणि आता अशा प्रकारचें मत हे आताचे

बॅरिस्टर देतात पहा, म्हणजे जगात पैसा घेऊनहि माणसें निष्काळजीपणानें कसें काम करतात तें—निवळ हिंदुस्थानातल्या लोकानाच हसावयाला नको. असो. बॅरिस्टराकडे जाऊन कांहीं कांहीं बाबतींत बॅरिस्टरची खात्री झाल्यानंतर व जवळ जवळ तारीख ठरल्यानंतर एके दिवशीं बॅरिस्टरास काम नाकारण्याची लहर लागली होती परंतु पुढें पत्रोत्तरीं खुलासा झाल्यावर पुन बॅरिस्टरनीं आपली कामगिरी करण्याचें कबूल केलें. माणसें गैरसमज करणारीं भेटतात व त्यानें गैर-समज कसे वाढतात यासलाच हा प्रकार आहे आम्ही लंडनमध्यें पोंचल्यावर लगेच दिपवाळी आली होती. या प्रसगीं कॅप्टन बसले याचे घरीं भाऊबीज केली भाऊबीज म्हणजे खरोखरीच ओंवाळूनसुद्धा घेतलें. दादाच्यावरती हा भाऊ बिजेचा ओंवाळून घेण्याचा प्रसग किती तरी दिवसानीं आला. अर्थातच त्या प्रसगीं त्याना आपल्या ताईची आठवण झालीच.

चिरोल–प्रकरणाचा निकाल काय होईल अशी आम्हाला कोर्टात धास्ती वाटतच नव्हती. एकदर परिस्थिति पाहिल्यावर, जजसाहेबाचा कल कसा काय आहे हें पाहिल्यावर सर्वांची खात्री झाली होती कीं, खटला आपल्या विरुद्ध होणार. अशी आमचीच नुसती खात्री नव्हती तर आमच्या सॉलीसिटराचीहि होती म्हणून त्यानीं आपले रोजचे पैसे रोज कांहीं तरी निमित्त सागून वसूल करून घेण्याचा उद्योग चालविला !

खटल्याचा निकाल होण्यापूर्वी दादा विलायतेस आले आहेत हें पुष्कळ लोकाना समजलें नव्हतें कारण या वेळीं ठराविक मडळींशिवाय कोणी जास्त मडळीं भेटावयास येत नसत परंतु खटल्याची हकीकत वर्तमानपत्रातून प्रसिद्ध झाल्यानंतर मात्र जास्त मडळी भेटावयास येऊ लागली.

जसें हिंदुस्थानात तसेंच विलायतेस वकवकरावाचें दार येणारा–जाणारास सदा खुलेंच होतें. भेटावयास कोणीही येवो, त्याला कधींहि नाहीं म्हटलें नाहीं.

(१३) हिंदुस्थानातून येणाऱ्या प्रत्येक पत्राला दादा स्वत काळजीपूर्वक पत्र लिहीत. नुसतें पत्र लिहिण्यातच काळजी असे असें नाहीं, तर त्या पत्राची घडी अगदीं बरोबर पडली पाहिजे, त्यावरचें तिकीटही व्यवस्थितपणें लागतां कामा नये यासवर्षीहि त पाहत असत. किंबहुना या सर्व गोष्टी स्वत च करीत. आता-पर्यंतचा पत्रव्यवहार सर्वसाधारणपणें खासगी स्वरूपाचाच असे. परतु हिंदुस्थानात निरनिराळ्या प्रांताच्या पुढाऱ्याकडून पत्रव्यवहार होऊं लागून प्रत्येकाला निर-निराळें लिहिण्यापेक्षा ' How are we getting on '—आमचा कार्यक्रम—या सदराखालीं जवळ जवळ सार्वजनिक पत्र जात असे

कोणत्याही गोष्टींत परावलबी असणं दादांना आवडत नसावें. स्वत ची इमारत स्वत च करण्याचा त्याचा विचार ठरला, व त्याप्रमाणें ते करीतही असत. विलायती पद्धतीच्या कपड्याचा तर त्याना इतका कटाळा असे कीं, त्यांना

ते एकदा केव्हा काढून टाकीन असें होत असे इंग्लिश पद्धतीप्रमाणें सर्व दिवसभर आपल्या घरातही नेकटाय, कॉलर, बूट, इत्यादि घालून सज्ज राहण्याचा परिपाठ त्यांनीं ठेवलाच नाहीं

(१४) आमच्यामागें गुप्त पोलिसाचें शुक्लकाष्ठ विलायतेस नसेल असें आम्हाला म्हणवत नाहीं परंतु जसे हिंदुस्थानातले गुप्त पोलीस गुप्त राहत नसत तसें मात्र विलायतेस कधींहि झालें नाहीं आम्हाला कधींहि कोठेंहि त्रास झाला नाहीं टिळकांना विलायतेस राजनिष्ठ मंडळी भेटावयास यावयाची नाहींतच, कारण ब्रिटिश राज्य आहे असेंच चालावें अशी त्यांची इच्छा सोशालिस्ट किंवा अशीच दुसरी मंडळी भेटावयाची परंतु अशा वेळींही आम्हाला गुप्त पोलिसाची चाहूल दिसली नाहीं एका गृहस्थानीं या बाबतींत खुलासा विचारला, त्यावेळेस दादांनीं त्याला खालील आशयाचा प्रश्न विचारले ' अहो, पोलीस कोणामागं नाहीं ? अगदीं सरकारच्या विश्वासातले रानडे, गोखले वगैरे मंडळींमागें पोलीस होतेच मी तर बोलून चालून सरकारच्या डोळ्यांत सलणारा माणूस पण सरकारच्या गुप्त पोलीस खात्याची मला केव्हाच भीति वाटली नाहीं तर उलट केव्हा केव्हा फायदाच झाला आहे माझ्या मनांत काय असेल हें कधीं गुप्त पोलिसास कळविलेंच नाहीं जर एकदोन तासांत किंवा दिवसांत जे करण्याचें नक्की ठरविलें असेल त्याच्यासंबंधीं तर कोणी विचारावयास आले तर बोलावयाचें पण एवढ्याशा बोलण्यानेंही कित्येक वेळां सरकारच्या मनांत काय चाललें आहे हें या गुप्त पोलिसांच्या चेहऱ्यावर मला वाचता येत त्यामुळें कोणताही गुप्त पोलीस आला तरी त्याच्याशीं बोलण्याचें मी आनंदानें कबूल करतों नाशिकला मी सावरकरांशीं जें बोलला तें सरकारच्या डायरींत टिपलें गेलेलें आहे हें तरी मला कसं कळलें ! तर ह्या पोलिसांच्याच द्वारं !

टिळकांचें जनलून स्वतःच्या स्वार्थाकरितां पैसे काढण्याकरितां अनेक लोक अनेक मिषांनीं येत अर्थात् माणसाची गरज पाहून दादांनीं पुष्कळांना निरनिराळ्या प्रकारें मदत केली ठकांचा कावा ओळखून त्यांना त्यांच्याच शब्दांत धरून ठेवून शुद्ध स्वरूप ओळखलें अशाच प्रकारचें त्याला जाणीव होण्यासारखें आपणही केलें काहीं गोष्टींत थोडीशी फसवणूक होऊन काहीं पैसेही फुकट गेले असतील पण त्याला इलाज नाहीं

(१५) एके दिवशीं माझे एक स्नेही मला भेटावयास आले हे विल्सनमधून बी ए झाल्यानंतर गणित विषयाचा अभ्यास करण्यास विलायतेस आले होते ह्यांनींही विलायती बायको पटकाविली होती याची व टिळकांची भेट झाली नाहीं, पण सर्व हकीकत समजल्यावर त्यांना अतिशय वाईट वाटलें आमच्याकडली तरुण हातकरू मंडळी जर नुसत्या कामाला बळी पडून आपलें आयुष्य मातीमोल करूं लागली तर राष्ट्रकार्याकडे कोणी पाहावयाचें !

## अप्पाजी विष्णु कुळकर्णी

[ लोकमान्यांचे एक लेखक व 'लो० टिळक यांचीं गेलीं आठ वर्षें' पुस्तकाचे कर्ते, पुणें ]

(१) बाबामहाराजांच्या इस्टेटीसंबंधाच्या खटल्याचें काम चाललें असतां 'मला अमक्याविषयीं सल्ला द्या, माझे कागदपत्र पहा' असें म्हणून रोज कोणी तरी त्यांच्याकडे येई. एके वेळीं हे अशा एका गृहस्थाचा अर्ज मला सांगत होते. इतक्यांत त्यांचे एक स्नेही तेथें आले व म्हणाले 'बळवंतराव, आताही लोकांचे अर्ज तुम्ही लिहीतच आहां. या वेळींसुद्धां तुमच्याकडून काम करून घेतल्याशिवाय तुम्हांस कोणी सोडीत नाहीं' यावर ते म्हणाले 'हें असेंच चालावयाचें! चिता पेटली तरी आमची विडी पेटलीच पाहिजे असें म्हणणारे काहीं असतातच!'

(२) ड्रेमेंडसाहेबांनीं आपल्या शिपाईप्याद्यांस तयारींत असण्यास सांगून टिळकांस शिक्षा दिली. शिक्षा दिल्यावर त्यांस पांचदहा मिनिटेंसुद्धां राहूं दिलें नाहीं. लगेच मोठ्या बंदोबस्तानें त्यांस तुरुंगाकडे पोंचविण्यांत आलें. त्याच दिवशीं संध्याकाळीं जामिनावर त्यांची सुटका झाली. वर्षभर चाललेल्या खटल्याचा निकाल अशा तऱ्हेनें लागल्यामुळें त्यांस किती दुःख झालें असेल! परंतु दुःखाचा यांचे ठायीं लेशही नव्हता. त्या दिवशीं त्यांनीं रात्रीं नऊ वाजतां शांत व धिमेपणानें निकालाचा एक कॉलमभर सारांश केसरीकरितां तोंडानें सांगितला, व तो सुद्धां त्यांना दादासाहेब यांनीं सांगितलेल्या मुद्यांचे स्मरणावरूनच केवळ सांगितला.

(३) सन १९०२ सालीं रा. ब. विष्णु मोरेश्वर महाजनी हे पुण्यास आले होते. त्या वेळीं पुढें महिन्यांत सार्वजनिक सभेमध्यें त्यांचें एक व्याख्यान झालें. या प्रसंगीं टिळकांप्रमाणेंच ना. गोखलेही हजर होते. व्याख्यान सुरू होण्यापूर्वी टिळकच प्रथम बोलावयास उठले, व त्यांनीं ना. गोखले यांनीच अध्यक्ष होण्याबद्दल विनंति केली. ना. गोखले हे आपणास अध्यक्षस्थान नको म्हणत व टिळक हे आग्रहपूर्वक त्यांना तें स्वीकारण्याविषयीं विनंति करीत. हा देखावा पाहून तेथें जमलेल्या दोनही पक्षांतील लोकांस जो आनंद झाला होता तो विलक्षण. यानंतर ना. गोखले विलायतेंतील डेप्युटेशनची कामगिरी बजावून आले असतां रे मार्केटांत जंगी जाहीर सभा भरली. त्या वेळीं त्यांचें अभिनंदन करण्याचा पहिला ठराव टिळक यांनीं सभेपुढें मांडून त्यांनीं नामदारांचा गौरव केल्याचें पुष्कळांचे स्मरणांत असेल. यावरून टिळक हे उलट बाजूच्या पुढाऱ्यांशीं योग्य वेळीं मान देण्यास किती तत्पर असत हें कळून येईल.

(४) सन १९०४ सालीं साताऱ्याचे महाराज श्री. आबासाहेब पुण्यास वारले. त्या वेळीं महाराजांच्या मंडळीची मदली अगदीं घाबरून गेली होती, व परठिकाणीं एकदर व्यवस्था कशी होते याची काळजी पडली होती. अशा वेळीं टिळक यांजकडे येऊन त्यांनीं आपली हकीकत सांगताच त्यांनी आसरा-पागोटें घालून ते बाहेर पडले. रात्रीची वेळ सुमारें नऊ वाजून गेलेले. लोकांच्या गाठीं घडणें मुष्किलीचें होतें तरी टिळक यांनीं स्वत: जाऊन सरदाराच्या एजंटाची (ताईमहाराजांच्या खटल्यात टिळकांना शिक्षा देणारे हि. जज मि. ल्यूकस हेच त्या वेळीं एजंट होते) गाठ घेतली, व प्रेत वाहून नेण्याच्या पेटीपासून (कॉफीन) तों थेट खासें स्पेशल इच्यानी ट्रॅफिक म्यानेजरकडून व्यवस्था होईपावेतों सर्व व्यवस्था त्यांनीं केली, व सकाळीं ८ वाजता सर्व सरंजामानिशीं सन्मानानें रेल्वेनें प्रेत जेव्हा रवाना करून दिलें तेव्हा ते घरीं परत आले जेवणखाण, रात्रभर जागरण किंवा श्रम याची त्यांनीं त्या वेळीं मुळींच पर्वा केली नाहीं

(५) वडील चिरंजीव विश्वनाथपंत हे वारल्यावर पुढें दुसरे दिवशीं सोमवार आला प्लेगचा संसर्ग होऊ नये म्हणून पंतांचे कपडे बाहेर उन्हांत टाकले होते. इतर सामानापैकीं कांहीं सामान अव्यवस्थितपणें इकडेतिकडे पडलें होतें. ज्या झोंपडींत विश्वनाथपंत वारले त्या झोंपडीपासून दहाबारा पावलावर टिळकांची झोंपडी होती तेथेंही सामान अस्ताव्यस्त पडलें होतें. जिकडे तिकडे औदासीन्य पसरल्याचा देखावा दिसत होता. अशा स्थितीत कोणासही काम सुचणें शक्य नव्हतें पण टिळक यांनीं त्या दिवशीं नेटिव्ह संस्थानिकाबरोबर इंग्रज सरकारच्या झालेल्या तहनाम्याची व करारांची पुस्तकें आणवून तीं वाचलीं व केसरींतील "श्री. महाराज होळकर यांचा राजीनामा मंजूर झाला" हा अग्रलेख मला तोंडानें सांगितला ! मला लिहितांना पंतांची वारंवार आठवण येई, परंतु टिळकांची मनःस्थिति कांहीं निराळीच. नेहमीं प्रमाणें शांत चित्तानें ते मजकूर सांगत

न करतां मीं लिहिलेला सर्व मजकूर, छापून त्यांचीं प्रुफें आल्यावर पुनः तपासण्याचा त्रास पडूं नये व वेळ लागू नये म्हणून, त्यांनीं वाचला व त्यांत दुरुस्ती करून मग तो छापावयास पाठविला. या गोष्टीला निदान १० मिनिटें तरी लागलीं असतील. पण अशा आणीबाणीच्या वेळीं एक सेकंदाचाही जेथें दम निघावयाचा नाहीं, तेथें स्वस्थ चित्तानें दहा मिनिटें काम करून मग ते बापूस पाहण्यास गेले हें कांहीं लहानसहान धैर्य नव्हे.

(६) सन १८९७ सालचा कारागृहवास संपल्यावर, 'आतां पुनः तुम्ही पत्रावर आपलें नांव घालूं नका, उगीच जीव धोक्यांत कां घालतां' असा कांहीं गृहस्थांनीं उपदेश चालविला असतां त्याला टिळकांनीं उत्तर दिलें कीं, "अहो, हें सतीचें वाण आहे ! ज्याचें त्यानेंच तें पत्करिलें पाहिजे !"

(७) सन १९०० साली विलायतेंतील 'ग्लोब' पत्रावर टिळकांनीं फिर्याद केली. सदर पत्राच्या संपादकानें त्यांची माफी मागून टिळकांच्या म्हणण्याप्रमाणें दुष्काळफंडास ५० पौंड दक्षिणा देऊन प्रायश्चित्त घेतलें. त्या वेळीं टिळकांच्या दृढनिश्चयाची तारीफ करतांना न्या. रानडे यांनीं "टिळकांनीं म्हणूनच ही गोष्ट केली; इतरांच्या हातून कधींहि झाली नसती" असे स्पष्ट उद्गार काढले.

(८) सन १९०४ साली पुण्यास संकेश्वराचे जगद्गुरु श्रीशिष्य शंकराचार्य हे आले असतां त्यांच्या मठांतील शास्त्री–पंडित यांच्याशीं ता. २३।५।०४ रोजीं केसरीचा मजकूर चालला असतां चर्चा झाली. तो संवाद पुढें देत आहें.

टिळक—जगद्गुरूंच्या आर्गी नवीन तऱ्हेनें शिकलेला इसम पाहिजे, म्हणजे तो पुष्कळ कार्य करील. त्यांतून हल्लींच्या काळीं अशा मनुष्यास इंग्रजी आलेंच पाहिजे.

शास्त्री—इंग्रजी आलें म्हणजे लोकांची श्रद्धा उडेल व ब्राह्मण्यासही थोडा धोका येईल.

टिळक—हें मत चुकीचें आहे. परिस्थितीप्रमाणें ह्या गोष्टी आतां झाल्याच पाहिजेत. खेरीज इंग्रजी शिकल्याशिवाय सध्याच्या काळीं आपल्या धर्माचें वजन थोरोंकडे पाहतां यावयाचें नाहीं. धर्माचें वजन पाडण्यास तुलनात्मकरीत्या त्याचें विवेचन केलें पाहिजे. ख्रिस्ती धर्म, मुसलमानी धर्म, पारशी धर्म वगैरे धर्मांपेक्षां आमचा धर्म का श्रेष्ठ आहे हें सांगता आल्याशिवाय आमच्या धर्माचें वजन कसें पडावें ! परकी भाषा शिकण्यानें कांहीं अपूज्यबुद्धि उत्पन्न होणार नाहीं. आद्य शंकराचार्यांनीं काय केलें ! ब्रह्मसूत्रभाष्याचें विवरण करतांना बौद्ध किंवा जैनमताचें खंडन करण्यास त्यांच्यास मताचा जो अनुवाद केला आहे तो पाली भाषेंतील ग्रंथ पाहून व ती भाषा शिकूनच केला आहे. त्या वेळीं परकी भाषेचा प्रश्न कोठें उपस्थित झाला होता ! खंडन करणारास असें केलेंच पाहिजे.

शास्त्री—या स्वामींना संस्थानचें उत्पन्न कम झाल्यामुळेंच अगोदर चिंता उत्पन्न झाली आहे; मग इतर गोष्टी कशा सुचाव्यात !

टिळक—सत्यानचें उत्पन्न जस झालें म्हणून काय झालें ! स्वामी कर्तृत्ववान् असतील तर ते हवें तितकें उत्पन्न मिळवितील. पूर्वीच्या शंकराचार्यांना कोठें उत्पन्न होतें ! त्यांनी स्वतःच्या प्रयत्नावर व कर्तृत्वावरच उत्पन्न मिळविलें ना ! लोकांची अद्याप धर्मश्रद्धा कांहीं कमी झाली नाहीं. धर्मणी पाहिजे तशी मिळेल व फंड पाहिजे तितका उभा राहील, पण हल्लींचा काळ जाणून हल्लींच्या रीतीनेंच चळवळ केली पाहिजे, स्वत शुद्धाचरणानें व करारीपणानें वागलें पाहिजे, लोकसमाज अनुकूल करून घेतला पाहिजे, मोठ्या सभा भरविल्या पाहिजेत, वक्तृत्व केलें पाहिजे, सर्व कांहीं केलें पाहिजे, त्याशिवाय कार्य होणार नाहीं परवा हंसस्वरूपस्वामी येथें आले होते, त्यांनीं दहापांच व्याख्यानें चांगल्या रीतीनें बसविलीं असल्यामुळें व त्याचें वक्तृत्व आणि आचरण उत्तम असल्यामुळें लोकांवर तात्काळ छाप पडली. तसेंच प्राणायामाचें महत्त्व सांगून व तो शिकविण्याकरता थोडी फी ठेवून हजार-बाराशें रुपयांची रक्कम येथून ते सहज घेऊन गेले प्राणायाम म्हणजे काय, हें अलीकडच्या शास्त्री लोकांना पटेल अशा पद्धतीनें सांगितल्यामुळें त्यांची मनें त्याकडे वेधून सहजच त्यांची श्रद्धा बसली

शास्त्री—असे लोक थोडे असतात

सप्तपदी करू नये, सप्तपदी तशीच ठेवून ती गर्भाधानाचे वेळीं करावी. सप्तपदी झाल्याशिवाय विवाहाची पूर्तता होत नाहीं. अर्थात् पूर्वीचे सर्व संस्कार करू द्यावेत व सप्तपदी मागाहून करावी. (२) ऋतु प्राप्त झाल्यानंतर विवाहास परवानगी द्यावी हें थोड्या प्रायश्चित्तानें करावें लागेल, पण धर्मशास्त्राच्या कांहीं विरुद्ध नाहीं या दुसऱ्या सुधारणेनें हल्लीं लोकास चांगली सवलत मिळेल यानें निदान अक्षतयोनी बालविधवा कांहीं मरणार नाहींत. नवऱ्याचा थोडा जरी समागम झाला तरी लोकांना तितकेंच समाधान वाटेल हल्लीं लहान मुलीचा नवरा मेल्यानें लोकांना जें इतकें वाईट वाटतें त्याचें कारण तिला नवऱ्याचें सुख मुळींच मिळत नाहीं हें होय. तेंच थोडे दिवस का होईना, सुख मिळेल तर आईबापांना इतकें वाईट वाटणार नाहीं मुलगी तर पाळण्यांतून लहान असते. तिला कांहींच कळत नसतें. आईबापांनीं लग्न करावें आणि लगेच नवरा मेला म्हणजे हळहळ करीत बसावें, अशी स्थिति येते. हल्लीं प्लेग, दुष्काळ वगैरेसारख्या आपत्तींत ही सवलत मिळाल्यास कांहीं तरी फायदा होईल

शास्त्री—स्वामींनीं अशा पुष्कळ सवलती दिल्या पाहिजेत

टिळक—होय, दिल्या पाहिजेत पण एकदम सर्व गोष्टींस परवानगी देऊन कार्य होईलच असें नाहीं समजा, स्वामींनीं पुनर्विवाह करण्यास परवानगी दिली तर त्याप्रमाणें करण्यास किती लोक तयार होतील? बरें, ज्यांना पुनर्विवाह करावयाचा आहे ते स्वामींच्या परवानगीची वाट थोडीच बघतात! तात्पर्य, लोकसमाजातहि तशी शक्ति आली पाहिजे, त्याशिवाय नुसतें स्वामींचें आज्ञापत्र किंवा हुकूम काय करणार?

(९) न्या. रानडे वारल्याची बातमी ज्या दिवशीं कळली त्या दिवशीं गोष्टी निघाल्या असतां लो. टिळक म्हणाले—"यांहीवेळां आगरकराच्या मृत्यूच्या वेळीं मला फार वाईट वाटलें. सहवासाचा हा परिणाम आहे त्या वेळीं दोन दिवस माझ्या डोळ्यांतून पाणी येत होतें व मला कांहीं सुचत नव्हतें"

(१०) गणपतीच्या मेळ्यासंबंधानें गोष्ट निघाली असतां एकदा लो टिळक म्हणाले—"सुधारक लोक मेळ्यास दूषण देतात व मुसलमानांचें अनुकरण म्हणून म्हणतात पण मुसलमानांनीं तरी हा प्रकार काढला कोठला? आमच्या वारकऱ्यांच्या मेळ्यावरूनच? मुसलमानांनीं केलेला प्रकार पुन आम्ही हिंदूकडे वळविला तर त्यांत गैर काय झालें? आमचें आम्हीच पुन करू नये की काय?"

(११) एक गृहस्थ एकदां केसरींतले लेख हिंदीमध्यें भाषांतर करून एक नवें पत्र काढण्याविषयींचा सल्ला विचारावयास आले असतां लो. टिळक म्हणाले—"केसरींतील सर्व लेखांचें भाषांतर तिकडे लोकप्रिय होणार नाहीं कारण त्यांत पुष्कळ स्थानिक विषय असतात, व ते येथील कित्येक व्यक्ति, संस्था, स्थळें, प्रसंग वगैरेंस उद्देशून लिहिलेले असतात आता सर्वसाधारण लेखांचें भाषांतर करण्यास

काहीं हरकत नाहीं पण तिकडचे स्थानिक विषय जोमानें लिहिणारा लेखक असल्याशिवाय नुसत्या या लेखानें कार्य होणार नाहीं हिंदुस्थानात ठिकठिकाणीं देशी भाषेंत जोमाचीं पत्रें नाहींतच मद्रासकडे 'हिंदु,' 'स्टँडर्ड' असलीं पत्रें इंग्रजींत चालतात पण तेलगु, तामील किंवा कानडी भाषेंत जोमाचीं पत्रें कमी आहेत नुकतेच कोठें मि जी सुब्रह्मण्य अय्यर यांनीं तिकडे देशी भाषेंत 'स्वदेश मित्रम्' नावाचें अशा प्रकारचें पत्र सुरू केलें आहे हीच स्थिति बंगाल्याची बंगवासी, हितवादी, वगैरे काहीं पत्रांचा खप मोठा आहे, पण तो पत्रातील मजकुराच्या जोमावर नसून बक्षिसें वगैरे एक प्रकारच्या लालुचीनें झाला आहे ही लालूच म्हणजे एक प्रकारचा (Gambling) जुवा आहे व 'पॉवर,' 'गार्डिअन' सारखीं कित्येक इंग्रजी पत्रेंहि जुगार खेळतात पत्र पुढें यावयाला जोमाचे काहीं लेख पाहिजेतच, व ते लेख लेखकानें थोडें–बहुत धाडस केल्याशिवाय यावयाचे नाहींतच "

लो टिळक पुढें म्हणाले—"माझ्या कडक लेखावर तुमचा कांहींतरी अपवाद येईल, पण एकदा अमुक बाजू चांगली व अमुक खोटी एवढी मनाची खात्री झाल्यावर भाषा कडक लेख कडक, या म्हणण्यात काय अर्थ आहे? साधा किंवा पचपचीत लेख कोणी वाचावयाचा नाहीं त्यात एखादी कोटी किंवा चुरचुरीत वाक्य असल्याशिवाय वाचकाची वाचण्याकडे प्रवृत्तीच होत नाहीं चहा पितांना पत्र हातात घ्यावयाचें आणि त्या वेळांत जर काहीं थोडेंबहुत झालें

१३।५।०५ रोजीं रा. रा. न. चिं. केळकर यांच्या घरीं इंग्रजींत संवाद झाला. त्या वेळीं टिळक म्हणाले—" देवनागरी लिपीनें जर मराठीप्रमाणेंच गुजराथी, बंगाली, वगैरे भाषा लिहितां येतील तर देशासंबंधानें पुष्कळ कार्य होईल. एक भाषा नाहीं तरी एक लिपी होण्यापासून कांहीं कमी फायदे नाहींत. एक भाषा असणें हें राष्ट्रीयत्वाचें एक दर्शक (National Significance) आहे. या कामीं तुम्ही म्हणतां त्याप्रमाणें लोकांनीं प्रयत्न करून फारसा उपयोग होणार नाहीं. सरकाराचें साहाय्य पाहिजे. क्रमिक पुस्तकांत त्यांनीं ही लिपी वापरली म्हणजे आपोआपच लहानपणापासून मुलांना गुजराथी, बंगाली, हिंदी वगैरे भाषांचें ज्ञान होईल, व पुढें त्या त्या भाषा शिकण्याकडे त्यांची प्रवृत्ति होईल."

(१५) १४।१२।०५ रोजीं अचूक निशाण मारणारे राणा सरतानसिंहजी, त्यांचे चिरंजीव व मोंगलाईकडील त्यांचे एक शिष्य, असे पांच–चार इसम येऊन बसले असतां जें भाषण चाललें होतें त्यांत टिळक म्हणाले कीं, " तुमच्या खेळांत बंदुकीच्या एका गोळीनें दोन वस्तु वेधण्याचा एक प्रयोग ठेवा. म्हणजे बार काढल्याबरोबर मत्स्यभेदासारखा एक भेद होऊन तीच गोळी अचूक दुसऱ्या मुद्दाम ठेवलेल्या वस्तूवर अशा रीतीनें अचानक पडावी कीं, ती वस्तु त्या वेळीं फुटून जावी, आणि हें थोड्याच प्रयत्नानें करतां येईल. डायनामिक्सच्या शास्त्रानें हें सिद्ध आहे व त्याबद्दल प्रॉब्लेम् आम्ही सोडवितों. बंदुकीच्या गोळीची व्हेलॉसिटी ( वेग ) जाणून पुढें ग्रॅव्हिटीनें ( गुरुत्वाकर्षणानें ) जेथें गोळी पडेल तेथला पदार्थ फुटला पाहिजे असा नेम मारणें म्हणजेच To kill two birds by one stone ( एका दगडानें दोन पक्षी मारणें ) ही म्हण कांहीं खोटी नाहीं. गोळी कांहीं सरळ जात नसते हवेच्या घर्षणानें ती तिरपी जात जात कांहीं वेळानें तिची गति बंद पडली पाहिजे, व मग आकर्षणशक्तीनें खालीं सरळ पडली पाहिजे. हल्लीं सुधारलेल्या राष्ट्रांत लढाईमध्यें अशा प्रकारच्या कृति होत असतात. तोफ उभी करून असा गोळा सोडतात कीं, तो किल्ल्यांतील मॅगेझिनवर ( दारूचें कोठार ) अचूक पडतो. दुर्बिणीनें किल्ल्यांत कोठें कोठार आहे हें दिसतें, पण तें जाळावें कसें ? तर अशा नेमानें तें जाळतात."

लोकमान्य—गीता ही चातुर्वर्ण्याकरिताच आहे असें नाहीं, तर ती सर्व वर्णांकरिता आहे, किंबहुना मानवजातीकरिता ती आहे असें म्हटलें तरी चालेल मनुष्याचें वर्तन अति उच्च दर्जाचें कसें असलें पाहिजे याचेंच तात्विक दृष्ट्या विवेचन करण्याचा गीतेचा हेतु आहे श्रीकृष्णाचे वेळीं चातुर्वर्ण्याची पद्धत प्रत्यक्ष पुढें होती, म्हणूनच तिची त्यांनीं गीतेंत संगति लाविली. समाजात जी वर्ण व्यवस्था अमलात असते, तिचेंच निरीक्षण करून मनुष्य त्यापासून चांगले वाईट सिद्धांत ठरवीत असतो. आणि तुम्हीं कोठेंहि जा, तेथें कोणत्या ना कोणत्या तरी प्रकारची चातुर्वर्ण्यासारखी अगर तशाच धर्तीवरची वर्णव्यवस्था तुमच्या दृष्टीस पडेल

प्रश्न—भगवद्गीतेंत ज्या प्रकारची चातुर्वर्ण्याची पद्धत सांगितली आहे तशी जेथें नाहीं तेथें गीता काय म्हणणार? व तेथील समाजाच उत्तम प्रकारची नीतिबंधनें कोणती ठरणार?

उत्तर—चातुर्वर्ण्याची व्यवस्था ज्या ठिकाणीं नव्हती असे प्रांत आयाचे वेळीं होते आफगाणिस्थानचेंच उदाहरण घ्याना तेथें ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र अशा प्रकारची इकडील समजुतीप्रमाणेंच कोठें वर्णव्यवस्था होती? पण ही व्यवस्था नसली आणि जरी त्यांना पूर्वी म्लेंच्छ हें नाव देत असत, तरी त्याच्या करिता म्हणून काहींतरी नीतीचीं उच्च तत्वें पाहिजेतच आणि सर्वांस च लागू पडतील अशीं उच्च नीतितत्वें आमच्या प्राचीन धर्मांत असल्यामुळें तो धर्म किंवा त्यातील तत्वज्ञान व्यापक स्वरूपाचें झालें अहिंसा, सत्य, अस्तेय, सर्वभूतहित, अशा प्रकारचीं सर्वसाधारण तत्वें कोणत्याही समाजास लागू पडतात व तेवढींच घेतलीं तरी बस आहेत

प्रश्न—मोक्षाला कोण पात्र आहे ? चातुर्वर्ण्यांतील एकाद्या वर्णांतच मनुष्य जन्मलेला असला पाहिजे कीं तो कोठेंही जन्माला येवो ?

उत्तर—ज्याच्या मनाची शुद्धावस्था झाली तो मोक्षास पात्र झाला, मग तो ब्राह्मण असो, क्षत्रिय असो, शूद्र असो किंवा कोणीही असो आता पूर्वसंस्कार म्हणून काहीं आहे त्याप्रमाणें पाहिलें तर तात्विकदृष्ट्या शूद्राचा ब्राह्मण होण्यास वेळ लागेल, व मनुष्य ब्राह्मण जातींत जन्माला नाहीं आला—आणि ब्राह्मण जातींतही जन्माला येऊन तो जर भ्रष्ट झालेला असेल तर ब्राह्मणजातींत आला म्हणण्यात तरी काय अर्थ आहे ? तरी मनाची पूर्ण शुद्धावस्था झाली कीं, त्याला मोक्ष मिळालाच पाहिजे आता ही शुद्धावस्था येण्यास अनेक जन्म लागतील किंवा कोणी उपजतच या जन्मात शुद्ध असू शकेल अहो, कोणत्याही समाजात कोणत्याही वेळीं कमजास्त दर्जाचे लोक असतातच श्रुतींच्या वेळीं जो समाज होता तसाच काहीं पुढें राहिला नाहीं. अर्थात् श्रुतीनंतर ब्रह्मसूत्रात त्या वेळच्या सामाजिक परिस्थितीचा त्यांनीं समावेश केला, व पुढें गीतेच्या वेळीं त्या कालाच्या

स्थितीचा विचार करून व्यापक रीतीनें सर्वांचा समावेश करतां येईल, अशा रीतीनें त्यांतील विवेचनाची व सिद्धांतांची मांडणी करण्यांत आली. शूद्र, स्त्री, चांडाल, पापयोनी यांपैकीं कोणीही असो, मन शुद्ध होऊन माझा आश्रय केला कीं, " तेऽपि यांति परां गतिम् " असेंच भगवंतांनीं म्हटलें आहे.

प्रश्न—प्रवाहपतित कर्म करणें योग्य म्हणतां; पण एखाद्याचा धंदा जन्मापासून चोरी करण्याचाच आहे किंवा ठग वगैरे जातींत जन्मलेला मनुष्य म्हणेल कीं, चोरी करणेंच माझें काम आहे. मग असा मनुष्य मुक्त होईल का ?

उत्तर—मनाची शुद्धता झाल्याशिवाय कांहींएक होणार नाहीं. आतां मनाची शुद्धता झाल्यावर एखादा योग्य प्रसंग प्राप्त झाला म्हणजे मग मनुष्याला त्याप्रमाणें वागलेंच पाहिजे. नाहीं तर समाजाची घडी बिघडेल. भीष्मांना असा प्रसंग नव्हता का आला ? एका पक्षास मिळून कर्तव्य करणें त्यांना भाग झालें. लॉर्ड रॉबर्टसचेंच उदाहरण घ्या ना ? बोअरयुद्ध करूं नये असें त्यांचें मत होतें. पण राष्ट्र युद्धाला तयार झाल्यावर आपल्या राष्ट्राचा हुकूम त्यांना मानणें भाग पडून कर्तव्य करावें लागलें.

---

## नारायण दामोदर सावरकर

[ एल. एम्. ॲण्ड एस. (नॅ.), बॅरिस्टर वि. दा. सावरकर यांचें बंधु, प्रसिद्ध धंदे व डॉक्टर, मुंबई. ]

(१) सोलापूरच्या प्रांतिक परिषदेहून आम्ही सर्व मंडळी परत येत होतों. आमच्या सद्भाग्यानें लोकमान्यहि याच गाडीनें परत फिरणार म्हणून साधार बातमी होती, म्हणून अत्यंत आनंदानें त्याच गाडीनें प्रयाण करण्याचें मीं ठरविलें. अखेर लोकमान्यांच्या बिऱ्हाडांत सामानाची बांधाबांध होऊं लागली. तेव्हां मात्र मनाला खात्री पटली कीं, लोकमान्य आतां खचित निघणार. मग मीहि सर्व तयारी करण्यास लागलों. अखेर, स्टेशनावर सर्व मंडळी जमा झाली. गाडी आली. लोकमान्य आपल्या जागीं जाऊन बसले व मीहि तो डबा हेरून ठेवून आपल्या जागीं अधिष्ठित झालों.

आमच्या डब्यांत अण्णासाहेब भोपटकर, श्री. मामणगांवकर वगैरे मंडळी बसली होती. श्री. मामणगांवकरांनीं लिंगायत पंथाच्या स्थापनेबद्दल, त्याचप्रमाणें

सुपारी तोंडांत टाकीत म्हणाले 'अरे बाबा, तुझें ठीक आहे,–पण तुझ्या ह्या सोप्या शब्दानें तिकडे सरकारचा जीव गुदमरतो त्याची काय वाट ? शिवाय हें बघ कीं, स्वराज्य–स्वातंत्र्य हें ध्येय ठेवायला जनता कोठें तयार आहे ? तूंच आपला उंच शिखरावर बसलास; परंतु लोकांना इतकें उंच कुठें उडतां येतें ? अरे, बाबा, इतकें कशाला ? शेंकडा ४० लोक जरी तुझ्या निर्भेळ स्वराज्याला तयार असतील तर मी स्वतः उद्यां त्या चळवळीचा पुढाकार घेईन. माझें काय ? परंतु लोक तयार पाहिजेतना ! ' लोक तयार नाहींत हें तर सत्यच होतें व तें लोकमान्यांच्या अधिकारयुक्त वाणींतून बाहेर पडल्यावर मला अधिकच पटलें. परंतु, तरीहि त्यानें माझें पुरेसें समाधान न झाल्याचें लक्षण माझ्या चेहेऱ्यावर उमटलेलें लोकमान्यांनीं पाहून, हंसून म्हटलें ' छे, तुला अजून पटलेलें नाहीं दिसत. बोल—बोल—संकोच कां धरतोस ? स्पष्ट बोलून टाकावें. ' मी जरा संशयित वृत्तीनें म्हटलें ' नाहीं; आपण म्हणतां तें सत्य आहे. परंतु लोक एकाद्या चांगल्या गोष्टीला तयार नाहींत म्हणूनच तर पुढाऱ्यांनीं त्यांना तयार करण्याची अधिक अवश्यकता. लोक आपण होऊनच तयार झाल्यावर मग पुढाऱ्यांचें काय प्रयोजन ? अशी एक शंका मनांत रहाते. ' मी हीं वाक्यें अदबीनें व तुटक तुटक अशीं उच्चारलीं. लोकमान्य हें ऐकून मोठ्यानें हंसले व समोर चिंतामण-रावहि हंसावयास लागले. नवीन सुपारी कातरून घेऊन ती तोंडांत टाकीत लोकमान्य मोठ्या मेळानें म्हणाले ' अरे, लोकांना तयार करण्याकरितांच तर ही तयारी चालली आहे ! '

इतक्यांत एक स्टेशन आलें. गाडी उभी राहिली. इतर मंडळी तेथें येऊन निरनिराळ्या गप्पा व हास्यविनोद सुरू झाले. गाडी नियत वेळेनंतर सुरू व्हावयास लागली. मी यावेळीं मात्र मनापासून माझ्या डब्यांत जावयास निघालों. परंतु लोकमान्यांनीं अधिकच आग्रह करून मला त्यांच्याच डब्यांत बसवून घेतलें; मग बोलणीं मी त्यांच्या प्रकृतीबद्दल काढलीं. त्या वेळीं ते अगदीं निःशक्त झाले होते. ते म्हणाले कीं, ' आतांशा हातपाय वळतात व कांपतात. ' मी म्हणालों कीं, ' आपण रोज अंगाला तेल लावून अंगमर्दन (Massage) कांहीं दिवस करून घ्यावें, म्हणजे त्यानें पुष्कळ बरें वाटेल. ' ' अरे इतके कोण घोपस्कार करतो ? ' असें ते म्हणाले. यावर मी अगदीं निग्रहानें अधिकच याची आवश्यकता सांगूं लागलों व म्हणालों कीं, ' पाहिजे तर मी आपण आतां सिंहगडावर धाणार आहांत तेव्हां आठ दिवस आपल्याजवळ राहून ( Massage ) करून दाखवितों. आपल्याला फरक वाटला तर मग पुढें चालू ठेवावा मग-तर झालेंना ! ' यावर लोकमान्य म्हणाले ' कसलें तेल आणि कसलें अंगमर्दन घेऊन बसलास ! आज कैक वर्षांत या देहाला तेलाच्या बिंदूचाहि संपर्क नाहीं ! ' हें वाक्य ते अशा विरागपूर्ण आवाजानें म्हणाले कीं, मला पुढें आग्रहच करणें

होईना ! पुढेंहि ते म्हणाले ' अरे बाबा, हजामतीच्या दिवशीं मुद्दाम कधीं तेल मीं लाविलें नाहीं तर आतां कशाचें मला हें सांगतोस ! ' माझें मन आश्चर्यमूढ झालें ! वाटलें कीं, खरा हा कर्मयोग्यांतील श्रेष्ठ संन्यासी, याहेक्षां संन्यासी तें काय अधिक करूं शकेल !

---

## दत्तात्रय बाळकृष्ण कालेलकर.

[ बी ए, सत्याग्रहाश्रम–साबरमती ]

(१) साधूच्या वेषानें काश्मिरांत फिरत असतां, एका इसमानें मला विचारलें, " स्वामी साहेबार, आप कहांके रहनेवाले ? " मीं उत्तर दिलें, " बम्बइके. " मला वाटलें, काश्मीरसारख्या दूरच्या प्रांतांत बेळगांवचा किंवा शहापूरचा असें सांगून उपयोग नाहीं पण माझें हें उत्तर व्यर्थ गेलं या गृहस्थानें मग पुन विचारलें, " बम्बई कहां पर है ? नखलौ ( लखनौ ) के पास ? " त्या बिचाऱ्याचें हिंदुस्थानच्या भूगोलाचें ज्ञान इतकें अगाध होतें ! मुंबई दूर दूर ती किती असणार ? असेल लखनौचे आसपास ! त्यानें मला दुसरा प्रश्न विचारला, " आप कौन है ! " मी म्हणालों " महाराष्ट्रीय ब्राह्मण " माझें उत्तर ऐकलें मात्र आणि मुंबई लखनौजवळ आहे असें म्हणणारा तो काश्मिरी गृहस्थ उत्तेजित झाला आणि विचारूं लागला " तुमचे टिळकमहाराज केव्हां सुटणार ?" हा प्रश्न ऐकून मी चकित झालों. हिंदुस्थानच्या सामान्य भूगोलाचेंहि ज्याला ज्ञान नाहीं अशा या काश्मिरी ब्राह्मणालाहि ठाऊक होतें कीं, ' टिळक महाराज ' म्हणून कोणी महाराष्ट्रीय देशभक्त तुरुंगांत पडला आहे आणि तो सुटावा अशी सर्व राष्ट्राची इच्छा आहे.

(२) एके दिवशीं वर्तमानपत्रकार होण्यासाठीं माणसानें काय काय वाचलें पाहिजे, काय तयारी केली पाहिजे, याविषयीं मी लोकमान्यांना विचारलें ते म्हणाले, " कवीसंबंधानें अथवा शिक्षकासंबंधानें असें म्हणतात कीं, He is born not made त्याचप्रमाणें वर्तमानपत्रकाराच्या संबंधानेंहि आहे. गुण हा उपजत असावा लागतो. रोज कांहीं नवीन नवीन लिहावयाचें नसतें. एकच गोष्ट रोज निरनिराळ्या रूपानें मांडावयाची असते, इतकेंच. काल आपण काय लिहिलें आहे तें आज लोक पहात बसत नाहींत, मात्र लोकांना

घांगण्यासाठीं तुमचेजवळ कांहीं दिव्य संदेश असला पाहिजे आणि तुम्हाला असें वाटलें पाहिजे कीं, ही गोष्ट लोकांना मी जर पटवून नाहीं दिली तर देशाचा घात होईल. असें जेव्हां वाटूं लागतें तेव्हांच वर्तमानपत्रकार व्हावें. बाकीची तयारी हळूं हळूं आपोआप होईल. ज्या प्रसंगीं ज्या विषयावर लिहावयाचें असेल त्या प्रसंगीं त्या त्या विषयांचें संपूर्ण अध्ययन करून मग लिहिण्याचा सराव ठेवावा. म्हणजे आपल्या लेखाचें तेज पडतें, एकदां लिहलेलें परत घेण्याचा प्रसंग येत नाहीं. नरसोपंत असेच तयार झाले आहेत. संमति वयाच्या बिलाची चर्चा चालत असतांनाच सारें स्मृतिशास्त्र मीं वाचून काढलें होतें."

(३) स्वराज्यसंघ स्थापण्यासाठीं लोकमान्य बेळगांवला आले असतां दे. भ. गंगाधररावांच्या घरीं, कांहीं खाजगी संभाषण चाललें होतें. विषय कोणता होता हें आतां आठवत नाहीं. नामदार खापर्ड्यांचें कांहींसें पुराण चाललें होतें; मध्येंच लोकमान्य म्हणाले "प्रयत्नांतीं परमेश्वर. ईश्वरानें जितकी बुद्धि दिली असेल ती सर्व वापरून मागचा-पुढचा विचार करून व्यवहारकुशल मनुष्याप्रमाणें मनुष्यानें काम करावें. इतकें केल्यानंतरहि आपल्या हातांत नसलेलें, बुद्धीच्या आटोक्यांत न येणारें असें अदृष्ट म्हणून कांहीं उरतेंच; त्या बाबतींत ईश्वरावरच निष्ठा ठेवली पाहिजे. जेथें बुद्धीचें क्षेत्र संपतें, तेथें श्रद्धेचें क्षेत्र सुरू होतें." अदृष्टासंबंधानें बोलतां बोलतां त्यांनीं नेपोलियनची एक गोष्ट सांगितली. 'नेपोलियन एके दिवशीं रणभूमीवर उभा होता. आसपास बंदुकीच्या आणि तोफांच्या गोळ्यांचा वर्षाव चालला होता. इतक्यांत एक सैनिक एका सरदाराचा कायसासा निरोप घेऊन आला. निरोप सांगितल्यानंतरहि निधड्या छातीचा आपला धंदाडा रणभूमीवर कसा झोमतो हें डोळेभर पाहण्यासाठीं तो तेथेंच उभा राहिला. त्याला तसा उभा राहिलेला पाहून नेपोलियन म्हणाला "अरे! तू अजून इकडेच उभा! गोळी लागली तर ठार होशीलना!" तरुण सैनिक म्हणाला, "महाराज, आपण फ्रान्सचे बादशाह असून, जीव धोक्यांत घालतां तेथें मज गरीबाचा काय पाड!" नेपोलियन म्हणाला, "वेड्या जा, एथून. जीव धोक्यांत घालणें, हा माझा तर धंदाच आहे, म्हणून माझें अदृष्ट मला सांभाळतें. तूं जर नाहक आपला जीव धोक्यांत घालशील तर तो स्वच्छंद होईल, स्वैराचार होईल." नेपोलियनचें वाक्य पुरें होतें न होतें तोंच एक गोळा येऊन पडला आणि त्या तरुणाच्या शरीराचे तुकडे झाले.

(४) गेल्या उन्हाळ्यांत लोकमान्यांशीं स्त्रीशिक्षणासंबंधीं चर्चा करण्याचा सुप्रसंग मिळाला होता. त्या वेळीं संभाषणाच्या ओघांत ते म्हणाले, "पाश्चात्य शिक्षणाच्या योगानें आपण तर श्रद्धाहीन झालोंच आहोंत. संशय-प्रत्येक उच्च भावनेसंबंधानें अश्रद्धा-हा जवळ जवळ आपला स्वभाव बनला आहे. हीच अश्रद्धा स्त्रियांमध्यें उत्पन्न करावी म्हणतां काय? कन्यांच्या शिक्षणपद्धतीविरुद्ध माझा मुख्य आक्षेप

हाच आहे आपल्या संस्कृतीवर आपल्या स्त्रियांची जी निष्ठा आहे ती घालविता उपयोगी नाहीं स्त्रिया आपलें राष्ट्रीय धन आहे त्याचा नाश होता कामा नये "

(५) सिंहगडावर त्यांना एकदा मी भेटावयास गेलों होतों तेथें कर्नाटक प्रांतिक परिषदेविषयीं बोलणें चाललें होतें लोकमान्य म्हणाले "पहा, हे प्रांत कसे आता वेगवेगळे होऊं लागले आहेत सिंध वेगळा झाला, तुमचा गुजराथ वेगळा झाला आणि आता कर्नाटक वेगळा होऊं पाहत आहे जिल्हा मुंबई प्रांतिक परिषद म्हणतात ती तर फक्त महाराष्ट्राचीच कॉन्फरन्स बनणार असें वाटतें एका रीतीनें हें चांगलेंच होत आहे ह्याच्या योगानें देशी भाषांतून राजकारणाची चर्चा होईल आणि त्यानें सामान्य लोकसुद्धा अधिक मन घालतील " मी म्हणालों, " तीस वर्षांपूर्वी केसरीनें ज काम सुरू केलें होतें तें हे लोक आज करू पाहत आहेत " यामध्यें खुशामतीची अतिशयोक्ति मी बिल्कुल केली नव्हती महाराष्ट्राबाहेर गेल्याशिवाय टिळकांनीं 'केसरी' चालवून महाराष्ट्राला किती शिक्षण दिलें आहे, याची कल्पना होणार नाहीं बंगालचे सुप्रसिद्ध वक्ते सुरेंद्रनाथ बानर्जी यांनी बंगभंगापूर्वी एकहि भाषण कलें नव्हतें विषय पुढ चालवता चालवता लोकमान्य म्हणाले, " जेव्हा मी 'केसरी' सुरू केला तेव्हा कांहीं लोक म्हणू लागले कीं, देशी भाषेंत पत्र कशाला काढता ? तुमच्या वर्तमानपत्राला कोणी विचारणार नाहीं मराठींतच पत्र काढण्याचा आमचा निश्चय जेव्हा आम्ही त्यांना कळविला तेव्हा ते म्हणाले, तर मग केसरीमध्ये इंग्रजीचे निदान दोन कॉलम तरी ठेवा. आम्ही म्हणालों, " तें होणें नाहीं " केसरी लोकांच्यासाठीं आहे आणि लोक त्याचे अवश्य स्वागत करतील आज केसरीच्याच उत्पन्नातून मराठा चालवावा लागत आहे 'केसरी' सुरू केला तेव्हा आम्हाला नवीन भाषा बनवावी लागली राजकीय विषयांतील परिभाषा बनवावी लागली जुन्या मराठींत भक्ति आणि वेदान्त होता शाहीर आणि गोंधळी लोकांनीं त्यांत वीररसाची भर घातली, पण राजकारणाची गंभीर चर्चा, वादविवाद, उपहास, थट्टामस्करी, सर्व गोष्टी करण्या साठीं आम्हाला नवी भाषाच निर्माण करावी लागली ज्या मनुष्यांत उत्कटता आहे, तो सहज भाषा निर्माण करू शकतो ' मी म्हणालों, ' होय अगदीं खरें आहे गांधीजी कांहीं गुजराथीचे महापण्डित नाहींत तरी त्यांनीं गुजराथी भाषेंत नवीन जीवन उत्पन्न केलें आहे त्यांच्या लेखांमुळें आणि भाषणांमुळे गुजराथी ही वीराची भाषा झाली आहे ' लोकमान्य म्हणाले, " होय मी तें पाहिलें आहे मला गुजराथी बोलता येत नाहीं, परंतु छापलेला मजकूर सहज वाचता येतो. "

(६) यानंतर भाषणाचा ओघ हिंदीकडे वळला लोकमान्य म्हणाले, " हिंदी राष्ट्रभाषा होण्यास लायक आहे खरी परंतु जोंवर हिंदी बोलणाऱ्या लोकांमध्यें देशभक्तीचा जोम व खरी तळमळ नाहीं, तोंवर त्या भाषेंत तेज

यावयाचें नाहीं राष्ट्राला काहीं तरी संदेश पोंहोचविण्याची तळमळ माणसांत उत्पन्न होईल तेव्हांच त्याचे हातून भाषा समृद्ध होईल " मी म्हटलें 'हिंदी भाषेंत खुशामतीची ठेवण बरीच आहे. आपण लखनौला जें हिंदींत भाषण केलें होतें त्याची सडेतोड शैली (Blunt grace) गांधीजींना फारच आवडली. मी त्यांना तें भाषण वाचून दाखविलें तेव्हां ते म्हणाले " तिलक महाराजांनीं हिंदींत एक नवीनच शैली निर्माण केली म्हणावयाची ! त्यांच्या या लहान लहान वाक्यांत आणि विवरणाच्या स्पष्टतेंत अद्भुत सामर्थ्य आहे " लोकमान्य म्हणाले, " आम्हांला ही दरबारी हिंदी भाषा कोठून येणार ? खरेंच हिंदीवर पारतन्त्र्याचा परिणाम खूपच झालेला दिसतो " टिळकांच्या वक्तृत्वाला गोळीबाराची उपमा देता येईल शिपाई ज्याप्रमाणें छाती किंवा कपाळ यावर नेम धरून गोळी सोडतो, त्याचप्रमाणें लोकमान्य साध्यासुध्या भाषेंत लहान लहान वाक्यांचे आपले वाग्बाण फेंकून श्रोत्यांचें हृदय अथवा बुद्धि विंधून टाकीत त्यांचा मारा हृदयापेक्षा बुद्धीवर अधिक असे

(७) पुण्यांत मद्यपाननिषेधाची चळवळ निघाली, त्या वेळीं आम्ही कॉलेजांत होतों या चळवळीला टिळकांचा पूर्ण पाठिंबा होता हें सर्वश्रुत आहे त्या दिवसांत मी पुष्कळदां गायकवाडवाड्यांत जात असे त्या दिवशीं विद्यार्थ्यांना केलेला उपदेश अजून जसाच्या तसा माझ्या कानांत गुणगुणत आहे " तुम्ही शिकूं नये असें आमचें म्हणणें नाहीं, पण देशकार्यासाठीं समाजसेवा करण्यांत जर तुमचें थोडेंफार नुकसान झालें तर तें तुम्ही सोसलें पाहिजे कारण देशसेवा हेंच सर्वांत मोठें शिक्षण होय देशसेवेंत लक्ष घालण्यानें फर्स्ट क्लासांत येणारा विद्यार्थी सेकंड क्लासांत आला, आणि सेकंड क्लासांत येणारा पास क्लासांत आला तर त्यांतच गौरव मानला पाहिजे आशाचाच आम्ही आदर करूं आपल्या शिक्षणाचा, जो देशासाठीं उपयोग करतो तोच सुशिक्षित बाकीचे सारे मारवाडीच समजले पाहिजेत "

(८) कांहीं वर्षांपूर्वी मी टिळकांचा एक पोवाडा ऐकला होता त्यांत टिळकांचें अलौकिक पाण्डित्य सिद्ध करण्यासाठीं खालील प्रसंग कवीनें कल्पिला होता एक दिवशीं विलायतहून इकडील सरकारला एक पत्र आलें मोठ्या मोठ्या अमलदारांना तें पत्र कांहीं केल्या लागेना शेवटीं तें पत्र टिळकांच्याकडे आलें टिळकांनीं एक क्षणहि डोकें खाजविल्याशिवाय पत्र घडाघड वाचून दाखविलें, एवढेंच नव्हे तर त्याचें उत्तरहि लिहून दिलें ! हें पाहून पत्र आणलेल्या साहेबानीं तोंडांत बोटें घातलीं ! बिचाऱ्या खेडवळ कवीला बुद्धिमत्तेची सीमा म्हणजे इंग्रजींत लिहिलेलें पत्र वाचणें हीच होय ! या क्षुद्र काव्यांतही संपूर्ण श्रद्धा आणि भक्ति भरलेली आहे ही गोष्ट निराळी

(९) राष्ट्राच्या हृदयात चिरकाल वसत असलेलें ध्येय लोकमान्य जाणत असत तेंच ध्येय त्यांनीं आपलेसें केलें होतें म्हणूनच ते लोकमान्य झाले महात्मा गांधींचें राजकीय ध्येय स्वदेशीय आहे खरें, पण हिंदी संस्कृतीच्या सर्वोच्च आदर्शाला अनुसरून त्यांनीं तें ठरविलें आहे, त्यामुळें लोकांना जरी तें आपलसें वाटतें तरी दूर दूर असल्याप्रमाणें लोकमान्यांनीं स्वत खासगी सभापणात गांधींच्या आदर्शाचें एकदा मोठें मजेदार वर्णन केलें होतें "समुद्रात सफर करणारें जहाज ध्रुवताऱ्याकडे लक्ष ठेवून चालत असतें पण तें काहीं ध्रुवताऱ्यावर जात नाहीं दाभोळ, रत्नागिरी, वेंगुर्ले वगैरे एकादें आत्मिक ध्येयच त्याला गाठावयाचें असतें त्याचप्रमाणें धार्मिक ध्येय हवें तेवढें उच्च असो, पण व्यवहारात व्यवहाराचें म्हणून निराळें ध्येय असलेंच पाहिजे नुसतें धार्मिक ध्येय ठेवून जगात चालावयाचें नाहीं. ध्रुवाकड लक्ष असू द्या, पण ध्रुवावर जाता यावयाचें नाहीं, हेंहि लक्षात असू द्या"

(१०) मि मॉंटेग्यूची मुलाखत घेण्यास लोकमान्य दिल्लीस गेले तेव्हा त्यांच्या सन्मानार्थ मिरवणूक काढू नये असा सरकारचा मनाई हुकूम निघाला. रस्त्यातील अडाणी माणसात त्या वेळीं पुढील गाष्टी चालल्या होत्या, "आज पूनेका राजा आनेवाला है. सरकार उसी वहोत डरती है"

(१४) टिळकास शाळेंतून दरमहा तीस रुपये पगार मिळत असे त्याचा एक सहकारी म्हणाला कीं, ' एवढ्या पगारात आपण मेल्यावर आपल्या दहनापुरता पैसाही गाठीं पडणार नाहीं ' टिळक म्हणत "या गोष्टीचा आमच्यापेक्षा सोसायटीनेंच विचार करावा विभूतिपूजा म्हणून त्यांनी आमचं दहन न केलें तरी गावच्या आरोग्यरक्षणार्थ तरी त्यास आमचं दहन करणें भाग आहे ।'

---

## दत्तात्रय केशव पाठक

[ लो टिळकांच्या चिरंजिवांचे खासगी शिक्षक, हल्लीं मु मुंबई ]

दादा कॉलेजमध्यें प्रीव्हीयसच्या वर्गांत असतांना त्या वेळचे त्यांचे एक स्नेही पुढे सन्यास घेतल्यावरहि दादांना मधून मधून भेटत असत त्याप्रमाणें दादांची भेट घेण्याकरितां हे स्वामी ह्याच सुमारास सिंहगडावर आले होते जेवणाच्या वेळीं स्वामींनीं दादांना विचारिलें कीं, "बळवंतराव, तुम्ही 'ओरायन' ग्रंथ लिहिलात, तो लिहिण्याची कल्पना तुम्हाला कशी सुचली ?" ते म्हणाले, "आपलेकडे बारा राशींप्रमाणें वसूहि प्रत्येक राशीला एक ह्याप्रमाणें बारा पाहिजेत परंतु वसु आहेत आठ तेव्हां बारा वसु केव्हां होते व आठ वसु केव्हांपासून झाले ह्याचा विचार करू लागलों असतां असें लक्षात आलें कीं, नॉर्वे देशांत चार महिने रात्र व आठ महिने दिवस असतो, व जेव्हांपासून ही चार महिन्यांची रात्र सुरू झाली तेव्हांपासूनच बारा वसूचें आठ झाले असावेत व हीच कल्पना 'ओरायन' लिहिण्यास कारण झाली"

१

---

## बाबूराव भाऊराव फुले

[ उत्पादक श्रीगोपाळ क्लब, स्वराज्य पक्षाचे व शहर म्युनिसिपालिटीचे एक सभासद, पुणें ]

(१) सन १९०० सालीं आमचे चुलते (महादेव बाबाजी फुले) हे 'केसरी' पत्राचे वर्गणीदार झाले. त्या वेळेस आर्यभूषण छापखान्यात 'केसरी' छापीत असावे असें मला वाटतें. छापखान्यापासून आमचें घर म्हणजे नवी पेठ बरीच दूर असल्यामुळें केसरीचा अंक वाटणारा इसम अंक आमचे घरीं टाकण्यास पुढें पुढें कटाळा करू लागला, आणि त्याप्रमाणें इतक्या लांब एका अंकासाठीं मी जाणार नाहीं अशी त्यानें मॅनेजरजवळ तक्रार केली आणि मी पुढील अंक टाकणार नाहीं, असें आम्हासहि त्यानें सांगितलें. मी मॅनेजर (बाबा विद्वांस असावे असें वाटतें ) ह्यांना जाऊन भेटलों, तेव्हां त्यांनीं सांगितलें कीं, एका अंकाकरितां वाटणारा जर इतक्या लांब येत नाहीं तर छापखान्यांतून अंक घेऊन का जात नाहीं ? 'केसरी' पत्र वाचण्याची मला फार आवड असल्यामुळें ती गोष्ट मीं प्रथम कबूल केली. परंतु कांहीं दिवसांनीं छापखान्यात वेळेवर न गेल्यामुळें कित्ती तरी वेळा अंक मिळत नसे. म्हणून एकदा टिळकांना भेटावें ह्या हेतूनें त्यांचेकडे मी गेलों आणि अंकाबद्दल सर्व हकीकत सांगितली, आणि केसरीच्या अंकाकरितां आम्हास बऱ्याच तंगड्या तोडाव्या लागतात असें म्हणालों. टिळकांनीं विनोदानें उत्तर दिलें कीं, " तंगड्यातोड " केल्याशिवाय सिंहाची भेट होणार नाहीं.

(२) सन १९०६ मध्यें नवी पेठ येथील मंडळीनें माझे देखरेखीखालीं श्रीगणपतीचा मेळा काढला. त्यावेळेस गायकवाडवाड्यात मेळेवाले लोकांची सभा टिळकांनीं बोलाविली. त्यामध्यें माझे मित्र लक्ष्मणराव काळे व मी हजर होतो. ज्या ज्या मेळेवाल्यास ज्या ज्या अडचणी होत्या त्या त्या त्यांनीं विचारल्या व त्यांचीं उत्तरें व सल्ला टिळकांनीं बरोबर दिली. माझ्या मनामध्यें आमच्या मेळ्याचे पुढें आम्हास आपटबार करण्याची हौस होती, आणि मी तो विषय टिळकांचे पुढें मांडला. टिळकांनीं खालीलप्रमाणें मला उत्तर दिलें–" असल्या फुसक्या आपटबारानें काहीं इंग्रज लोक भिणार नाहींत. त्यांना खऱ्या दारूचे बार

बरोबर वरील गोष्ट करण्याकरिता सज्ज असलेल्या नायका पचारती घेऊन उभ्या होत्या. मी लो० टिळकाना म्हणालों, नायका ओंवाळण्याकरिता उभ्या आहेत. त्यानीं खालीलप्रमाणें मला उत्तर दिलें— "स्वराज्य मिळाल्यावर मला ओवाळा. अगोदर ओंवाळावयाला जाल आणि ओंवाळताना जर एखादा दिवा विझला तर तो अपशकून होईल तर ओंवाळू नका. विजयश्रीनें गळ्यात माळ घातल्यावरच आरत्यात ओंवाळावयाची चाल आहे "

(४) श्रीगोपाळकृष्णाच्या वाढदिवसाचें अध्यक्ष व्हावे, म्हणून निमंत्रण देण्याकरिता एकदा लो० टिळकाकडे गेलों होतो. त्यानीं उत्तर दिलें कीं "मी तुमचाच आहे मी केव्हाहि अध्यक्ष होईन, परंतु बाकीचे पुढारी अगोदर करून घ्या " मी महात्मा गांधींचें नाव सुचविल्याबरोबर ते म्हणाले, " अगोदर त्याना बोलवा. " परंतु योग आला नाहीं.

(५) श्रीगोपाळ कृष्ण–पुणें, या संस्थेचा वाढदिवस नवी पेठ चिमणबाग येथें लो० टिळकाचे अध्यक्षतेखालीं करण्याचें ठरलें रीतीप्रमाणें निमंत्रण देण्याकरिता गेलों असता गायकवाडवाड्यापासून नवी पेठपर्यंत चार घोड्याचे गाडींत बसवून न्यावें अशी त्याना विनंति केली त्यावेळेस त्यानीं मला उत्तर दिलें–" मी काहीं बाटलीवाला पारशी नाहीं ज्याला लोक ओळखीत नसतील त्यानें असले विचित्र प्रकार करावेत "

(६) श्रीगोपाळ कृष्णाच्या पाचव्या वाढदिवसाचें अध्यक्षस्थान टिळकानीं स्वीकारल्याचें कबूल केलें आम्ही नवी पेठ चिमणबाग येथें त्याचेकरिता एक मोठें व्यासपीठ तयार केलें व्यासपीठ थोडें उंच झालें होतें टिळकांची स्वारी ठरल्या वेळेस आली समारंभाने व्यासपीठावर नेऊन बसविलें. चढता चढता मी सहज म्हणालों, व्यासपीठ थोडें उंच झालें नाहीं ? लागलेंच उत्तर दिलें कीं, "अध्यक्षाला

## नरहर शिवराम परांजपे

[ डॉक्टर, तपस्वी, चिटणीस टिळक स्वराज्य संघ, व अखिल महाराष्ट्र स्वराज्य पक्षाचे ' व्हिप ' ]

(१) खेडवळ लोकांशीं तादात्म्य पावून त्यांच्या शंकाचें समाधान करण्यात लोकमान्य किती तरबेज होते याचें एक उदाहरण मला पाहण्यास मिळालें तें असें—

मंडालेहून शिक्षा भोगून परत पुण्यास आल्यावर लवकरच एके दिवशीं एक खेडवळ पण पोक्त शतकरी " लोकमान्य कोठें आहेत ? " याचा शोध करीत थेट त्यांच्या नेहमींच्या बसण्याच्या जागीं जाऊन पोंचला, व " लोकमान्य कोठें आहेत ? " असा त्यानांच त्यानें प्रश्न विचारला तेव्हा ' हेच ते ' असें मी सांगितल्यावर तो लोकमान्यांच्या हालअपेष्टांशीं तद्रूप पावून " हें तुम्हास कोणी सांगितलें ? " असा भोटक व दुर्बोध प्रश्न त्यानें मोठ्या कळवळ्यानें केला तेव्हा लोकमान्यांनीं म्हणींचाच आधार देऊन उत्तर दिलें कीं, " वागोवागीनें कोणी काहीं करीत नाहीं स्वभावानुसार जो तो वागत असतो " पुढें त्यानें साचिंत अंत करणानें प्रश्न केला " हें असेंच पुढें चालणार कीं काय ? " लोकमान्य किंचित् हसून म्हणाले ' जित्याची खोड मेल्याशिवाय कशी जाईल ? "

(२) पुण्यास प्रांतिक परिषद भरली होती, त्या वेळीं एका ठरावाच्या भाषेंत कोणत्या शब्दाची योजना करावी याबद्दल खासगी रीतीनं कडाक्याचा वाद चालला होता त्याचा निर्णय होण्यापूर्वी जवळ आलेल्या एका साधूच्या दर्शनास जाण्याची गोष्ट काहींजण बोलू लागले तेव्हा लोकमान्यांनीं विनोदानें प्रश्न केला, " एकूण माझ्या शेंडीचे केंस डोक्यावर आहेत तोंपर्यंत तुम्ही मला साधु किंवा संन्यासी मानीत नाहीं म्हणावयाचें ? " हा प्रश्न एकताच मंडळी ठरावाकडे लक्ष

नंतर ही नोट पाहा " असें त्यांनीं मला सांगितलें होतें त्याप्रमाणें मी ती नोट वाचली, परंतु 'चंद्र सूर्यप्रशस्ति ' हें पुस्तक मला कोठें पाहण्यास मिळालें नाहीं तेव्हा त्यांची पुन गांठ पडल्यावेळीं मी त्यांना " प्रशस्तीचें पुस्तक छापलेलें नाहीं व तें मिळालें नाहीं " असें सांगितलें तेव्हा ते म्हणाले, " मी देखील तें वाचलें नाहीं, पण तें वाचण्याची आवश्यकता मला भासली होती ती कशावरून भासली होती तें मी आता पाहतो ' असें सांगून ते लायब्ररींत गेले व दीड–दोन तास पुस्तकें धुंडाळून बनारस चौखंबा सीरीजच्या एका पुस्तकाच्या मळपृष्ठावर " छापत आहेत " या सदराखालीं चंद्र सूर्यप्रशस्तीचें नाव त्यांनीं दाखवून दिलें लोकमान्य कैदेंत जाण्यापूर्वी त्यांनीं ती जाहिरात एक वेळ पाहिली होती पण तिचें स्मरण त्यांना सात वर्षांनंतर देखील अगदीं निश्चित असें होतें ! त्यांची स्मरणशक्ति चांगली होती एवढेंच नव्हे, तर तिच्या विश्वसनीयतेबद्दल त्यांना नेहमीं खात्री असे यामुळें एखादी गोष्ट आपल्या पाहण्यात आली होती असें त्यांना वाटलें कीं, प्रसंगाच्या वेळीं ती शोधून काढण्यासाठीं ते तासच्या तास घालवीत आणि शेवटीं त्यांना पाहिजे असलेला उल्लेख नेमका सापडत असे याचीं आणखी अशीच दोनचार उदाहरणें मी पाहिलीं होतीं

---

प्लेग असो किंवा पटकी असो, भिता उपयोगी नाहीं. डॉक्टरच जर रोगाला भ्याले, तर बाकीचे लोक जास्तच भितील. कारण पाणबुड्यानें पाण्याला भिऊन कसें चालेल ? तसेंच लोकपक्षीय वर्तमानपत्राच्या संपादकानीं तुरुंगाला भिता कामा नये ' हें यांचें म्हणणें ऐकताच मी प्लेग हॉस्पिटलमध्यें काम करण्याचें पतकरलें.

(३) रँडसाहेबाचा खून ज्या रात्रीं झाला त्याचे दुसरे दिवशीं सकाळीं ६ वाजता मला सखल हॉस्पिटलमधील मित्राकडून ती बातमी कळली. तेव्हा मी तसाच लोकमान्य टिळकाकडे गेलों व त्याना ही हकीकत सांगितली. आणि मी त्याना म्हटलें, आता तुम्हाला सरकार पकडणार. असें म्हणताच, ते हसले व म्हणाले ' हे तर ठरलेलेंच ' आणि उद्गारले, ' आम्ही गव्हर्मेंट हौसमधून घरीं परत येईपर्यंत आम्हाला वाटेत काहीं गडबड कळली नाहीं. '

(४) एकदा डॉक्टराच्या सभेंत काहीं सभासदानीं डॉ० गणेश कृष्ण गर्दे याना ' मराठी वैद्यक ' या विषयावर बोलावें म्हणून विनंति केली होती. त्याप्रमाणें त्यानीं त्या विषयावर काहीं लिहून काढलें तें माझे पाहण्यात आलें. त्यात मराठी वैद्यकासंबधानें गौरवपर अगदीं थोडें असून वाईट काय आहे याचाच उल्लेख होता. तेव्हा मी डॉ. गर्दे याना म्हटलें, मराठी वैद्यकासंबधान चांगल्याचा निर्देश करून वाइटासंबधानें मुग्ध रहणें बरें, पण माझें हें म्हणणें त्याना पटलें नाहीं. म्हणून मी लो० टिळकाकडे गेलों व त्याना ही हकीकत सांगितली. कारण त्या वेळीं मराठी वैद्यक चांगलें कीं वाईट व शाळेंत शिकवावें कीं नाहीं किंवा सरकारी मदत मिळावी अशाबद्दल वाद चालला होता लो० टिळकानी माझें म्हणणें ऐकून घेतलें व डॉ० गर्दे याचे घरीं जाऊन गर्दे यानीं मराठी वैद्यकासंबधानें लिहिलेला लेख वाचला व त्यात जरूर तो मजकूर शुद्ध करून त्यानीं त्याना वाचण्यास सांगितलें

काराना विचारलें की, ' समजलें का ?' त्यावर त्यांनीं होय असें उत्तर दिलें त्यावर टिळकांनीं त्यांना असा सवाल केला कीं, ' विरुद्ध बाजूचे वकील दाजी आबाजी खरे यांनीं असा दुसरा मुद्दा पुढें मांडला तर त्यावर तुम्ही उत्तर काय द्याल ? ' त्या वेळीं चदावरकरांना उत्तर देता येईना त्यावर लो० टिळकांनी त्यांना असें सांगितलें कीं, ' आपण अशा रीतीनें मुद्दा पुढें करून उत्तर द्या ' तें चदावरकरांना पटलें, आणि त्याप्रमाणें तो खटला हायकोर्टांत चालून चदावरकरांतर्फे निकाल लागला

---

## महादेव मल्हार जोशी

[ एम् ए प्रोफेसर जुनागड कॉलेज, न्यू स्कूलचे एक जुने विद्यार्थी ]

लोकमान्य हे माझे सहावी व सातवी इयत्ता व सहा महिने कॉलेजामध्यें शिक्षक होते सहावी व सातवी या इयत्तेंत ते गणित व कांहीं दिवस इंग्रजी शिकवीत असत टिळकांच्या अंगांत शिष्यामध्यें उत्साह उत्पन्न करण्यासारखा विशेष गुण नव्हता पण उत्तम गणती जो विद्यार्थी असेल त्याच्याच मनांत त्यांच्याविषयीं आदर उत्पन्न व्हावयाचा साधारण मुलाकडे त्यांचें लक्षही नसे व त्याविषयीं त्यांना पर्वाही नसे या कामांत के वामनराव आपटे व नामदार गोखले हे टिळकांहून श्रेष्ठ होते ते वर्गांत उत्साह उत्पन्न करीत, व त्यांची ओळखहि जास्त परिचयाची असे वामनराव आपटे जो मुलगा अभ्यासी व कर्तबगारी दाखविणारा असेल त्याच्याशीं जास्त सलगी करीत व वर्गांतच त्याला उत्तेजन मिळेल अशी केव्हां प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष अशी स्तुति करीत टिळकांच्या शिकविण्यानें उत्तम विद्यार्थ्यांच्या मनांत तेवढा आदर उत्पन्न व्हावयाचा बाकी वर्ग उत्साहशून्य असे

कॉलेजांत हीच तऱ्हा त्यांनीं भूमितीचें एक एक पुस्तक एका तासांत सर्व सिद्धांताची मूळ पीठिका सांगून संपवावें परंतु साधारण विद्यार्थ्यांचें लक्ष लागत नसे टिळक हे जसजसा विद्यार्थी बुद्धिमान् असेल तसतसे त्याला जास्ती उपयोगी असत इंग्रजी शिकविण्यांत टिळकांची प्रत्येक परिग्राफांत विचार काय आहे त्याची गोळाबेरीज थोडक्यांत सांगण्याची हातोटी नवीन व जास्ती उपयोगी होती. बाकी व्याकरण वगैरे फिरकोळ बाबतींत त्यांचें विशेष लक्ष नसतें ते एम् ए चे शिक्षक उत्तम होते त्यांचें ज्ञान अगाध असे परंतु शिस्त, करमणूक व उत्साह याविषयीं ते फारशी काळजी करीत नसत

---

## दत्तात्रय वामन पोतदार

[ बी ए प्रोफेसर न्यू पूना कॉलेज इतिहास–स मडळाचे चिटणीस, पुणे ]

(१) लो० टिळकाशीं निकट सहवास मला कधीं फार लाभलेला नाहीं, त्यामुळें सागण्याजोग्या आठवणी मजपाशीं नाहींत एकदा केसरीमार्फत त्यानीं केलेल्या भाषासेवेसबधानें विषय निघाला असता त्यानीं या लेखकाजवळ असे उद्गार काढले कीं, " आमचें धोरण केसरींत इग्रजी शब्द सहसा येऊ द्यावयाचा नाहीं असें असे लिहावयाला बसावयाचें आणि निश्चय हा ठेवावयाचा कीं, इग्रजी शब्द मध्यें न घालता सारला मजकूर लिहित जावयाचा लेखणी अडली तरी शब्द मराठी करून घातल्याखेरीज पुढें जावयाचें नाहीं हट्टूनच बसलें म्हणजे शब्द सुचत व या रीतीनें केसरींत किती नवीन नवीन शब्द आणता आले "

(२) दुसरी आठवण आमच्या न्यू पूना कॉलेजाला जागा मिळविण्याच्या वेळची प्रथमपासून आमचे कै० कृष्णाजीपत डोंगरे याचा डोळा भाऊमहाराज बागेवर होता पण सन १९१८ सालीं तर तुरीसुद्धा बाजारात नव्हत्या इतक्यात योग आला प्रिव्ही कौन्सिलनें टिळकाखटल्याचा निकाल दिला पुन डोंगरे याना आशा सुटली ते टिळकाना भेटले जुनी ओळख टिळकानी ठेविली होती काम करतो, परतु आता माझ्या हातीं कायदेशीर अधिकार नाहीं अखेर हजार विघ्नें आलीं मोठमोठ्यानीं मोडता घातला पण श्री जगन्नाथमहाराजानीं " दादाच्या बाहेर मी नाहीं " हा शब्द कायम ठेविला टिळक विलायतेला जावयाला निघाले कामाची गर्दी झाली आमचा कागद काहीं होईना आमची चिंता क्षणोक्षणीं वाढली त्या रात्रीं टिळकाना नुसता नमस्कार करावयाला सुद्धा फुरसत नव्हती. पुण्यात मिरवणुकीसाठीं हजारों लोक जमलेले त्या घाईत नुसतें टिळकापर्यंत पोंचणें देखील अशक्य झालें अखेर मुबई गाठली तेथें तोच प्रकार ही लोकाची दाटी ! श्री तात्यासाहेब केळकर, विद्वासप्रभृतींनीं आमची दाद पोंचविण्याचा यत्न केला परतु क्षणभराची उसत टिळकाना नाहीं आणि तत्सबद्ध मडळी बहुतेक विरुद्ध तरी एवढ्या गर्दींत सरदारगृहाचे माडीवर आमचे मडळीतर्फे मी व टिळक, जगन्नाथमहाराज, बाबा विद्वास, गोपाळ मोरेश्वर पटवर्धन, बाबासाहेब खापर्डे अशी मडळी दार लावून तसेच उभ्या उभ्या बोलणें केलें अखेर टिळकानीं सांगितलें कीं " मी आता सागतों आणि मी म्हणतों म्हणून जागा द्या " म्हणून तोंडीच करार केला आणि त्यानीं गाडींत पाय टाकला पुढें ते कोल्बोहून परतच आले तरी सारखी आठवण ठेवून हा करार पुरा करून जागा त्यानीं मडळीस मिळवून दिली शब्द दिला तो पुरा केला

(३) भारत–इतिहाससशोधक मडळाचे मंदिरासाठीं टिळकांनीं १००० रु. देणगी देण्याचें कबूल केलें पुढें त्यानवर चिरोल–खटल्याचा बोजा पडला

स्वत.चें घर गहाण टाकावें लागलें पण मंडळाची रकम पोंचती करण्यांत कसूर झाली नाहीं. मी सहज दिसलों तों त्यावेळीं " काय हो! तुमचे ५०० रु राहिले आहेत ना? बाबाना सांगून देववितों " मी म्हटलें, 'मला वाटतें १००० आले असतील मी पाहून कळवितों ' अखेर टिळकांची आठवण खरी ठरली. ते लवकरच मुंबईला गेले व हा लोक त्यांनीं सोडला रुपये पश्चात् दुसऱ्यांनीं दिले

---

## केशव रामचंद्र जोगळेकर

[ न्यू इं स्कूलमधील लो० टिळकाचे बरोबरीचे एक शिक्षक, मु संगमनेर ]

(१) कै० बळवंतराव टिळक यांचे वडील कै० गंगाधरशास्त्री हे पुणें येथें आसिस्टंट डेप्युटी होते त्या वेळीं नुकतेच कै० सीताराम विश्वनाथ पटवर्धन हे पुणें जिल्ह्याचे डेप्युटी-इन्स्पेक्टर झाले त्यांनीं आपले असिस्टंट टिळक यास पावसाळ्यामध्यें मराठी शाळांतून आठवड्यातून दोन तास शिक्षण देण्यास सांगितलें. त्याप्रमाणें ते आम्हास गणित व व्याकरण शिकवीत असत व्याकरण कर्ते तेच असल्यामुळें ते आपलें व्याकरण शिकवून दादोबाच्या व्याकरणांतील कांहीं चुका दाखवीत. ह्याप्रमाणें सुमारें इ० स० १८६८ सालीं लो० टिळकाच्या वडिलांचा व माझा, मी मराठी चौथ्या इयत्तेत शिकत असतां संबंध आला माझे वडील हे पुणें मराठी शाळा न. २ चे हेडमास्तर पूर्वपद्धतीचे व नावाजलेले असल्यामुळें गंगाधरपंत त्यास फार प्रेमपूर्वक वागवीत व मानीतही.

(२) यानतर बळवतरावाचा व आमचा सबध इ० स० १८७७ पर्यंत आला नाहीं. सन १८७८ साल्च्या जानेवारी महिन्यात आम्ही डेक्कन कॉलेजात गेलों तेव्हा दुसऱ्या टर्ममध्यें म्हणजे जूनपासून बळवतराव एलूएलू. बी. चा अभ्यास करण्याकरता म्हणून डेक्कन कॉलेजात राहिले. त्या वेळीं ते आमच्या क्लबाचे मेंबर होते. आमच्या क्लबात येण्याचें काय कारण असेल हें जरी निश्चयानें सागवत नाहीं, तरी त्या वेळीं आमच्या क्लबास 'सेक्रेड क्लब' असें नाव पडलें होतें. याचें मुख्य कारण आम्ही पूना हायस्कुलातून पास होऊन बहुतेक मुलें जमून त्यानीं हा क्लब काढला व त्यात सोंवळ्यानें जेवावयास बसावें असा नियम केला. ह्याप्रमाणें हा क्लबात ७-८ मेंबर्स तरी सोंवळ्यानें जेवावयास बसत असत. आमच्या वेळच्या जुन्या मडळींचा एक प्रसिद्ध क्लब असे. त्यात बाळासाहेब चौबळ, राममाऊ गोडबोले वगैरे मडळी असत. त्या जुन्या व जवळ जवळ टिळकाच्या बरोबरीच्या मडळींचा क्लब सोडून आमच्या क्लबात ते मिळाले याचें कारण उघड आहे कीं, बळवतराव त्या वेळीं तरी ओवळ्यानें जेवत नसत. पुढें त्याच्याच बरोबरीची मडळी आमच्या क्लबात बरीच आली. त्यात अण्णा साहेब देशपांडे रिटायर्ड डेप्युटी कलेक्टर, मनोहरपत कायवटे रिटायर्ड सबजज, ऑनरेबल उपासनी व विष्णु रावजी जोशी. यातूनही काहीं मडळी सोंवळ्यानेंच बसत असत. आमच्या मडळीत एकमेकाना जेवताना शिवणें वगैरेचा प्रतिबध घराव असे. त्यामुळें कोणाचही, कोणाच्या इच्छेविरुद्ध वर्तन होण्याची भीति नसे. बळवतरावजी याचा त्या वेळचा क्रम आम्ही पाहिला आहे तो असा कीं, ते ७ वाजता क्लबाकडे जात. प्रातर्विधी करून स्नान आटोपून ते तालीम करीत नतर ८ ८॥ चे बेताला ते परत आपल्या खोलींत येत या खोलींतच ही वर सांगितलेली मडळी राहत असत म्हणून या खोलीस आम्हीं यहूनें 'हायकोर्ट' असें नाव दिलें होतें. येथें बळवतराव अभ्यास करीत, परतु मित्रमडळींशीं पुष्कळ गप्पादी मारीत. अभ्यासाची सबब गप्पा मारण्याच्या कामीं ते कधींही पुढें आणीत नसत, व आपण निवात असले म्हणजे ते अभ्यास करीत असत तो असा कीं, आम्ही रात्रीं दोन वाजता एखादे वेळीं उठावें आणि पाहावें तों बळवतराव अभ्यास करीत आहेत त्या वेळची एक गोष्ट मला अशी आठवते कीं, त्याच्या अभ्यासक्रमात 'Hindu Law' म्हणून होता तो त्यानीं इग्रजींतील वाचला असेलच परतु धर्मशास्त्राच्या पोथ्या घेऊन त्या ते वाचीत असत, हें आम्ही प्रत्यक्ष पाहिलें आहे या एका गोष्टीवरून अभ्यास किती दूरदृष्टीनें करावयाचा हा त्याचा निश्चय लेव्हापासून दिसून येण्यासारखा आहे.

(३) आमचा बळवतरावाशीं सबध असता, कधीं आजारी, कधीं डोकें दुखणें, झोंप आली नाहीं म्हणून तक्रार करणें ह्या गोष्टी त्याच स्वभावात हि ठाऊक नाहींत असें आम्हास दिसे. स्वभाव नेहमीं मोकळा, आकुरलेली वृत्ति कधींही नाहीं,

कोणी काहीं प्रश्न विचारा, त्याचें सांगोपांग उत्तर देऊन, प्रश्न विचारणाराचें समाधान करणें ही एक त्याची हातोटी होती मग तो प्रश्न विचारणारा त्याच्यापेक्षा कितीहि कमी दर्जाचा असो व विषय कोणताहि असो. संस्कृत घ्या, गणित घ्या, अथवा तत्कालिन राजकीय किंवा सामाजिक विषय घ्या, त्यावर त्याचें समर्पक व खात्री करून देण्यासारखें उत्तर असे.

(४) पुढें १८८२ सालीं मी न्यू इंग्लिश स्कूलांत मास्तर झालों. तेव्हां पुन संबंध आला. परंतु मी खालच्या दर्जाचा शिक्षक व हे लाईफ मेंबर असल्यामुळें आम्ही साहजिक अधिकारी म्हणून त्याचेपासून योग्य तें अंतर राखूनच होतों. त्यामुळें विशेषसा संबंध आला नाहीं अशा प्रकारचा संबंध ८२ सालापासून ९२ सालापर्यंत होता. परंतु ८५ सालीं न्यू इंग्लिश स्कूलास ग्रॅन्ट घ्यावी किंवा न घ्यावी या बाबतींत व्यवस्थापक मंडळींत वाद उत्पन्न होऊन दोन पक्ष झाले आम्ही शिक्षक या नात्यानें ताबेदार असल्यामुळें आमच्यावर जे सुपरिंटेंडेन्ट असत त्यांच्याच अनुरोधानें चालणें आम्हास भाग होतें मग ते अधिकारी व बळवंतराव यांच्यात मतभेद होत असल्यामुळें आम्हास साहजिक रीतीनेंच ते जरा दूर लेखीत. त्यांत आम्ही माधवराव गोळे यांचे अनुयायी म्हणून ‘Gole's myrmidons असें उपपद आमच्या मंडळींस टिळक पक्षीयांकडून दिलें गेलें होतें. यामुळें आम्हास त विशेषेण उपहासक रक वाटेव म्हणून बळवंतरावांशीं लगट करणें थोडें दुरापास्त झालें गोळे हे आगरकरांचे मित्र. अर्थात् गोळे–कंपू आगरकरांचेंच समर्थन करणारा असा बळवंतरावांच्या पक्षाचा ग्रह असे या गोळे–कंपूंत आम्ही दोन जोगळेकर, बापूसाहेब लिमये, अण्णासाहेब देवस्थळे व खालील पहिल्या–दुसऱ्या इयत्तेंतील काहीं मास्तर असे असत वासुदेवराव केळकर हे गोळ्यांचेच घरांत बिऱ्हाडानें राहत असल्यामुळें तेही गोळे–कंपूंतच सामील झाल्यासारखे दिसत असत गोळे आणि आगरकर हे कॉलेजांत असतांना जरी अत्यंत स्नेही असा लोकांचा समज होता तथापि शाळेंत आल्यावर त्या स्नेहांत तितकें दार्ढ्य दिसत येत

जेव्हा तटा उपस्थित झाला तेव्हापासून हे पक्ष निरनिराळे झाले असें लोकांच्या प्रत्यक्ष अनुभवास येऊं लागलें. शेवटीं बळवंतरावांनीं राजीनामा दिला वगैरे गोष्टी मशहूर आहेतच त्यांनीं राजीनामा दिल्यामुळें त्यांची पॉलिसी असे, तिजबद्दल रुपये भरण्याबद्दल त्यास मागणें केलें असता, आगरकर यास अशक्ततेमुळें पॉलिसी मिळाली नव्हती, तेव्हां सोसायटीनें पैसे भरून त्याचा फायदा आगरकर ह्यास द्यावा असें बळवंतरावजींचें म्हणणें आहे अशी गोष्ट आम्ही ऐकत होतों. त्यांतील खरें तथ्य काय होतें तें आम्हास ठाऊक नाहीं. तथापि आमच्या खालच्या मंडळींत टिळकाबद्दल ह्या स्वार्थत्यागासाठीं मोठा अभिमान वाटे. बळवंतराव यांचे परमस्नेही गोखलेशास्त्री हेही पण आमच्याच कपूत असत. पुढें पुढें तर संस्कृत पुस्तकें करतेवेळीं ते गोळ्यांचेच अनुयायी बनले, असें भासू लागलें ह्या दोन पक्षांत कट्टे टिळकाभिमानी वर सांगितलेली मंडळी असत. आगरकरांचे पक्षास पैशाच्या प्राप्तीमुळें कदाचित् आपटे, गोळे, केळकर गेले असें जरी वाटत असलें तरी ते आगरकर यांचे कट्टे अभिमानी असें मात्र नसे. जितक्यापुरतें तितकें असत असा दिसे. या वेळेस आगरकर यांचे कट्टे अभिमानी गोखले झाले व मागाहून त्यास वासुदेवराव पटवर्धन हे मिळाले

(५) बळवंतराव व आगरकर हे प्रथम १०१ दिवसांच्या कैदेच्या विपत्तींत पडल्यामुळें अत्यंत स्नेही असे मानत असत व त्यांचीं बिऱ्हाडेंही तांब्यांच्या वाड्यांत एकत्र असत त्यांतच वामनराव आपटे राहात होते १०१ दिवसांच्या कैदेंतून आगरकर आणि टिळक सुटून आल्यावर त्यांचें स्वागत आम्ही डेक्कन कॉलेजांतील विद्यार्थ्यांनीं कसें करावें, ह्याबद्दल कॉलेजाच्या विद्यार्थ्यांत प्रश्न निघाला त्यावेळेस कॉलेजांतील सर्व मंडळी पुणें स्टेशनावर गेल्यास, त्यास प्रवेश होण्यास रेल्वे-अधिकारी हरकत घेतील हें जाणून मंडळींनीं खडकीच्या स्टेशनवर जाऊन त्यांचें स्वागत करण्याचें ठरविलें ह्याकरिता खडकीचे स्टेशनमास्तर यास दुसरे दिवशीं पहाटेच्या गाडीस ७५ पॅसेंजरची तिसऱ्या क्लासचे उतारू म्हणून सोय करण्याविषयीं लिहिलें होतें त्याप्रमाणें त्यानें ती सोय केल्यामुळें आम्हा सर्वांस तेथें स्वागत करण्याची संधि मिळाली त्या वेळीं बळवंतराव व आगरकर हे सेकंड क्लासांतून आले असून आम्हास खडकीच्या स्टेशनवर पाहताच, त्यांनीं सेकंड क्लासमधून उतरून आमच्याकरता जे दोन डबे होते त्यांत एकेक जाऊन बसले त्या वेळीं तुरुंगांत काय काय गैरसोय झाल्या त्या त्यांनीं आम्हास सांगितल्या त्यांत एक गोष्ट अशी कळली कीं, आगरकर हे मूळपासून दमेकरी असल्यामुळें जें अन्न त्यास मिळे त्यांतील अर्धा भाग त्यास खाववत नसे. जो भाग त्यास खावावे तेवढाच तो खात त्यामुळें त्यास अर्धपोटीं राहावें लागे ही गोष्ट लक्षांत घेऊन बळवंतरावजींनीं तेथील अधिकाऱ्यास विनंति केली कीं, माझ्या अन्नापैकीं जो जो भाग आगरकर यास अनुकूल असेल, तो त्यास द्यावा व

त्याच्या भागापैकीं जो भाग त्यास प्रतिकूल असेल तो मला चालेल अशा प्रकारचा स्वार्थत्याग दोघेही सारख्याच विपत्तींत असल्यामुळें जो करीत त्याबद्दल आम्हास किती आदरबुद्धि वाटत असेल, ह्याबद्दल सांगणें नको, परंतु ह्याच दोन व्यक्तींत पुढें केवढें अंतर झालें ह्याचेंही सखेदाश्चर्य वाटणें साहजिक आहे ८२ पासून ९२ च्या आरंभापर्यंत माझा न्यू इंग्लिश स्कूलशीं संबंध होता

(६) १८९२ सालापासून मी अक्कलकोटास गल्यामुळें माझा संबंध कमीच असे आलों म्हणजे बळवंतरावास मधून मधून भेटत असे बळवंतराव दुसऱ्यादा कैदेंतून सुटून आल्यावर माझी त्यांची गांठ अप्पा बळवंताचे वाड्यासमोर पडली त्या वेळेस मी त्यास असें म्हणालों कीं सार्वजनिक कामांत पडल्यामुळें आपणास ह्या दोनदा विपत्ति भोगाव्या लागल्या शिवाय सरकारचीही गैरमर्जी झाली सांपत्तिक स्थिति बरी होण्याचीही ह्या कामांत कांहींच चिन्हें दिसत नाहींत तेव्हा आपण ही बाजू सोडून दिली तर बरें म्हणजे आपणास हा त्रास होणार नाहीं व आमच्यासारख्यांना तो झालेला पाहून वाईट वाटण्यास कारणही राहाणार नाहीं परंतु त्या वेळीं त्यांनीं माझें मत अशा रीतीनें खोडून काढलें कीं, मी त्यावर अगदींच निरुत्तर झालों त म्हणाले 'जगांत हजारों प्राणी आपली पोटें भरून व संसार करून ऐहिक सुखाची प्राप्ति करून घेतात मला माझें ऐहिक सुख ह्यातच यात्रत आहे जपून कांहीं तरी करावें व तें असें का, आज किंवा उद्यां तरी त्या उद्योगाबद्दल लोकांनीं आपलें नांव घ्यावें अशी आकांक्षा बाळगणें काय वाईट ? " अशा प्रकारचा बुद्धिवाद त्यांनीं मजपाशीं केला, आणि आपला मार्ग न सोडता [illegible]

गेलों. माझे घरची मंडळी त्या वेळीं प्लेगमुळें परांजप्याची पढळ म्हणत तेथें राहत असत. जवळच बळवंतरावाची झोंपडी होती. त्या वेळीं ध्यानात ठेवण्यासारखी अशी गोष्ट झाली कीं, बळवंतराव मला कधींही निरुत्साही असे दिसले नव्हते, ते दिसले. या प्रसंगीं त्यांनीं जे उद्गार काढले ते अजून माझ्या हृदयात साठलेले आहेत. तेथें इतकेंच सांगितलें पाहिजे कीं, त्याच वेळीं बळवंतरावाचा एक पाय दुखत होता, व भाऊमहाराजाचा खटला चालूच होता. त्या वेळेस बळवंतराव यांचे मापणात अशीं अक्षरें निघालीं कीं, "माझे इतके वकील ओळखीचे असून माझे खटल्याचा निकाल अजून लागत नाहीं व इतके डॉक्टर ओळखीचे असून माझा पायही बरा होत नाहीं." टिळकाच्या तोंडीं निराशेचे उद्गार जर मी कधीं ऐकले असतील तर ते हेच होत. ह्याउपर निराशादर्शक उद्गार काढलेले मला आठवत नाहींत.

---

## नारायण कृष्ण गोगटे

[ बी ए , लोकमान्य टिळकांच्या चिरंजिवाचे एक खासगी शिक्षक, पुणें ]

(१) मॉंटेग्युसाहेबाना सादर करण्याचा खलिता Memorial तयार करून सार्वजनिक सभेतर्फे श्री० बाबासाहेब पटवर्धन तो लोकमान्यांस दाखविण्यासाठीं घेऊन आले लोकमान्यांनीं तो वाचला व त्यास आपली नापसती दर्शविली. 'कसला नेभळा खलिता तुम्ही तयार केला आहेत हा ? नोकरशाहीला जितक्या शिव्या तुमच्या मनातून द्यावयाच्या असतील तितक्या ह्या ठिकाणीं देऊन घ्या. इतर ठिकाणीं बोलण्यास अगर लिहिण्यास १२४ अ, १५३ अ, प्रेस ॲक्ट वगैरेंची भीति ज्याना वाटत असेल त्यांनीं तरी ही नोकरशाहीचें खरें स्वरूप

जगन्नाथमहाराजाचा बिलकुल हक्क नाही. ह्या रेफरन्सला उत्तर म्हणून जें ल्हानसें चोपडें लोकमान्यांनीं तयार केलें त्यांत त्यांनीं तहनामे, जुने कागदपत्र वगैरेंवरून सप्रमाण सिद्ध केलें कीं, महाराजाची इस्टेट सरंजामी इनाम नसून धर्मादाय आहे. तिजवर कोल्हापुरकराची सत्ता उरली नाहीं शिवाय मूळ देणगी कोल्हापुरकरांनीं दिली असली तरी १८१० ते १८४० च्या दरम्यान जे प्रकार घडले त्यावरून पाहता इंग्रजसरकारानेंच ती महाराज–घराण्यास दिल्यासारखी झाली आहे तेव्हां त्यापुढें त्याबाबत कोल्हापुरकराचा बिलकुल संबंध येत नाहीं.

चोपड्याची हस्तलिखित प्रत तयार झाली, व शेवटीं बोलता बोलता म्हणाले, " त्या वेळच्या महाराजांना कोल्हापुरकरापासून बराच त्रास होऊं लागला, तेव्हां त्यांनीं इंग्रज सरकारचा आश्रय धरला धोरणी इंग्रजांनीं कोल्हापुराकडची अर्धी भेट असामी हातीं धरून मराठेशाही बुडविण्याचें कार्य व्यवस्थितपणें साधलें. नाहीं तर, कोण कोणाचा पुरस्कार करणार ? ह्या दृष्टीनें पाहता महाराजाची ही इस्टेट जुन्या स्वराज्याची कीडच ठरते ज्यांनीं त्या काळीं मराठेशाही, पेशवाई यांची बाजू सोडून इंग्रजसरकारला त्याच्याविरुद्ध मदत केली, निदान त्याची सत्ताच मान्य केली, तेच इनामदार, जहागीरदार, संस्थानिक असे कायम राहिले. ज्यांनीं स्वराज्याची सेवा शक्य तितकी बजावली, जे इंग्रजास येऊन मिळाले नाहींत, उलट जे इंग्रजांशीं लढले त्यांचीं सरंजामें, जहागिरी, इनामें वगैरे सर्व इंग्रजसरकारनें, जप्त केलीं व त्या महात्म्यांना देहोधडीस लावलें, आणि आजचा प्रसंग पहा. स्वराज्याकरिता चळवळ करणारा मी ही कीड महाराज–घराण्यात कायम टिकावी म्हणून खटपट करीत आहे. हा काय चमत्कारिक दैवयोग Irony of Fate आहे पहा ! "

ह्यावरून लोकमान्यांचा कर्मयोग तर निर्विवाद सिद्ध होतच आहे ( सहज कर्म कौन्तेय सदोषमपि न त्यजेत् । ) पण त्यांची मुत्सद्देगिरीहि विशेष व्यक्त होत आहे सर्वांचा उपयोग स्वराज्यसेवेसाठीं करून घेऊन आगचें किल्मिष सर्व जाळून भस्म करून टाकण्याची संधि प्रत्येकास आणून देणें हेंच यांच्या राजकारणाचें रहस्य होतें.

## विनायक सदाशीव गोगटे

[एम ए आर्टस् कॉलेज, नाशिक ]

माझ्यासारख्या अल्पवयस्क विद्यार्थ्यांस टिळकांच्या खासगी आठवणी त्या काय असणार ? येऊनजाऊन 'तुझा अभ्यास कसा काय चालला आहे ?' असें त्यांनीं कधीं कधीं विचारलें असेल, व मीहि जरा गुळमळत, 'बरा चालला आहे,' असें उत्तर दिलें असेल राजकारणाविषयीं ते इतरांशीं संभाषण करीत असतांना मी पुष्कळ वेळां लक्ष देऊन ऐकत असे परंतु संभाषणांतील मजकुरा पेक्षां टिळक या व्यक्तीकडेच माझें चित्त अधिक वेधून जात असे. एक प्रसंग मात्र मी कधींहि विसरणार नाहीं, कारण माझ्या स्वत च्या दृष्टीनें तो अत्यंत महत्त्वाचा होता.

१९२० सालच्या मे महिन्यांतली गोष्ट. या दिवसांत टिळक नेहमीं सिंहगडावर राहण्यास जात असत हें सर्वांस माहीतच आहे इतर बाबतींत नाहीं तर निदान सिंहगडावर जाऊन राहण्यांत तरी टिळकांचें अनुकरण करावें अशी इच्छा मला उत्पन्न होऊन मी गडावर गेलों त्या वेळीं महात्माजींचीहि स्वारी हवापालट करण्यासाठीं तेथें येऊन राहिलेली होती आधींच सिंहगड आणि त्यावर लोकमान्य व महात्माजी ! असा अपूर्व त्रिवेणीसंगम, अशी परमपावन यात्रा, पुन कधीं घडेल काय ?

सिंहगडावर जाण्यांत माझा एक उद्देश होता प्रोफेसर रानडे यांनीं भारतीय तत्त्वज्ञानाचा इतिहास लिहिण्याचें कार्य नुकतेंच अंगिकारलेलें होतें. कार्यक्षेत्र अत्यंत विस्तृत असल्यामुळें त्यासाठीं स्वत स आजन्म पूर्णपणें वाहून घेणारा असा मदतनीस हवा होता या कामीं मला हाताशीं धरून तयार करण्याची इच्छा त्यांनीं प्रदर्शित केली. मिळालेली संधि फार अपूर्व होती, यांत संशय नाहीं, परंतु या अफाट समुद्रांत उडी घालण्यापूर्वीं टिळकांचा उपदेश घेणें मला आवश्यक वाटलें, व तसें प्रोफेसर रानडे यांस सांगून व कांहीं दिवसांची मुदत मागून घेऊन मी सिंहगडास गेलों.

माझा सवाल ऐकताच टिळकांना फार आनंद झाला प्रोफेसर रानडे यांनीं आरंभिलेल्या कार्याबद्दल त्यांची सहानुभूति होती इतकेंच नव्हे, तर सवड असती तर स्वत च तें काम करण्याची त्यांची मनीषा होती हें बहुतेकांस माहीत असेलच परंतु माझ्या उत्साहाबद्दल टिळकांनीं जरी आनंद प्रदर्शित केला तरी त्यांनीं केलेल्या उपदेशाचा परिणाम माझा उत्साहभंग होण्यांत झाला. ते म्हणाले, "मनुष्याच्या आवडीनिवडी वरचेवर पालटत जातात कोणत्याहि एका ध्येयाची आवड व गाठण्याचा निश्चय सतत कायम टिकणें अत्यंत कठीण असतें.

तरी होण्यास एक ठराविक वयोमर्यादा प्राप्त व्हावी लागते. तुझें वय तर अशा तऱ्हेचा निश्चय करण्यास अत्यंत अल्प आहे. माझी स्वत:चीच गोष्ट पाहाना. प्रथम मी शिक्षणाच्या कार्यात पडलों. नंतर वर्तमानपत्राचा व्यवसाय पत्करला. मध्येंच धंदा करण्याची देखील मला लहर आली व त्यासाठीं एक गिरणीहि सुरू केली! आता माझें साठ वर्षे वय होऊन गेलें तेव्हा कोठें माझ्या बुद्धीला व ध्येयाला स्थिरता प्राप्त झाली आहे - तू आणखी तीनचार वर्षे तरी विचार करण्यात व आपली ध्येयाबद्दलची निकाटी पारखून पाहण्यात घाल व मग बद्ध हो..." या उपदेशाची यथार्थता कोणाहि तरुण मनुष्यास सांगावयास पाहिजे असें नाहीं.

त्या वेळीं टिळकांच्या धाकट्या चिरंजिवांच्या लग्नाच्या निमंत्रणपत्रिका पाठविण्याचें काम चाललेलें होतें. चिठ्ठ्यांची प्रांतवार विभागणी करण्यात आलेली होती. निरनिराळ्या व्यक्तींचीं नावें व ठिकाणें आठवून सांगताना दिसून आलेली टिळकांची अलौकिक स्मरणशक्ति पाहून मी अगदीं चकित होऊन गेलों. ते प्रत्येक व्यक्तीचें नाव बरोबर सांगत इतकेंच नव्हे तर, "हा केसरीचा वर्गणीदार आहे," असेंहि मधूनमधून उद्गार काढीत. "सोलापूरच्या सभेंत ज्या गृहस्थाच्या डोक्यात दगड बसला त्याना एक चिठी पाठवा," असें सांगण्यासहि ते विसरले नाहींत. टिळकांचा व्याप जितका मोठा तितकीच तो सांभाळण्याची त्यांची पात्रताहि मोठी होती, याचें प्रत्यंतर वरील क्षुल्लक गोष्टीवरूनहि मिळण्यासारखें आहे.

सिंहगडावरून परत आल्यानंतर लोकमान्यांच्या सान्निध्याची दुसरी व शेवटची हृदयस्पर्शी आठवण सरदारगृहातली. या दोन आठवणी किती भिन्न! राजकीय उलाढालींच्या बाहेर, गत स्वराज्याच्या भूमिकेवर, आपल्या आवडत्या निवासस्थानीं विश्रांतिसुखाचा अनुभव घेणारी, व "आणखी पाचदहा वर्षे तरी मी खास मरत नाहीं," असे उद्गार काढणारी ती धीरगंभीर मूर्ति कोणीकडे, व इंग्रजी राज्याच्या केंद्रस्थानीं, आपल्या नैसर्गिक धीरश्रीनें अहोरात्र मृत्यूशीं झगडणारी ती कृश मुद्रा कोणीकडे! या दोन दृश्यातील विरोधानें हृदय भरून येऊन लेखणी आपोआप शिथिल पडली तर त्यात काय नवल!

---

## धोंडो केशव कर्वे

[ बी. ए., प्रोफेसर व लाईफ मेंबर डे. ए. सो., अनाथ बालिकाश्रम संस्थेचे उत्पादक, स्त्री-शिक्षणाचे पुरस्कर्ते, भारतीय महिला-विद्यापीठाचे संस्थापक, पुणे ]

माझा एकमार्गीपणा व आमची भिन्न कार्यक्षेत्रे ह्यामुळें लोकमान्यांशीं माझा संबंध फारच थोडा आला. अर्थात् त्यांच्यासंबंधाच्या माझ्या आठवणी फारच थोड्या आणि त्याहि लोकांपुढें ठेवण्याच्या योग्यतेच्या नाहींत. पण आठवणींचे संपादक रा. बापट यांचा आग्रह पडल्यामुळें त्यास नाखूष करणें माझ्या जिवावर आलें म्हणून मी ह्या चार ओळी लिहीत आहे.

लोकमान्यांची व माझी पहिली भेट केव्हां झाली हें माझ्या स्मरणात नाहीं. पण ती १८९१ च्या अखेरीस पुण्यात आल्यानंतर बारसहा महिन्यांत झाली असावी. सन १८९३ च्या मार्चांत माझा पुनर्विवाह झाला. त्या वेळीं लोकमान्यांना निमंत्रण गेलें होतें व ते पानसुपारीला आले होते. नंतर, महिन्या दीड महिन्यानें मी कोंकणात गेलों. त्यासंबधानें वेडीवाकडी टीका केलेलें एक पत्र "प्रो. कर्वे यांची मुरुडावर स्वारी" या मथळ्याखालीं केसरींत छापलें गेलें. त्याला उत्तर म्हणून मी एक पत्र लिहून तें केसरींत छापण्याविषयीं त्यांना विनंति केली. ती मान्य करून तें पत्र त्यांनीं केसरींत प्रसिद्ध केलें. पुनर्विवाहाच्या प्रश्नासंबंधानें सुशिक्षित लोकांचीं मतें घेण्याचा मीं प्रयत्न केला त्या वेळीं लोकमान्यांनीं पुनर्विवाहितांबरोबर भोजनव्यवहार करण्यास हरकत नाहीं, असा स्पष्ट लेखी अभिप्राय दिला होता. एका पुनर्विवाहाच्या वेळीं त्यांनीं भोजनास यावें अशाबद्दल एका मित्राच्या सहाय्यानें मीं प्रयत्न केला, पण त्यांत यश आलें नाहीं.

अनाथ बालिकाश्रम त्यांनीं पाहावा अशी विनंति त्यांना श्रीमती पार्वतीबाई आठवले ह्यांनीं केली. ती मान्य करून आश्रम पाहण्यास ते आले होते, व त्यांनीं शेरेबुकावर संस्थेविषयीं बरा अभिप्राय लिहून ठेविला. आश्रमाचें काम साधारण रीतीनें चांगलें चालू लागल्यावर लोकांमध्यें संस्थेची प्रसिद्धि व्हावी ह्या हेतूनें आश्रमाच्या माहितीबद्दलचा एक लेख त्यांनीं केसरींत प्रसिद्ध करावा अशाबद्दल मीं त्यांना विनंति केली, व तिला मान देऊन त्यांनीं माझा बराच मोठा लेख केसरींत प्रसिद्ध केला. आश्रमाला लोकमान्यांकडून जरी प्रत्यक्ष मदत फारशी झाली नाहीं तरी त्यांजकडून झालेल्या अप्रत्यक्ष मदतीची किंमत करता येणार नाहीं. अठावीस वर्षांपूर्वी सामान्यतः स्त्री-शिक्षणासंबंधानें व विशेषतः विधवांच्या शिक्षणासंबंधानें लोकांमध्यें अनुदार बुद्धि फार होती. अशा परिस्थितींत आश्रमाचें काम मोठें नाजूक होतें. आश्रमासंबंधानें सामान्यतः केसरीनें तटस्थ वृत्ति स्वीकारलेली होती म्हणून बरें झालें. केसरीचें वजन फार दांडगें होतें,

ह्यामुळें त्याची जर का थोडीथोडीहि वक्रदृष्टि झाली असती तर सरथेला मोठा अपाय झाला असता, पण तसें झालें नाहीं म्हणून आमचें कार्य बरेंच सुकर झालें असें मला अनेक वेळा वाटलेलें आहे.

स्त्रियांच्या विद्यापीठासंबधानें मात्र लोकमान्यांकडून मला मदत झाली नाहीं ती होईल असें मला वाटत होतें, म्हणून मी प्रयत्नहि बराच केला, पण यश आलें नाहीं ह्या लोकप्रिय पुढाऱ्यांची सहानुभूति मिळाल्यास मोठा कार्यभाग होईल अशी मला आशा होती म्हणून विद्यापीठाच्या स्थापनेच्या आधींच मी त्यांना भेटून माझी योजना सांगितली, परंतु त्यांना तिचें फारसें महत्त्व वाटलें नाहीं ह्या कामाला म गांधी, रवींद्रनाथ टागोर, मिसेस् बेझट, सी एफ् अँड्रयूज्, पंडित मदन मोहन मालवीय, वगैरे पुढाऱ्यांची सक्रिय सहानुभूति मिळ विल्यावर पुन एकदा प्रयत्न करून पाहावा म्हणून मी त्यांजकडे गेलों ह्या वेळीं विद्यापीठाचें काम चालू झालेलें होतें व त्याला सर्व पक्षांतील लोकांकडून मदत मिळत होती, पण ह्या वेळींहि माझी निराशा झाली तथापि फिरून यत्न करून पहा म्हणून माझें मन मला सांगू लागलें, म्हणून तिसऱ्यानें मीं शेवटचा प्रयत्न केला ह्या वळीं त्यांचें म्हणणें तरी काय तें एकदा कळावें अशी मला इच्छा होती, म्हणून मीं त्यांस तसें विचारलेंहि तेव्हा त्यांनीं स्पष्टपणें असें सांगितलें कीं, शिक्षणाच्या हल्लींच्या दिशेनें आम्ही पुरुष जसे संशयवादी ( Sceptic ) बनलों आहों तशाच स्त्रिया बनतील व आमच्या गृहसौख्याचा नाश होईल ह्यावर मीं त्यांना म्हटलें कीं, सगळ्या युनिव्हर्सिट्यांच्या वेगवेगळ्या परीक्षांना बसणाऱ्या स्त्रियांची संख्या सालोसाल वाढत आहे ही गोष्ट आपण पाहता काय ? आपणाला ज्या प्रकारचें शिक्षण स्त्रियांना द्यावें असें वाटत असेल त्या प्रकारचें शिक्षण देण्याचा एक तरी जोमदार प्रयत्न कोठें झाला आहे काय ? प्रयत्नाला यश येऊन लोकमताचा कल तिकडे वळेपर्यंत मातृभाषांना अग्रस्थान देऊन त्यांच्या द्वारें शिक्षण देणें आणि संसारशास्त्र, आरोग्यशास्त्र वगैरे स्त्रियांना आवश्यक अशा विषयांचा समावेश करून केवळ लोकतत्रानें चालविलें जाणारें हें विद्यापीठ, निदान मध्यवर्ती मार्ग म्हणून, त्याबद्दल आपणाला काहीं सहानुभूति वाटते काय ? व त्यास आपण काहीं हातभार लावू शकणार नाहीं काय ? ह्या माझ्या बोलण्याचा त्यांच्यावर फारसा परिणाम झाला नाहीं, व त्यांनीं ह्या प्रयत्नाला काहीं मदत केला नाही

आमचीं कार्यक्षेत्रें भिन्न होतीं हें मीं आरंभींच लिहिलें आहे ज्या कार्यांत लोकमान्यांचें लक्ष नाहीं त्या कार्यांत त्यांजकडून मदत मिळविण्याची मीं इच्छा केली ही कदाचित् माझी चूक असेल, तथापि लोकमान्य हे अत्यंत थोर मनाचे होते व त्यांनीं लोकजागृतीचें प्रचंड कार्य केलें आहे ह्यांत संशय नाहीं त्यांच्या-मुळें महाराष्ट्राच्या लौकिकांत केवढी तरी भर पडली आहे.

---

## अंताजी दामोदर काळे

[पैसाफंडाचे उत्पादक, व जुन्या राष्ट्रीय पक्षाचे एक सभासद, मु० सतलवाडा ]

(१) मी मुंबईस मराठी शाळेंत ६ वे यत्तेंत असतां लो. टिळक यांस प्रथम पाहिलें. प्रार्थनासमाजाच्या इमारतीच्या जागीं डोंगरीच्या तुरुंगातून इचा खाऊन आल्यामुळें त्यांचा जाहीर सन्मान झाला होता आदर दर्शविण्यासाठीं त्यांना अस्त्र आहेर करण्यांत आला होता. तो स्वीकारतांना त्यांनीं म्हटलें कीं, 'आम्हीं केलेली सेवा लोकांस पसंत पडली असून त्यांनीं आज जशी सहानुभूति दाखविली तशी ते पुढेंही दाखवितील तर आमचा एक पाय नेहमीं तुरुंगातच आहे असें समजा !' हे शब्द बोलून दाखवितांना त्यांनीं एक पाय पुढें टाकून छातीचा निधडेपणा दाखविला. त्यामुळें देशसेवेचा 'श्रीगणेशा' मीं याच दिवशीं घेतला, व याचें श्रेय कै० लो० टिळक यांसच आहे, हें कृतज्ञतेनें मला सांगणें भाग आहे.

(२) मुंबईच्या समारंभानंतर १७ वर्षांनीं मी लोकमान्यांस लखनौ येथें कॉंग्रेसच्या वेळीं प्रथम पाहिलें मध्यंतरीं भेटीचा योग आला नाहीं. देशस्थिति कशी बिघडली आहे व ती सुधारण्यास पैसाफंड हा उपाय किती उत्तम आहे, हें लोकांस पटावें म्हणून "सद्य स्थितीचें चित्र" नामक पुस्तक मी छापविलें होतें विद्वानांनीं पसंत केलें तरच त्याचा प्रसार लवकर होईल असें वाटून मी लखनौ येथें गेलों. १८९९ सालची राष्ट्रीय सभा तेथें होती सर्व विद्वान् एकच भेटतील म्हणूनच मी इतक्या लांबचा प्रवास करण्याचें ठरविलें. दे. गणपतराव पागे हेच एकटे माझ्या ओळखीचे गृहस्थ तेथें मला भेटले. यांनीं लोकमान्यांची व माझी भेट करविली. मी ७ रुपये पगार मिळविणारा असिस्टंट मास्तर असल्यामुळें समाजांत मला किंमत नव्हती. म्हणून लोकमान्यांची भेट होतांच मला परमानंद वाटला. तद्‌नंतर उठून बाहेर येऊन त्यांनीं मजशीं हस्तांदोलन केलें, व माझें म्हणणें ऐकून घेतलें इंग्रजी किंवा उर्दू बोलण्याचें कबूल करीत असाल तर तुमच्याबद्दल मी प्रयत्न करतों असेंहि टिळकांनीं मला सांगितलें. पण हें शक्य नाहीं असें म्हणतांच इतक्या लांबचा प्रवास फुकट गेला म्हणून त्यांना वाईट वाटलें. तेव्हां मला धीर देण्याच्या बुद्धीनें त्यांनीं मला सांगितलें कीं, तुम्ही सातारा येथें प्रांतिक सभेसाठीं या तेथें तुम्हांला मराठीमध्यें बोलण्याची संधी मिळेल. "सद्य स्थितीचें चित्र" या पुस्तकाची एक प्रत मी त्यांस तेथेंच नजर केली दुसरे दिवशीं सकाळीं ९ चे सुमारास स्नान करण्याचे वेळीं लोकमान्यांना स्वतः धोतर धूत असतांना मी पाहिलें. लोकमान्य हे महाराष्ट्राचे नेते, पुण्याचे पुढारी असून सभोंवतीं अनेक अनुयायी असतां, त्यांस स्वतःधोतर धुण्याची पाळी यावी

हें पाहून मला फार वाईट वाटलें, व मी धांवत जाऊन त्यांच्या हातांतून ते नको म्हणत असतां धोतर हिसकावून घेतलें व धुवून तेथेंच वाळत घातलें.

(३) १९०० साली सातारा येथें प्रांतिक सभा भरली होती. तेथें ठरल्याप्रमाणें मी त्यांची भेट घेतली. या ठिकाणीं आमचा (सर्व व्हाऱ्हाडी प्रतिनिधींचा) मुक्काम एकत्र होता. भोजनाचे वेळीं ते माझी मुद्दाम चौकशी करीत. जानास उशीर झाल्यामुळें 'तुम्ही व्हा मी येतोंच' असें म्हटलें तरी ते वाट पाहत ! श्रीविष्णु व लक्ष्मी या दोहोंच्या अवकृपेस पात्र अशा माणसास लोमालेरीज अशारीतीनें वागविण्याचें दुसरें कारण निदान माझ्या तरी लक्षांत येत नाहीं. श्री. गोकुळदास पारख वकील यांच्या अध्यक्षतेखालीं प्रांतिक सभेचें काम सुरू झाल्यावर लोकमान्यांनीं भीड खर्च करून रा. प्रभाकरपंत नागपूरकर वकील यांचें नांव "अनुमोदन देणार" म्हणून प्रसिद्ध झालें असतां, त्यांच्या ऐवजीं आयत्या वेळीं माझें नांव दाखल केलें. मी प्रांतिक सभेमध्यें बोललों खरा, पण घाबरल्यामुळें श्रोत्यांवर परिणाम होऊं शकला नाहीं. तेव्हां कित्येक मित्रमंडळींनीं रात्रीं सभा भरवून व्याख्यानाचा योग पुळवून आणला. या वेळीं लोकमान्य अध्यक्ष होते. श्रोते थोडेच, पण सर्व विद्वान् होते. मी आपल्या शक्तीप्रमाणें

मला पुढें आणण्यास किती तत्परता दाखविली, हें यावरून म्हणजे खरा पुढारी कसा पाहिजे हें चटकन् कळतें

(४) मुबई येथील गुजराथी पत्राचे इग्रजी सपादक श्री नारायण विष्णु गोखले बी. ए एल्एल् बी यानीं पैसाफडापेक्षा रुपया फड सोपा असें प्रतिपादन करून रुपयाफड सुरुहि केला होता पैसाफडावर हें एक सकटच आलें होतें समाजात आपलें वजन नाहीं तेव्हा काय केलें तर पैसाफड मागें पडणार नाहीं, यासबधीं पुष्कळ विचार करून शेवटीं लोकमान्याकडे धाव घ्यावी असें ठरविलें त्या वेळीं पदरमोड करून पुण्यास जाण्यास मी असमर्थ होतों म्हणून पत्ररूपानें भेटण्याचें ठरविलें माझें पत्र जाताच त्यानीं असा एक स्फुट लेख लिहिला कीं, त्या योगानें रुपयाफड जागच्या जागीं जिरून गेला ! पैसाफडात एका पैशापासून पुढें वाटेल तितकी रक्कम घेण्याची सोय असता पैसाफड हा एका गरीब मनुष्यानें काढला म्हणून तो बाजूस टाकावयाचा व रुपयाफड हा एका श्रीमत व वजनदार मनुष्यानें सुरू केला म्हणून तो जवळ घ्यावयाचा, हा शुद्ध अन्याय होय पैसाफडाची अगदीं भिकार रक्कम असता लोकमान्यानीं हा स्फुट लेख लिहिला होता पैसाफडाला आपण हातीं धरलें, तेव्हा आता त्याला सोडावा कसा, या बुद्धीनें त्यानीं हा स्फुट लेख लिहिला नव्हता या गोष्टीवरून लोकमान्याच्या अगीं न्यायबुद्धि कशी जागृत होती हें स्पष्ट दिसून येतें

(५) लोकमान्याची न्यायबुद्धि नेहमीं जागृत असे श्री गोखले याची रुपया फडाची कल्पना श्री माधवराव बोडस हायकोर्ट वकील यास पसत पडून त्यानीं केसरींतून त्याचा ओझरता उल्लेख केला होता पण तिकडें कोणाचें लक्ष गेलेंच नाहीं पैसाफडाची थट्टा सहन न होऊन मी पैसाफड मासिकातून थट्टा करणा राची चागली खरडपट्टी काढली होती यामुळें बोडस याचा मजवर राग झाला १९०४ च्या डिसेंबरात पैसाफड मुख्य कमिटी स्थापन होऊन तिच्या कामकाजा सबधीं नियम करण्याचें काम अध्यक्ष डॉ नानासाहेब देशमुख व खजिनदार लो० टिळक व डॉ खेर यानीं श्री बोडस याजकडे दिलें डॉ खेर यास धद्यामुळें खजीनदाराचें काम करण्यास अवाची तरी फुरसत नाहीं म्हणून त्याच्या जागीं माझी नेमणूक व्हावी अशी श्री बोडस याची इच्छा होती मी या नेमणु कीस हरकत घेईन असें स्पष्टपणें सागितलें पुढें पैसाफड कमिटीच्या अनास्थेचा पुरावा म्हणून मुबईवैभव पत्रात एक पत्रव्यवहार प्रसिद्ध झाला या पत्रावर सही नव्हती तरी सभेला हजर असलेल्या हन तीन साडेतीन गृहस्थाखेरीज ही माहिती प्रसिद्ध झाली कशी ? अर्थात् रा काळे यानीं हें पत्र लिहिलें असून लिहविलें असावें असा सर्वाचा मत झाला ! श्री बोडस यानीं कमिटीकडे पत्र पाठविलें कीं, रा काळे यास कांहीं दिवस 'रस्टिकेट' करा, असें होत नसेल तर माझा

राजीनामा समजावा. डॉ देशमुख यांच्या घरीं सभा भरली असतां श्री. बोडस यांच्या पत्राचा विचार सुरू झाला त्या वेळीं लो टिळक हे हजर होते त्यांनीं म्हटलें कीं, श्री बोडसांच्या पत्रांत रा काळे यास रस्टिकेट करण्याचें कारण दिलेलें नाहीं, व येथें श्री बोडस हजर नाहींत तेव्हा श्री बोडस यास बोलावणें पाठवावें असें ठरून एक मनुष्य गेला, दुसरा गेला परंतु श्री बोडस येत ना लोकमान्यांचे सांगण्यावरून मी स्वत बोडस यांजकडे जाऊन त्यास बोलावलें तरी बोडस आले नाहींत चर्चा चालू झाली तोंच श्री बोडस हजर झाले तेव्हा लोकमान्यांनीं त्यास खुलासा विचारला खुलासा मंडळीस अपुरा वाटला तेव्हां लोकमान्यांनीं श्री बोडस यांची भीडमुर्वत न धरता स्पष्ट सांगितलें कीं, 'रा काळे यास रस्टिकेट करण्याचें कारण श्री बोडस सांगत नाहींत. तेव्हा त्याचा अर्ज निकालांत काढावा ' तेव्हा श्री बोडस म्हणाले कीं, 'काळे यास रस्टिकेट करा नाहीं तर माझा राजीनामा घ्या ' लोकमान्यांनीं जरा सुद्धां ध्यान मान न करता श्री बोडसांचा राजीनामा मंजूर करविला! लोकमान्यांची न्यायबुद्धि जागृत नसती तर त्यांच्या हातून या वेळीं पक्षपात उचित् झाला असता

(६) लो टिळक यांच्या ठिकाणीं राष्ट्रहितबुद्धि विशेष जागृत होती, म्हणून त्यांचा कोणी अपमान केला तरी ते त्याचा सूड न घेता व्यापक राष्ट्रकार्यावर नजर ठेवून त्याजवर उपकारच करीत मुंबईस कांकडवाडींत आर्यसमाज हॉल मध्यें पैसाफंड मुख्य कमिटी स्थापन करण्यासाठीं डॉ नानासाहेब देशमुख यांच्या अध्यक्षतेखालीं जाहीर सभा भरली होती, त्या वेळीं लोकमान्यांनीं म्हटलें कीं, "पैसाफंडाची कल्पना दिसण्यात सोपी आहे ३० कोटीपैकीं १४ कोटि लोक वजा केले व बाकी राहिलेल्या लोकांनीं वर्षाचा एकेक पैसा दिला तर इतके पैसे व त्याचे इतके रुपये होतील हा कागदी हिशेब मराठी तिसरी इयत्ता शिकणारा मुलगाहि करू शकेल हा हिशेब व ग काळे आज पांच वर्षे सतत मेहनत घेत असतां अद्यापि एक हजार रुपयेसुद्धा जमले नाहींत हा प्रत्यक्ष अनुभव,

" आपण ज्या ठिकाणीं व ज्या वेळीं प्रथम रहस्यग्रथ लिहिला त्या परिस्थिती-कडे लक्ष देऊन आम्ही वास्तविक अशा तऱ्हेचा आक्षेप घेणें योग्यनव्हतें " असें मीं म्हटलें.

ते म्हणाले, " तसे तुम्ही आम्हाला माफींत काढू नका. खरी न्यूनता काहीं असेल तर दाखवा थिऑसफीतील पुस्तकासबधानें तुम्ही काहीं लिहिता, परतु जोंपर्यंत ते ग्रथ आमच्या मताचे विरुद्ध नाहींत तोंपर्यंत त्याचा उल्लेख करण्याचें काहींच कारण नाहीं. आमचें मुख्य लक्ष कर्मयोगाचा सिद्धातच गीतेंत प्रमुख आहे, इकडे आहे. बाकीच्या गोष्टी त्याला पोषक आहेत. त्या सिद्धातावर तुमचा काहीं आक्षेप आहे का ? "

मी म्हटलें " नाहीं. थिऑसफिस्ट या दृष्टीनें तो सिद्धात आम्हास सर्वतोपरि मान्य आहे. "

ते म्हणाले " थिऑसफीची दृष्टि तुम्ही का घेता ? स्वततें दृष्टीनें पहा. " त्यावरून श्रद्धेसबधानें काहीं बोलणें निघालें, पण इतर व्यवधानात तो विषय त्या वेळीं तितकाच राहून गेला.

पुढें ते ज्योतिषसमेलनाकरिता सागलीस आले त्या वेळीं मजकडे उतरले होते. ती सधी मी साहजिकच व्यर्थ जाऊ दिली नाहीं. " थिऑसफीची दृष्टि म्हणजे खऱ्या हिंदुश्रद्धेची दृष्टि असें क्षणभर आपण मानून चाला व आपल्या ग्रथात त्या तऱ्हेच्या श्रद्धेचा पाया आहे काय तें आम्हास पटवून द्या " असा माझा सवाल होता, व या माझ्या प्रश्नाच्या स्पष्टीकरणार्थ त्याच्यापुढें " यज्ञाद्भवति पर्जन्यः " वगैरे गीतेंतील यज्ञचक्राचें वर्णन मीं माडिलें " हें वर्णन खरें आहे असें आपलें मत आहे अगर कसें ? " असें मी विचारलें. त्यावर त्यानीं उत्तर केलें " आम्ही ग्रथात आहे त्याचा अर्थ सागण्यास जबाबदार आहों, गीता असें सागते हें आम्ही प्रसिद्ध करतों, खरेंखोटें तुम्ही पहा. "

मी तावडतोब प्रश्न केला " ही निवळ पाडित्याची " Scholarship " दृष्टि झाली ही जर्मन विद्वानाजवळ सुद्धा आहे. हिंदु या नात्यानें अगर्वा अध्ययनामुळें आपली स्वत ची श्रद्धा त्या यज्ञ—चक्रावर आहे काय ? " तेव्हा त्यानीं उत्तर केलें कीं, "हा शास्त्राचा विषय आहे,आम्ही नाहीं—होय म्हणून काय उपयोग ? आम्ही गीतेचें व्याख्यान करीत असता तींत असलेलें शास्त्र तावत्काल धरून चालतों " मी म्हणालो, " थिऑसफीच्या दृष्टींत व आपल्या दृष्टींत येथेंच तर अतर आहे थिऑसफीची दृष्टि श्रद्धेची आहे " अखेर त्यानीं योगादि गूढ शास्त्राच्या साह्यानें आपण विचार केलेला नाहीं, यामुळें आपण तीं शास्त्रें स्पष्ट उलगडून सागू शकत नाहीं, परतु ग्रथातील विधानावर आपला स्वत चा विश्वास असल्याचें सागितलें त्यावरून त्याचे अनुभवाची गोष्ट हस्तगत करण्याचें मीं धाडस केलें, त्यात त्यानीं इतर गोष्टींच्या चर्चेत "आपल्यास धारणा

ध्यानसमाधीची साक्षात् माहिती नाहीं अथवा "Trance" मध्येंही गेल्याचें सांगता येणार नाहीं. परंतु नित्याच्या म्हणजे "काळजीच्या" राजकीय वगैरे विषयांचें चिंतन करीत दीर्घकाल स्वस्थ पडलें असता जागृतींतून निघून दुसऱ्या अवस्थेंत तोच विषय स्पष्टपणें नजरेसमोर राहिल्याचा अनुभव आलेला आहे व त्या दुसऱ्या अवस्थेंत केवळ स्वप्न असें आपण म्हणू शकत नाहीं येवढा तरी अनुभव आपल्यास आहे," असें सांगितलें. पुढें आम्हा थिऑसफिस्टांच्या श्रद्धेवरून स्वाभाविकच मिसेस बेझंट यांचें नाव निघालें मी थिऑसफींतील मेंबर या नात्यानें माझा बाईंविषयीं आदर स्वाभाविकच मोठा होता बाईंनीं अलीकडे हिंदुस्थानांतील राजकीय चळवळींत लक्ष विशेष घातलें होतें व मध्यंतरीं त्यांना व त्यांचे दोन साहाय्यकांना अटक झाल्यानें बाईंना राजकारणांत सामान्यांच्या तोंडींही मोठेंपण आलें होतें मध्यंतरीं एक वार मिसेस बेझंट व्याख्याती व लोकमान्य अध्यक्ष असा प्रसंग वसंतव्याख्यानमालेंतहि घडून आला होता त्या वेळीं मी हजर होतों माझी इच्छा या उभयतां थोर व्यक्तींचें सूत अधिकच जुळेल तर जुळवावें असें फार होतें म्हणून मी मुद्दाम लोकमान्यांना उघडच म्हटलें "बाईंचा व आपला राजकारणांत एकजुटीचा मिलाफ होणें शक्यच नाहीं काय? तसा होणें शक्य असल्यास आम्ही वाटेल ते उपाय करण्यास तयार आहों बाईंनीं आपल्याकडून स्वतः आपणाकडे भटीस वगैरे येऊन वाट खुली केली आहे." त्यावर ते म्हणाले "आमचीं मतें जुळतात तोंपर्यंत मिलाफ होतोच आहे, परंतु बाई आपणा सर्वांस केव्हां सोडील याचा विश्वास नाहीं आपलें अनुयायांचें मत घेऊन तदनुसारच नवीन "चाल" चालू करणें हा आमचा क्रम आहे बाईंचें तसें नाहीं दुसऱ्याचा, अनुयायाचा सुद्धां आगाऊ सल्ला घेतल्याविना नवा उपक्रम करूं नये अशी नीति बाईंस मान्य नाहीं ती एकदम नवीन फर्मान काढल्ये इतर साहाय्यकांना त्याचा सुगावाहि नसतो ही अरेरावी मिलाफास आड येते बाईंची धार्मिक श्रेष्ठतेची जाणीव तिच्याशीं जोडीचा किंवा बरोबरीचा मिलाफ

आढ्यतेमुळें बरोबरीचे पायरीस उतरून दुसऱ्याशीं मिळाफ करणें हें दुसऱ्यावर उपकार केल्याप्रमाणें वाटत राहतें आणि असली ती परोपकारी नम्रता जरा ताण बसतांच तुटते असा अनुभव आहे." बाईंविषयीं हा त्यांचा ग्रह योग्य होता असें मला वाटत नव्हतें व नाहीं; परंतु त्या वेळीं तो विषय वाढविण्याचें कारण दिसलें नाहीं. त्यांचें जें त्यावेळचें मत होतें तें जसेंच्या तसें दिलें आहे. बाईंचे पराक्रमाविषयीं तर नाहींच परतु तिचें निष्कपटपणाविषयींहि त्यांना शंका नव्हती, असा माझा अदाज आहे. उभयतांच्या मनात वास्तविक अंतर फारच थोडें, किंबहुना (त्या वेळीं तरी) नाहींच, परतु बाईंचा अंतःस्फूर्तीनें चालण्याकडे ओढा व लोकमान्य केवळ उघड्या बुद्धिवादावरच भिस्त ठेवणारे, यामुळें उभयतांचें कधींच जमणार नाहीं असा मला त्या वेळच्या त्यांच्या भाषणाचा तात्पर्यार्थ दिसला.

(२) लोकमान्यांच्या चर्येवरून एक प्रकारच्या उग्रपणाचा त्यांचेवर आरोप करणारी मडळी होती. पुढाऱ्यात जरूर असणारा मनमिळाऊपणा त्यांचेजवळ नसावा असा तेवढ्यावरूनच अंदाज करणारे लोकमान्यांच्या विरोधी मताचे मवाळ लोक माझे पाहण्यांत आलेले आहेत. मवाळ पक्षांतील लोक लोकमान्यांच्या खासगी व्यवहारांतील वर्तनहि त्यांच्या वादाच्या पद्धतीप्रमाणेंच मानीपणाचें, उग्र, किंबहुना कठोर व शिष्टाचारांतील विनयास न मोजणारें असतें असा अपवाद आणीत. केवळ गैरमाहितीमुळें सुद्धां हा प्रकार घडत असे, व विशेषेंकरून पुण्याबाहेरचे लोकात या गप्पा खपू घकत. वस्तुतः खासगी वर्तनांत त्यांचे इतपत निरभिमानी, शिष्टाचार संभाळणारा व मृदु अतःकरणाचा पुरुष त्यांचे वेळचे दक्षिणेंतील ठळक लोकांत त्यांचे तोडीचा दुसरा झाला नाहीं असाच माहितगारास अनुभव आहे. योग्य वेळीं दुसऱ्याचा मान राखण्याविषयीं अतिशय जपल्याचीं एकदोन उदाहरणें त्यांच्या सागलीच्या दौऱ्यात माझ्या नजरेस आलीं तीं येथें नमूद करतों, म्हणजे

मला गरज होती व खेरीज ही अशी सवडहि मिळाली म्हणून मी एकटाच बुधगावच्या स्टेशनवर त्याना भेटण्यास पुढें आलों, अर्थातच स्वागताची तयारी अशी बुधगावास नव्हती, परंतु बुधगाव स्टेशनावरील गिरणीवाल्याच्या तर्फे कोणी गृहस्थ आपण होऊन हारतुरे, दूध वगैरे तयारी करून हजर होते. त्याची वर्दी अर्थातच मला स्टेशनवर जाईपर्यंत नव्हती त्यानीं हारतुरे व इतर व्यवस्था केली होती ती केवळ लोकमान्यापुरतीच केलेली होती. गाडी थांबली. मी लोकमान्याचे डब्यात शिरलों तों मजबरोबर ते गिरणीवाले गृहस्थहि हार वगैरे घेऊन डब्यासमोर आले. मला पाहताच लोकमान्य खाली उतरण्याच्या बेतानें अगरखा पागोटें वगैरे घालू लागले त्याचेबरोबर रा. कोल्हटकरानींहि पोषाख केला. प्लॅटफॉर्मवर मांडलेली एक खुर्ची, हातात दिसणारा एक हार, वगैरे प्रकार त्यानीं सारा चटकन् पाहिला आणि खुर्चीवर बसण्यापूर्वी परतले व माझा हात धरून मला प्लॅटफॉर्मवर खाली घेऊन गेले व म्हणाले "तुम्ही सारा मान बरोबरीनें केला पाहिजे, ते तुमचे अध्यक्ष आहेत, त्याचा मान आधीं करा, आणि आतापासून पुढें कोठेंहि केव्हांहि ही प्रतारणा दिसू देऊ नका." इतकें बोलणें ऐकून घेणें मला भागच पडलें कारण माझें मध्यंतरीचें अडविणें त्यानीं जुमानलेंच नाहीं नंतर मीं खुलासा केला, "बागलीचें स्वागत येथें मुळीं सुरूच झालेलें नाहीं. मी एकटाच पाहुण्यास नेण्यास व आपल्यास आगाऊ काहीं गोष्टी कळविण्यास आलों आहे. हा सन्मान गिरणीवाल्यानीं आपल्यापुरताच योजिला, तथापि त्यावहि आता काहीं तजवीज करू."

"यापुढें गैर दिसेसें घडता कामा नये त्याचा मान तुम्ही प्रथम केला पाहिजे," अशी ताकीद त्यानीं मला दिलीच तेथील मोटक समारंभ आटोपल्यावर रा. कोल्हटकराना घेऊन ते गाडींत बसले व त्याच वेळीं (डॉ कुर्तकोटी) श्री शंकराचार्य मठ करवीर यांस "येण्यासारखें" बोलावणें मुद्दाम करण्यास त्यानीं मला सुचविल्यामुळें मी तारा करून स्वामींना आणविले त्याचा मान राखण्याविषयींहि लोकमान्यानीं वेळोवेळीं शिकस्त केली ते सभेंत असल्या वेळीं दुसऱ्या अध्यक्षाची अपेक्षाच नाहीं असें त्याचें मत असल्यामुळें दर सभेंतून तसा उल्लेख करून कार्यनिर्वाह करावा लागत असे. व खेरीज श्रींचें आगमन-प्रसंगीं खडी ताजीम व दरवेळीं सामोरे जाण्याचे प्रकार चालत ते निराळेच. या कामीं हा शिष्टाचार विशेष राखण्यात त्याचें काहीं धोरण असण्याचा संभव आहे, असा तर्क काढता येण्यासारखा आहे. परंतु वैद्यराज आबासाहेब सामारे याचे घरीं आपण होऊन जाण्याचा जो आग्रह त्यानीं घेतला त्यात तरी जुन्या चालीचा शिष्टाचार व सहज कृतज्ञता याखेरीज काहीं हेतु दाखविता येण्यासारखा नाहीं. वैद्य. आबासाहेब सामारे याचें औषध मध्यंतरी थोडे दिवस लोकमान्य घेत होते व त्याकरिता वैद्य. आबासाहेब पुण्यास एकदा गेले होते. ही गोष्ट लोक-

मान्य विलायतेस जाण्यापूर्वीची असावी. सांगलीस आल्यावेळीं लोकमान्यांना पानसुपारीचीं पुष्कळच निमंत्रणें होतीं व त्यांच्याकरितां वेळ आंखून देणें प्राप्त झालें. ज्यानीं आगाऊ कळविलें होतें त्यांची वेळ आंखली व एका सकाळचे प्रहरातच साऱ्या पानसुपाऱ्या उरकण्याच्या असल्यानें जाण्याचा क्रमही आखला. वैद्य. आबासाहेबांच्याकडील सूचना नव्हती, व आग्रहास अपेक्षाहि नव्हती. त्यांच्या घराजवळच त्यांचे बंधू वैद्य. दामूतात्या होते. त्याच्या निमंत्रणावरून लोकमान्य तेथें गेले, ते वैद्यराज आबासाहेब यांचे दारावरूनच गेले. मोटार नतर घराकडे चालू झाली. लोकमान्यांनीं मुद्दाम आठवण काढून, घर शोधून, पुण्याच्या जुन्या ओळखीचें आर्यभूषणशीं संबंध असलेले एक कुटुंब सांगलीस त्या वेळीं राहत होतें, त्या ठिकाणीं भेटीस बिनचूक जाण्याची ताकीद मोटार हांकणारास देऊन ठेवली होती, तिकडे जाण्यास मोटार वळली. इतक्यात वैद्य. आबासाहेब यांचें नांव त्यांच्या तोंडून निघालें. मी " त्यांना सूचना घातली " असें म्हटलें, तों ते म्हणाले " ते गांवात आहेत ना ? आपणच त्यांच्या घरापर्यंत जाऊन समाचार घेऊ. " तावडतोब मोटार वळविली व आम्ही त्या अडचणीचे रस्त्यातून वैद्य. आबासाहेब यांचे घरीं गेलों. तों ते कोठें बाहेर गेले होते. लोकमान्यांनीं जाऊन त्यांचें आंगणांतील लाकडी कट्टयावर बैठक मारली. वैद्य. आबासाहेब म्हणजे सांगलींतील बड्या वैद्यांपैकीं एक, आपल्या धंद्यांत चतुर व धीर, पण विलक्षण मानी; विलक्षण उपकारी पण विलक्षण लहरी आणि निःस्पृह, लहर लागेल तर रेशमाहून मऊ, नाहीं तर दगडाहून घट्ट त्यांनीं एकदा एका मोठ्या महाराजांना आपल्या दारांतूनच उभ्या उभ्या परतविलें होतें. लोकमान्यांच्या या भेटींत कोणीकडूनच कडक-पणा न यावा येवढेंच आम्ही जपत होतों. पुढचा प्रकार सांगून जागा अड-विण्याची विशेष जरूर नाहीं. वैद्य. आबासाहेब जरा वेळानें आले. पानसुपारी झाली. प्रकृतीच्या गोष्टी निघाल्या. वैद्य. आबासाहेब यांचे मतानें लोक-मान्यांनीं आपलें औषधाचे काळांत बेलाशक पथ्य सोडावें. त्या वेळींही लोक-मान्य मुख्यत्वें सातूचे पिठावर होते. बराच वेळ झाल्यानंतर आम्ही उशीर होतो म्हणून एकदाचे त्यांस बाहेर काढिलें. वैद्य. आबासाहेब यांचें औषध आपल्याला गुण करील अशी लोकमान्यांची समजूत नव्हती व एकदरींत स्वतःचे प्रकृतीविषयीं त्यांचा कयास फारच निर्मळ व चोख होता. केवळ शिष्टाचारांत न्यून पडू न देण्याविषयीं ते इतके जपवील असी त्या वेळीं आमची कल्पनाहि नव्हती. परंतु जुन्या पद्धतीचा धरोबा राखण्याविषयीं मागील पिढी जितकी दक्ष असे तितकी आताची नाहीं. मिरजेस गेल्या वेळीं रा. खरे यांची भेट घेणें, त्यांचे घरीं जाऊन समाचार घेणें, तसेंच दुसऱ्या एका सरदारच्या कारभाऱ्याला सांगलीस येऊन त्यांना भेटतां येईना व पूर्वस्नेहामुळें भेटण्याची

तर इच्छा विशेष. तेव्हा त्या गावीं जाऊन त्याचे दारावरून दिंडण्यास मोटार काढण्याची कल्पना इतराची असली तथापि कामाच्या गर्दीत असूनहि तिला मन पूर्वक अनुमोदन देणें, हे सर्वहि उपद्रव सोसणारा दुसरा प्रेमळ पुढारी विरळाच सापडेल.

(३) जसा प्रेमळपणा तद्वीच साहसाची गोडी हीहि त्यांच्यात साहजिकच होती. याचे दाखले त्यांच्या चरित्रात मोठ्या कृत्यात तर मिळतीलच. परतु एकवार अकलीचे पुलापर्यंत मोटारनें फिरण्यास गेलों असता पुढें करवीर सरकारची हद्द आहे तेव्हा येथूनच परत् असें मी किंवा दुसरें कोणी म्हटलें, त्या बरोबर एखाद्या लहान मुलाप्रमाणें उसळी घेऊन ते म्हणाले, " का, त्या हद्दींत गेल्यास मला पकडण्याची तयारी आहे की काय ! असेल तर जरूर सवड देऊन तर पाहू चला, असेच नृसिंहवाडीस जाऊन येऊ ! काहीं कायदा म्हणून आहे कीं नाहीं ! ! " वेळ सध्याकाळची होती व खरोखरीच समेल्नाचे कार्यास लोकमान्याची गरज होती आम्ही वेळात वेळ काढून हवा खाण्यास निघालों होतों. कारण या शर्तीवरच मी त्याना पुण्याबाहेर काढले होतें अशा स्थितींत करवीरदरबारचे तयारीची परीक्षा पहाण्याचा हट्ट आम्हाला पुरवता येण्यासारखा नव्हता आमची भीति कदाचित् सर्वस्वीं अस्थानीं असेल परतु नाक मुठून पिण्यात दिलाऊ दोष असला तरी नुकसान खास नसतें लोकमान्यानीं त्या दिवशींच सकाळचे बैठकींत एका वृद्ध ज्योतिषाचे सस्कृत भाषेवरील सार्थ पदत्वाचे थट्टेवर " व्याघ्र " या पदाची कोटी केली होती तिची आठवण मी त्या वेळीं त्यास दिली सस्कृत भाषेतील शब्दाचीं पदें पाडिलीं कीं, अर्थच निष्पन्न होतो निराळा अर्थ शोधण्यास नको असें ज्योतिषाविषयींहि मत प्रति पादन करणाऱ्या गृहस्थास त्यानीं एक गोष्ट सांगितली " विशेषण आम्रातीति व्याघ्र " असा व्याघ्र शब्द गुरूनें शिष्यास व्युत्पत्तीनेंच सिद्ध करून दिला होता. पुढें दोघे रानातून चालले असता खरोखरच वाघोबा पुढें सिद्ध झाले. तेव्हा निष्ठावत गुरु पळू पाहणाऱ्या शिष्यास म्हणतात " अरे, विशेषेण आम्रा तीत व्याघ्र, अशी याची सिद्धि आहे. आम्राति म्हणजे हुगतो. विशेष सांगितला त्यावरून फार तर एकदा हुगण्याचें ऐवजीं अनेकदा हुगून जाईल. यात भीतीचा अर्थ निघत नाहीं. " " तरी पण झाडावर चढूनच त्या विशेष हुगण्याचा मी प्रथमचा अनुभव घेतों " असें म्हणून शिष्यानें पळ काढला. पुढें गुरूचा प्रकार काय झाला असेल तो सागणें नकोच. ही गोष्ट त्या वेळीं बोलण्यात अगदीं ताजीच होती म्हणून मी त्याना वाघाची सिद्धि अथवा व्युत्पत्ति आपल्या ब्रिटिश हद्दींतच राहून केलेली बरी असें निदान शिष्याचें तरी मत आहे, असें म्हणून मोटार तितकीच थांबविली व पुढें लवकरच आम्ही परतलों. त्या वेळीं वाघोबावरून गोष्टी निघत निघत एशिया व युरोपमधील इस्लाम सारा एक

होऊन केव्हा तरी एकदा त्या बाबोबाच्या अनुभवाप्रमाणें हकीकत घडणार व आपल्या गुरूचा गळा फोडणार असें त्यांनीं एक प्रकारचें भाकीत वर्तविलें होतें; व हिंदुस्थानांतील मुसलमानासवर्धीहि हार खात खात कोठवर मजल जाते कोण जाणे अशीहि काळजी त्यांनीं व्यक्त केली होती. त्यांचें मुसलमान जमाती पुढें सांगलीस व्याख्यान ठरलें होतें, ह्याहि स्मरणावरून बोलण्याचा ओघ तसा निघाला असावा.

(४) ह्या बाबोबाच्या गोष्टीप्रमाणें समयोचित गोष्टी सांगण्याचा व कोटी करण्याचा त्यांचा हातखंडा असे. याचा अनुभव सांगलींतील त्यांचे सार्वजनिक व्याख्यानाचे वेळीं अचानक आला. आमची कोल्हापूरच्या हद्दीत जाण्याची भीति व्यर्थ असली तथापि कोल्हापुराकडून कांहीं मोटारी येण्याला व सभेंत अखेर अखेर मोठा दंगा होण्याला एकच गांठ पडली. मारुतीपुढील मोठें मैदान माणसांनीं अगदीं चिकार भरलें होतें. सुमारें पंधरा हजार तरी समुदाय खास होता. रात्रीची वेळ होती, तरी प्रकाश खूब केला होता. व्याख्यानाचा विषय 'व्यवहार व परमार्थ' असाच कांहीं तरी स्थानाला शोभेसा होता. अर्थातच श्रीशंकराचार्य करवीर मठ ( डॉ. कुर्तकोटी ) हे अध्यक्ष होते. त्या वेळीं ते नुकतेच कोल्हापुराहून निघून बाहेर पडले होते. असो, लोकमान्यांचें भाषण झालें त्या वेळीं सर्वत्र शांत होतें. श्रींच्या भाषणास सुरुवात होऊन थोडा वेळ झाला नाहीं तोंच काय हूल उठविण्यात आली सांगवत नाहीं, कोणी म्हणतात मोटार आली, कोणी म्हणतात साप सुटला, पण इतकें खास कीं, एकदम एका बाजूची मंडळी उठून बसलेल्या पुढील मंडळीचे अंगावर पडूं लागली. अशा रागेमागें रागेचा प्रकार पांच सात मिनिटें चालला. पुष्कळांनीं इजा झाली. पुष्कळांचे रुमाल गेले, पादत्राणें गेलीं, आणखी किती तुडवातुडव होते याचा विश्वास वाटेना. मोठ्या शर्थीनें आम्हीं ही दंगल थांबविली व मंडळींना लोकमान्यांचें भाषण पुन: ऐकण्याचा लोभ लावून व तसें उघड वचन

(५) त्यांची राजकीय मतें कोणी आठवण म्हणून सांगण्याची गरज नाहीं. त्या मताचे प्रभावानेंच हिंदी स्वराज्याच्या इतिहासाचा ओनामा लिहिला गेला आहे. परंतु ते वारण्याचे वेळींच महात्मा गांधींनीं जी असहकारितेची मोहीम पुकारली तिजविषयीं त्यांचें मत खास विरोधी असावें असा माझा स्वतःचे माहितीवरून कयास आहे. मी त्यांना सांगली ज्योतिषसमेलनासाठीं निमंत्रण करण्यास आलों तेव्हा स्टेशनजवळील एका बंगल्यात ते थारेपाल्ट करून विश्रांति मिळते का पाहत होते. व त्यांच्या भाचानीं अगदीं गळीं पडून आम्हास त्यांना न नेण्याची मीडहि गावातून चलताना घातली होती कारण त्यांना तसाच आम्हांलाहि त्यांचा भिडस्त स्वभाव माहीत होता खरोखरीच आता असें वाटतें कीं, त्या वेळीं त्यांची क्षीणता वाढत्या प्रमाणातच होती आपल्याला फक्त दोन तास श्रम घेण्याची ताकद आहे, त्यातलाच एक तास फिरण्याचे व्यायामाला घालवावा लागतो असें ते सांगत मी व इतर दोन–तीन सांगलीची मंडळी सकाळींच बंगल्यावर जाऊन त्यास गांठलें व तातडीची विनंति केली. तेव्हा ही हकीकत त्यांनीं सांगितली. तरी पण त्यांचा भिडस्तपणा माहीत असल्यानें आम्ही आग्रह धरलाच. त्या वेळच्या भाषेत "नाहीं तर आम्ही सत्याग्रह करू" असे शब्द येऊन गेले त्यावरोबर एकदम उसळून ते म्हणाले "सत्याग्रह करणार तर गांधींकडे चला" यापुढील भाषणात "सत्याग्रह ही तरी एक प्रकारची दांडगाईच नव्हे काय? जास्त मतींची दांडगाई करता येत नाहीं म्हणून हें सौम्य सोंग दाखवावयाचें आहे. चालेल त्यानें चालेल तितका वेळ करून पहावें" असेहि त्यांचे निसटते उद्गार येऊन गेले, असें मला स्मरतें. सत्याग्रहाच्या ज्या सात्विक स्वरूपावर हल्लीं जोर देण्यात येतो त्यावर लोकमान्यांची श्रद्धा नव्हती, 'शठं प्रति शाठ्यं' वगैरे त्यांचीं मतें उघड वादालाही महात्मा गांधीजींच्या मताशीं विरोधाला आल्याचें प्रसिद्धच आहे. परंतु काल बदलला असता हत्यार बदलून वापरावें या मताचे विरुद्ध मात्र ते खास नव्हते परंतु ते राजकारणात धर्म आणण्याला तयार नव्हते तरी स्वराज्य जिंकण्यास निघालेल्या राष्ट्रहितचिंतकाना सर्वहि उपायाचा यथावकाश आश्रय करावा लागेल असेंच त्यांचें मत व त्यांचें धोरणहि होतें. नाहींतर मॉन्टेग्यू–चेम्सफोर्ड स्कीम त्यांना आवडत होती असा भाग थोडाच होता! विशेषेंकरून विशेष जातींना प्रतिनिधी दिले, ही गोष्ट त्यांना स्वाभाविकच अप्रिय होती. मी बोलण्यास आलों त्याच दिवशीं शहराकडे गाडींतून परत येत असता ते म्हणाले, "आम्ही Aristocratic स्वरूपाच्या राज्य *व्यवस्थेची आवड असणारे लोक आहों.* '*Aristocracy of wisdom*' आम्हाला पाहिजे, बाकी सर्व जाती पूर्वीप्रमाणें आमचे पोटात याव्या व त्यांचे करिता आम्ही झटावें हें योग्य आहे. परंतु घर भेदण्याला ही पैशाच्या पायावर रचलेली Democracy ची नक्कल आमचे गळ्यात बांधण्यात येत आहे. ही

असली Democracy आम्हाला मनापासून नको आहे. परंतु हातीं येईल तेवढी सत्ता घेऊन दिलेलीं सोंगें सूत्रें चालवून कितपत नाचतात तें पाहण्याचें आहे." कौन्सिलात आपलेतर्फेचे शक्य तितके अधिक लोक धाडण्याची खटपट करण्याचा त्या वेळीं तरी त्याचा निश्चय दिसला. पुढें येणारी असहकारिता त्याचे कल्पनेंतहि नव्हती.

(६) त्याच्या भाषणात वाचाळपणा नसे व नमनात अथवा बारतींत ते वेळ घालवीत नसत, स्वाभाविकच इतरातील बावदूकपणाचा त्याना कटाळा असे. सभातील प्रस्तावना व उपसंहार, तशीच लावलचक आभारप्रदर्शनें व गोडवे गाणें हीं त्याना बिल्कुल आवडत नसावीं. अथणीस भरलेली बेळगाव जिल्हा परिषद संपत आली त्या वेळीं साहजिक आभार मानण्याचा क्रम सुरू झाला, त्यात स्वराज्य ही एक मेजवानी आहे असें रूपक कोणी साधलें व त्या रूपकाचे फाटे फुटत फुटत अखेर व-हाडच्या लोकानीं आपल्यास व-हाडी म्हणवून घेतलें व सागलीचे लोकाना स्वत स्वराज्याचे मेजवानींत हक्क नाहीं, परंतु ते प्रसिद्ध वाढपी आहेत व त्यानीं आपली वाढप्याची स्वरूप सेवा हजर केली आहे येथपर्यंत

चक्राची गरज आहे, 'अवकहडा' हा शब्द कसा बनला आहे असें तुम्ही समजता ?" त्यावर कोणींच उत्तर केलें नाहीं, तेव्हा ते म्हणाले "अवकहडा म्हणजे ए, बी, सी, डी असा वर्णानुक्रमदर्शक शब्द आहे." "पण हिंदूंचे पचांगावर तो कसा आला ? आरबी मुळाक्षरांतहि हा शब्द मिळत नाहीं" अशी कोणी शंका काढली. त्या वेळीं म्हणाले "हा चमत्कार खरा, परंतु दुसरी कोणती व्युत्पत्ति तुम्ही बसवित तो सांगा." याप्रमाणें बोलून तें बारीक टाइपांत छापलेलें पचांग अधिकाधिक बारकाईनें तपासण्यांत व शास्त्रीबुवांना सूचना देण्यांत ते गर्क झाले.

---

## जनार्दन सखाराम करंदीकर

[ बी ए एलएल बी, जुन्या श्रीसमर्थ-विद्यालयांतील एक प्रमुख अध्यापक, उपसंपादक केसरी, पुणें ]

(१) जगांतील प्राणिमात्र कोणी ना कोणी व्यक्ति आदर्श म्हणून आपल्या-पुढें ठेवून त्याप्रमाणें वागण्याचा यत्न करतात आणि त्यावरून त्यांच्या स्वतःच्या स्वभावाचा कल व्यक्त होतो. महाभारत हा ग्रंथ लोकमान्यांचा अत्यंत आवडता असून त्यांतले भीष्म व कृष्ण हे दोन वीर त्यांना आदर्शभूत असे वाटत. गणेशोत्सवांत १८९५ सालीं व्याख्यानमालेस प्रथमच प्रारंभ झाला. त्या वर्षी विंचूरकरांचे वाड्यांत लोकमान्यांचें पहिलेंच व्याख्यान वरील विषयावर झालें. त्या व्याख्यानास आता २९ वर्षें झालीं तरी त्या वेळचे लोकमान्यांचे शब्द आजोमतीलादि ततोतत लागू पडतात. त्या दिवशीं व्याख्यानांत लोकमान्य म्हणाले, 'धर्माची सत्यनिष्ठा, कर्णाची उदारता, भीमाचें बाहुबल, अर्जुनाचें हस्तकौशल्य इत्यादि गुणांचें कितीहि कौतुक करावेंसें वाटलें तरी भीष्माचा दृढनिश्चय आणि श्रीकृष्णाचें मुत्सद्दीपण या दोन गुणांपुढें इतर सर्व गुण फिके पडतात. यास्तव तरुण पिढीला माझें हेंच सांगणें आहे कीं, त्यांनीं महाभारताचें

(२) १९०७ सालच्या प्रारंभीं ताईमहाराजाच्या खटल्यानिमित्त लोकमान्य कोल्हापुरास आले होते त्या वेळीं अद्यापि लाला लजपतरायांना हद्दपारी झाली नव्हती आणि सभाबंदीच्या कायद्याची कल्पनाहि सरकारच्या डोक्यातून निघाली नव्हती. अर्थातच लोकमान्यांचें व्याख्यान करविण्यास कांहींच हरकत नसल्यानें व्याख्यान देण्याविषयीं विनंति करण्याकरिता रा. स. ख. आळतेकरप्रभृति पुढारी लोकमान्यांकडे आले. व्याख्यान करविण्याचें ठरलें व नुकत्याच होऊन गेलेल्या लोकप्रतिनिधि--सभेविषयीं लोकमान्यांनीं बोलावें असाहि मंडळींनीं आपला मनोदय प्रकट केला, तथापि जाहिरातींत तो विषय नमूद करूं नये असें ठरलें. तेव्हां आळतेकर म्हणाले, " मग जाहिरातींत विषय कोणता लिहावयाचा ? " त्यावर लोकमान्य हसून म्हणाले, "अहो, गावांत हरिदासबुवा आले आहेत आणि सध्याकाळीं त्यांचें कीर्तन आहे, एवढें जाहीर केलें म्हणजे झालें, आख्यान कोणतें लावणार आहेत तें कांहीं सांगावें लागत नाहीं !" त्याप्रमाणें व्याख्यानाचा विषय नमूद न करताच हस्तपत्रिका वाटण्यांत आल्या आणि

जाण्याच्या गाडीची वेळ होत आली असें पाहून ते उठण्याची तयारी करू लागले. त्या वेळीं राष्ट्रीय शिक्षणाच्या संबधाची चर्चा चालली असून वाद रंगात आला होता. त्यामुळें प्रो. विजापूरकर म्हणाले, ' थांबा हो थोडा वेळ, गाडीला अद्यापि अवकाश आहे, आणि गाडीची वेळ झालीच तरी तुम्ही या गाडीनें जाणार असल्यानें तुम्ही स्टेशनवर पोहोंचेपर्यंत गाडी काहीं येत नाहीं, गाडी खात्रीनें 'लेट' होईल. मी सांगतों हा अनुभव तरी पहा.' त्यावर टिळक उद्गारले, " ऋषींचे आन्हिक चुकूं नये म्हणून चंद्रसूर्यसुद्धा थांबतात म्हणतात ! असल्या कथांवर कितपत विश्वास ठेवावा याची चर्चा मी आता करीत बसत नाहीं, पण माझ्यासाठीं गाडी लेट होऊन दैवानें माझ्यावर उपकार करावा ही गोष्टच मला मान्य नाहीं गाडी वेळेवर येवो अगर लेट होवो, मी वेळवर स्टेशनवर जाऊन बसणार आणि गाडी गाठणार मी प्रयत्नवादी आहे, दैवाचा उपकार मला नको आहे ! "

(८) कॉंग्रेसच्या डेप्युटेशनकरिता लोकमान्य विलायतेस जावयाला निघाले, त्या वेळीं श्रीओंकारेश्वराच्या देवळात ब्रह्मवृंदातर्फे त्याना पानसुपारी झाली त्या वेळच्या भाषणात 'सामर्थ्य आहे चळवळीचें' या समर्थांच्या ओंवींतील ' भगवंताचें अधिष्ठान ' या पदाचा लोकमान्यांनीं फारच मार्मिक खुलासा केला. ते म्हणाले, " चळवळींत सामर्थ्य आहे ही गोष्ट आता लोकाना समजू लागली आहे, पण कित्येकजण अशी शंका घेतात कीं, आमच्या ' स्वराज्यसंघा च्या चळवळींत भगवंताचें अधिष्ठान नाहीं ! आणि जणु काय ती उणीव भरून काढण्या करिताच आज ही पानसुपारी ओंकारेश्वराच्या देवळात करण्यात आली आहे ! पण ' भगवंताचें अधिष्ठान ' म्हणजे काय याचा कोणी फारसा विचार करीत नाहीं. कोणतीहि एकादी चळवळ सुरू केली व त्या चळवळीच्या कचेरींत एकादी मूर्ति बसविली व तिच्यापुढें नित्य धूप जाळला म्हणजे का तेथें भगवंताचें अधिष्ठान येते ? भगवंताचें जगात कार्य काय, तर साधूचें रक्षण, दुष्टाचें निर्दलन आणि धर्माची संस्थापना ही कार्यें जेथें चालली असतील तेथें भगवंताचें अधिष्ठान आपोआपच आलें आमची होमरूलची चळवळ ही हिंदुस्थानाची परकीय जुलमांतून सोडवणूक करण्याकरिता आणि सनातनधर्म रक्षण्याकरिता आहे. म्हणून हें कार्य जेथें जेथें चालू असेल तेथें तेथें भगवंताचें अधिष्ठान आहेच आहे, आणि म्हणून आमची चळवळ यशस्वी होणार याविषयीं कोणीहि शंका घेऊ नये "

## सदाशिव खंडो आळतेकर

[बी. ए. एल्एल् बी वकील, लोकमान्यांचे व जुन्या राष्ट्रीय पक्षाचे अनुयायी असहकारयोगी, कराड.]

(१) १८९५ सालीं श्री शिवाजीच्या स्मारकाकरिता महाराष्ट्रांतील शिष्टमंडळा-बरोबर कै. शाहूमहाराज यांच्या भेटीकरिता लोकमान्य आले होते. शिष्टमंडळांतील सद्गृहस्थांची गांठ महाराजांनीं नवीन राजवाड्यांत घेतली. शिष्टमंडळांतील इतर सभासदांनीं रायगड येथील श्री शिवाजीमहाराजांच्या छत्रीची कशी दीन स्थिति आहे त्याचें वर्णन करून शिवाजी स्मारकफंडास मदत करण्यास महाराजांना विनंति केली. अखेर लोकमान्यांची बोलण्याची पाळी आली. लोकमान्यांचें सडेतोड व परिणामकारक भाषण झालें. त्याचा अगदीं थोडक्यांत सारांश—" कोल्हापूरच्या गादीवर छत्रपति विराजमान आहेत तोंपर्यंत श्री शिवाजी महाराजांचें जिवंत स्मारक आहेच. जिवंत स्मारकानें रायगडच्या समाधीच्या जीर्णोद्धाराची हयगय केल्यास श्री शिवाजीमहाराजांच्या आत्म्यास किती दु:ख होईल याचा महाराजांनीच विचार करावा."

(२) कै. श्री. साईमहाराजांनीं श्री. जयसिंगमहाराजांस दत्तक घेतल्यावर सन १९०१ सालच्या श्रावण महिन्यांत लोकमान्य कोल्हापुरास आले होते. लोकमान्यांची व कै. शाहूमहाराजांची गांठ पडल्यानंतर लोकमान्य एका बड्या गृहस्थाच्या भेटीस गेले. सदर बडे गृहस्थ बाहेर जाण्याच्या तयारींत होते. कोठें निघालां असें विचारतां श्री. बाळामहाराजांस श्री. साईमहाराज दत्तक घेणार आहेत त्या समारंभास निघालों असें सदर गृहस्थ म्हणाले. मी महाराजांची गांठ घेऊन आलों, पण मला ते दत्तकासंबंधीं चकार शब्द बोलले नाहींत, असें म्हटल्यावर सदर गृहस्थ म्हणाले—" महाराज शिवाजीमहाराजांप्रमाणें मुत्सद्दी आहेत " लोकमान्य म्हणाले. " शिवाजीमहाराजांचे स्वाभिमान, सत्याभिमान, देशाभिमान, प्रजावात्सल्यप्रभृति इतर गुण [illegible] महाराजांमध्यें असते तर किती बहार उडाली असती ! " असो. याच दिवशीं महाराजांचे समक्ष साईमहाराजांनीं बाळामहाराजांस दत्तक घेऊन लोकमान्यांच्या मार्गी सकटपरंपरेचें बीं पेरलें ! !

(३) १९०७ सालीं साईमहाराजांच्या मुलीचें लग्न श्री. बाबासाहेब-युवराज संस्थान विशाळगड यांच्याबरोबर ठरविण्याकरितां लोकमान्य कोल्हापुरास गेले होते. त्या वेळीं लोकप्रतिनिधिसभेचा उत्पादक या नात्यानें मी लोकमान्यांच्या जाहीर व्याख्यानाचा सुयोग घडवून आणला. स्वदर्शप्रसादक नाटकगृह चिकार भरून गेलें होतें. विषय जाहीर केला नव्हता. करवीर—दरबारच्या रोषास पात्र झालेल्या लोकप्रतिनिधी सभेवर बोलण्यास लोकमान्यांनीं आरंभ केला. तेव्हां

सरकारी अधिकारी उठून बाहेर गेले ही गोष्ट सभेनंतर लोकमान्यांच्या नजरेस आणता लोकमान्य म्हणाले, " महाराजांच्या चुका महाराजांच्या नजरेस आणण्याचें नीतिधैर्य तर राहोच, पण बाहेरच्या माणसांनीं त्यासंबंधीं बोलताना तें ऐकण्याचेंही नीतिधैर्य कोल्हापूरच्या अधिकारी वर्गांत नाहीं ! दुर्दैव कोल्हापूरचें ! ! "

---

## रामकृष्ण गोपाळ भिडे

[ टिळक स्वराज्यसंघाचे एक माजी नोकर, ' केसरी ' ऑफिसातील एक लेखक, पुणे ]

(१) लोकांचें अंतःकरण बोलावयाचें हा असा लोकमान्यांचा एक विशेष होता, त्याप्रमाणेंच लोकांच्या अंतःकरणास पटेल असेंच बोलावयाचें व लिहावयाचें हाहि त्यांचा एक विशेष होता जसा समाज असेल त्याप्रमाणें आपला उद्देश त्याला सुलभपणें समजावून देणें हा गुण लोकमान्यांत अलौकिक होता एकच तत्त्व पण विद्वत्समाजांत व सामान्य जनसमाजांत त्या समाजाच्या योग्यतेप्रमाणें मांडण्याची त्यांची हातोटी विलक्षण होती

बेळगांव जि परिषद चिकोडी येथें भरली होती व लोकमान्य त्या परिषदे साठीं गेले होते स्वराज्यसंघाची नुकतीच स्थापना झाली असून स्वराज्याची कल्पना लोकांत प्रखरतेनें रूढ झाली नव्हती सर्व दर्जांच्या समाजांत स्वराज्याची कल्पना रूढ करण्यासाठीं लोकमान्य एकहि संधी वाया जाऊं देत नसत चिकोडी येथें स्वराज्यावर त्यांचीं दोनचार भाषणें झालीं त्यांत तेथील रयत लोकांसाठीं म्हणून त्यांचें एक व्याख्यान झालें व्याख्यानाच्या दुसऱ्या दिवशीं सकाळीं श्री तात्यासाहेब केळकर, बापूराव गोखले, स्वतः लेखक व तेथील कांहीं गृहस्थ स्नानासाठीं विहिरीवर चाललों असतां, वाटेंत एका शेतकऱ्याला श्री तात्या साहेबांनीं विचारलें—कां पाटील, काल टिळकांच्या व्याख्यानाला गेला होता का ? पाटील —होय केळकर —त्यांनीं कशावर व्याख्यान दिलें ? पाटील —स्वराज्यावर केळकर —म्हणजे काय हो ? पाटील —म्हणजे त्यांनीं सांगितलें कीं, आपल्या गावचा मामलेदार किंवा कलेक्टर हे जर आपल्याला नको असतील, जुलूम करीत असतील, तर त्यांच्या जागीं आपल्याला पाहिजेत त्यांना नेमतां यावें ! याचें नाव स्वराज्य !

साध्यासुध्या अडाणी शेतकऱ्यालाहि आपलें हृद्गत पटवून देण्याचें हें कौशल्य अलौकिक नव्हे काय !

(२) हातीं घेतलेलें काम वाटेल तो प्रयत्न करून तडीस न्यावयाचें, मग कसलींहि संकटें आलीं तरी त्यास जुमानावयाचें नाहीं, हा लोकमान्यांत मोठा गुण होता, हें सर्वप्रसिद्धच आहे. स्वराज्याच्या चळवळीस खूप जोरानें त्यांनीं सुरुवात केली, इतकी कीं, भारतमंत्री मि. मॉंटेग्यू यास येथील परिस्थिति प्रत्यक्ष पाहण्यास यावें लागलें. त्यांना भेटण्यास बेझंटबाईंच्या होमरूल लीगचें व टिळकांच्या हिंदी स्वराज्यसंघाचें असें एक संयुक्त शिष्टमंडळ दिल्लीस गेलें होतें परंतु शिष्टमंडळाचें पुढारीपण बाईंनीं घेतलें असल्यानें लोकमान्यांस आपलें म्हणणें स्पष्टपणें भारतमंत्री व चेम्सफर्ड साहेब यास सांगता आलें नाहीं तेव्हां त्यांनीं भारतमंत्र्याची मुलाखत मागितली व ती त्यास मिळालीहि. त्यास भेटण्यास व्हाइसरॉयसाहेबांच्या वाड्यांत लोकमान्य गेले. त्यांजबरोबर श्री. तात्यासाहेब केळकर, श्री. अण्णाका फडणीस व स्वतः लेखक इतकेजण होते. लोकमान्य त्यांच्या भेटीस वाड्यांत गेले, व आम्ही पाहुण्यासाठीं बाहेर उभारलेल्या तंबूंत होतों मुलाखत सुमारें चाळीस मिनिटें चालली होती. तेथून परत येतांना लोकमान्य अगदीं खुषींत दिसले. जवळ येताच काय झालें म्हणून श्री. तात्यासाहेबांनीं विचारलें, तेव्हां लोकमान्य म्हणतात, " अगदीं योजल्याप्रमाणें बोललों. त्यांनी विचारलें सुधारणा अपुऱ्या आहेत तर त्या तुम्ही स्वीकारणार कीं नाहीं ?
:

## श्रीधर बळवंत टिळक

[ लोकमान्यांचे कनिष्ठ चिरंजीव, पुणें ]

(१) प्रथमतः घरगुती संभाषणांत वेळोवेळीं लोकमान्यांचे तोंडून ऐकलेल्या काहीं मार्मिक व मनोरंजक गोष्टी सांगतों ---

श्रीमंत थोरले बाजीराव पेशवे यांनीं मस्तानी नामक एक सुंदर म्लेंच्छ स्त्री जवळ बाळगली होती ही गोष्ट इतिहासप्रसिद्ध आहे श्रीवर्धनच्या सुप्रसिद्ध भट-घराण्यापैकीं एका नामांकित कर्त्या पुरुषानें असला अनाचार करावा हे पुण्यातील तत्कालीन सनातन धर्माभिमानी काहीं भिक्षुक ब्राह्मणांस न आवडून त्यांनीं या गोष्टीची चर्चा करण्यासाठीं एका देवालयाचे सभागृहांत शास्त्री पंडितांची खासगी बैठक बोलावली मुख्य विषयावर बरीच ' भवती न भवति ' होऊन अखेर धर्मबाह्य वर्तन केल्याचा अगम्य आरोप बाजीरावांवर ठेवण्यात येऊन ब्राह्मण्याचे जोरावर त्याला पदच्युत करून वाळींत टाकण्याचें एकमतानें मुक्रर करण्यांत आलें बैठकींत वरील विषयावर खडाजंगी वादविवाद चालू असतां एक पोक्त ब्राह्मण देवालयाचे एका कोंपऱ्यातून हा सर्व प्रकार पाहत मुकाट्यानें उभा होता वादविवादाची मजल अखेर वरील निर्णयात्मक ठराव करण्यापर्यंत पोंचली तेव्हां मात्र म्हाताऱ्याच्यानें राहवेना काठी टेंकीत टेंकीत तो वृद्ध ब्राह्मण पुढें सरकला व जमलेल्या ब्रह्मवृंदास उद्देशून म्हणाला मांजराचे गळ्यांत घांट बांधण्याचा ठराव करणें सोपें आहे पण ती बांधायची कोणी ? आज बाजीरावसाहेब आहेत म्हणूनच निजाम, नादिरशहा वगैरेंचा मराठेशाहीकडे डोळे वटारण्याची छाती नाहीं पेशव्यांच्या कृपाछत्राखालीं आजपर्यंत आपण सुखासमाधानानें नांदत आलों किंबहुना त्यांच्या नांवाच्या दराऱ्यामुळेंच आपलें घरदार आपलीं बायकापोरें, आपल्या आयाबहिणी सुरक्षित आहेत तेव्हां बाजीरावाच तोडीचा शूर, कर्तबगार व मसलती असा दुसरा कोण लढवय्या मुत्सद्दी तुमच्यांत असेल तो पुढें येऊं द्या आणि मग आपण यथावकाश बाजीरावाच्या धर्मबाह्य वर्तनाची छाननी करूं " येणेंप्रमाणें वस्तुस्थितीचें यथायोग्य आविष्करण झाल्याबरोबर सर्व ब्रह्मवृंदाचे डोक्यांत चक्क प्रकाश पडला आणि कोणताहि ठराव पसार करण्याचे भानगडींत न पडतां सभा एकदम बरखास्त करून शालजोड्या सावरीत सावरीत जमलेली शास्त्री मंडळी घरोघर निघून गेली सारांश, थोर व पराक्रमी पुरुषांना इतरेजनांसाठीं अस्तित्वांत आलेले सामान्य कायदे किंवा रूढी बंधनकारक होऊं शकत नाहींत

(२) पेशव्यांचे दरबारांत नेहमीं सर्वांना मुक्तद्वार असे. अशाच एका दरबारचे प्रसंगीं एक पैहलवान-पेशाचा गरीब ब्राह्मण काहीं दाद लागावी या हेतूनें गणेश-महालांत प्रवेश करून एका बाजूस बैठकीचे कोपऱ्यावर खांबास टेंकून बसला.

बराच वेळ तिष्ठत बसूनहि पेशवेसरकारची नजर त्याचे वांकूस वळेना. अखेर दरबार बरखास्त होऊन मंडळी उठणार अशा वेळीं त्याला एक नामी युक्ति सुचली. त्यानें त्या भव्य दिवाणखान्याचा आपले शेजारचा खांटोळा मरीव पुरुषा खांब बगलेंत घट्ट पकडून किंचित् वर उचलला व गालिच्याचें एक टोंक मुकाट्यानें त्याखालीं सारून दिलें. दरबाराचें काम खलास झाल्यावर मानकरी मंडळींचे घोळक्यातून बाहेर पडून हाहि आपले घरीं निघून गेला. नंतर थोड्याच वेळांत नेहमीप्रमाणें नोकरचाकर बैठकी गोळा करूं लागले. जाजमाच्या घड्या घालतां पाहतात तों एका गालिच्याचें एक टोंक खांबाखालीं गुंतलेलें! ही गोष्ट झाली कशी, याचा कोणास कांहींच उलगडा होईना. अखेर जातां जातां गोष्ट पेशव्याचे कानापर्यंत पोंचली. लगेच त्यांनीं त्या दिवशीं दरबाराला कोण लोक हजर होते याविषयीं चौकशी सुरू केली, व खांब उचलून गालिच्या सोडवून देणाराला मोठें बक्षीस लावलें. गांवातील नामांकित वस्तादांनीं शिकस्त करून पाहिली, पण कोणालाच एकट्याला तो खांब हलेना. दुसऱ्या दिवशीं भरदरबारांत या ब्राह्मणानें जाऊन आपल्या अचाट शक्तीचें लोकोत्तर स्वरूप पुनः प्रकट केलें, व खांबास बगल देऊन गालिच्या काढून दाखविला. आपल्या असामान्य शक्तीचा असा हा दुरुपयोग करण्याचें कारण विचारतां ब्राह्मणानें हात जोडले व म्हणाला— "महाराज, काय करूं? लहानपणापासून मला हा असा मर्दुमकीचा शोक आणि घरीं अठराविश्वें दारिद्र्य. कांहीं तरी नरितार्थाची सोय व्हावी म्हणून काल दरबारला आलों पण दाद लागेना. तेव्हां थोडी गम्मत केली. हेतु एवढाच कीं, आपल्यासारख्या थोरामोठ्यांचे पदरीं माझ्या ताकदीचें कांहीं चीज व्हावें." त्याचें तें अचाट शरीरसामर्थ्य पाहून पेशवेसरकार खूष झाले व त्यांनीं त्याजवर मल्लाचे खुराकासाठीं वर्षासन लावून देऊन त्याचा गौरव केला. एवंच पेशवाईतहि आधुनिक राममूर्तीचे तोडीचीं किंबहुना कांकणभर सरस अशीं माणसें कांहीं कमी नव्हतीं.

(३) समशेरबहाद्दर परशरामभाऊ पटवर्धन एकदां हजामतीस बसले असतां न्हाव्याचा वस्तरा फार लागूं लागला. तेव्हां वस्तऱ्यास नीट धार लावून जरा जपून हजामत करण्याबद्दल त्यांनीं न्हाव्यास बजावलें. त्यावर न्हावीदादा बोलले, "काय राव, तुम्हांला वस्तरादेखील सोसत नाहीं, मग मोठमोठ्या लढाया कशाला मारतां!" अर्थातच परशुरामभाऊंना ही भाषा झोंबली, पण ते त्या वेळीं कांहीं बोलले नाहींत. हजामत संपल्यावर त्यांनीं आपला भाला मागवला व न्हाव्याचे पावलावर आपलें पाऊल दाबून धरून भाला अशा सफाईनें फेंकला कीं, त्याचें फाळ दोघांचे पावलांतून घुसून खालीं जमिनींत रुतलें. त्याबरोबर न्हावीदादांनीं बोंबाबोंब सुरू केली. वेदना असह्य झाल्यामुळें त्याला ओरडतांना पाहून परशुरामभाऊ शांतपणानें म्हणाले, "लेका, आतां कां ओरडतोस? भाला जसा तुझ्या पावलांतून तसा तो माझ्याहि पावलांतून आरपार गेला आहे. समजलें ना

तुला, आम्ही लढाईंतील जखमा कशा सहन करतों तें ! लढाई ती लढाई आणि हजामत ती हजामत. लढाईंतील सहनशीलता हजामतीचे प्रसंगींहि दिसून आली पाहिजे हा तुझा आग्रह कोठला !"

(४) एकदा पांच-सहा असामी एकमेकांच्या सोबतीनें प्रवासास निघाले. एका गावाहून दुसऱ्या गावास पायमार्गानें जात असतां वाटेंत त्यांना बराच मोठा ओसाड व रुक्ष प्रदेश लागला. वाट चालून चालून थकल्यामुळें सर्वांनाच तहान लागली होती. पण त्या निर्जन प्रदेशांत कोठें नदी-नालाहि लागेना. सर्वांचीं तोंडें अगदीं सुकून जाऊन घसा कोरडा पडला होता. इतक्यांत त्यांना एक विहीर लागली. विहिरीजवळ धांवून आंत डोकावून पाहतात तों पाणी फार खोल व आंत उतरण्यास वाटहि नाहीं. बरें, लोटा व रस्सी बरोबर घ्यावयाची तर तीहि कोणाजवळ नव्हती असा स्थितींत त्यांपैकीं एकाचे डोक्यांत एक अजब कल्पना आली. त्यानें आपल्या उपरण्याचें एक टोंक आपल्या जोड्याचे टाचेस घट्ट बांधलें व हळूहळू जोडा विहिरींत सोडला जोड्याचा पोहऱ्यासारखा उपयोग होऊन त्यानें जोडाभरून पाणी वर काढलें व त्यावर आपली तृषा शांत केली. नाहीं होय करतां करतां आपद्धर्म समजून इतरांनींहि तोच मार्ग स्वीकारला. राहता राहिला एकजण. हा मात्र खरा स्नानसंध्याशील धर्मनिष्ठ ब्राह्मण होता "तहानेनें प्राण व्याकूळ झाले तरी हरकत नाहीं, पण मी जोड्यानें कदापिहि पाणी पिणार नाहीं" असा आग्रह धरून इतरांनाहि त्यानें धर्मबाह्य वर्तना पासून परावृत्त करण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. हा सर्व प्रकार कधींकाळीं धर्माधिकाऱ्याचे कानावर गेल्यास तुम्हां सर्वांस तुमच्या या स्वैर वर्तनाबद्दल प्रायश्चित्त भोगावें लागेल असेंहि त्यानें बजावलें. पण त्या वेळीं त्याचें कोणींहि ऐकलें नाहीं. पुन्हा सर्वजण मार्गक्रमण करूं लागल्यावर जे जोड्यानें पाणी प्याले त्या पांच

त्यावरून पाहता ' हा एकटाच जोड्यानें पाणी प्याला व आता लबाड बोलतो ' असा सर्वांचा अभिप्राय पडला अखेर त्याला एकट्याला एकमतानें बहिष्कृत ठरविण्यात आलें अशा रीतीनें पूर्ण निरपराधी असताहि संगतीसंगदोषाचें खास प्रायश्चित्त त्यास भोगावें लागलें, आणि हें कशासाठीं तर पाचजणानीं संगनमत करून त्याचेविरुद्ध धडधडीत खोटा साक्षीपुरावा दिल्यामुळें. " पांचा मुखीं परमेश्वर " या सामान्य ममजुतीचा प्रसंगविशेषीं कसा उलटा फायदा घेता येतो तो पहा !

(५) १८८० सालापर्यंत पुण्या-मुंबईच्या सरकारी कॉलेजातून संस्कृत विषयाच्या प्रोफेसराचे जागीं कोणा तरी बड्या जर्मन स्कॉलरची नेमणूक व्हावयाची असा प्रघात चालू होता. १८८१ सालीं येथील डेक्कन कॉलेजचा संस्कृतचा युरोपियन प्रोफेसर ( हा बहुधा डॉ किलहॉर्न असावा ) रिटायर होऊन बिलायतेस परत जावयास निघाला त्या समयीं त्याला निरोप देण्यासाठीं पुण्या-मुंबईतील शिक्षण-संस्थांचे प्रतिनिधी व इतर पुष्कळ सद्‌गृहस्थ बंदरावर हजर होते. साहेबमजकुराना हारतुरे घातल्यावर ते बिलायतचे बोटीवर चढले व आगबोट बंदरापासून सुटू लागली इतक्यात प्रोफेसरमजकुराना आपलें संस्कृतचें अगाध ज्ञान प्रकट करण्याची लहर आली व ते डेकवरून बंदरावर जमलेल्या मडळींकडे हातवारे करून " शिवाऽस्ते पन्थान सन्तु " म्हणून ओरडू लागले त्याबरोबर बंदरावर जमलेल्या शास्त्री-पंडिताना हसू आवरता आवरता पुरेवाट झाली कारण " शिवाऽस्ते पन्थान सन्तु " या वाक्याचा अर्थ " तुमचा प्रवास सुखकर होवो " असा असल्यामुळें त्या वेळीं प्रोफेसरसाहेबाचे तोंडीं तें वाक्य अगदींच अस्थानीं व अप्रयोजक होतं बंदरावर निरोप द्यावयासाठीं जमलेल्या मंडळींपैकीं एखाद्यानें प्रोफेसरसाहेबाना उद्देशून हें वाक्य उच्चारलें असतें तर तें युक्त झालें असतें वास्तविक पाहता डॉक्टरसाहेबाचे मनातून " अनुगृहीतोऽस्मि । स्वस्ति भवद्भ्य । " यासारखें काहीं तरी .गावयाचें होतें, पण झाला प्रकार याच्या अगदीं उलट ! असो. यानंतर — जाकोबीसाहेबाची डेक्कन कॉलेजवर संस्कृत प्रोफेसराचे जागीं नमणूक व्हावयाचें घाटत होतें पण रानडे, तेलगप्रभृति वजनदार मंडळींच्या खटपटीनें त्या रिकाम्या जागेवर अखेर डॉ भाडारकराची नेमणूक झाली, आणि तेव्हापासून संस्कृत विषय शिकविण्यासाठीं विलायतेहून युरोपियन प्रोफेसर बोलावण्याचा प्रघात बंद पडला ही गोष्ट मुंबई इलाख्याचे तत्कालीन गव्हर्नर सर जेम्स फर्ग्यूसन याचे कारकीर्दीतील होय.

(६) ' डेक्कन ऐज्युकेशन सोसायटी ' स्थापन झाल्याबरोबर प्रारंभीं सरसेच काहीं निवडक, उत्साही व स्वार्थत्यागी शिक्षक मंडळी सहाह्यात सभासद म्हणून

येऊन मिळाली या सुशिक्षित होतकरू मडळींना व्यक्तिशः काहीं आर्थिक मदत करावी या सद्हेतूनें बडोदें सरकाराकडून "श्रीसयाजी–ग्रंथमालेसाठीं विषयवार विवक्षित इंग्रजी पुस्तकांचीं मराठी भाषांतरें करून मिळाल्यास योग्य पारितोषिक मिळेल" असें कळविण्यात आलें द्रव्यार्जनाच्या या अनायासें चालून आलेल्या सधीचा योग्य फायदा घेण्याचें बहुतेकांनीं ठरविलें या योजनेंत प्रो टिळकाचे नावापुढें काहीं तत्त्वज्ञानविषयक इंग्रजी ग्रंथ होते परंतु टिळकांनीं हें भाषांतराचे काम पत्करण्याचें कृतज्ञतापूर्वक नाकारलें त्यांनीं साफ कळविलें, "माझा जन्म साहेब लोकांनीं लिहिलेल्या ग्रंथांचीं भाषांतरें करून देण्यासाठीं नाहीं. माझे हातून पुढें मागें काहीं ग्रंथकर्तृत्व घडायचें असेल तर तें त्या त्या विषयावर मातृभाषेंत स्वतंत्र ग्रंथ निर्माण करण्यातच दृष्टोत्पत्तीस येईल. मला एखाद्या विषयावर स्वतंत्र ग्रंथ लिहावयास सागा माझी केव्हाहि तयारी आहे"

(७) एके दिवशीं कोणी एक इसम लोकमान्यांचे भेटीस येऊन सांगू लागला, "मी अगदीं गरीब असून सध्या पैशाचे अडचणींत आलों आहे प्रापंचिक विवचनेंत काळ कठीत असता काल रात्रीं मला एकाएकीं असा दृष्टांत झाला कीं, 'तू टिळकाकडे जा म्हणजे ते तुझी काळजी तत्काळ दूर करतील.' त्याप्रमाणें मी आपलकडे आलों आहें मला तूर्त पाचशें रुपयांची नड आहे, मेहरबानी करून तेवढी रकम द्याल तर माझेवरील सकट निवारण होईल" त्याच्या चेहऱ्याकडे पाहून हा भिक्षेकरी समाजांत लफंग्याचे कोटींतील एक असावा हें लोकमान्यांनीं ताडलें, व उत्तर दिलें—"बाबारे, तुला दृष्टांत झाला खरा, पण अद्याप मला कोठें झाला आहे? ज्या भगवताला तुझी येवढी काळजी त्यानें मलाहि त्याच घटकेस आगाऊ दृष्टांत द्यावयास पाहिजे होता कीं, अमुक अमुक इसमास मी आपलेकडे पाठविणार आहे, त्याला पैशाची मदत करा मला जोंपर्यंत तसा साक्षात्कार होत नाहीं तोंपर्यंत मी या बाबतींत काहीं एक करूं शकत नाहीं" त्यारीला हात हलवीत मुकाट्यानें घरचा रस्ता सुधारावा लागला.

(७) दुसऱ्या एका प्रसंगीं एक मतलबी बाई काहीं गुप्त कान-मंत्र देण्यासाठीं म्हणून आली, व लोकमान्यांना बाजूला बोलावून सांगू लागली—'मी माझ्या गुरूपासून स्वराज्याची गुरुकिल्ली हस्तगत करून घेतली आहे. करिता आता मला फक्त आपली मदत पाहिजे तेवढी मिळाली कीं, स्वराज्य हा, हा म्हणता पदरात पडेल." यावर लोकमान्यांनीं उत्तर दिलें, "बाई, तुम्हाला स्वराज्य प्राप्तीचा गुरुमंत्र व गुरुकिल्ली मिळाली आहे, तर मग माझ्या मदतीची अपेक्षा का करता? आपल्या सिद्धीचा उपयोग खुशाल करा व स्वराज्य मिळवा भावी इतिहासात झाशीच्या राणीसारखें तुमचें नाव अजरामर होईल, व आमचीहि तितकी मेहनत वाचेल" हें ऐकून बाई निरुत्तर झाल्या हें वेगळें सांगावयास नको

विलायतेहून परत आल्यावर अमृतसर कॉंग्रेसला जाण्यापूर्वी दरम्यान लोकमान्य काहीं राजकीय कामासाठीं मद्रासला जाऊन आले त्या वेळीं तेथील एका सुप्रसिद्ध प्राचीन देवालयात त्यांना पानसुपारी करण्याचें देवालयाचे पुजारी ब्राह्मणानीं ठरविलें, व त्याप्रमाणें निमंत्रण केलें देवालयाचे मुख्य सभामंडपात पानसुपारीचा जाहीर समारंभ झाल्यावर पुजारी मंडळी लोकमान्यांनीं अगदीं आतील मूर्तीचे गाभाऱ्यात घेऊन जाऊ लागली असता लोकमान्यांनीं आपण होऊन हळूच सुचविलें–" मी नुकताच विलायतचा प्रवास करून आलों असून प्रायश्चित्त वगैरे अद्याप काहीं घेतलेलें नाहीं." पुजारी ब्राह्मणांना ही गोष्ट माहीत असल्यामुळें ते म्हणाले, " आपण फक्त देशकार्यासाठीं विलायतेस गेला होता, व तिकडे अभक्ष्यभक्षण किंवा अपेयपान केलें नाहीं याबद्दल आमची खात्री असल्यामुळें आपणास प्रायश्चित्त घेण्याची मुळींच जरूर नाहीं कारण " तीर्थोदकं च वह्निश्च नान्यतः शुद्धिमर्हत ।" असें म्हणून त्यांनीं लोकमान्यांना बळेंच आत ओढलें, त्यांच्या डोक्यावर देवाचे मूर्तीचा रत्नखचित सोनेरी मुकुट धरला व मंत्राक्षता टाकल्या अशा प्रकारचा अपूर्व बहुमान तिकडे आजपर्यंत दुसऱ्या कोणास मिळालेला नाहीं असें लोक बोलतात

(१०) विलायतेंत हिंदी राजकीय सुधारणेवर जाहीर व्याख्यान देत असता मध्येंच एका श्रोत्यानें प्रश्न केला– ' २० ऑगष्ट १९१७ च्या पार्लमेंटरी अभिवचनावर विसंबून प्रस्तुतचा मॉन्टेग्यु–सुधारणाचा हप्ता ' पायरेचें निसुळतें टोंक ' समजून तूर्त स्वीकारण्यास हरकत काय ? " लोकमान्यांनीं तत्काळ उत्तर दिलें, " स्वयंनिर्णयाच तत्त्वानुरूप त्या पायरेवर पाहिजे तेव्हां मागून ठोका मारण्याची सत्ता आमचे हातां दिल्यास माझी काहींच हरकत नाहीं पण सध्या रंग दिसत आहे तो असा कीं, या पायरेवर दुसरा ठोका द्यावयाचा कीं नाहीं याचा कमींत कमी दहा वर्षानंतर पार्लमेंट पुन विचार करणार ! आणि माझी तक्रार आहे ती येवढ्यापुरतीच "

(११) १९२० चे प्रारंभीं प्रकृतीच्या अस्वस्थतेमुळें विश्रांतीसाठीं म्हणून लोकमान्य टिळक स्टेशनजवळील मातीवाल्याचे बंगल्यात महिना दोन महिने जाऊन राहिले होते तेथून ते सकाळ–सध्याकाळ खडवानी मॅन्द्रावरून बंड–गार्डनपर्यंत फिरावयास जात असत मीहि त्या वेळीं त्यांचेजवळ बंगल्यावर राहत असल्यामुळें त्यांचेबरोबर फिरावयास जात असे सायंकाळीं बंडगार्डनवर डॉ भांडारकर नियमित वेळीं येऊन बाकावर बसलेले असावयाचे एके दिवशीं त्यांना भेटावयाचें ठरवून फिरत फिरत लोकमान्य त्यांचे बाकाजवळ गेले व आदरपूर्वक अगदीं लवून नमस्कार करून "मी बळवंतराव टिळक नमस्कार करतों" असें मोठ्यानें म्हणाले, कारण डॉ. भांडारकरांना बरेच दिवसांपासून

ऐकू कमी येतें व फारसें दिसतहि नाहीं हें त्यांना माहित होतें. लोकमान्यांचा आवाज ऐकून मांडारकरांनीहि "अरे, तू इकडे कोणीकडे!" म्हणून मोठ्या प्रेमानें विचारपूस केली, व पुढें म्हणाले, "आज टाईम्सनें तुझ्यावर कडक टीका केली आहे" लोकमान्य म्हणाले, "हे चालावयाचेंच, पुढील वर्षांत टाईम्स कार्यांचें पाहून घेऊ" नंतर लोकमान्यांनीं आपण जवळ मोतीवाल्यांचे बंगल्यावर राहावयास आलों व त्यांचें घरधाद्देवास निवेदन करून अखेर " मी इतक्यांतच थकलों, आपल्यासारखें दीर्घायुष्य आमच्या नशिबीं नाहीं " असे उद्गार काढले त्याबरोबर मांडारकर म्हणाले, ' अरे, तुझ्यासारखा मी राजकीय उलाढालींत पडतों आणि तुझ्यावर जी संकटपरंपरा आदळली तिचा शतांश जर माझ्या वाट्यास येता तर मी मागेंच आटोपलों असतों जास्त दिवस जगण्यात सुख नाहीं दुःखें मात्र तितकीं अधिक पहावीं लागतात " इतकें बोलणें झाल्यावर थोडा वेळ विश्रांति घेऊन डॉ. मांडारकरांनी एका खिशातून एक मोठें घड्याळ व दुसऱ्या खिशातून 'मॅग्निफाइंग लेन्स' काढून किती वाजले तें स्वतः पाहिलें व " माझी जाण्याची वेळ झाली ' असें सांगून निरोप घेतला हा बहुधा टिळक-मांडारकरांच्या परस्पर भेटीचा अखेरचा प्रसंग होय।

(१२) याच सुमारास एके दिवशीं सायंकाळीं आम्ही उभयतां बंडगार्डनवर बसलों असतां लोकमान्यांची दृष्टि नदीपलीकडील टेंकडीकडे वळली, व ते म्हणाले— "ही सादिलबाबाची टेंकडी या टेंकडीवरील एकूण एक सडक व पाऊलवाट माझे चांगली परिचयाची आहे डेक्कन कॉलेजांत असतांना मी व आगरकर दोघांनीं या टेंकडीवर बसून कित्येक विषयांवर वादविवाद केले भावी आयुष्यक्रमासंबंधानें निश्चयक योजना केल्या चांदण्या रात्रीं कित्येक वेळां भटकत फिरलों गेले ते दिवस! उद्यां आपण जमल्यास लवकर फिरावयास निघू व टेंकडीवर काय काम चाललें आहे तें पाहून येऊ" सादिलबाबाची टेंकडी पाहून त्या वेळीं लोकमान्यांचे अंतःकरणांत उचंबळून आलेले मनोविकार—

बहोर्दृष्टं कालादपरमिव मन्ये जनपदं
निवेशः शैलानां तदिदमिति बुद्धिं द्रढयति ॥

यांपेक्षां फारसे भिन्न नसावेत या टेंकडीवर हल्लीं जो कै. शेट विठ्ठलदास ठाकरसी यांचा 'पर्णकुटी' नामक टोलेजंग राजवाडा झाला आहे त्यासाठीं पाण्याचे नळ टाकण्याचें काम त्या वेळीं नुकतें कोठें सुरू झालें होतें काहीं कारणामुळें पुढें लोकमान्यांबरोबर प्रत्यक्ष टेंकडीवर फिरावयास जाण्याचा योग आला नाहीं नाहीं तर आणखी काहीं गतगोष्टींचीं स्फुट स्मृतिचित्रें त्यांचे तोंडून ऐकावयास खचित सांपडलीं असतीं

(१३) एके दिवशीं लोकमान्यांच्या एका वहीच्या पहिल्याच पानावर—

> अम्भोजिनीवननिवासविलासमेव ।
> हंसस्य हन्ति नितरां कुपितो विधाता ।
> न त्वस्य दुग्धजलभेदविधौ प्रसिद्धां ।
> वैदग्ध्यकीर्तिमपहर्तुमसौ समर्थः ॥१॥

हें भर्तृहरीचें सुभाषित लिहिलेलें पाहून मीं आश्चर्य प्रकट केलें. तेव्हां ते म्हणाले—" ही वही मला तुरुंगांत मिळालेल्या वह्यांपैकीं आहे. सरकारी मालावर हा माझा शिक्कामोर्तब आहे. श्लोकाचा अर्थ असा कीं, सरकार मला फार तर शारीरिक निर्बंध घालूं शकेल, पण त्यांना माझे डोक्यांतील ईश्वरदत्त देणगी काढून घेतां येणें कदापिहि शक्य नाहीं."

(१४) सोमवार ता. ८ जून १९१४ रोजीं लोकमान्यांनीं मंडालेचा तुरुंग सोडला व अवघ्या दहा दिवसांत पुणें गाठलें. त्यानंतर कित्येक आठवडे वाट पाहूनहि सरकारनें मंडालेच्या तुरुंगांत त्यांचेपासून काढून घेतलेल्या गीतारहस्याच्या हस्तलिखित वह्या लवकर परत मिळण्याचें चिन्ह दिसेना. जसजसे दिवस लोटूं लागले, तसतसे सरकारच्या हेतूविषयीं लोक अधिकाधिक साशंक होऊं लागले. शेवटीं कांहींजणांनीं स्पष्ट बोलून दाखविलें कीं, " सरकारचें लक्षण कांहीं ठीक दिसत नाहीं. वह्या परत न करण्याचा विचार जवळ जवळ ठरल्यासारखा दिसतो." हे तर्क-कुतर्क लोकमान्यांच्या कानावर पडताच ते म्हणाले," भिण्याचें कांहींएक कारण नाहीं. वह्या सरकारच्या कबजांत असल्या तरी ग्रंथ माझे डोक्यांत आहे. फुरसतीचे वेळीं महिना दोन महिने सिंहगडावर बसून मी तो पुनः समग्र लिहून काढीन."

## दत्तो आप्पाजी तुळजापुरकर

( बी ए एलएल बी वकील ' श्रुतिबोधा ' चे एक माजी संहसपादक, मुंबई )

(१) टिळकाना ' लोकमान्य ' प्रथम कोणी म्हटलें याचा थोडासा मनोरंजक इतिहास आहे साधारण समजूत अशी आहे कीं, त्याच्या ज्युबिलीच्या उत्सव प्रसगीं गायकवाडवाड्यात स्वर्गातील देवानाहि पाहण्यासारखा जो अभूतपूर्व समारम झाला त्या प्रसगीं अध्यक्ष या नात्यानें महर्षि अण्णासाहेब पटवर्धन यानीं टिळकांच्या गुणवर्णनपर जें भाषण केलें त्यात त्यानीं स्वयस्फूर्तीनें त्याना ' लोकमान्य ' ही पदवी प्रथम अर्पण केली ज्युबिलीसारखा अद्वितीय प्रसग आणि अण्णासाहेब पटवर्धन यांच्यासारख्या अधिकारी पुरुषाच्या मुखांतून निघालेली वाणी, तेव्हा लोकमान्याचें ' लोकमान्यत्व ' तेव्हापासूनच सिद्ध झालें ही गोष्ट खरी परतु लोकमान्याना ' लोकमान्य ' ह्या विशेषणाचा जाहीर रीतीनें अहेर करण्याचा पहिला मान दुसऱ्या एका व्यक्तीकडे आहे. आणि ती व्यक्ति म्हणजे न्यू इंग्लिश स्कूलमधील सस्कृत शिक्षक महादेवशास्त्री ओक ही होय।

सन १९०५ सालची विजयादशमी या सुमुहुर्तावर पुण्यातील रविवार पेठेंतील एका मोठ्या वाड्यातील भव्य दिवाणखान्यात एक छोटासाच पण एका दृष्टीनें अद्वितीय असा एक समारम घडून आला वाड्याच्या मालकीण कै० श्रीमती दुर्गाबाई जोशी यांच्या मनात त्या वर्षीच्या चातुर्मासानिमित्त काहीं तरी निराळ्या तऱ्हेचें व्रत करण्याची कल्पना उद्भवली दुर्गाबाई या नव्या जुन्या दोनही मतांच्या अभिमानी होत्या व त्यांच्या वेळच्या साधारण सुशिक्षित स्त्रियात गणना[1] होण्याइतक्या त्या शिक्षितहि होत्या इंग्रजी शाळेतील सहाव्या सातव्या इयत्तेतील सस्कृतच्या काहीं निवडक विद्यार्थ्यांकरिता सस्कृतचा मोफत शिक्षणाचा एक वर्ग त्यानीं आपल्या घरीं सुरू केला व त्या कामावर ओकशास्त्री याची योजना केली ओकशास्त्री यांचें सस्कृत भाषेवरील प्रभुत्व व काव्य-व्याकरणासारखे विषय अत्यंत गोड व सुलभ रीतीनें शिकवण्याची त्याची हातोटी याविषयीं त्यांची त्याच वेळीं प्रसिद्धि झालेली होती. महाकाव्याचे काहीं सर्ग शास्त्रीबुवानीं विद्यार्थ्यांना शिकविले या व्रताचें उद्यापन दसऱ्याच्या सुमुहूर्तावर करण्यात आलें, व विद्यार्थ्यांना सटीक भगवद्गीतेची एक एक प्रत पारितोषिक म्हणून देण्यात आली हा उद्यापनाचा समारम टिळकाच्या हातून साजरा व्हावा अशी दुर्गाबाईंची फार मनीषा होती व ती पूर्णपणें सफल झाली टिळकानीं ह्या समारमाचें अध्यक्षस्थान आनदानें पत्करलें व आपल्या भाषणात स्त्रियाच्या दानधर्माच्या व व्रतवैकल्याच्या हल्लींच्या कल्पनेला नवीन वळण लावण्याचा प्रयत्न केल्याबद्दल दुर्गाबाई जोशी याचा आदरयुक्त भाषेंत

गौरव करून व अशाच तऱ्हेच्या प्राचीन काळीं भरत असलेल्या मोठमोठ्या शानसत्राची माहिती सांगून सभेंत जमलेल्या मंडळींना व विद्यार्थ्यांना बहुमोल असा उपदेश केला. या समारंभानिमित्त ओकशास्त्री यानीं खालीं दिलेले श्लोक रचले होते व त्याच्या छापील प्रतीहि त्या वेळीं सभेंत वाटण्यात आल्या होत्या—

क्व ते जगन्मान्य महानुभावता । क्व माननैषा च मया प्रयोजिता ॥
दृष्टां मदीयां तु विभाव्य भावनाम् । गृहाण गीतामुपदीकृतामिमाम्॥
इति सभाध्यक्ष लोकमान्य बाळ गंगाधर टिळकमुद्दिश्य—
जोशीवंशावतंसो दैन्यवनच्छेदने शितः परशुः ।
सुगृहीत नामधेयो भर्ता यस्यास्तु परशुरामोभूत् ॥
साहं तच्चरणांबुजदासी दुर्गा तदीय कृपयैव ।
चातुर्मास्यनिमित्तक नियममिममशक्यम् प्रपूरयितुम् ॥
अवहितमनसाधिगता विद्या युष्माभिरत्र बालवरा ।
इति तुष्टया मयैषा दत्ता गीतास्तु वः सदा भूषा ॥

यातील लोकमान्य शब्द शास्त्रीबुवानीं बुद्धिपुरःसर वापरलेला आहे त्याबद्दल त्या वेळीं थोडी वाटाघाटहि झाली होती. हे श्लोक अण्णासाहेब पटवर्धन यांच्याहि पाहण्यात पुढें आले होते. कदाचित् अण्णासाहेबाना ज्युबिलीसमारंभाच्या वेळीं भाषण करताना ओकशास्त्र्यांच्या 'लोकमान्य' या शब्दाचें सहज स्मरण होणेंहि संभवनीय होतें. कदाचित् त्या प्रसंगीं तो शब्द त्यांच्या मुखांतून सहज स्फूर्तीनेंहि बाहेर पडला असेल !

योगायोग मोठा विलक्षण असतो असें म्हणतात तें मात्र खरें. ह्याच दुर्गाबाई जोशी याचे पति परशुराम बाळकृष्ण जोशी हे कित्येक वर्षें टिळकांचा एखाद्या हाडवैऱ्यासारखा द्वेष करीत असत, आणि कारण काय तर मुळींच काहीं नाहीं ! तो प्रकार फारच मौजेचा आहे. जोशी हे पुण्यातील एक गर्भश्रीमंत सुखवस्तु गृहस्थ होते. माझ्या आठवणीप्रमाणें ते जवळ जवळ दहा वर्षे टिळकांचा कारणाशिवाय द्वेष करीत होते ! टिळकाना 'मॅनर्स' नाहींत, ते फार उद्दाम वृत्तीचे आहेत, गर्विष्ठ आहेत असें ते नेहमीं म्हणत. असें म्हणण्याचें तें एक कारण देत असत. कोठेंशी गाठ पडली असताना व चारदोन वेळां त्यानीं टिळकाना नमस्कार केला असताना टिळकानीं त्याना उलट नमस्कार केला नाहीं, एवढेंच नव्हे पण त्यांच्याकडे त्यानीं नुसतें ढुंकूनसुद्धां पाहिलें नाहीं ! एवढ्या मोठ्या अपराधाबद्दल त्यांनीं टिळकांचा द्वेष करू नये तर काय करावें ! पण पुढें एके प्रसंगीं चमत्कार असा झाला कीं, टिळकांच्याबरोबर मी एकदा बोलत उभा राहिलों असताना त्यानीं पाहिलें. मी कोणाबरोबर बोलत होतों

असें सहज त्यांनीं मला मागाहून विचारलें. टिळकांचें नाव सांगितल्याबरोबर ते एकदम दचकून म्हणाले 'काय, ते टिळक होते ? अरे, मी तर मग दुसऱ्याच कोणा मनुष्याला आजपर्यंत टिळक म्हणून समजत होतों !' ही गोष्ट टिळकांना १९०५ सालीं वरील समारंभाचें अध्यक्षस्थान स्वीकारण्याकरिता विनंति करण्यास गेलों होतों त्या वेळीं मीं सांगितली. तेव्हां ते हसून म्हणाले 'मग तर मला या समारंभाचें अध्यक्षस्थान अवश्य स्वीकारलें पाहिजे !'

(२) तरुण मुलांनीं उच्छृंखल बनावें अशाच तऱ्हेची टिळकांची त्यांना शिकवण असे, असा एक त्यांच्यावर आरोप करण्यांत येतो. पण ह्या बाबतींत माझा एक लहानपणाचा छोटासा अनुभव सांगण्यासारखा आहे. १८९५ सालची पुण्याची कॉंग्रेस अनेक कारणांमुळें प्रसिद्ध आहे. त्या वेळीं प्रथम टिळक व बॅ. गाडगीळ हे उभयतां रिसेप्शन कमिटीचे सेक्रेटरी होते. पण पुढें पुणेंकर व मुंबईकर नेमस्त मंडळींचें व टिळकांचें न पटल्यामुळें टिळकांनीं आपल्या सेक्रेटरीच्या जागेचा राजीनामा दिला. आम्ही मुलें कॉंग्रेसकरितां व्हॉलंटिअर झालेलें होतों. टिळकांनीं राजीनामा दिल्याबरोबर आम्हीहि आपले राजीनामे पाठवून दिले. मोठ्यांच्या नाचण्याचेंच अनुकरण करण्याचा हा आमचा प्रकार होता हें उघड आहे. पण त्या वेळीं आम्हाला त्याचें कौतुक वाटून टिळक त्याबद्दल आपल्याला शाबासकी देतील अशा भावनेनें आम्ही त्यांच्याकडे गेलों व थोड्याशा आत्मप्रौढीनें आमच्या राजीनाम्याची कथा त्यांना निवेदन केली ! पण "तुम्ही केलें हें बरें नाहीं. मोठ्या माणसांच्या क्लिष्ट स्वरूपाच्या वादांत तुम्ही मुलांनीं पडू नये. तुम्ही कॉंग्रेसचे व्हॉलंटिअर आहांत, टिळकांचे किंवा गाडगिळांचे नव्हत" वगैरे उलटा उपदेश करून त्यांनीं आमची निराशा केली !!

आलें होतें. 'पॅक्स्स' या सहींनें एका परोपकारी गृहस्थानें त्या लेखातील कांहीं भागाचें इंग्रजी भाषांतर टाईम्समध्यें प्रसिद्ध करून 'असल्या लेखकाला अदमानाची हवा खाण्यास का पाठवू नये?' असा सवाल केला होता त्याचबरोबर केसरींतील कांहीं लेखांचेहि उतारे प्रसिद्ध केले होतेच महाराष्ट्रमित्रकारावर त्या लेखाबद्दल खटला होणार व महाराष्ट्रमित्राचे त्या वेळचे तरुण संपादक साताऱ्याच्या कांहीं लोकांच्या भिडेस्तव लेखकाचें नांव सांगून आपण माफी मागून मोकळे होणार अशी साताऱ्याहून बातमी आली. अशा स्थितींत टिळकांना जाऊन भेटण्याशिवाय गत्यंतरच नव्हतें. आपल्या पत्रांत प्रसिद्ध झालेल्या लेखाबद्दलची जबाबदारी स्वतः वर न घेतां लेखकाला सरकारच्या तोंडीं देणें ही गोष्ट तर टिळकांना उघड उघडच पसंत पडण्यासारखी नव्हती. पण महाराष्ट्रमित्रकार जर तसें करणार असतील तर मीं काय करावें हा माझ्या दृष्टीनें मुख्य प्रश्न होता! लेखांत तसें विशेष कांहींच नव्हतें त्याला कांहीं विशिष्ट परिस्थितीमुळें कृत्रिम महत्त्व आलें होतें पण सरकारनें खटला केला आणि महाराष्ट्रमित्रकारांनीं माफी मागितली तर आपल्यालाहि माफी मागितल्याशिवाय किंवा मुकाट्यानें तुरुंगांत गेल्याशिवाय इलाज नाहीं अशी स्थिति होती एकानें माफी मागितल्यावर दुसऱ्यानें आपला बचाव तरी कसा करावयाचा? आणि केला तरी तो व्यर्थातच लंगडा ठरणार. लेखाबद्दल माफी मागण्याचा प्रसंग येऊं नये अशी साहजिकच इच्छा होती, पण तुरुंगांत जाण्याचा प्रसंग येऊं नये हीहि इच्छा तितकीच प्रबल होती!

वरील मजकूर १९२४ सालीं मी लिहित आहें या वेळीं महात्मा गांधींच्या दिव्य प्रभावामुळें राजद्रोह, तुरुंग वगैरे गोष्टी रोजच्या परिपाठांतल्या होऊन गेल्यासारख्या आहेत पण सत्तावीस वर्षांपूर्वीचें १८९७ साल तसें नव्हतें त्या वेळीं राजद्रोहाच्या गुन्ह्याकरितां तुरुंगांत जाण्यास तयार होणें ही गोष्ट अश्रुतपूर्व होती हें 'दिव्य' करण्यास कोणीहि खुषीनें तयार नव्हते सबंध हिंदुस्थानांत तरी असल्या निधड्या छातीचा एकच पुरुष निघाला यावरूनच त्या वेळीं हें दिव्य किती खडतर समजलें जात होतें याची कल्पना येईल तेव्हां 'महाराष्ट्रमित्र'काराचें राहू द्या, पण समजा, 'वेळ आली तर तुम्ही तुरुंगांत जाण्यास तयार आहां कीं नाहीं' या टिळकांच्या रोखठोक प्रश्नाला मीं होकारार्थी दिलेलें उत्तर तितकें मनापासून नव्हतें ही गोष्ट त्यांच्या लक्षांत आल्याशिवाय राहिली नाहीं. ते हसून म्हणाले 'इतकें भावरण्याचें कांहीं कारण नाहीं. लॉजिकच्या फॅलसीज किंवा ट्रिग्नॉमेट्रीचीं उदाहरणें तेथें तर तुम्हाला उत्तम सोडवतां येतील, आणि त्याचबरोबर जगांतल्या फॅलसीजचाहि विचार करण्यास मुबलक वेळ मिळेल!' मी म्हणालों 'फॅसिलिटीज मिळतील तर पुढें फॅलसीजचा अभ्यास करावयाचा आणि शिवाय माझ्यासारख्या अर्धवट शिक्षण झालेल्या गरीब विद्यार्थ्यानें तुरुंगांत जाण्यापासून काय मोठासा फायदा होणार आहे!'

"फॅसिलिटीज कोणत्याहि न दिल्या तरी तुरुंगांत विचार करण्याचें तुमचें स्वातंत्र्य तर कांहीं सरकार हिरावून घेऊं शकत नाहीं ! ही गोष्ट खरी कीं, तुम्हाला यामुळें बी. ए., एम्. ए. कदाचित् होतां येणार नाहीं पण दुसरीहि यशीं पुष्कळ कारणें असूं शकतील कीं, तुरुंगांत न जातांना सुद्धां तुम्हाला बी. ए. किंवा एम. ए. होतां येणार नाहीं. फरक एवढाच कीं, तुरुंगाच्या ह्या 'ॲक्सिडेंटमुळें' देशकार्याला हमखास उपयोगी पडणारा एक माणूस आम्हाला मिळूं शकेल."

पण हा सुप्रसंग किंवा कुप्रसंग पुढें आलाच नाहीं! महाराष्ट्रमित्रकर्त्यांनीं माफीहि मागितली नाहीं व लेखकाचें नावहि सांगितलें नाहीं. कदाचित् अतस्य रीतीनें सरकारला नांव कळलें असूनहि लेखकाच्या क्षुद्रत्वामुळें सरकारनें तिकडे दुर्लक्ष केलें असेल. पण टिळकांनीं मात्र त्या वेळीं महाराष्ट्रमित्राची बाजू उचलून धरून केसरींतील लेखापेक्षांहि त्याचें जास्त जोरानें समर्थन केलें व यातच त्यांचा मोठेपणा होता.

(४) अशाच तऱ्हेचा दुसरा एक पण लहानसा प्रसंग त्यानंतर आणखी तीन वर्षांनीं आला होता. मी त्या वेळीं सीनिअर बी. ए.च्या क्लासांत डेक्कन कॉलेजमध्यें 'रेसिडेंट स्टूडंट' म्हणून होतों. कॉलेजच्या वार्षिकोत्सवाचे वेळीं डॉ. भांडारकर यांचें व्याख्यान झालें. इंग्रजी राज्यामुळें 'आगगाडी–तारायंत्रादि किती तरी फायदे आपल्या देशाला झाले आहेत. इंग्रजी राज्य नसतें तर मी कोठें तरी रत्नागिरी जिल्ह्यांतील आपल्या खेडेगांवीं ज्ञानसंध्या करीत पळीपंचपात्री आपटीत बसलों असतों, अशा तऱ्हेचें त्यांच्या विद्वत्तेला न शोभणारें व प्रसंगाला अनुचित असें लांबलचक पतोजीवजा भाषण डॉक्टरसाहेबांनीं त्या वेळीं केलें. आम्हा विद्यार्थ्यांना तें भाषण रुक्ष व कंटाळवाणें वाटलेंच. पण कॉलेजांतील इतिहासाचे प्रसिद्ध प्रोफेसर मि. बेन यांनीं समारंभाचे अखेरीस डॉक्टरसाहेबांचे आभार मानतांना 'या वेळीं शिवाजी असता तर तो उत्तम क्रिकेटपटु बनला असता व नाना फडणविसांनींहि टेनिसच्या डावांत 'लव्हसेट' दिला असता' अशा तऱ्हेचें विनोदी भाषण करून डॉक्टरसाहेबांच्या अरसिकपणाबद्दल खूपच चेष्टा केली! या दोनहि भाषणांचा रिपोर्ट मीं केसरीला पाठवला होता तो केसरींत प्रसिद्ध करून त्यावर टिळकांनीं थोडीशी विनोदी टीकाहि केली होती. मराठ्यांतहि त्यावर कांहीं 'नोटस्' आल्या होत्या. डॉक्टरसाहेबांना किंवा त्यांच्या कांहीं मित्रमंडळींना ही गोष्ट रुचली नाहीं. त्यांच्या सांगण्यावरून त्याची कागाळी प्रथम सेल्बीसाहेबांपर्यंत व नंतर डायरेक्टर ऑफ पब्लिक इन्स्ट्रक्शनपर्यंत नेण्यांत आली. केसरींतील पत्र लिहिणाऱ्या विद्यार्थ्यांचा बारकाईनें शोध काढण्याची कामगिरी सेल्बीसाहेबांनीं आपल्या कांहीं आवडत्या फेलोजना व स्कॉलर्सना सांगितली व डायरेक्टरसाहेबांनीं भलत्याच स्पष्टोक्तीबद्दल बेनसाहेबांचे कान उपटून केलेली चूक

कोणत्या तरी निमित्तानें दुरुस्त करण्याबद्दल हळूच हुकूमवजा कानमंत्र त्यांना सांगितला. वेनसाहेब बिचारे साधे भोळे, त्यांनीं लागलीच एका लेक्चरचा प्रसंग साधून "तुम्हा लोकांना ( म्हणजे अर्थात् इंडिअन्सना ) सेल्फ–रिस्पेक्ट म्हणजे स्वाभिमान कसा तो मुळींच माहीत नाहीं परवाचेंच उदाहरण पाहाना ! आपल्या ऑनिव्हर्सरीच्या दिवशीं डॉ. भांडारकराचे आभार मानतांना मीं केलेल्या भाषणाचा भलताच अर्थ करून त्यावर केसरीनें व मराठ्यानें टीका केली हा काय त्या पत्रकर्त्यांचा स्वाभिमान झाला ? मी तशा अर्थानें काहीं बोललों नव्हतों .. "वगैरे काहीं तरी असंबद्ध भाषण करून त्या पापातून मोकळे होण्याचा प्रयत्न केला. वेनसाहेब म्हणजे माणूस उमदा. असल्या उमद्या स्वभावाच्या माणसावर न केलेली चूक दुरुस्त करण्याची जबरदस्ती केली म्हणजे त्याची जी त्रेधा उडते ती काहीं विचारू नका ! एक पाप टाळायला जावें तर दुसरें दत्त म्हणून पुढें उभें राहतें.

ह्याहि भाषणाचा समग्र रिपोर्ट तावडतोब केसरींत प्रसिद्ध झाला व त्याचबरोबर वेनसाहेबांच्या 'सेल्फरिस्पेक्ट' वर केसरींत व नंतर मराठ्यात झणझणीत टीकाहि आली. केसरींत प्रसिद्ध झालेलीं दोनहि पत्रें कॉलेजमधल्याच कोणा तरी विद्यार्थ्यानें लिहिलीं असलीं पाहिजेत याबद्दल कॉलेजच्या अधिकाऱ्यांची खात्री झाली कारण दुसऱ्या व्याख्यानाच्या वेळीं बाहेरचीं माणसें कोणीच नव्हतीं. तेव्हा त्या विद्यार्थ्याला शोधून काढून त्याच्या ह्या अविचारीपणाबद्दल तुसत्या कॉलेजातूनच काय पण युनिव्हर्सिटींतूनहि हकालपट्टी करण्याचा सेल्बीसाहेबांनीं चंग बांधला ! फेलोज आणि स्कॉलर्स त्या उद्योगाला लागले. कॉलेजमध्यें एक प्रकारची टेहळणी (Espionage) च सुरू झाली. क्लबात, जिमखान्यात, रीडिंग रूममध्यें किंवा क्लासात कोण कोणत्या मिषानें काय बोलत आहे ह्याबद्दल जो तो साशंक होत असे पण इतकें करूनहि शोध लागावा कसा ? शेवटीं एका कल्पक फेलोनें अशी कल्पना सुचवली कीं, ह्या प्रकरणाची खिसबातमी केसरी ऑफिसातून किंवा खुद्द टिळकांच्या घरून काढावयाची. मूळ लेखाचें हस्ताक्षरच सांपडलें म्हणजे मग तो पकाच पुरावा झाला टिळकांशीं ज्याचा स्नेह होता व त्याच्या घरीं ज्याचें जाणें येणें होतें अशा एखाद्याची काहीं मुलें त्या वेळीं कॉलेजमध्यें होतीं त्यांच्या मार्फत हा प्रयत्न होणार होता. हें समजल्याबरोबर मी मुद्दाम जाऊन टिळकांना ही हकीकत सांगितली तेव्हा ते म्हणाले 'केसरी ऑफिस किंवा टिळकांचें घर म्हणजे काहा सेल्बीसाहेबांचा बंगला नव्हे कीं, तेथला कोणताहि कागद चपराश्यान किंवा बटलरनें खुशाल उचलून आणून दुसऱ्याला दाखवावा ! हें शहाणपण आम्ही कोल्हापूर–प्रकरणाच्या वेळेसच शिकलेले आहोंत सेल्बीसाहेबांना हा गुंड्याला तुबड्या लावण्याचा रिकाम्या न्हाव्याचा उद्योग कोणी सांगितला ? तेथें त्याचें लॉजिक

किंवा फिलॉसफी कांहीं उपयोगी पडावयाची नाहीं. जास्त कांहीं गडबड केली तर सागा, म्हणजे त्यानाहि चागले रिंगणावर घरू. डेक्कन कॉलेज म्हणजे सी. आय्. डी. चे ऑफिसर्स तयार करण्याचा कारखाना आहे कीं काय ?'

(५) लेखाला अनुरूप, अन्वर्थक परतु वित्ताकर्षक असा मथळा घालण्याची टिळकाना विलक्षण हातोटी साधलेली होती. हेडिंग पाहिल्याबरोबरच लेख वाचण्याची वाचकाची जिज्ञासा दसपट वाढली पाहिजे! कित्येक वेळीं दुसऱ्याच्या लेखाचें नुसतें हेडिंग बदलूनच त्या लेखाला ते विलक्षण स्वारस्य आणीत असत. वरील दुसऱ्या लेखाला मी 'प्रो. बेन व मेस्मेरिझमचा प्रयोग' असें हेडिंग दिलेलें होतें. त्यांनीं लेख वाचल्याबरोबर तें हेडिंग बदलून 'साधे भोळे प्रो. बेन याचा स्वाभिमान' असें दुसरें जास्त अन्वर्थक व सूचक हेडिंग दिलें. लेखाच्या मथळ्याला त्यांनीं एकदा स्त्रियाच्या नथेची उपमा दिली होती. खरेंच, नथेमुळे मूळच्या सौंदर्यांत तर भर पडतेच पण मुळींच सौंदर्य नसलें तरी ती उणीव कांहीं अशीं तरी भरून येते!

(६) केसरीचा पूर्वीचा आकार वाढवून किंवा पृष्ठें जास्त घालून केसरीची उपयुक्तता वाढविण्याची कल्पना जेव्हा टिळकाच्या मनात आली, तेव्हा वर्गणी किती वाढवावयाची हा प्रश्न अर्थातच उपस्थित झाला. मीं त्याना लिहिलें कीं, केसरीची वर्गणी एक रुपयाच ठेवण्यात एक प्रकारची 'जादू' आहे. ह्या जादूनें भारले गेलेले केसरीचे वाचक केसरीला हजारों नवीन वर्गणीदार मिळवून देतील. या वेळीं मी हैद्राबादेस होतों. पुढें लवकरच सुरतेची कॉंग्रेस झाली, तेव्हा सुरतेस आम्ही उतरलों होतों त्याच 'घीकाट्या' च्या वाड्यात वरील विषयाची कांहीं निवडक मडळींमध्यें खासगी चर्चा झाली महाराष्ट्रात आपल्या मडळीचे एक इग्रजी दैनिक असावें. केसरीहि दैनिक करावा, निदान तो द्विसाप्ताहिक तरी असावा अशी एक मीं सूचना केली. ही ऐकून टिळक म्हणाले 'आणि ह्या सगळ्या गोष्टी एक रुपया वर्गणीच्या जादूनेंच घडवून आणावयाच्या कीं काय ? तुमच्या हैद्राबादच्या अधेर नगरींत कदाचित् 'टका शेर खाजा' मिळत असेल, पण ही मोंगलाई आमचेकडे नाहीं!'

(७) सुरतेस आमच्या 'घीकाट्या'लाहि एक प्रकारचें महत्त्व आलें होतें; 'घीकाटा' म्हणजे मध्यें मोठा चौक असलेला एक प्रशस्त चौसोपी असा वाडा होता. त्याच ठिकाणीं राष्ट्रीय पक्षाच्या बहुतेक सर्व सभा भरत असत. पण त्याचेंहि एक विशेष कारण होतें. राष्ट्रीय पक्षाला आपल्या सभा भरवण्याला सुरतेस कोठें जागाहि मिळू नये अशा तऱ्हेचा आटोकाट प्रयत्न नेमस्त पक्षाच्या कांहीं अभिमान्यांनीं केला होता सुरत शहर म्हणजे फेरोजशहा मेथा याचे मानस पुत्र त्रिभुवनदास माळवी यांचें माहेरघर आपल्या समतीशिवाय सुरतेस इकडचें

पानहि तिकडे हलणार नाहीं, अशी माळवी यांना घमेंड होती व ती बऱ्याच अंशीं खरीहि होती. त्यांच्या हस्तकांनीं राष्ट्रीय पक्षाला आपल्या सभा भरवण्याला प्रशस्त अशी जागाच मिळूं दिली नाहीं. भोजनाची वगैरे व्यवस्था स्वतंत्र असल्या-मुळें आम्ही कांहीं मंडळींनीं धीकांट्याच्या वाड्यांत आपली उतरण्याची स्वतंत्र अशी सोय केली होती. तो सर्वच वाडा आमचे ताब्यांत होता, त्यामुळें दुसऱ्या प्रशस्त जागेच्या अभावीं धीकांट्यातच राष्ट्रीय पक्षाच्या सभा भरूं लागल्या. सभेला जागा न देण्याबद्दल वाड्याच्या मालकाकडून प्रथम आम्हाला खाजगीच निरोप आला. आम्ही अर्थातच तिकडे दुर्लक्ष केलें. तेव्हां जागा खाली करून देण्या-बद्दल त्यांनीं निकड लावली, पण तेंहि आम्ही नाकारलें. लबाडीनें फसवून आमची तेथून हकालपट्टी करण्याचा थोडासा प्रयत्न करण्यांत आला. पण आमच्या बरोबरच्या कांहीं मंडळींच्या दक्षतेमुळें तोहि साधला नाहीं. शेवटीं जबरदस्तीनें कबजा घेण्याचा प्रयत्न होईल असा रंग दिसूं लागला. तेव्हां आम्ही काय करावें हा प्रश्न आला. टिळकांनीं स्पष्ट सांगितलें कीं ' जागेचा कबजा तूर्त तुमचा आहे तो तुम्ही मुळींच सोडावयाचा नाहीं. मालकाला वाटलें तर त्यानें कोर्टाकडून इंजंक्शन आणावें. जबरदस्ती किंवा दांडगाई केल्यास त्याची जबाबदारी अर्थात् मालकावरच राहील. ' पुढें मालकांनींहि मग तो नाद सोडून दिला.

(८) अध्यक्षाच्या निवडणुकीला मरकाँग्रेसमध्यें उपसूचना आणावयाची असें सर्वानुमतें ठरल्यानंतरहि काँग्रेसचे नियोजित अध्यक्ष डॉ. रास बिहारी घोष हे बंगाली आहेत एवढ्याच कारणाकरितां अश्विनी कुमार दत्त व मोतीलाल घोष यांच्यासारखे राष्ट्रीय पक्षाचे बंगाली पुढारीहि त्या उपसूचनेला काँग्रेस-मध्यें उघड रीतीनें अनुमोदन देण्यास तयार नव्हते, याचेंहि टिळकांना एका दृष्टीनें कौतुक वाटलें. त्या वेळीं सहजगत्या त्यांच्या तोंडांतून खालील उद्गार बाहेर पडले–" नाहीं तर आमचे XXX पहा ! एवढी महाराष्ट्रीय मंडळी येथें आहेत; पण ते कधीं इकडे आले किंवा कोणाच्या भेटी घेतल्या किंवा कोणाला चार समजुतीच्या गोष्टी सांगितल्या, असें कांहीं केलें असतें तर लोकांनाहि आपलेपणा वाटून विनाकारण वाढत चाललेल्या विरोधाला कांहीं तरी आळा बसला असता. "

(९) काँग्रेसच्या दुसऱ्या दिवशीं मंडपांत जी दंगल उडाली ती टिळकांनीं पूर्वसंकेताप्रमाणें जाणूनबुजून घडवून आणली अशी त्या वेळीं सर्रास समजूत झाली होती व अजूनहि पुष्कळ लोक ती खरी आहे असें मानतात. पण हें केवळ असत्य आहे. काँग्रेसच्या पहिल्या दिवशीं सुरेंद्रनाथ बानर्जींना कांहीं मंडळींनीं आरडा-ओरडा करून बोलूं दिलें नाहीं ही गोष्ट स्वतः टिळकांना मुळींच आवडली नाहीं. काँग्रेसमध्यें राष्ट्रीय पक्षाचें बहुमत नव्हतें. आपल्या अल्पसंख्याक पक्षाचें का होईना पण स्वतंत्र अस्तित्व काँग्रेसमध्यें स्थापित झालें तरी पुरें असस आहे. बहुमत

यदा नधलें तरी पुढच्या वर्षी आपल्या बाजूनें होईल किंवा त्याच्या पुढच्या वर्षी होईल. तोंपर्यंत राष्ट्रीय पक्षानें कॉंग्रेसमध्यें राहूनच जेवढ्या गोष्टी करता येतील तेवढ्या कराव्या असें त्यांनीं आपलें स्पष्ट मत दिलें होतें. पण फेरोजशहा मेथा यांच्या अरेरावी व चढेलपणाच्या वर्तनामुळें कांहीं मंडळी अगदीं चिडून गेली होती. त्यामुळें निदान अध्यक्षाची निवडणूक तरी सरळपणानें होऊं देऊं नये असा त्यांचा कटाक्ष होता. त्यातून सुरेंद्रनाथ बानर्जींनीं आपल्या कांहीं उद्गारांनीं राष्ट्रीय पक्षाला दुखावलें होतें तोहि राग त्यांच्या मनांत होताच. कदाचित् सुरेंद्रनाथांच्या ऐवजीं दुसऱ्या कोणी पुढाऱ्यानें अध्यक्षाची सूचना पुढें मांडली असती तर पहिले दिवशीं झाला इतका धारडाओरडा झाला नसता पण कांहींहि असलें तरी पहिले दिवशीं झालेला प्रकार टिळकांना पसंत पडला नाहीं. याबाबतीं झालेल्या दोन्ही तिन्ही खासगी घाटाघाटींच्या वेळीं मी हजर होतों अध्यक्षाच्या निवडणुकीलाही आपल्याला पद्धतशीर विरोध करता आला असता, पण नुसती दंगल करण्यांत काय अर्थ होता ! असें त्यांनीं आपलें स्पष्ट मत दिलें होतें.

अध्यक्षाच्या निवडणुकीला भर कॉंग्रेसमध्यें उपसूचना आणण्याचें काम शेवटीं सर्वानुमतें टिळकांच्यावर सोंपवण्यांत आलें. परंतु त्यांनीं आपल्याकडून स्पष्ट सांगितलें होतें कीं, 'बहुमत आपल्या बाजूनें नसल्यामुळें ही उपसूचना अखेर नापास होईल. आजपर्यंतची पद्धत अशी होती कीं, कॉंग्रेसच्या अध्यक्षाची निवडणूक एकमतानें व्हावयाची. तेव्हा त्यांतलें स्वारस्य कमी करण्याकरिताच फक्त आपल्या उपसूचनेचा उपयोग होईल, हीहि गोष्ट कॉंग्रेसच्या इतिहासांत आजपर्यंत घडून आली नाहीं अशी होईल. पण सर्वांनीं शांतपणा धरला तरच हें होणार आहे... ..' ह्याप्रमाणें सर्वांनीं कबूल केलें नंतर कॉंग्रेसमध्यें येणाऱ्या दुसऱ्या ठरावांपैकींहि कोणकोणत्या ठरावावर कसा विरोध करावयाचा याचीहि साधारण चर्चा झाली. यावरून कॉंग्रेस उधळून लावण्याचा टिळकांचा पहिल्यापासूनचाच बेत होता, हें म्हणणें किती खोटें आहे हें दिसून येईल. ठरल्याप्रमाणें सुरेंद्रनाथांचें भाषण मुरळीतपणें पार पडलें. कोणी हू कीं चू सुद्धा केलें नाहीं पण टिळक आपली उपसूचना कॉंग्रेसपुढें मांडण्याकरिता जेव्हा प्लॅटफॉर्मवर जाऊं लागले त्या वेळीं त्यांना प्लॅटफॉर्मवरच न येऊं देण्याचा अश्लाघ्य प्रयत्न कांहीं मंडळींकडून करण्यांत आला. मी तेथून सुमारें चार-पांच हातांच्या अंतरावरच प्रेस-रिपोर्टरच्या लाईनमध्यें बसलेला होतों. त्यामुळें मला या सर्व गोष्टी प्रत्यक्ष पाहण्यास सांपडल्या टिळकांना धक्का देण्यापर्यंत मजल गेली. तेव्हा नागपूरचे डॉक्टर गद्रे व आणखी एक-दोन मंडळी प्लॅटफॉर्मवर घुसली. तरी सुद्धा टिळकांना अध्यक्षाच्या खुर्चीपर्यंत मोठ्या कष्टानें जाता आलें. टिळक बोलावयाला आरंभ करणार तोंच नेमस्त पुढाऱ्यांच्या अनुयायांनीं 'नो' 'नो' चा गोंगाट सुरू केला. एका सद्‌गृहस्थानें त्यांच्या अंगावर खुर्ची फेंकली व दुसऱ्या एकानें

त्याच्याशीं लगट करून त्यांना प्लॅटफॉर्मवरून खालीं ओढण्याचा प्रयत्न केला. त्या प्रसंगीं पंडित मदन मोहन मालवीय जर मध्यें आडवे आले नसते तर टिळकांना खालीनें काहीं तरी इजा झाली असती मंडपांत आरडाओरडा व गोंगाट सारखा चालूच होता त्याच वेळीं इतिहासप्रसिद्ध पुणेरी जोडा प्लॅटफॉर्मवर फेंकण्यात आला व त्याच्या अशुभ आगमनामुळें मिळून जाऊन फेरोजशहा मेथा मागच्या दारानें बाहेर निघून गेले. पुढें काय झालें हें सर्वश्रुतच आहे, व तो इतिहास कथन करण्याचें हें स्थळहि नव्हे.

झालेल्या प्रकारामुळें अरविंद घोष यांच्यासारखीं माणसेंसुद्धां दिङ्मूढ होऊन गेल्यासारखीं झालीं होतीं. दंगा आटोपल्यानंतर टिळक, अरविंदबाबू व इतर काहीं मंडळी मागच्या बाजूच्या एका तंबूत काहीं वेळ थांबली होती. तेव्हां टिळक अरविंदबाबूंना म्हणाले 'इतके हवाय (नर्व्हस्) होण्याचें काहीं कारण नाहीं. असल्या सभा मोडण्याच्या दंगलीचा आम्हाला पुण्यास पुष्कळदा अनुभव आलेला आहे.' आमच्याबरोबर हैद्राबादेहून आलेले एक डेलिगेट, दिनकर नारायण पटवर्धन यांच्या डोक्याला एका गुंडाच्या लाठीनें भयंकर जखम झाली होती. मंडपात झालेल्या दंग्यामुळें पोलिसांकडून काहीं धरपकड होण्याचा संभव होता. पटवर्धनांच्या जखमेची हकीकत मी जेव्हां टिळकांना सांगितली तेव्हां ते म्हणाले, 'पोलिसांकडून काहीं पकडापकडी झाल्यास ही पटवर्धनाची जखम आपल्या बाजूनें उत्तम पुरावा होईल कारण मारामारी कोणीं केली, हें यावरून बिनतोड साबीत होणार आहे.'

दिलें 'चांगला स्वयपाक करण्याबद्दल आभार मानून घेण्याइतक्या आमच्या महाराष्ट्रातील स्त्रिया पाश्चात्य स्त्रियाप्रमाणें अरसिक किंवा उपयुक्ततावादी नाहींत!'

(११) टिळक मंडाल्याहून सुटून आल्यानंतर मी प्रथम त्यांना भेटावयाला गेलों. त्या वेळीं त्यांचा पहिला प्रश्न हा होता कीं, 'तुमच्या हैद्राबादच्या नबाबसाहेबांनीं तुमचीहि उचलबांगडी केलीना ?' मी म्हणालों 'नबाबसाहेबांनीं काहीं नाहीं, पण रेसिडेंटबहादुरांनीं केली पण सी आय डी नें माझ्याविरुद्ध केलेल्या रिपोर्टांत मी आपला भाचा आहें असा एक रिपोर्ट होता!' त्यावर ते हसून म्हणाले, 'याचेंच नाव सी आय् डी, नाहीं तर खऱ्या रिपोर्टाला सी आय् डी पाहिजे कशाला?'

(१२) इंग्लिश लोकांच्या खऱ्या स्वरूपाची ओळख ज्या थोड्या लोकांना झाली होती त्यांत लोकमान्य आग्रगण्य होते पण इतकें असूनहि ब्रिटिश कोर्टावर त्यांचा जो विलक्षण विश्वास होता त्याबद्दल प्रत्येकाला आश्चर्य वाटत असे कायद्याचा कीस काढून कोर्टांच्या शेवटल्या पायरीपर्यंत भांडत जाणें या गोष्टीचें जणु काय त्यांना बाळकडूच मिळाल्यासारखें होतें, अशी सर्वसाधारण समजूत आहे ज्युबिलीच्या वेळेसच त्यांच्यावर जामिनकीचा खटला झाला जामीन घेण्याबद्दल झालेल्या हुकुमावर हायकोर्टांत अपील दाखल झालें होतें त्या वेळीं खटल्याच्या कायदेशीर स्वरूपाबद्दल व अपिलांत करावयाच्या तक्रारीबद्दल व होणाऱ्या निकालाच्या अंदाजाबद्दल त्यांचें माझें बरेंच बोलणें झालें होतें खालच्या कोर्टांत फिर्यादीतर्फे म्हणजे सरकारतर्फे गायडर यांची साक्ष घेतली नाहीं, त्यामुळें कायद्याच्या दृष्टीनें जरूरीच्या परंतु न्याय-अन्यायाच्या दृष्टीनें विशेष महत्त्वाच्या नसलेल्या काहीं गोष्टी शाबीत होण्याच्या तशाच राहून गेल्या होत्या ह्या फिर्यादीपक्षाच्या वैगुण्यावर त्यांचा फार कटाक्ष होता, व बॅ जिना यांनी या मुद्यावरच अपिलाच्या सुनावणीच्या वेळीं जोर द्यावा असा त्यांचा आग्रह होता हा कायद्याचा कीस काढण्याचा प्रकार हल्लींच्या जज्जांना तितका मानवत नाहीं फिर्यादी पक्षाच्या असल्या वैगुण्यानें आरोपीचें तसेंच काहीं विलक्षण नुकसान झाल असेल तर एखादे वेळीं असल्या तक्रारीचा फायदा होतो एरवीं असल्या तक्रारीनें जज्जाचे मनावर उलट परिणाम होण्याचा संभव जास्त हें माझें म्हणणें त्यांना यथार्थतच पटलें नाहीं कायद्याचा कीस काढून राजकीय स्वरूपाच्या खटल्यांत ब्रिटिश कोर्टांत न्याय मिळवण्याच्या त्यांच्या विलक्षण आशावादि-याबद्दल मीं आश्चर्य प्रदर्शित केलें तेव्हा ते म्हणाले—'ब्रिटिश कोर्टांवरील माझा विश्वास अनाठायीं आहे असें पुष्कळ लोक म्हणतात, पण एकदोन महत्त्वाच्या गोष्टींचा ते विचार करीत नाहींत ब्रिटिश लोक हे जात्याच कायद्याचे अभिमानी आहेत अन्याय करावयाचा असला तरी ते कायद्याच्या कलमाखालीं करतात, तेव्हा त्यांच्याच

शस्त्राचा उपयोग त्यांच्याविरुद्ध करावयाचा एवढाच उद्देश मिन्टी कौन्सिलपर्यंत भांडत आण्यांत किंवा कायद्याचा कीस काढण्यांत असतो. एखादे वेळेस त्यांच्या जातिस्वभावाचा फायदा मिळतो, पण न मिळाला तरी त्यांच्या अन्यायाचें हिडीस स्वरूप सगळ्या जगाला दाखवावयाला मिळतें. हा काय थोडा फायदा आहे ! लोकजागृति करण्याचें हें एक अमोघ शस्त्रच आहे.

(१३) आम्ही डेकन कॉलेजमध्यें असतांना ' संस्कृतांत टिळक श्रेष्ठ कीं, भांडारकर श्रेष्ठ ' असा एकदां वाद लिघाला होता. कॉलेजच्या विद्यार्थीचाच तो वाद; तेव्हां त्यांत सहजिकच दोन पक्ष झाले होते. आम्ही अर्थातच टिळकांच्या बाजूचे होतों. शेवटीं कॉलेजांतील संस्कृत शास्त्रीबोवापर्यंत तें प्रकरण गेलें. त्यांना टिळक व भांडारकर दोघांचीहि माहिती होती. परंतु त्यांनीं आपला निर्णय भांडारकरांच्या बाजूनें दिला. आम्हांला साहजिकच थोडें वैषम्य वाटलें. तेव्हां एकदां संधि साधून आम्ही त्याबद्दल टिळकांनाच प्रश्न केला. ' मला संस्कृत भाषेची केव्हांहि ' डिफिकल्टी ' आली कीं मी प्रथम भांडारकरांकडे जातों, यावरून संस्कृत चांगलें कोणाचें याचा तुम्हीच निर्णय करा ' असें मार्मिकपणाचें उत्तर देऊन त्यांनीं आमचीच फजीति केली !

---

(१४) लेखक या दृष्टीनें त्यांची योग्यता फार उच्च दर्जाची होती, वर्तमानपत्रांतील भाषेला नवीन वळण त्यांनी लावलें. परंतु याहि बाबतींत त्यांच्यावरहि मात करणारे गृहस्थ त्यांच्याच शिष्यवर्गांत उत्पन्न झाले आहेत. केसरींतील केळकरांचे कांहीं लेख टिळकांच्या लेखांपेक्षांहि जास्त सरस वठलेले आहेत. दिल्ली-दरबाराच्या वेळेस दिल्लीवर लिहिलेला केळकरांचा केसरींतील अग्रलेख ह्या गोष्टीची साक्ष कोणालाहि पटवील. पुष्कळ वेळां असे प्रसंग आले आहेत कीं, केसरींतील केळकरांनीं लिहिलेल्या लेखांची टिळकांचे लेख म्हणून तारीफ करण्यांत आली होती, व स्वतः टिळकांनीं लिहिलेले कांहीं लेख लोकांना नीरस वाटल्यामुळें त्यांची जबाबदारी केळकरांवर ढकलली गेली होती. केसरींत एक-दोन आठवडे कडक किंवा चुरचुरीत लेख न आले तर केसरी पिळपट झाल्याबद्दल तक्रारींचीं पत्रें लोकांकडून खुद्द टिळकांकडेहि जात असत. एकदां एक गृहस्थ अशीच तक्रार घेऊन त्यांच्याकडे गेले होते, व केसरी दुसऱ्याच्या हातांत द्यावा अशी त्यांनीं त्यांना विनंति केली. त्यावर टिळकांनीं त्यांना उत्तर दिलें कीं, 'गेल्या महिन्यांतील सबंध केसरीचे अंक माझ्याच हातचे आहेत. ते जर तुम्हाला पसंत नाहींत तर

केसरी दुसऱ्याच्या हातात देणें हाच एक मार्ग मला प्रशस्त वाटतो! नेहमीं चुरचुरीतपणा किंवा खमगपणा आणावयाचा कोठला?

---

## श्रीपाद महादेव माटे

[ एम्. ए., अस्पृश्यतानिवारण-कार्यकर्ते, पुणें ]

लोकमान्य विलायतेस जाण्यासाठीं निघण्याच्या आधींची गोष्ट. मी व माझे मित्र हरिभाऊ फाटक सर्व हिंदूंना प्रवेश मिळेल असें देवालय बांधण्याच्या नादात होतों. मी एके दिवशीं रा. रा. व्ही. आर. शिंदे यांजकडे जाऊन म्हणालों कीं, "आमची अशी अशी कल्पना आहे, आपल्याला काय वाटतें?" यावर त्यांनीं उत्तर द्यावयाचें तें दिलें. पण त्याच्यापूर्वीं मला विचारिलें कीं, तुम्ही टिळकांकडून आला आहात काय? मला याचा अर्थ कळेना. मी त्या वेळेपर्यंत टिळकांच्याशीं एक शब्दहि बोललों नव्हतों आणि हे मला असें का विचारतात? असें मला वाटलें. म्हणून मी रा. शिंदे यांना म्हणालों "माझ्या मनात ही देवळाची कल्पना येताच, तुम्ही या अस्पृश्य विषयातील जाणते म्हणून तुम्हासच पहिल्यादा विचारावयास आलों. माझी व टिळकांची मुळींच ओळख नाहीं" रा. शिंदे म्हणाले "मीं तुम्हास असें विचारलें याचें कारण इतकेंच कीं, टिळक ही कल्पना मजजवळ बोलले होते व ही जर अमलात आली, म्हणजे असें मंदिर जर झालें, तर फार नामी गोष्ट होईल, असें म्हणाले होते." आपल्या मनात असलेली कल्पना खुद्द लोकमान्याच्याहि मनात आलेली आहे हें पाहून मला आनंद झाला व त्याची स्वत ची गाठ घेऊन ते या विषयासबधीं काय बोलतात तें पाहावें म्हणून त्याजकडे जाण्याचें मीं ठरविलें.

रा. दत्तोपंत आपटे म्हणजे प्रसिद्ध इतिहाससशोधक व तेव्हाचे चित्रमय जगतचे सपादक हे आमच्या हरिभाऊचे मित्र व टिळकांच्या उत्तम परिचयाचे. तेव्हा माझी टिळकांशीं मुलाखत त्यांच्या द्वारा घडवून आणण्याची योजना हरिभाऊनीं केली. ठरल्याप्रमाणें सकाळीं आठाच्या सुमारास मी गेलों. लोकमान्याच्या राहत्या घरात माडीवरील मधल्या सोप्यात आम्ही बसलों. लोकमान्य आराम-खुर्चीवर बसले व मला समोरील खुर्चीवर त्यांनीं आग्रहानें बसविलें. मीं माझी कल्पना सागितली. सागताना माझें विषयान्तर होत आहे असें त्याना

वाटलें कीं ते म्हणत " तें निराळें. " असें दोन-तीनदां झालें. माझ्या ध्यानांत इतकेंच आलें कीं, मी फार विस्तारानें बोलावें अशी त्यांची इच्छा नाहीं. असो; माझ्या कल्पनेवर लोकमान्य फार ठासून व रेंखीव बोलणें बोलले. " ही खटपट तुम्ही जरूर करा; सर्व हिंदु देवळांत एकत्र जमविणें हें अगदीं इष्ट आहे, " असें ते म्हणतांच मी म्हणालों ' आम्ही थोडी योजनाहि केली आहे ' व तिचें रूप थोड्यांत सांगितलें. त्यावर ते म्हणाले " उगाच खोपट बांधूं नका. मी परत विलायतेहून येईपर्यंत यत्न करा. मोठ्या मुंबईच्या माणसालाहि आंत येण्याला लाज वाटणार नाहीं असें चांगलें भव्य मंदिर बांधा. मी तेथें येईन व सर्वांसमोर मला जें बोलावयाचें तें-Announcement स्पष्टपणानें बोलेन. " हे त्यांचे शब्द ऐकून मला अतिशय आनंद झाला. त्यांचें मत निश्चित व मांडणेंहि निश्चित. मी त्यांना सभांतून वगैरे पुष्कळ वेळां पाहिलें होतें. नजीकहून पाहून व त्यांचें रेंखीव बोलणें ऐकून माझा आदरभाव द्विगुणित झाला. शेवटीं मी म्हणालों "हें आपलें मत मी प्रसिद्धपणें बोललों व त्याचा Propaganda च्या कामीं उपयोग केला तरी चालेलना ! " लोकमान्य लागोलाग उद्गारले ",खुशाल करा. " हा प्रश्न मीं संकोचानेंच केला होता. पण त्याचें उत्तर मात्र एकदम व खुलासेवार आलें. इतकें बोलणें होत आहे तोंच व कदाचित् तें पुढें चालू राहील असें वाटत असतांना ग. भट आंत आले व लोकमान्यांच्या आजारी असलेल्या मुलाला पाहावयास डॉक्टरला घेऊन आल्याचें त्यांनीं सांगितलें. मी विषय संपविला व नमस्कार करून निघालों.

---

## वामन कृष्ण दातार

[ प्रमुख नट, महाराष्ट्र नाटक मंडळी. ]

१९२३ च्या सुमारें आक्टोबरमध्यें आम्ही कर्नाटकांत जात असतांना वाटेंत एका विद्वान दशग्रंथी वैदिकाकडून लोकमान्यांसंबंधीं मला बरीच नवीन माहिती मिळाली. तीवरून लोकमान्यांचें ऋग्वेदाचें वाचन व अध्ययन किती सूक्ष्म आणि मर्मग्राही होतें याचा बोध होतो. लोकमान्यांनीं ऋग्वेदांतील कित्येक कूटप्रश्नांचीं समाधानकारक व बिनतोड उत्तरें देऊन वैदिक वाङ्मयावर नवीन प्रकाश पाडला आहे. पुढें दिलेली माहिती आजवर प्रसिद्ध झालेल्या लोकमान्यांचे कोणत्याहि चरित्रांत आलेली नाहीं म्हणून तिची नवलाई विशेष आहे.

(१) हल्लीं उपलब्ध असलेली ऋग्वेदसंहिता अपूर्ण असून त्यातील कश्यप ऋषींनीं पाहिलेलीं सहस्र सूक्तें व आंगिरस ऋषींनीं पाहिलेलीं सहस्र सूक्तें गहाळ झालीं असल्याचें लोकमान्यानीं सर्वानुक्रमाच्या ७ व्या व ४३ व्या खंडातून दाखवून दिलें

(२) क्षत्रियानीं पुरोहिताचें गोत्र स्वतःला लावून घेण्याचीं वचनें व रूढि आहे त्यावरून क्षत्रियांना स्वतंत्र गोत्रच नाहीं अशी सर्वांची समजूत आहे परंतु लोकमान्यानीं श्रौतसूत्राच्या बाराव्या अध्यायातील १५ व्या खंडाच्या आधारानें, क्षत्रियांना पुरूरव हें गोत्र असून, मान व अरेल असे प्रवर असल्याचें दाखवून दिलें

(३) संहितेतील काहीं सूक्तांचे शेवटीं कित्येक ठराविक चरण व ऋचा पुनः पुनः येत असतात उदाहरणार्थ, ५ व्या अष्टकातील ७ व्या अध्यायाच्या पहिल्या वर्गाच्या शेवटीं आलेला चरण पुढें ७ व्या अष्टकाच्या चौथ्या अध्यायाच्या ११ व १२ वर्गांत पुनः पुनः येतो तसेंच तिसऱ्या अष्टकाच्या तिसऱ्या अध्यायाच्या १४ व्या वर्गाचे शेवटीं आलेली ऋचा पुढें ८ व्या अष्टकाच्या चौथ्या व पांचव्या अध्यायांत १६ व्या व २५ व्या वर्गांचे शेवटीं आलेली आहे याची उपपत्ति काय असावी ? असा पूर्वपक्ष करून लोकमान्यानीं खालील तर्क सिद्ध केला आहे—काहीं काहीं व्यक्तींना बोलतांना समापणातून 'म्हटलं म्हणजे' 'समजलं' 'आलं लक्षात' अशा प्रकारें तेच तेच शब्द पुनः पुनः बोलण्याची सवय असते तिला अनुसरून हे चरण व ऋचा पुनः पुनः आलेल्या असाव्यात उपरिनिर्दिष्ट चरण वसिष्ठाचे तोंडीं व ऋचा विश्वामित्राचे तोंडीं वारंवार आलेल्या आहेत त्यावरून त्या त्या ऋषींना त्या त्या सवयी असाव्यात हें सिद्ध होतें आणि त्या सवयींवरून तथल्या सूक्तांचे ऋषि वसिष्ठ व विश्वामित्रच आहेत हें अचूक ताडतां येतें

(४) ऋग्वेदसंहितेंतील संजिवनी मंत्रानें इक्ष्वाकु वंशातील समाती राजाच्या सुबंधु नामक पुरोहितास त्याच्या तिघां बंधूंनीं जिवंत केल्याचें ८ व्या अष्टकातील पहिल्या अध्यायाच्या १८ ते २५ वर्गांचे जीवनसूक्तानें लोकमान्यानीं दाखविलें आजवर दैत्यगुरु शुक्राचार्यांपाशीं असलेल्या संजीवनी विद्येसंबंधानें पुष्कळांना जबरदस्त शंका वाटत असे पण लोकमान्यांच्या वरील शोधानें पुष्कळ लोकांचें शंकानिवारण होऊन समाधान झाल्यावाचून राहणार नाहीं

(५) राष्ट्र हें पाराव्याच्या साहाय्यानें मजबूत असलेल्या वटवृक्षाप्रमाणें असावें, अशी राष्ट्राची घटना ऐतरेयब्राह्मणाच्या ७ व्या पंचिकेंतील ३० व्या खंडांत असल्याचें लोकमान्यानीं दाखवून दिलें

(६) ऋग्वेदसंहितेंत अग्नि, वायु, रुद्र, इंद्र इ. सूक्तें क्रमवार न येतां तुटक तुटक व मागेंपुढें आलेलीं आहेत. या अव्यवस्थेचें कारण काय असावें असा पूर्वपक्ष करून लोकमान्यांनीं ब्राह्मणग्रंथांतील एका गोष्टीच्या आधारानें उत्तर दिलें. ही गोष्ट ऐतरेय-ब्राह्मणांतील दुसऱ्या पंचिकेच्या १९ व्या खंडांत आहे.

---

## लक्ष्मण जनार्दन आपटे

[ बी. ए. एलएल. बी. वकील, रावबहादूर, पुणें म्यु० चे माजी अध्यक्ष ]

कठीण प्रसंगांतहि लोकमान्यांचा विनोदी स्वभाव दिसून येई. लोकमान्यांची केस नामदार हायकोर्टांत चालू असतां त्यांचे बॅरिस्टर यांस एकदा येण्यास जरा उशीर झाला. तेव्हां तेथील एक तरुण तरतरीत बॅरिस्टर आपले एका बॅरिस्टर स्नेह्या बरोबर लोकमान्यांकडे गेले व 'आपले बॅरिस्टर यांस येण्यास उशीर झाला असला तरी आम्ही मदत करण्यास तयार आहोंत' असें म्हणाले. हे असें म्हणतांच लोकमान्य हास्यमुद्रेनें म्हणतात —"साठ सत्तर वर्षांचे उमेदवार वधूस वीस पावीस वर्षांचे वराचे ऐवजीं दहा अकरा वर्षांचे दोन वर चालतील काय?" तेव्हां तेथें मोठा हशा पिकून बॅरिस्टरद्वय तेथून मुकाट्यानें दूर गेले!

---

## श्रीनिवास व्यंकटेश फौजलगी

[ बी ए एल्एल् बी वकील, होमरूल लीगचे व जुन्या राष्ट्रीय पक्षाचे एक पुढारी, विजापूर ]

(१) माझा डेक्कन कॉलेजांत प्रवेश आणि डेक्कन एज्युकेशन सोसायटीमधील फूट हीं जवळ जवळ समकालीन होतीं कै गोखले, आगरकर एका बाजूला आणि कै टिळक, नामजोशी एका बाजूला, असा तो देखावा होता कॉलेजांतील विद्यार्थ्यांतही दोन तट पडून खाजगी वादविवाद चाले त्या वेळेपासून माझा ओढा टिळकपक्षाकडे होता तो अजूनहि तसाच आहे हें सांगण्यास मला मोठा अभिमान वाटतो आमच्या कानडी क्लबांत दे भ गंगाधरराव हे आगरकर-गोखले पक्षाचे पुढारी असल्यामुळें त्या वेळीं आमच्या क्लबांत सुद्धा वादाचीं रणें माजून रहात होतीं सुधारक व केसरी आणि त्यांतील प्रतिपादित मतें हेंच मुख्यत वादाचे विषय असत याच सुमारास मी व काहीं मित्रमंडळींनीं मिळून स्वदेशी कापड वापरण्याची शपथ घेतली होती ती आतापर्यंत पाळली आहे याला कारणें, सार्वजनिक काकांचें उदाहरण व केसरीचा उपदेश हीं होत क्रमिक अभ्यासाबाहेरचा आमचा तत्कालीन व्यवसाय म्हणजे पुण्यांतील टिळकांच्या प्रत्येक चळवळींत हजर असणें व त्यांच्या उपदेशानें आमचीं मनें भारून घेणें आणि त्याप्रमाणें आपापल्या गांवीं जाऊन त्या त्या चळवळी तेथें सुरू करणें हा असे. गणेशोत्सव, शिवाजीचा उत्सव, स्वदेशी चळवळ हीं ठळक उदाहरणें होत या सर्व गोष्टींत

(२) सुरतेच्या बखेड्याच्या वेळीं लोकमान्यांचें असामान्य धैर्य उत्कृष्ट रीतीनें लोकांच्या नजरेला आलें. सुरतेला जहाल—मवाळांचें कुरुक्षेत्र होणार हें जाणून दोनहि पक्षांनीं जय्यत तयारी चालविली. नियोजित अध्यक्ष रास बिहारी घोस होते यामुळेंच घोंटाळा झाला. अध्यक्षाची निवडणूक झाल्यानंतर त्याच्याकरवीं टिळकपक्षाची मुस्कटदाबी करावयाची व कलकत्त्याच्या ठरावाला खचीं करावयाचें असा मवाळ शिबिरातला संकल्प बाहेर फुटला. याला युक्ति काय ? हा मोठा बिकट प्रश्न उद्भवला.

टिळकांनीं अध्यक्षाच्या सुचनाला हरकत करावयाची असा निश्चय केला. याला वंग प्रतिनिधी कबूल नव्हते. यात आपल्या प्रांताचा अपमान होत आहे असें त्यांना वाटलें ! त्यांच्या साहाय्यावांचूनच विरोध करण्याचें ठरलें व टिळकांनीं तें काम आपल्या अंगावर घेतलें. सभेंत बहुमत कोणाचें होणार हें संशयात होतें. सभेच्या चालकांनीं गुंडांची मदत घेण्याचें ठरविलें, ही गोष्टहि गुप्त राहिली नाहीं. अध्यक्षाचा ठराव पुढें येताच विरोध करण्याकरिता टिळक प्लॅटफॉर्मवर उभे राहिले. त्यांच्यावर कोणी तरी खुर्ची फेंकली ! झालें, दंगलीला सुरुवात झाली. दक्षिणी जोडा फडकला. टिळकांच्या अनुयायांनीं वाघाप्रमाणें उडी मारून उंचा स्थानाचा ताबा घेतला, व आपल्या नायकाच्या सभोंवतीं ते उभे राहिले. इतकें होई-पर्यंत अनेक वस्तूंचा अंगावर वर्षाव होत असताहि आमचा धीरोदात्त नायक एक केंसभरहि हलला नाहीं. मवाळाग्रणींचा कोठेंच पत्ता दिसेना. त्यांनीं केव्हाच पोबारा केला होता. इतक्यांत बाहेरून गुंडांचा तांडा सभास्थानीं आला. टिळकांना त्यांच्या भक्तांनीं घमाळून मंडपाबाहेर नेलें. गुंडांच्या मान्याचा प्रतिकार करीत असता मला चौघांनीं घेरलें व मारामारी करून पोलीस—चौकांत नेऊन बस विलें. तेथें थोड्याच वेळात नागपूरची जखमी झालेली अनेक देशभक्त मंडळी आणण्यांत आली. पुढें कांहीं वेळानें पोलीस सुपरिंटेंडेंट साहेब आले व झालेल्या प्रकाराबद्दल दिलगिरी प्रदर्शित करून त्यांनीं सर्वांना सोडून दिलें.

(३) सुरतेहून नंतर धुळ्याला राष्ट्रीयांची प्रांतिक परिषद रावबहादूर गणेश व्यंकटेश जोशी यांच्या अध्यक्षतेखालीं भरली होती. त्या वेळीं मला मुख्य ठरावा वर बोलण्याचा मान मिळाला होता. तो माझा पहिलाच प्रसंग होता. बोलतां बोलतां मी स्वातंत्र्य किंवा स्वराज्य नुसत्या ठरावानें मिळत नाहीं, त्याकरितां आत्माहुति देण्यास लोक तयार झाले पाहिजेत वगैरे बोलून शेवटीं किती लोक याप्रमाणें सर्वस्वावर पाणी सोडण्यास तयार आहेत म्हणून सवाल टाकला. सभेंतून प्रत्युत्तर मिळण्यास विलंब होतोसा पाहून लोकमान्य ' All, All, '— ( सर्व सर्व) असें मोठ्यानें ओरडले, त्यासरशीं टाळ्यांचा गजर झाला ! घरीं आल्यावर श्रीयुत खापर्डे व लो. टिळक यांनीं सभेचें मन पूर्ण समजावल्याशिवाय व अनुकूल उत्तर येण्याची खात्री असल्याशिवाय भाषणांत असे सवाल टाकू नयेत म्हणून

प्रेमानें इषारा दिला अनुयायांना उत्तेजन देऊन स्फूर्ति उत्पन्न करण्याची त्यांची हातोटी विलक्षण होती

(४) लखनौला काढलेल्या स्पेशल ट्रेनमध्यें लोकमान्यांबरोबर प्रवास करण्याची सुसंधि मला मिळाली होती त्या वेळीं त्यांची सहिष्णुता व लोकछंदानुवर्तित्व हे गुण पूर्ण निदर्शनास आले मुंबई मुक्कामापासून लखनौपर्यंत प्रत्येक स्टेशनावर रात्रीच्या वेळीं कडाक्याच्या थंडीची, किंवा झोंपेची पर्वा न करता धुम्या पेटवून वाद्यें वाजवीत लोकमान्यांच्या दर्शनेच्छेनें हजारों लोक जमले होते! व प्रत्येक ठिकाणीं लोकमान्यांना डब्याच्या दारांत उभें राहून दर्शन देणें भाग पडे हा इतका त्रास त्यांनीं हसत हसत सोसला दुसरे दिवशीं सकाळीं जागरणामुळें त्यांचें तोंड म्लान झालेलें दिसत होतें परंतु आनंदी वृत्तींत तिळभरहि कमतरता नव्हती विश्रांतीच्या स्टेशनावर यात्रेकरूंची मंडळी स्नान, भोजन, फलाहार वगैरे करण्यांत गुंतली असतां त्यांनीं त्यातल्यात्यांत लहानसें व्याख्यान देऊन लोकांना उपदेश करावा, त्यांच्या स्वागताबद्दल आभार प्रदर्शित करावे व पुढें चालू व्हावे या प्रवासांत स्वतःच्या नैसर्गिक गरजांची बिलकूल पर्वा लोकमान्यांनीं केली नाहीं त्यांच्या व त्यांच्या सर्व प्रांतांतील अनुयायांच्या आगमनानें लखनौच्या राष्ट्रीय सभेंत नवा जोम उत्पन्न झाला व तेव्हां जी ही सभा राष्ट्रीयांनीं काबीज केली ती आतांपर्यंत तशीच आपल्या हातांत कायम ठेविली आहे लखनौला हिंदुमुसलमानांचा परिचय करार झाला, त्या वेळीं लोकमान्यांनीं मुसलमानबंधूंच्या मागण्या सढळ हातानें कबूल केल्या या करारांचें पुष्कळसें श्रेय लोकमान्यांना आहे, यांत शंका नाहीं या करारामुळें स्वराज्यांत मुसलमानांची वरचढ होऊन इतरांस त्रास होईल ही भीति यांना कधींच शिवली नाहीं नोकरशाहीच्या हातांत दृढमूल होऊन राहिलेली सत्ता कोणत्याहि उपायांनीं ढिली करावयाची हा त्यांचा कृतनिश्चय होता या संक्रमणावस्थेंत ती कोणाच्याहि हातांत गेली तरी कालांतरानें व आपल्या कर्तबगारीनें तिला योग्य मार्गावर आणतां येईल असें ते म्हणत असत.

---

## श्रीपाद केशव नाईक

[ मुंबईंत शिक्षणविषयक चळवळ करणारे एक गृहस्थ, मुंबई. ]

(१) बळवंतराव टिळक २५ वर्षांपूर्वी कौंसिलसाठीं उमेदवार राहिले, त्या वेळीं 'प्रभाकर' पत्रांतून त्यांनाच निवडावें, अशा प्रकारचे लेख येत असत. त्यांत कै. काशिनाथ रघुनाथ मित्र, गणेश लक्ष्मण पागे व कै. मुकुंद बाळकृष्ण गुर्जर यांचें अंग असे. एके दिवशीं गजानन भास्कर वैद्य यांच्या घरीं मी बसलों होतों, त्या वेळीं यांच्या घरीं लोकमान्यांची स्वारी आली. ते आरामखुर्चीवर बसले. त्यांच्यासमोर रा. वैद्य आणि बाजूला मी बसलों. त्या वेळीं 'स्टँडर्ड टाईम' संबंधाची चळवळ चालली होती. तेव्हां त्यासंबंधानें त्यांचें झालेलें भाषण ऐकून माझी अशी खात्री झाली कीं, थोडक्यांत स्पष्ट व खुलासेवार विषय प्रतिपादण्याची कला यांच्यापासूनच शिकावी.

(२) १९०६ सालीं गिरगांव पोष्टामागें डॉ. नानासाहेब देशमुख यांच्या बंगल्यासमोर खुल्या जागेंत स्वदेशवस्तुप्रचारिणी सभेमार्फत जंगी जाहीरसभा भरली होती. लांकडी प्लॅटफॉर्म केलेला होता. त्यावर प्रमुख मंडळी बसलेली होती. टिळक, त्यांच्या उजव्या हातास रा. मराठे व डाव्या हातास शेठ तुकाराम जावजी, असे खुर्चीवर होते; आणि मी टिळकांच्या पायाजवळ बसलों होतों. त्या वेळीं प. वा. चतुरसिंग यांच्यामुळें कोटांतल्या पोष्टखात्यांत संप झाला होता. मराठे यांनी तो मोडला. त्यांनी त्या लोकांना चकवलें अशी

## सदाशिव विनायक बापट

[ लोकमान्यांचे एक लेखक; केसरी, सार्वजनिक सभा, टिळक स्वराज्यसंघ, टिळक स्वराज्य-संघ-स्मारक-ट्रस्ट या संस्थांतील एक नोकर व प्रस्तुत पुस्तकाचे संपादक व प्रकाशक, पुणें ]

(१) सन १९०३ सालीं लोकमान्यास पाहण्याकरिता मी १४ वर्षांचा असताना मुद्दाम विंचुरकराचे वाड्यात गेलों होतों. लोकमान्य ह. भ. प. भिंगार करबुवाशीं बोलण्याचे भरात होते. ते म्हणाले " बुवा, होम-हवनाचे वेळीं स्थंडिलें कशीं घालावींत वगैरेबद्दलचें शास्त्र आहे, पण त्याचा शास्त्रीय व आधुनिक दृष्टीनें विचार केला तर त्यापासून काहीं नवीनच शोध लागणार आहे त्यावर मी येत्या गणेशोत्सवात व्याख्यान देणार आहे " हें व्याख्यान झाल्याचें दिसत नाहीं

(२) सन १९०३ सालीं सातारा येथें एके दिवशीं सकाळीं मी मंडईत गेलों होतों. ते आम्याच दिवस होते मोठे, रसाळ व वाघास उत्कृष्ट अशा आम्यांच्या त्या पाटीवाल्यानें स्वस्त आंबे सांगितले " तू हे लहान आणि हिरवे आंबे इतके महाग सांगतोस, हें रे कसें ? " असें मी त्याचे जवळच्या दुसऱ्या पाटीवाल्या घोंगड्यास विचारलें. तो म्हणाला, " होय, सर्वच बामण आहेत, मोठे आहेत, श्रीमान आहेत, पण त्या पुण्याच्या टिळक बामणाची कोणास तरी सर येईल का ? तस हो महाराज थोर हैती ! "

(३) परलोकवासी रा. ब. वामनराव कोल्हटकर यांच्या पौनर्भव ज्येष्ठ कन्येचा पुणें येथें मळेकराचे वाड्यात सन १९०३ सालीं विवाह झाला. त्या वेळीं पानसुपारीस लोकमान्य आले असता, त्यांस जरा टोंचून वामनराव म्हणाले " लग्नसमारंभाचे मुख्य वेळीं सर्व मंडळी जमली असताना आपण कसचे येता ?" लोकमान्यांनीं विनोदानें उत्तर दिलें " अहो ! त्या वेळीं नवरदेवाऐवजीं माझें का प्रदर्शन करावयाचें होतें ? केव्हा तरी पासुनपारी घेतली म्हणजे झालें."

लोकमान्यांचे लहानपणापासूनचे एक मित्र रावबहादूर लक्ष्मण मोरेश्वर ऊर्फ अण्णासाहेब देशपांडे, पुणें ( पे. डु. डे. कलेक्टर ) यांजकडून लोकमान्यांबद्दल काहीं गोष्टी ऐकावयास सापडतील म्हणून मी त्यांचेकडे गेलों होतों. न्या. रानडे यांच्या चरित्राकरितां मुंबईचे रा. ठाकूर यांचे सांगण्यावरून सातारचे रा. ब. विठ्ठलराव पाठक मास्तर यांजकडे मी गेलों असताना ( ही हकीकत मागें मी केसरींत दिलेली आहे ) त्यांनीं त्या वेळीं रानडे यांजविषयीं अति प्रेमानें गोष्टी सांगितल्या, त्याचीच मला या वेळीं अण्णासाहेबांचे घरीं आठवण झाली. फरक इतकाच कीं, मास्तरसाहेब हे आपणा स्वत मध्यें व न्यायमूर्तींमध्यें काहींच फरक न मानून एका प्रमाणांतील आपण सारख्याच योग्यतेच्या मूर्ति

आहोंत असें समजत, तसें मात्र आण्णासाहेबांचें दिसलें नाहीं रानडे–टिळक यांच्या या दोघा रावबहादूर मित्रांत हा फरक तेव्हांच दिसून आल्याखेरीज राहिला नाहीं इतकेंच नव्हे तर, अगदीं आरंभींच लोकमान्यांचा 'विभूति, असामान्य पुरुष, महात्मा' वगैरे शब्दांनीं रा. ब. आण्णासाहेब यांनीं उल्लेख केला, व ते म्हणाले "त्या वेळीं लहानपणीं हा (आम्ही बरोबरीचे असल्यामुळें एकमेकास अरे–जारे म्हणत असू व त्यास 'बाळ' असेंच आम्ही म्हणत होतों) पुढें एवढा मोठा लोकमान्य राजकारणी पुरुष होईल असें जरी आम्हांपैकीं कोणासहि वाटलं नाहीं, तरी त्याची बुद्धिमत्ता पाहून 'हें कांहीं निराळेंच पाणी आहे' असें आमचे ध्यानांत आल्याखेरीज रहात नसे लोकमान्याचे शोभतील असेच त्याचे लेही रा. आण्णासाहेब हे असल्यामुळें, अगदीं प्रांजलपणें 'बळवंतराव! तुमचेपेक्षां आम्ही ऐहिक सुखाचे भाग अधिक आहोंत' असें त्यास आपण नेहमीं म्हणावें असेंहि त्यांनीं सांगितलें कोणाचीं कांहीं विगें, दोष हे अति परिचयाच्या व खेळीमेळींतील मनुष्यास अधिक माहीत असावयाचे हें लक्षांत आणून व अशापैकींच एका पुरुषाचे लोकमान्यांबद्दलचें मत पाहून त्या थोर महात्म्याबद्दल अधिकच आदर कां वाटणार नाहीं? लहानपणापासून आण्णासाहेबांचा व लोकमान्यांचा निकट सहवास असल्यामुळें आण्णासाहेब म्हणतात, 'त्यांचेसंबंधीं आतां काय काय म्हणून तुम्हास सांगावें?' असे म्हणून त्यांनीं मला दोन तास बरीच माहिती सांगितली पण तिच्यापैकीं फारच थोड्या गोष्टी येथें पुढें देत आहे

टिळक्याकडे जा, तो हें उदाहरण तुम्हास सोडवून देईल " असें सांगितलें, व त्याप्रमाणें बाळानें तें सोडविलेंहि ! तेव्हापासून नाना हे बाळास हें ' सूर्याचे पिलू आहे' असें म्हणत ! व आम्हा मुलाजवळहि नाना एकदा म्हणाले 'त्या सूर्याच्या पिलाचा प्रभाव आता नाहीं तुम्हा कोणास कळणार, पण ऐनमध्यान्ह काळीं त्याचा प्रकाश कोणासहि सोसवणार नाहीं, हें लक्षात ठेवा ! '

(६) " १८७५।७६ सालीं मुंबईच्या एल्फिन्स्टन कॉलेजमध्यें आम्ही असता, तेथील गणिताचे प्रो. हॅयॉर्नथ्वेट यानीं निवळ परीक्षा पाहण्याकरिता म्हणून एकदा मुद्दाम अति कडक घेतलेल्या गणिताचे परीक्षेत कायवटे याना पाच, व मला सात, असे मार्क मिळाले. सुमारें ५० मुलाना अगदीं शून्य मिळाले. फक्त घोंडो हरि आगाशे यास मात्र ७० मिळाले व बाळास ५५ मिळाले, पण एके दिवशीं बाळास हॅयॉनथ्वेटसाहेबानीं मुद्दाम बोलावून म्हटलें, " आगाशेपेक्षा तुम्हास मार्क जरी कमी मिळाले असले तरी तो केवळ तुमच्या निष्काळजीपणाचा व अव्यवस्थित पणाचा परिणाम आहे, पण तुमची गणितातील एक प्रकारची सूक्ष्म व स्वतंत्र बुद्धि बाराप्यासारखी आहे यात शंका नाहीं !" पुढे प्रो. साहेब त्यास म्हणतात, " कॅम्ब्रिज जर्नलमध्यें गणिताचे काहीं कूटप्रश्न आले आहेत. माही ते सोडविण्याचा प्रयत्न करतों, पण तुम्हीहि प्रयत्न करून पहा " असें म्हणून त्यानीं तें जर्नल त्याचेजवळ दिलें. घरीं यऊन बाळानें नेटक भारुन सपाट्यासरशीं ते सर्व सोडवून त्यास नेऊन दिल्यावर मोठे खूष होऊन प्रोफेसरसाहेब त्यास म्हणतात, Oh good chap ! I never thought you were capable of solving them all in such an intelligent method ! (शाबास ! अशा स्वतंत्र बुद्धीनें तुम्ही हे सर्व सोडवाल असें मला वाटलें नव्हतें ) पुढें पुढें या प्रोफेसरसाहेबाचे हातून बाळास दरडा ९५।९८ मार्क मिळत असत. एकदा

केली पण आश्चर्य हें कीं, बळवंतराव हट्टी, समेटास नेहमीं विरुद्ध (Uncompromising) म्हणून त्याचें 'कानफाट्या' नाव पाडणाऱ्या व तथा जगभर डांगोरा पिटणाऱ्या मवाळांनींच त्याच्या गुरुबंधूच्या केवळ हट्टानेंच हा समेट लांबाहून टकला तो असा—

पुण्याची स्थानिक सर्व प्रमुख मवाळ मडळी आमच्या योजनेस बळवंतरावा प्रमाणें तयार झाली असताहि, त्या वेळचे मिस्टर गांधी हे बळवंतरावाकडे येऊन म्होरकेरणानें आपणावर जबाबदारी घेऊन म्हणतात, " समेट होईल, नाहीं असें नाहीं ! आमच्या सर्व प्रोग्रेसिव्ह पक्षातर्फे मी तुम्हास असें सागतों कीं, तुम्ही मात्र एक अक्षरहि बोलण्याचा हक्क न मागता व इतर काहींहि चळवळ न करता आमच्या मडपात येऊन बसण्याचें अभिवचन द्यावें, म्हणजे तुमचा डेलिगेशन फॉर्म आम्ही मजूर करू शिवाय असें पहा कीं, एकदा तुम्ही आला म्हणजे तुमचा पक्षही आल्यासारखें झाले व मग एकीहि झाली असें म्हणण्यास हरकत नाहीं ! ! " गांधींनीं बळवंतरावासारख्या सिंहास अशा रीतीनें शिनविणें बरें नव्हतें पण याचा परिणाम म्हणजे प्रांतिक परिषदच काय पण पुढें लगेच ल्सनौ येथें राष्ट्रीय सभाहि मवाळाचे हातून घेऊन त्यानीं आपलीशी केली अण्णासाहेब म्हणतात " टिळक–गांधी याच्या वरील समेटविषयक संवादाच्या सर्व नोंदस मी त्या वेळीं घेऊन घरीं येऊन त्याचा विस्तार करून सर्व लिहून काढल्या आहेत !',

(८) लो टिळकता २८।१।१९०४ च्या केसरींत काहीं एका प्रसगीं लिहित असता म्हणतात " लहान मनुष्य काय आणि मोठा काय प्रसगविशेषीं निरनिराळ्या प्रकारचे व कधीं कधीं एकमेकास विरुद्ध विचार प्रदर्शित करीत असतो परतु त्यामुळें त्याचीं तीं मतें कायमचीं होतीं असें समजणें वेडेपणाचें होय मनुष्याच्या शरीराप्रमाणें त्याचें मन हें नेहमीं उमेदींत असतें असें नाहीं त्याच्या मनात कधीं दु खाचा व कधीं नाउमेदेची झाक येत असत आयुष्याच्या हरएकक्षणीं मनुष्य जें बोलतो तें तो पूर्ण विचारांतीच बोलतो असें नाहीं, इतकेंच नव्हे तर त्याच मनुष्यास त्याच विषयावर जर सार्वजनिक तऱ्हेनें बोलण्याचा प्रसग आला तर निराळ्याच तऱ्हेनें तो बोलत असतो " मनुष्य स्वभावाचें हें वर्णन व मानवी मनाची ही चिकित्सा किती खरी व यथार्थ आहे बरें ? " अमकी अमकी (भिकार) गोष्ट करण्याकरिता मी जन्मास आलों नाहीं " असे आत्मप्रत्ययाचे तजस्वी उद्गार निदान २।३ वेळा तरी लोकमान्यानीं काढलेले प्रस्तुत लेखकास माहीत आहेत, पण लोकमान्यानीं आपल्या बरोबरीच्या स्नेही मडळात केवळ बाल्यपणापासूनच्या समान दर्जाच्या व बरोबरीच्या नात्यास धक्का न लागावा व आपली जन्मादारभ्य विनयशीलता कलकित न व्हावी म्हणूनच वरील उद्गाराच्या अगदीं थट उलट उद्गार त्यानीं काढल्याचें रा ब.

अण्णासाहेब याचे पुढील सांगण्यावरून सहज कळून येतें. 'तुमचा खडतर तुरुंगवास, लोकनायकत्वाचें असिधाराव्रत वगैरेंची स्तुति करून त्यांचे आम्ही जुने स्नेही त्यांचेजवळ बोलत असू तेव्हा ते आम्हास म्हणत, "एकेक करूं लागलें—एकेक अंगावर पडलें—म्हणजे तें तें सर्व कोणीहि पुढें करू लागतो, व माझेंहि असेंच झालें कारण श्रीशिवाजीमहाराजाप्रमाणें 'I am not born a patriot (जन्मत मी देशभक्त नाहीं)' हें तुम्ही लक्षात ठेवा अहो, तुम्ही यात पडता तर, माझी खात्री आहे कीं, तुम्ही सुद्रा असेंच करता अक्षर घटविण्यास बसलें म्हणजे तें घटलें—व्यासपीठावर बसलें कीं तोंडास ओवी येतेच, त्यात विशेष तें काय आहे ?" पण लोकमान्यांच्या ही शालीनतेची शालजोडी जरा बाजूस सारली—अर्जुनाची दिव्य दृष्टि काढून मग विश्वरूपदर्शनाची कल्पना केली—म्हणजे मग "त्यात विशेष तें काय आहे" हें प्रत्येकानें आपल्या मनाशीं पाहून घ्यावें !!

(९) अण्णासाहेब सांगतात "एकदा पुण्याचे कलेक्टर मि कार्मायकेल मला म्हणाले, 'इनॉक्युलेशनचे विरुद्ध टिळकांनी केसरींत फार लिहिलें आहे हें आम्हास बिलकुल रुचणार नाहीं असे त्यास तुम्ही कळवा' मी त्यास म्हटलें 'साहेब, मी त्याचा खासगी स्नेही सरकारी बाबाविषयीं मी त्यास काय म्हणून विचारावें ? आपणच त्यास भेटीस बोलावून विचारा' साहेब म्हणतात, 'आम्ही पाठविलेल्या पत्राचा ते अव्हेर करतील (He will disregard my letter and treat it with contempt) हें एकून लगेच त्यास मीं बजावलें, 'हें पहा, यामुळेंच सर्व बिघडलें आहे त्या माणसाविषयीं आपण निष्कारण गैरसमज करून घेतला आहे क्वचित् खासगी नात्यानेंहि आपण आपल्या पट्टेवाल्याबरोबरहि त्यास निरोप पाठविला तरी तो येणारा आहे असा त्याचा निगर्वी स्वभाव आहे आपण एकदा याची प्रचीति तर पहा हें असो पण आपण म्हणता ते केसरीचे सर्व लेख मीं वाचले आहेत त्यात इनॉक्युलेशनचा कोठें संबंधहि नाहीं ' साहेब म्हणाले, 'तर मग माझेकरिता त्याचें भाषांतर करून टिळकास घेऊन तुम्हीच यानात ?' अखेर हें त्याच म्हणणें मी मान्य

your friend is a gigantic intellectual man! I was certainly much pleased and even impressed with his cogent and attractive conversation of yesterday!"

(१०) रा. ब. अण्णासाहेब म्हणाले, "टिळकाचें नाव सरकारास अप्रिय म्हणून सरकारास भिऊन बळवंतरावाबद्दल उगाच खोटेंनाटें काहीं तरी वारवार सरकारास सागण्याचें पाप व मोह अनेकाना आवरत नसे हें मला माहीत आहे पण मी बळवंतरावाचा लहानपणापासूनचा जिवलग स्नेही असून व हें सर्व साहेब लोकास माहीत असूनहि पेनशन घेईपर्यंत माझें केव्हाहि व काहींहि नुकसान झालेलें नाहीं याचें कारण माझ्या मतें इतकेंच कीं, सरळपणानें व सत्यपणानें सरकारास टिळकाचें अंत करण उघडून कोणीं दाखविलेंच नाहीं. सर्वांनीं त्याचे-विषयीं गैरसमज मात्र केला मी पुणें येथें नोकरीवर असता (हु डे कलेक्टर) एकदा कमिशनर मॉरिसनसाहेब याजकडून ऑफिसमध्यें घोडेस्वाराबरोबर मला पत्र आलें कीं, तावडतोब असाल तसे मग येऊन भेटा. पण मी ट्रेझरी ऑफिसर असल्यामुळें 'तीन वाजेपर्यंत मला येथून हालता येत नाहीं' असें मी त्यास लिहून पाठविलें पुढें माझें काम संपल्यावर मी त्यास भेटण्यास गेलों सुमारें दीड तास बोलणें झालें तें सर्व टिळकाचेविषयीं! साहेब मला म्हणाले, "तुम्ही टिळकाचे स्नेही सरकारविषयीं तुमच्या टिळकाना इतका द्वेष का?" मीं म्हटलें, "साहेब, मोठा नाजूक विषय आपण काढला माझ्यासारख्या नोकरास व आधींच दूषित ग्रह करून घेतलेल्या टिळकाचे स्नेहास आपण हें विचारलें नसतें तर फार बरें झालें असतें पण आपण आता विचारताच तितका सरळपणानें सागणें माझें कर्तव्य आहे" असें म्हणून त्यास निरनिराळ्या गोष्टी सागून (अण्णासाहेबांनीं येथें व याव गोष्टी सागितल्या पण त्या देणें अशक्य आहे) उत्कृष्ट रीतीनें टिळकाचें म्हणणें, कशाचाहि विपर्यास न होऊ देता, मीं त्यास सागितलें नतर ते म्हणतात 'ना गोखले तुमचे स्नेही आहेत? त्यास तुम्ही देशभक्त समजता? त्याचे मार्ग तुम्हास कसे काय वाटतात?' याचींहि उत्तरें मीं अगदीं प्राजलपणें मला जीं खरोखर वाटलीं तीं दिलीं तरीहि पण साहेबबहादुराचें समाधान येवढ्यानें होईना म्हणून आणखी खोदून मला ते विचारतात "त्या दोघात तुम्हास विशेष कोण आवडतो वतेंका? व टिळक राजद्रोही ठरले असताहि गोखल्याचे पेक्षा समाज त्याचेचमागें इतका का?" याचींहि उत्तरें मीं स्पष्टपणें व सत्यास स्मरून त्यास दिलीं व म्हटलें 'हे दोघेहि देशभक्त असले तरी टिळकाचेंच म्हणणें मला व जनतेस अधिक पटतें!' नतर समाजाच्या अगदीं खालच्या थरापर्यंत टिळक सर्वांशीं मिसळून त्याचीं सुखदु खे ताच आपलीं सुखदु खें ते कशीं मानतात, त्यास सरकारनें राजद्रोही म्हटलें तरी लोकाच्या खऱ्या कल्याणाविषयीं नि स्पृह पणें, धाटपणें व नि स्वार्थबुद्धीनें सदैव झटणाऱ्या व निष्कलक दानतीच्या त्या

देशभक्तासच प्रजेनें डोक्यावर का घेतलें वगैरे वस्तुस्थितीचें यथार्थ वर्णन करून त्यांस मी सांगितलें, व शेवटीं म्हटलें 'साहेब, हें सर्व आपणास कसें काय वाटलें असेल तें असो. पण आपण विचारलें म्हणून सत्यास स्मरून, सरकारचीहि दिशाभूल न व्हावी म्हणून व टिळकांसहि मलोपकडून अन्याय न व्हावा म्हणून मला जें योग्य वाटतें तें सांगितलें आहे.' कदाचित् याचा परिणाम म्हणून पुढें एकदा टिळक–मॉरिसन यांच्या भेटींत झालेल्या त्यांच्या संवादावरून बळवंतरावांविषयीं त्यांचा मग्गढ साफ बदलून उलट तो अनुकूल झाल्याचेंहि दिसून आलें!"

(११) अण्णासाहेब देशपांडे म्हणतात, "कोणावरहि आणि त्यातल्या त्यात सरकारी बड्या ऑफिसरावर तर आपली छाप पाडण्याची कलम बळवंतराव यांस मोठीच अवगत होती यांत शंका नाहीं. १८९५ सालच्या कौन्सिलच्या निवडणुकीकरितां ते एक उमेदवार उभे राहिले होते त्यावेळीं त्यांस सरकारी कांहीं खासगी कागदपत्र पाहण्याचें कारण पडलें. म्हणून त्यांचे स्नेही व त्या वेळचे म. मा. कमिशनरचे दप्तरदार रावबहादूर बाबासाहेब पेंडसे यांचेजवळ त्यांनीं ते पाहण्याची इच्छा दर्शविली. बाबासाहेब म्हणाले, 'साहेबांचें (जे के स्पेन्स, कमिशनर) तुमचेविषयीं मत बरें नाहीं तेव्हां तुम्हांस ते पाहण्यास मिळणें शक्य दिसत नाहीं' बळवंतराव त्यांस म्हणतात, 'तुमचे हातून हें काम होत नाहींना? साहेब देईल कीं नाहीं हें माझें मी पाहून घेईन' असें म्हणून अगोदर साहेबाशीं एंगेजमेंट करून भेटण्याची वेळ ठरवून त्यांस भेटण्यास ते गेले व सुमारें अर्धा–पाऊण तास दोघांचें बोलणें होऊन त्यांनीं अशी कांहीं साहेबांवर आपली छाप पाडली कीं, ते परत आल्यावर कमिशनरसाहेब आपल्या दप्तरदारास म्हणतात, "Oh, Mr Pendse Mr Tilak seems to be an extraordinary, intelligent and very straightforward man I don't know why he is condemned by the Government Please give him all the necessary and available documents he wants" (काय हो पेंडसे, मला तर रा. टिळक हा मोठा बुद्धिवान् व अगदीं सीधा मनुष्य दिसतो. मग सरकारचा त्याचेवर एवढा दात कां? त्यास हवे असलेले आपल्याजवळचे सर्व कागदपत्र [illegible])"

लवकरच मी 'होमरूल लीग' अशीच संस्था स्थापणार आहे, असेंहि त्यांनी त्यास सांगण्यास कमी केलें नाहीं पुढें सदर मौंटफर्डसाहेब यांनी गव्हर्नर-साहेबास या मुलाखतीचा रिपोर्ट केला त्यात ते म्हणतात, "Mr Tilak is a very bold and a most reasonable man He is a gentleman of no hide-and-seek policy He does what he speaks and he always speaks frankly and openly, From the various reports at my disposal, I can say he seems to be a trusted and popular leader" (टिळक मोठे धीट व समजूतदार गृहस्थ आहेत वाटेल तशीं वळणें मारणारा तो मनुष्य नव्हे ते जें उघडपणें बोलतील तेंच ते करतील लोकाचा विश्वास संपादन करून लोकमान्य झालेला हा पुरुष आहे असें माझेकडील सर्व रिपोर्टावरून मला दिसून येतें )"

(१३) पुढें गव्हर्नर विलिंग्डनसाहेब यांनीं त्यास आपल्या भेटीस बोलविलें खुद्द स्वारीशीं गाठ पडल्यामुळें तर आपण त्यांचेशीं अधिकच स्पष्ट व सडतोड झाल्याचें अण्णासाहेब म्हणतात, त्यांनीं आम्हांस सांगितलें गव्हर्नर साहेब म्हणाले, "Well, Mr Tilak, from this I could clearly see that you mean to uproot the British Government by resorting to any unconstitutional and revolutionary means" (या तुमच्या बोलण्यावरून वाटेल त्या गैरशिस्त व क्रांतिकारक मार्गानें ब्रिटिश सरकार येथून नाहींसें करावें अशी तुमची इच्छा दिसत) टिळक सरळ व स्वच्छपण म्हणाले, "Yes sir if I could I would But it is impossible impracticable and even suicidal for us to follow such Irish methods in the present state of the country and therefore I must try my best in constitutionally but vehemently and desperately fighting with the Government to reach the goal" (होय साहेब, हें शक्य असतें तर असेंच केलें असतें पण हल्लींसारख्या आमच्या देशस्थितींत आयर्लंड करतें तसें आम्ही करणें अशक्य, अव्यवहार्य व आत्मघातक होणार असल्यामुळें आम्हास सनदशीर मार्गानेंच पण अत्यंत आवेशानें व निकरानें सरकारशीं झगडण्यावांचून इलाज नाहीं)" सरकारी अधिकाऱ्यांवर वरीलप्रमाणें छाप पाडण्याची त्यांच्यातराची अलौकिक हातोटी असल्यामुळें, अण्णासाहेब म्हणतात, मी त्यास वारंवार म्हण कीं, तुमचे सवयानें विनाकारण सरकार गैर समज करून घेतें तव्हा तुम्ही सरकारी अधिकाऱ्यात थोडे मिळाल मिसळाल तर कोणाची छाती आहे तुमच्याविरुद्ध ब्र काढण्याची ! यावर ते म्हणाले, 'तसें करण्यानें ते आपला उपयोग मात्र करून घेतात ! व माझा सरकारानें तसा

उपयोग करून घ्यावा याचे मी अगदीं विरुद्ध आहे आवळा देऊन कोहळा काढणें हा सरकारचा उपजत स्वभाव आहे म्हणून शहाण्यानें त्यास बळी न पडणें हें बरें बाकी प्रसंग येतो तेव्हां आम्हीहि आवळ्याच्या मोबदला कोहळा काढण्यास असमर्थ आहोंत असें मुळींच नाहीं "

(१४) " १८९५ सालच्या कायदेकौन्सिलच्या निवडणुकीकरितां बळवत रावाबरोबर (त्यास प्रतिस्पर्धी म्हणून) घोंडो शामराव ऊर्फ बाबासाहेब गरुड हे एक उमेदवार म्हणून उभे होते रा व बाबासाहेब पेंडसे हे कमिशनराचे दसरदार असल्यामुळें त्यांचे वजनानें सर्व मामलेदार महलींचे मार्फत अधिक मतें मिळण्याचा विशेष संभव म्हणून पेंडसे यांची मदत घेण्यास एके रविवारी दोन प्रहरीं रा गरुड त्यांचे घरीं गेले या वेळीं बाबासाहेब निजलेले होते कर्म धर्मसंयोगानें बळवतरावहि त्याच वेळीं तेथें आले हें पाहून गरुड हे पेंडसे यांचे उशाशीं जाऊन बसले बळवतराव उठून मुद्दाम त्यांच्या पायथ्याशीं बसले वास्तविक हे दोघेहि परस्परांचे व पेंडस यांचेहि स्नेही पुढें पेंडसे निजून उठताच प्रथम त्यांस साहजिकच बळवतराव दिसताच बळवतरावांनीं त्यांस नमस्कार ठोकला व निवडणुकीचे कामीं त्यांजकडून मदतीचें वचनहि घेतलें तों गरुडांनीं गिल्ला करून म्हटलें, 'वा हें काय ? मी येथें अगोदर आलों आहें म्हणून बाबासाहेबांचेकडून वचन मागण्याचा हक्क माझा अगोदर आहे ' तेव्हां बळवतराव त्यास म्हणतात, " भारतीय युद्धाचे वेळीं एकाच वेळीं अशाच रीतीनें श्रीकृष्णाची मदत मागण्यास आलेल्या अर्जुन–दुर्योधन–यांचा इतिहास विसर कसा पडतो ! "

(१५) सन १९०४ सालीं सातारा हायस्कूलमध्ये मी (लेखक) सातव्या इयत्तेंत असतां मुखपृष्ठावरील लोकमान्यांच्या फोटोचीं एक्सरसाईज बुकेंच मी नेहमीं वापरीत असें त्या वेळीं एकदा मुख्य डायरेक्टरसाहेब आमचे हायस्कूल मध्यें आले असतां आमचे वर्गांत ते आल्यावर त्यांची दृष्टि सहज माझे हातांतील त्या एक्सरसाइज बुकाकडे गेली वर्ग पाहून ते परत गेल्यावर त्या वेळचे हेड मास्तर रावसाहेब हरि गणेश बोडबोले यास डायरेक्टरसाहेबांनीं टिळकांच्या फोटोचीं एक्सरसाईज बुकें इत पर न वापरण्याबद्दल सक्त ताकीद दिली म्हणून दुसरे दिवशीं मी शाळेंत येताच हेडमास्तरसाहेबांनीं मला आपल्या खोलींत बोलावून नेऊन टिळकांच्या फोटोचीं माझीं सर्व एक्सरसाईज बुकें रद्द करून पुन केव्हांहि तीं शाळेंत न आणण्याबद्दल मला त्यांनीं तंबी दिली हें पाहून मला फार राग आला, व मी तें न ऐकतां दुसरे दिवशीं मी नहमेप्रमाणेंच तीं घेऊन शाळेंत गेलों हेडमास्तरसाहेबांनीं तें पाहून उग्र रूप धारण करून असें न करण्याबद्दल मला बरेच दटावून सांगितलें पण मल्याच बाबतींत अधिकाऱ्याच्या लागणाऱ्या स्वैर लहरीस बळी पडणाऱ्या आमच्या मोठ्या लोकांच्या मानसिक दास्याची व

मनोदौर्बल्याची मला चीड येऊन त्यांचें न ऐकण्याच्या इरेस मी पेटलों. अखेर मला शाळेंतून काढून टाकण्याचें ब्रह्मास्त्र सोडण्यापर्यंत मजल आली व त्यासहि मी तयार आहें असें त्यास दिसताच त्यांनीं आपले घरीं मला बोलावून अगत्यानें व मोठ्या प्रेमळपणानें ते मला म्हणाले "बापट, ज्या टिळकाचे व कथित् चित्राबद्दल तुम्ही इतका अभिमान बाळगता ते प्रत्यक्ष—Tilak was my class fellow and he is my colleague whom I sincerely respect and love deeply and even at present पण काय करणार बाबा ! तू टिळकाचा खरा भक्त असशील तर आमच्या लहानपणची एक गोष्ट मला आठवते ती तुला सांगतों ती ऐकून टिळकाचें खरें अनुकरण कसें करावयाचें तें त्यावरून शिकशील. आम्ही डेक्कन कॉलेजामध्यें असतां एकदा व्हिक्टोरिया महाराणीचें उत्कृष्ट रंगीत चित्र आमचे खोलींत लाविलेलें आमच्या एका देशाभिमानी सोबत्यानें आमचे खोलींत येऊन तिरकाऱ्यानें फाडून टाकून 'आपल्या देशास गुलामगिरींत ठेवणाऱ्यांची चित्रें तुम्हास नित्य कशीं पाहवतात बुवा ?' असें म्हणत आमच्याकडे पहात त्यानें तें पायाखालीं तुडविलें ! हें पाहून जवळच बसलेले टिळक थोडे हसत पण फार गंभीरपणें त्यास म्हणाले "अरे, त्या बिचाऱ्या निरुपद्रवी कागदानें तुमचें काय केलें आहे ? दारें लावून बडबडोरी करणें म्हणजे आपल्या मनाचा कमकुवतपणा व क्लैब्य दर्शविणें आहे. हिम्मत असेल तर सदाशिवरावभाऊ पेशव्याप्रमाणें घण घालून लढतचे तख्त फोडून पायाखालीं तुडविण्याची महत्त्वाकांक्षा धरा. निदान याच दिशेनें यावज्जन्म आपल्या यत्नाची शिकस्त करण्याची आज मनानें तरी शपथ घ्या, तरच हें चित्र फाडण्याचा तुमचा आवेश मी खरा समजेन !" हेडमास्तरसाहेब मला म्हणतात "मग बोल आता, टिळकाच्या निर्जीव फोटोचीं एक्स्ट्रासाईज बुकें वापरण्याचा तू हट्ट धरणार का, टिळकाचे वरील तेजस्वी उद्गार तुला प्रिय वाटून त्यांचें तू अनुकरण करणार ?"

(२६) एके दिवशीं रा. वामनराव तळवलकर वकील यांचेकडे मी कांहीं कामानिमित्त गेलों असतां त्यांचेपाशीं गप्पागोष्टी करण्यांत त्यांजकडून लोकमान्यां विषयीं कांहीं गोष्टी ऐकल्या ( या गोष्टी म्हणजे केळकरकृत टिळकचरित्रात चरित्रकारानीं संक्षिप्त रूपानें वर्णिलेल्या लोकमान्यांच्या शाळेंतील शिक्षक म्हणून शिकविण्याच्या त्यांच्या पद्धतीचेंच ही एक प्रकारें विस्तृत आवृत्ति आहे, यांत नवीन असें विशेष कांहीं नाहीं ) वामनराव म्हणतात "मी न्यू इं. स्कूलमध्यें सहाव्यांत किंवा सातव्यांत असेन त्या वेळीं मला एक उदाहरण अडलें. तें मी प्रथम प्रो. मानू यास विचारलें त्यांनीं तें समजावून दिलें, पण मला समजलें नाहीं, म्हणून प्रो. फर्वे यास विचारलें त्यांनीहि तें समजावून देण्याचा प्रयत्न केला, पण माझी समजूत पटेना. पुढें ओकयाशी वर्गावर आले त्यास विचारलें ते

म्हणाले, 'अरे यात रे काय! हें अगदीं साधें आहे' असें म्हणून त्यांनीं सांगण्याचा प्रयत्न केला, तरी मासेप्रमाणें इतरांचेंहि डोक्यांत तें शिरेना. अखेर शेवटीं बळवंतराव वर्गावर आले. तेव्हां संकोच, भीति, लाज सोडून त्यांस मी तें विचारलें. ते म्हणाले 'फळ्याकडे पहा,' आणि चमत्कार असा कीं, अशा काहीं अद्भुत रीतीनें त्यांनीं तें उदाहरण मांडण्यास सांगितलें कीं, तें तसें मांडता मांडताच विजेप्रमाणें लखकन् माझे डोक्यांत प्रकाश पडून पुढील रीत करण्याचे आधींच मी आनंदानें 'हो, समजलें' असें म्हटलें. त्यासरशीं ते व वर्गांतील सर्व मुलें यांचा हंशा पिकला! पण हंशा संपण्याचे आधींच मी उदाहरणाचें उत्तरहि फळ्यावर मांडून टाकलें!"

(१७) वामनराव म्हणतात, "अल्जिब्रा शिकविण्याचे बाबतींतहि त्यांचें असेंच. इतर शिक्षकांकडून मुलांची समजूत पटून तासांत २।४ उदाहरणेंहि संपण्याची मारामार, पण ही स्वारी वर्गावर आली म्हणजे काय त्यांचे सांगण्यांत जादू असेल कळत नाहीं, त्यांनीं एकदां अशी काहीं रीत सांगावी कीं, गुंतलेल्या दोऱ्याचें टोंक हातीं लागताच मग तो जसा भराभर सोडावा तशी सर्वांस समान अशी एक रीत सांगून तासांत वीस-वीस बावीस-बावीस उदाहरणांचा त्यांनीं फडशा पाडावा! असा चमत्कार अजूनपर्यंतहि कोणीहि गणिती प्रोफेसरानें दाखविलेला नाहीं असें मी खात्रीपूर्वक म्हणतो!"

(१८) वामनराव सांगतात 'बळवंतरावांनीं आम्हांस युक्लिड शिकवितांना फळ्यावर आम्ही मुलांनीं मुद्दाम त्यांचा घोंटाळा उडावा म्हणून A B C हीं नेहमींचीं अति परिचित अक्षरें न मांडतां काहीं तरी Q F X अशीं मांडावीं. पण त्या बहादरानें खुर्चीवर बसूनच मागें फक्त एकदां मान वळवून फळ्यावरील आकृति व तीं अक्षरें पहावींत व हसत उलट मुलांचाच घोटाळा उडवीत शेवट पर्यंत पुन: फळ्याकडे न पाहतां अति मजेनें आम्हांस तो सिद्धान्त त्यांनीं बिन चूक समजावून द्यावा!'

(१९) दे. भाऊसाहेब लवाटे हेहि वामनरावांच्याच वर्गांत होते. भाऊ साहेब म्हणतात, "मी एकदां सर्व मुलांच्या आग्रहावरून, सर्वांच्या समजुती प्रमाणें अतिशय अवघडांतलें अवघड म्हणून एक उदाहरण मुद्दाम टिळकांस वर्गामध्यें एकदम विचारलें आज टिळकांची 'फजीति' होणार असें प्रत्येकास मनांत वाटलें परंतु मी मोठ्या ऐटीनें वाचवरून उठून उदाहरण वाचून दाखविण्याचा अवकाश तों ताडकन् एका घावानें जसा नारळ फोडावा त्याप्रमाणें त्यांनीं तें फळ्यावरूनहि न समजावून देतां तोंडानेंच सोडवून टाकलें. तेव्हां आम्ही सर्व मुलें अगदीं खजील झालों, व हें प्रकरण काहीं निराळेंच आहे असें तेव्हांपासूनच मनांत आम्ही समजून राहिलों!!"

आपलें कुटुंब कैलासवासी झालें, याबद्दल त्या वेळीं मला किती दुःख झालें म्हणून सांगू ? आपणास तर ती बातमी कळल्यावर काय वाटलें असेल याची कल्पना ६ होत नाहीं. " किंचित् सकोचित मुद्रेनें लोकमान्य म्हणतात, "तुम्ही आता विचारताच म्हणून सांगतो. मूळ माझे स्वभावात भावना कमी आहे असें नाहीं, पण अनुकूल सवेदनेनें हर्षातिशय अगर प्रतिकूल सवेदनेनें शोकातिशय असें मला कधींच होत नाहीं. याचा अर्थ असा नाहीं कीं, मी सुखदु खातीत आहे. पण त्याहिबरोबर हेंहि खरें कीं, गीता व वेदान्त यांच्या मननानें व चिंतनानें विकाराचा क्षय होतो हा माझा अनुभव आहे. "

(१३५) लोकमान्य मंडालेहून सुटून आल्यावर सरकारनें त्यास कसें 'वाळीत' टाकलें होतें व लोकास कसा दरारा बसविला होता, हें सर्वांस माहीतच आहे. त्याच वेळीं एका प्रसिद्ध इंग्रज मनुष्यास लोकमान्यांनीं द्रव्याची मोठी मदत केली तें पाहून अण्णासाहेब म्हणतात, मी त्यास म्हणालों, 'विनाकारण पैशाचा असा का दुरुपयोग करता ? ' ते म्हणाले, "अहो, हें राजकारण आहे. पैशाचा मलिदा मी त्यास चारीन तेव्हाच हा माझे उपयोगी पडणार. राजकर्त्यांच्या हाडामासाचा हा असल्यामुळें त्याचेकडून या पैशाच्या दसपट काम मी साधून घेतल्याशिवाय राहणार नाहीं आवळा दिल्याशिवाय कोहळा मिळणार कसा ? " आणि खरोखरच त्यांनीं त्याचेकडून कोहळा मिळविला हें आम्हास माहीत आहे !

(१३६) श्रीमत अण्णासाहेब नेने यांच्या आठवणी वर लिहिताना त्यांचेसबंधीं काहीं धरून उठविलेल्या गैरसमजाच्या धुळीच्या शमनार्थ खुद्द लोकमान्यांनीं, केसरींत लिहावयाच्या मजकुराचे वेळीं सहज बाबासाहेब विद्वांस यांचेजवळ काढलेले उद्गार अशा वेळीं प्रसिद्ध करणें अनौचित्याचें होईल असें वाटत नाहीं. लोकमान्य म्हणाले, " कोणी काय वाटेल तें म्हणो, इतकेंच काय पण दुसरेंहि कोणी त्याची साथ करो, जोंपर्यंत मी जमविलेल्या पैशाचे ( होमरूल–फंडाचे ) अण्णासाहेब नेने खजिनदार आहेत व मराठे ऑडिटर असून आमचा XXX अकौन्टट आहे तोंपर्यंत मला ब्रह्मदेवाचीहि भीति बाळगण्याचें कारण नाहीं ! मग XXXXX ची कथा काय ? "

(१३७) सन १९१७ ची कलकत्याची कॉंग्रेस होऊन मी परत येत असता वाटेंत चांदा ( मध्यप्रांत ) येथें माझे आप्त रा. सा. दिगंबर कृष्ण कोल्हटकर असिस्टंट जज्ज यांचेकडे मी उतरलों होतों रा ब वामनराव कोल्हटकरहि तेथेंच आलेले होते. कलकत्त्याहून परत येत असता लोकमान्यास चांदेकर मडळी मुद्दाम तेथें आणणार होती कोल्हटकर यांचे बगल्यावरून लोकमान्यांची मिरवणूक जाणार होती दुफेर रस्ते शृंगारण्यात आले होते त्याच्याकडे पाहून मध्यप्रांतातील नेमस्तामणी वामनरावजी म्हणतात " Certainly he is a

very valuable man and by all means he deserves all public adoration. So long, we in vain misunderstood the man." (खरोखरच हा पुरुष केवळ अमूल्य आहे आणि जनतेनें त्यास भजावें असाच तो आहे. इतके दिवसपर्यंत आम्ही उगाचच त्यांच्याविषयीं विनाकारण त्यांचेविषयीं गैरसमज मात्र करून घेतला होता.) एके काळीं लोकमान्यांस शत्रु म्हणून लेखणाऱ्या नेमस्त मंडळींकडून हें सर्टिफिकेट घेण्यास त्यांस कसे टाकीचे घाव सोसावे लागले हें सांगण्याचें कारण नाहीं.

(१३८) सदर चांदा येथील मुक्कामांत एके दिवशीं रात्रीं चांदण्यांत रावबहादुरांशीं मी गप्पा गोष्टी करीत बोलत असतां, त्यांचा विद्याव्यासंग, गीताभ्यास व त्यांचें दांडगें वाचन यांविषयीं मला अत्यंत आदर असल्यामुळें, मीं त्यांस मुद्दाम विचारलें, "टिळकांचें गीतारहस्य तुम्हास कसें काय वाटतें?" बोलण्या कष्टानें पण अत्यंत सरळ व प्रामाणिकपणें ते म्हणाले "तूं विचारतोस म्हणूनच सांगतों, Mr. Tilak's *magnum opus* is certainly unparalleled; but I wish it had been from the pen of Justice Ranade. I cannot frankly admire it as I would have done in the case of Ranade." (टिळकांचा हा प्रचंड ग्रंथ अद्वितीय आहे, यांत शंका नाहीं. परंतु मला वाटतें, हा ग्रंथ न्या. रानडे यांनांच शोभत. त्यांचे हातूनच तो व्हावयास पाहिजे होता. रानडे यांनीं हा ग्रंथ लिहिला असता तर त्याविषयीं आम्ही जे धन्योद्गार काढले असते तसे टिळकांचे बाबतींत होणें शक्य नाहीं!)

(१३९) कै. श्री. बाळासाहेब नातू सार्वजनिक सभेचे खजिनदार असल्यामुळें त्यांजकडे वरचेवर जाण्याचा मला प्रसंग येई. कांहीं कारणामुळें लोकमान्यांच्याविषयीं तेथें बोलणें निघालें. तेव्हां ते म्हणाले, "मी बळवंतरावांस एकदां म्हणालों 'तुम्ही आपली व केसरीची सर्व शक्ति, लोकांनीं स्नानसंध्या करावी व धर्मानें वागावें इकडे खर्च केली असती तर देशाचा फार अधिक फायदा झाला असता.' यावर टिळक म्हणाले "अहो, परदास्यांतून सुटणें व दुसऱ्यांस सोडविणें हीच खरी पहिली संध्या आहे. तुम्ही ब्रह्मवाक्य मानणाऱ्या आद्य शंकराचार्यांनींसुद्धां 'को नरकः?' यास 'परतंत्रता' हेंच उत्तर दिलें आहे. या नरकांतून मुक्त झाल्यावर मग दुसरी भाषा; आणि म्हणूनच रामायण—महाभारतकाळीं ब्राह्मणांनीं निरुपायास्तव क्षत्रियांचें काम अंगावर घेतलेंच कीं नाहीं? दुर्दैवानें आज तशीच आमची स्थिति झाली आहे."

(१४०) वरील आठवणीबरोबर दुसरीहि एक आठवण झाली. प्रो. जिन्सीवाले हे श्री. बाळासाहेब नातू यांचेप्रमाणेंच धार्मिक व कर्मठ होते. त्यांनीं एकदां लोकमान्यांस धोंडोपंत विद्वांस यांचेबरोबर निरोप पाठविला कीं, "काय,

वाटेल तें करा, पण सध्या, त्रिसुपर्ण व ब्रह्मयज्ञ केल्याखेरीज राहत जाऊ नका ” यावर उलट लोकमान्यांनी त्यास निरोप पाठविला तो असा –" मच्यासाहेबास ( प्रो निनवीवाले यास ) म्हणावें कीं, सकाळीं मी जागा झाल्यापासून रात्रीं झोंपीं जाईपर्यंत मातृभूमीच्या चिंतनावाचून माझा एक क्षणहि जात नाहीं हीच माझी सध्या हेंच त्रिसुपर्ण व हाच ब्रह्मयज्ञ ! तरी पण सहज घडल्यास मला तें नको आहे असें मात्र नाहीं ”

(१४१) लोकमान्य मंडालेहून सुटून आल्यावर त्यांचा कीर्ति–भानु ऐन मध्यान्हीं तळपत असता, एके दिवशीं मी सहज ××× यांच्याशीं बोलताना, त्यांच्या मनाचा ताजवा मला पूर्ण माहीत असल्यामुळें, मी मुद्दाम त्यास विचारलें ' हल्लीं ठिकठिकाणीं बळवंतरावजींच्या अपूर्व मिरवणुकी निघतात व बादशहापेक्षाहि त्यांचा विलक्षण सन्मान होतो इतकेंच काय पण देवाप्रमाणें लोक त्यास भजतात याचें बळवंतरावास कसें काय वाटत असेल ? त्यास किती तरी आनंद होत असेल नाहीं ? ' चटकन् ××× म्हणतात ' छट् ! बळवंतरावजींचे ते दिवस मागेंच निघून गेले आहेत ते आता मनानें या सर्वांच्या वर आहेत खरोखर ते अलीकडे शोक–आनंद या विकारातीत झाले आहेत लोकांची ही सन्मानाची उपाधि केवळ आपलें कार्य अधिक विस्तारावें याच सात्त्विक बुद्धीनें ते साहीत असावेत, असें मला वाटतें नाहीं तर, एरवीं त्यांनीं क्षणभरहि असले प्रकार नि सशय चालू दिले नसते असें मला खास वाटतें पण करतात काय, लोक समूह हा तर त्यांचा नियमाचा धडाच होऊन बसला आहे ! '

(१४२) रा विनायक गणेश लिमये बी ए यांजकडे मी एकदा गेलों असता त्यांनीं आपला स्वत चा अनुभव सांगितला तो पुढें देत आहे ते म्हणाले " वे शा स प्रो किंजवडकरशास्त्री यास लोकमान्यांनीं काहीं एक ग्रंथ लिहिण्यास सांगितला होता सदर बाबतींत शास्त्री बुवाकडे जाऊन मी लिहिण्याचें काम करीत असे पण एकाएकीं माझे डोळे बिघडले व लिहिण्या वाचण्यास मी असमर्थ झालों ” एके दिवशीं शास्त्रीबुवा लोकमान्याकडे गेले असता त्यास लोकमान्य म्हणाले " आमचें काम ( ग्रंथ लिहिण्याचें ) कोठपर्यंत आलें आहे ? ” शास्त्रीबुवा म्हणाले ' आमचे मदतनीस लिमये याचे डोळे एका एकीं बिघडल्यामुळें लेखनाचें काम लांबणीवर पडलें आहे ' लोकमान्य म्हणाले ' कोण लिमये ? कशानें एकाएकीं असे डोळे बिघडले ? त्यास तांबडतोब माझ्याकडे पाठवून द्या ” शास्त्रीबुवानीं मला लोकमान्याकडे जाण्यास सांगितलें, पण त्यांची माझी ओळख नाहीं, कधीं येणें जाणें नाहीं, काहींहि संबध नाहीं, असें असता आपण त्याजकडे कसें जावें असें वाटू लागलें पण त्या थोर पुरु षाची आज्ञा उल्लघणें अधर्म्य होय असें वाटल्यामुळें त्याजकडे गेलों त्यांनीं मला सर्व माहिती वगैरे विचारली व म्हणाले "तुमचे डोळे येथील डॉक्टराकडून

बरे होणारे नाहींत, त्याकरितां तुम्हास मुंबईसच गेले पाहिजे. मुंबईस तुम्ही अवश्य जा." ' पण जा कसें ! माझी तशी सांपत्तिक स्थिति नाहीं, यामुळें हें मला अशक्य आहे ' असें मी किंचित् निराशेनें त्यास म्हणालों. त्यावर ताडकन् लोकमान्य म्हणतात, " आम्ही ज्या वेळेला एकाद्याला काहीं गोष्ट करावयास सांगतों तेव्हां ती केवळ आम्ही आमच्या जबाबदारीवरच सांगत असतों. नेहमींचा आमचा असाच परिपाठ आहे. तुम्हास काळजी करण्यास नको. तुम्ही खुशाल मुंबईस जा, उपचार करा, सर्व खर्च मी देईन ! ' तरुणावर पितृवत् प्रेम करणाऱ्या या पुढाऱ्याच्या थोर व उदार मनाची मी आपले मनांत वाहवा करीत घरीं गेलों, व पुढें अन्य रीतीनें मी आपली सोय मुंबईस करीत आहे असें त्यास लिहून पत्रद्वारें त्याचे कृतज्ञतापूर्वक आभार मानले. पुढें कैक दिवसांनीं ते चिरोल-केसच्या अगदीं गडबडींत असतां व बोलण्यासहि त्यांना त्या वेळीं फुरसत नसतां त्यांतले त्यांत किंजवडेकरशास्त्री यांच्याशीं त्यांनीं त्या पत्राचा उल्लेख केला याचें आश्चर्य वाटतें ! "

(१४३) न्यू इ. स्कूलमधील लोकमान्यांच्या बरोबरीचे एक शिक्षक व त्यांचे स्नेही श्री. हरिभाऊ आमडेकर यांचेकडे ता. २४।८।२० रोजीं मी गेलों असतां त्यांनीं मला लोकमान्यांविषयीं कित्येक गोष्टी सांगितल्या, व त्यामुळें लोकमान्यांच्या चरित्रावर विशेष प्रकाश पडणार असला तरी त्या केवळ व्यक्तिविषयक असल्यामुळें त्या सर्व गाळून, सांगण्यासारखी अशी फक्त एकच गोष्ट येथें देतों. ते म्हणाले, शाळेंतील ड्रिलमास्तर गंगाधरपंत दीक्षित यांजकडे एके दिवशीं काहीं नैमित्तिक प्रसंगानें विष्णुशास्त्री चिपळूणकर, बळवंतराव, आगरकर वगैरे बरीच शिक्षक मंडळी भोजनास गेली होती. भोजन चालू असतां आग्रह सुरू झाला. तेव्हां बळवंतराव म्हणाले " येथें आग्रह करण्याचें काहींएक कारण नाहीं. शिवाय अकरा वाजतां आपणा सर्वांस शाळेंत कामावर जावयाचें आहे हें लक्षांत ठेवा. " पण त्यांच्या या म्हणण्याकडे फारसें कोणी लक्ष दिलें नाहीं आग्रह सुरू झाला. काहीं मंडळी ईर्षेस पेटली व पैज मारण्यापर्यंत पाळी आली अखेर बळवंतरावहि याव सांपडले व अखेर त्यांची आणि दुसऱ्या एका गृहस्थाची चढाओढ सुरू झाली, व यांत हरेल त्यानें पांच रुपये शाळेंतील ड्रिलच्या सामानाकरितां द्यावे असं ठरलें ! टिळकांच्या सदर सामनेदारानें मोठ्या [illegible]नें वेरनाचे वीस लाडू खाल्ले व बळवंतरावांनीं एकवीस खाऊन पैज जिंकली ! बळवंतराव आतां आजारी पडणार, कोण हा अत्याचार वगैरे मधून मधून, शास्त्रीबुवा व आगरकर एकसारखें बोलत, व निषेधहि करीत. पुढें जेवण झाल्यावर काहींनीं आज शाळेंत जाणें अशक्य म्हणून चिठ्ठी पाठविली काहींनीं तेथेंच वामकुक्षी केली व काहींनीं आज शाळेंत येण्यास उशीर होईल म्हणून कळविलें. पण शास्त्रीबुवा आपलें घोंगडें मार्गें घरीं ठेवून शाळेंत येतात तो, वर्गावर जाऊन आपल्या

नेहमींच्या मोठ्या आवाजानें शिकवीत असलेल्या टिळकांचा आवाज ऐकून शास्त्री बुवा अगदीं थक्क झाले इतकेंच नव्हे, तर तास संपताच ज्या कोणा शिक्षकास येता न आल्यामुळें वर्ग मोकळा पडला होता, त्या वर्गावर जाऊन त्यांनी तास घेतला हें पाहून शिक्षक मंडळी बसण्याचे खोलींत शास्त्रीबुवा आल्यावर म्हण तात 'जोंपर्यंत टिळक शाळेंत आहेत तोंपर्यंत तरी निदान आमची शाळा बुडण्याची मला काळजी नाहीं !'

(१४४) एके रविवारीं (ता ७ जुलै १९१८) अनपेक्षित रीतीनें सका ळच्या डाकेनें आमच्या ऑफिसमध्यें केसरी ऑफिसांत मॉंटेग्यू–चेल्मसफर्ड सुधारणाच्या रिपोर्टाच्या तीन प्रती अचानक येऊन धडकल्या तें पाहून प्रथम सर्वांस आश्चर्य वाटलें तात्काळ लोकमान्यांनीं आपणा स्वत करितां एक प्रत घेतली, एक फळकर–खाडिलकर यांस दिली, व एक करंदीकर–गोखले–भट यांचे हवालीं केली, व दुसरे दिवशी–सोमवारीं–सायंकाळीं सर्वांनीं एके ठिकाणीं जमून आपले अभिप्राय मला कळवावेत असें सर्वांस सांगितलें लोकमान्यांनीं त्या दिवशीं, रविवारीं सकाळीं १७० फुलस्केप पानांचें तें पुस्तक एकदा ज हातांत घेतलें तें सायंकाळीं सभेपर्यंत खालीं ठेविलें नाहीं स्नान, खाणें व इतर व्यवहार सर्व बाजूस राहिला अशी विलक्षण एकाग्रतेची समाधि त्यांनीं लाविली होती, असें त्याचे भाचे रा बाबासाहेब विद्वांस यांनीं सांगितलें रात्रीं व दुसरे दिवशीं, सोमवारीं सकाळीं, त्या पुस्तकावरून त्यांनीं आपलीं टिपणें, टांचणें करून दोन प्रहरीं केसरीकरितां अग्रलेखहि लिहून ठेविला त्या अग्रलेखास त्यांनीं "उजाडलें, पण सूर्य कोठें आहे ?" असा त्या सुधारणाच्या तात्पर्यात्मक व सर्व निष्कर्षक मथळा दिला ! चार वाजता गोरक्ष्या दिवाणखान्यात वरील सर्व मंडळी जमण्या पूर्वी प्रस्तुत लेखकानें थट्टाखोरपणें 'तुम्ही तो रिपोर्ट वाचलाच असेल, सरकारानें उत्तर आपणास काय दिलें आहे ?' असें वरील मंडळींपैकीं एका

उपनिषदाच्या शब्दात मी तर त्याचें असेंच वर्णन करीन की, मॉन्टेग्यु शिर कार्टिसपुच्छ प्रतिष्ठा!" नंतर मग मंडळींचा पुष्कळ वादविवाद झाला, व उद्यांचे केसरीकरितां आपण आताच याच विषयावर आर्टिकलहि लिहून खाली बाबाकडे दिलें आहे असें ते म्हणाले हें ऐकून सर्वांस आश्चर्य वाटलें पुढें लोकमान्य म्हणाले "त्या आर्टिकलला मी 'उजाडलें, पण सूर्य कोठें आहे!' असें हेडिंग दिलें आहे पण ही कल्पना मला A drama without Hamlet यावरून सुचली" नंतर टाईम्स-क्रॉनिकलकडे सुधारणासंबंधीं आपला अभिप्राय आजचे आज तारेनें पाठविण्याचें त्यांनीं ठरविलें, व लगेच तेथेंच मसुदा तयार होऊं लागला आरंभींच The Reforms are quite worthless एवढें वाक्य तें किंचित् रागानें एकदम उद्गारताच सर्वांसच जरा करोंसें वाटलें, इतकेंच नव्हे तर इतक्या कडक पद्धतीनें व सबंध हिंदुस्थानात सर्वांचे आधीं, आजचें आज, आपणच प्रथम आपलें मत जाहीर करीत आहात याची त्यास त्या मंडळींनीं अत्यंत सौम्य व नम्र रीतीनें किंचित् जाणीवहि करून दिली पण सिद्धांताप्रमाणें सिद्ध झालेलीं त्यांचीं पायाशुद्ध व शास्त्रीय मतें वर्तीं व्यक्त करण्याची त्यांची तीक्ष्ण पद्धति यात फरक कसचा पडतो! पुढें केसरींतें मत प्रमुख इंग्रजी पत्रांना कळवितांना कसरीनें योजलेल्या हेडिंगाचें भाषांतर तारेंत घालण्याची पाळ आली तेव्हां कोणी The morning without the sun कोणी The day dawned but the sun वगैरे वगैरे भाषांतर सुचवूं लागले तों एकदम लोकमान्य म्हणाले "थोडक्यांत पण 'पोएटिक' The sunless morning असें लिहा म्हणजे झालें!"

(१४५) दुसरे दिवशीं सकाळीं म्हणजे मंगळवारीं मी त्यांचेकडे लिहावयास गेलों असतां आंतील खोलींत ईझिचेअरवर पडून रा. बापुकाका जोशी यांच्याशीं ते बोलत होते नवीन सुधारणा त्यांच्या डोक्यांत एकसारख्या घोळत होत्या सुधारणांचा पोंचटपणा, मवाळांचा तिरस्कार्य लोचटपणा, इंग्रजांचा कावेबाजपणा व आपल्या लोकांचा कमकुवत उर्फ दुबळेपणा या चतुर्विध विचारांनीं केव्हां फार निराशेनें तर केव्हां मधून मधून प्रबल आशेनें ते बोलत होते बोलतां बोलतां किंचित् पडत्या आवाजांत ते म्हणाले "आमच्या हयातींत येथपर्यंत तरी मजल गाठेल असें तरी एके काळीं आम्हास कोठें वाटलें होतें? समव्यवसायी बंधूंना (मला वाटतें या वेळीं विष्णुशास्त्री, आगरकर वगैरे मंडळी त्यांच्या मनापुढें असावी) आशेचे तुरळक किरणहि पहावयास न सापडतां या जगांतून जावें लागलें त्या मानानें माझें मोठेंच भाग्य म्हटलें पाहिजे, आणि आलों या गतीच्या दसपट वेगानें आम्ही या वेळीं पुढें गेलों व भगवद्गीतेचें बीज सर्वांस नीट कळलें तर मला उमेद आहे कीं, माझ्या देखत जरी नाहीं तरी दहावीस वर्षांत देशास पूर्ण स्वातंत्र्य मिळण्यास हरकत नाहीं!"

(१४६) तळेगावच्या नूतन श्रीसमर्थविद्यालयाच्या पुनरस्थापनेच्या बाबतींत लोकमान्यांनीं मुद्दाम पडद्याआड राहून गु. प्रो. अण्णा विजापूरकर यास शक्य ती मदत केल्याचें लोकास माहीत नसावें असें दिसतें. सदरहु बाबतींत सर माधवराव चौबळ याजकडूनहि इष्ट व शक्य ती मदत घेण्यास लोकमान्यांनीं कमी केलें नाहीं. विद्यालयाच्या बाबतींत प्रस्तुत लेखकाबरोबर दोन तीन वेळा पत्रें देऊन त्यास पुणें लष्करमधील बंगल्यात सर माधवरावसाहेब याजकडे लोकमान्यांनीं मुद्दाम पाठविलें होतें. त्यापैकीं एके प्रसंगीं रात्रीं दहा वाजता मी सरसाहेबाकडे पत्र घेऊन गेलों असता वेळप्रसंगीं गव्हर्नरसाहेबाच्या खुर्चीवर बसून काम केलेल्या सरसाहेबाचे हातात अगदीं खेडेगावी पद्धतीचा चंचीचा बटवा व त्याची खाली लाकवर लोंबत पडलेली नाडी हा थाट पाहून मला जरा आश्चर्यच वाटलें. लोकमान्यांनीं दिलेलें पत्र त्याचे हातात मी देऊन जवळच खुर्चीवर बसण्यास त्यानीं मला सांगितल्यावर त्यानीं तें पत्र फोडून वाचून झाल्यावर तेथें असणाऱ्या एका बड्या गृहस्थाकडे वळून ते म्हणतात, "मी पेन्शन घेण्याचे आधीं एकदा माझे अध्यक्षतेखालीं किर्लोस्कर थिएटरात सभा झाली त्या वेळीं तेथें टिळक आले. त्याच्या स्वागतार्थ श्रोत्यानीं केलेल्या त्याच्या नावाच्या गजरानें थिएटर कोसळून खालीं पडतें कीं काय, असें वाटलें. हें सर्व पाहून मला मनातून फार आनद झाला " इतकें बोलून हातातील पत्र पुन वाचीत किंचित् मजकडे वळून पण जवळच्या त्या गृहस्थाकडे पाहत सरसाहेब म्हणतात "Once he (Tilak) takes to a thing he has no minute to wait He will try to accomplish it by whatever means at his hands With such giant like efforts the country, must see better days " असें म्हणत लोकमान्यांस देण्याकरिता त्यानीं एक चिट्ठी लिहून दिली. ती घेऊन लोकमान्याकडे मी आलों तो त्यास झोंप लागली असल्यामुळें रा बाबासाहेब याचेजवळ ती ठेवून मी घरीं गेलों. तो सोमवारचा दिवस होता गु तात्या करंदीकर केसरीचीं प्रुफें पाहत तेथें बसले होते. अकराचे सुमारास लोकमान्य जागे होताच बाबानीं त्यास ती चिट्ठी देताच "आताचे आता पावणेबाराचे गाडीनें तळेगावास जाऊन विजापूरकर यास सकाळचे मेलनें माधवराव चौबळ येत आहेत त्यास तळेगावचे स्टेशनावर भेटून त्याचेबरोबर मुंबईस जाण्यास त्यास सांगावयाचे आहे, तरी ताबडतोब कोणास पाठविण्याची व्यवस्था करा " असें गु तात्या करंदीकर यास लोकमान्यानीं सांगताच ते माझ्या घरीं आले मी लगेच रवाना झालों रात्रौ ११-१२॥ वाजता गु अण्णा विजापूरकर यास उठवून माझ येण्याचें प्रयोजन मी सांगताच ते म्हणतात "खरोखर बळवंतराव नुसत्या शिक्षणाचा प्रश्न हातीं घेते तर राष्ट्रीय शिक्षणाचें पूर्ण स्वराज्य ते केव्हाच मिळवते! ते व

डोक्यात घेतील त्याचा अगदीं पिच्छा पुरवतील केसरीवर आरूढ होणें त्यानाच शोभतें!"

(१४७) ताईमहाराज-प्रकरणाचा एकदाचा अखेरचा निकाल लोकमान्यास अनुकूल असा प्रिव्ही कौन्सिलात लागल्याची तार येताच त्या आनंदाचें काय वर्णन करावें? सदर दिवशीं मी आजारी म्हणून घरीं पडून होतों. पण लोकमान्यास केव्हा भेटेन व त्याचे अभिनंदनार्थ त्याच्या चरणावर केव्हा मस्तक ठेवीन असें मला झालें होतें अखेर त्याच दिवशीं रात्रीं १०॥ चे सुमारास मी त्याजकडे जाऊन त्याचे पायावर डोकें ठेवून आनंदाचे चार शब्द बोलल्यावर ते म्हणवात, "या खटल्यानें गेलीं १४ वर्षे माझी बुद्धि व शक्ति बरीच खाऊन टाकली अखेर बरी झाली म्हणून ठीक तरी पण आनंद झाला असता हसणें व दु ख झालें असता रडणें या निवळ माकडचेष्टा आहेत असें समजून आपण आपलें काम मात्र अखंड करीत राहिलें पाहिजे"

(१४८) तपस्वी बाबासाहेब पराजपे याचा स्पष्टवक्तेपणा महशूर आहे त्याच्याशीं एकदा बोलत असता ते म्हणाले, "मी टिळकाकडे एकदा जाऊन त्यास म्हटलें, 'परवापासून आपल्या ऑफिसातील दोन मदतीचर गृहस्थास येथून रजा मिळाली, आश्चर्य आहे! आपल्या चालीस ते कमी पडत असले तरी त्यास शिकवून, वेळोवेळीं त्यास सूचना देऊन आपण तयार केले असते तर ते तयार झाले असते सरकारी नोकरीच्या यशात घातलेला कसलाहि इसम जर त्या साच्यात बसतो तर आपल्या ऑफिसमध्ये असें का होऊ नये? दोष कोणाचा?' हें ऐकून टिळक म्हणवात "अहो, असल्या गोष्टी कोठें शिकवून येतात? तें जातीचेंच लागतें आम्हाला कोठ कोणी शिकविलें होतें? छापाचे मातीचे गणपति काय थोडे तयार होवात? मग शाडूच्या कोरीव मूर्तीची काहींच किंमत उरतीना! यथें येणाऱ्या आमच्या मडळींस साहित्यसामुग्री वगैरे सर्व काहीं आम्ही पुरवितों, त्यास पुस्तकें वगैरे जें काहीं लागेल तें सर्व देतों त्यातून आपल्या कर्तृत्वानें जो डोकें वर काढील-मग तो एखाद च का होईना-तोच टिकाऊ होईल व हें सर्व साभाळील"

(१४९) लोकमान्यानीं चिरोलवर खटला करून त्यापायीं आपली चीजवस्तु राहण्याचें घरहि गहाण टाकून व वर गाणरी लाख दीड लाख रुपयाचें डोक्यावर कर्ज करून खटल्याकरिता विलायतेस जाण्याची तयारी केली होती, हें आता सर्वश्रुतच आहे विलायतेस जाण्यापूर्वी विश्वासातील काहीं मडळींस जवळ घेऊन लोकमान्य म्हणतात, "मी आता विलायतेस चाललों खटला आपणा बारसा झाला तर माझें अब्रुनुकसानीबद्दल मिळणाऱ्या पैशाचें मी काय करणार हें काहीं सांगावयास पाहिजे असें नाहीं पण उलट खटला अगावर आला तर मात्र मी हिंदुस्थानांत लगेच परत येताच (पुढील वाक्य हसत विनोदानें

( म्हणतात ) सरकारी नोकरीप्रमाणें पाहिलें तरी देखील मला आता जनतेकडून 'पेनसलींत' निघण्यास हरकत नाहीं, 'पेनसल' राहिली, पण जनतेची निदान एक वर्ष 'हकाची' रजा घेऊन सिंहगडावर बसून माझे अपूर्ण राहिलेले ग्रंथ मी पुरे करून त्यावर मला सहज हजारों रुपये मिळतील ते मिळवून ऋणमुक्त झालें पाहिजे व हें अगदीं सहज होईल यात मला बिल्कुल शंका वाटत नाहीं शिवाय या अशा अडचणीच्या काळातच माझे हातून ग्रंथ निर्माण व्हावेत असाच योगायोग व ईश्वरी संकेत असावा असें दिसतें " यावरून परावलंबनाचा त्या विजयी योद्धयाच्या मनास कधींहि विटाळ न होता निव्वळ आत्मबळावरच कोणत्याहि अचाट कार्यास ते कसा हात घालीत हें यावरून दिसून येतें. बाकी त्यास पितृवत् मानणाऱ्या व असंख्य शीर्षाधिष्ठित करणाऱ्या जनतेनें पुत्राची भाकळी म्हणून त्याचे चरणीं तीन लक्ष रौप्य मुद्रिका अर्पण केल्या ही गोष्ट वेगळी. पण ही पर्स, ते हिंदुस्थानात येताच त्यास देण्याकरिता, ते विलायतेंत असतानाच, इकडे पैसे गोळा होऊ लागले होते ही गोष्ट त्यास समजली तेव्हा त्यास बरें वाटलें नाहीं कारण लोकाच्या मदतीच्या अपेक्षेवर आपण हा खटला उभारलाच नसून तो आपण आपल्या मनगटाच्या सामर्थ्यावर व आत्मविश्वासावर उभारला आहे. खटला सार्वजनिक स्वरूपाचा असला तरी लोकास न विचारता तो आपण सुरू केला आहे, सबब त्याचा बोजा लोकावर काय म्हणून, असं त्यास वाटत असे म्हणून त्या वेळीं विलायतेहून त्यानीं रा बाबूराव गोखले यास पाठविलेल्या कित्येक पत्रातून याविषयींचा पुढीलप्रमाणें लिहिलेला मजकूर पाहून त्याच्या निरपेक्षतेसंबधानें मन अधिकच उचंबळून येतें " Mr Kelkar has cabled to you to stop fresh collection for the proposed Purse Fund So please discontinue at once the Purse Fund collections in any way. (पत्र-ता ३१ जुलै १९१९) I have already written to you to stop at once the Purse collections in any manner whatever I did not like your idea of sending cards on my birth-day But it is no use quarrelling about what has taken place I think you had better close up the thing now at once (पत्र-ता १४ ऑगस्ट १९१९) . .. . ...I sincerely hope you have now stopped the collection of the Purse Fund: (पत्र-ता २१ ऑगस्ट १९१९) . .I think you had now better close the Purse Fund, that is, stop securing any new contributions at least (पत्र ता २८ ऑगस्ट १९१९)

(१५०) येणेंप्रमाणें लोकमान्यानीं निकडीचीं पत्रे पाठविलीं, पण लोकमान्या-वरील प्रसंग हा आपणावरील्च प्रसंग असें मानणाऱ्या त्याच्या सर्व बंधुभगिनींनीं

लोकमान्य हिंदुस्थानात येण्यापूर्वीच तीन लक्षाची गाठोडी बांधून ठेविली व ती त्यास पुणें येथें मुद्दाम केलेल्या जाहीर समारंभात अर्पण केली. त्या वेळीं लोकमान्य म्हणाले, "तुम्हास न विचारता मी या खटल्यास हात घातला, म्हणून त्याचा बोजा तुम्हावर लादणें योग्य नव्हतें. तुमच्या अभावीं सदरहु घोंड दूर करण्यास मला कांहीं काल बाजूला बसावें लागणार होतें. पण आज तुम्ही हा बोजा उचललात याचा अर्थच हा कीं, तुम्ही मला तेवढ्यापुरतें विकत घेतलेंत, व मलाहि तुम्हास सांगण्यास आनंद वाटतो कीं, हा मुदैंडादाखल वाया जाणारा माझा काल मी यापुढें तुमच्याच सेवेंत खर्च करीन!"

(१५१) मवाळ झाले म्हणून सर्वच मवाळ अगदीं एक छापीच असतात असें थोडेंच आहे. त्यांतून मनुष्याची पारख असणाऱ्या लोकमान्यास मवाळांच्या पुढाऱ्यांतीलहि प्रकृतिभेद माहीत असल्यास नवल नाहीं. लोकमान्य विलायतेस असता १९१९ सालीं सुधारणांच्या कायद्याबद्दल पार्लमेंटच्या सिलेक्ट कमिटीपुढें होणाऱ्या साक्षीकरिता हिंदुस्थानांतून निरनिराळीं डेप्युटेशनें गेलीं होतीं. त्यात मवाळांच्या डेप्युटेशनात इतरांपेक्षा ना शास्त्री आले तर तितका कार्यनाश होणार नाहीं, अशा आशयानें केळकर यास पाठविलेल्या ता. २८।२।१९ च्या पत्रात लोकमान्य म्हणतात "I may last of all tell you that if Shastri comes to know what the real situation here is, and if he does not fall subsequently into the hands of Basu and Lord Sinha I believe he will agree with us or at any rate not oppose us!"

(१५२) सन १९१९ सालीं लोकमान्य विलायतेहून परत येण्याचे वेळीं अभूतपूर्व बादशाही स्वागत समारंभानें पुण्यपत्तनस्थानीं त्यांचा अलौकिक नगरप्रवेश घडवून आणिला, ही अगदीं ताजी गोष्ट सर्वांचे स्मरणात असेलच. पुणेंच म्युनिसिपालिटीनेंहि त्यास मानपत्र अर्पण केलें, पण त्याशिवाय पुण्यातील सर्व जनतेमार्फत त्यास आणखी एक दुसरें मानपत्र देण्याचें ठ०० पण त्यास जेधे मॅन्शनमधील मंडळींनी—अर्थात् जुन्या दावेदार मवाळ पक्षानें—विरोध करण्याचें ठरविलें. "मानपत्रास पुण्याचे सर्व नागरीक अनुकूल नाहींत, पुष्कळ विरुद्ध आहेत सबब तें मानपत्र सर्व नागरिकातर्फे न देता, टिळकांच्या चहात्या मंडळींचें आहे असें प्रसिद्ध करा, नाहींतर आम्ही तेथें विरोध करू." असा मवाळांच्या सभेंत पास झालेला ठराव प्रसिद्ध झाला. तें पाहून समारंभास विघ्न येऊ नये, तो निर्वेध पार पडावा या शुद्ध बुद्धीनें या मानपत्राच्या चळवळीचे चालक पुरस्कर्ते यांनी मवाळ म्हणतात त्याप्रमाणें करावें असें ठरविलें. ही गोष्ट लोकमान्यास कळताच अपूर्व धीरथी धरलेल्या योद्ध्याप्रमाणें तें पुढें होऊन हा केवळ तत्त्वाचा प्रश्न

पडल्यामुळें सर्व नागरिकांतर्फेंच मानपत्र असेल तर घेण्याचें त्यानीं ठरवून हें सर्व काम स्वत जातीनें पार पाडण्याचें त्यानीं ठरविलें कारण प्रश्न 'मान'–पत्राचा–मानापमानाचा नसून (कारण यापूर्वी शेंकडों मानपत्रें त्यास मिळालीं होतीं व प्रत्यक्ष पुणेंकरांतर्फेंहि म्युनि॰ नें त्यास मानपत्र नुकतेंच दिलेलें होतें) विलायतेंत गाजवलेल्या कामगिरीस पुणें शहरवासीयांच्या मिळणाऱ्या पसंतीच्या तत्त्वाचा होता यामुळें स्वत बद्दलचा हा प्रश्न आहे असें म्हणून लोकापवादास्तव त्यात आपण लक्ष न घातलें तर आता मान क्वचित् तत्त्वाचा व कार्याचा नाश होतो असें पाहून स्वत विषयींच्या निरभिलाष बुद्धीनें, 'केवळ टिळकचाहायाचें तर्फे हें मानपत्र नसून तें सर्व नागरिकांतर्फेंचें आहे छाती असेल तर तेथें विरोध करण्यास या,' असेंहि पत्र मवाळ कपूचे अध्वर्यु रॅ॰ परांजपे यास त्यानीं पाठविलें इतकेंच काय, पण रेमार्केटच्या रणक्षेत्राच्या या छोट्या वाग्युद्धभूमीची रचना कशी असावी, कोणत्या शिबिरामध्यें प्रतिपक्षीयानीं बसावें, एकदर तेथील व्यवस्था कशी असावी इतक्या बारीकसारीक गोष्टीही–त्याचा नकाशा काढून सभेचे व्यवस्थापक डॉ गोपाळराव पळसुले याजकडून करवून घेण्यास त्यानीं कमी केलें नाहीं! तसेंच ता ९।१२।१९ च्या केसरींतील या विषयावरील त्यानीं लिहिलेल्या त्या प्रखर स्फुट सूचना व पुढच्याच अंकातील 'ना पराजयाचा जळफळाट ' हा तिखट अग्रलेख हे त्यांच्या युद्धनैपुण्याचे व कार्यदक्षतेचे अपूर्व मासले होत !

(१५४) गेल्या जानेवारीमध्यें स्वामी श्रद्धानदजी पुणें येथें आले असता येथील त्यांच्या काहीं तासाच्या मुक्कामातील कामाचे गर्दीतच मी त्यास लोकमान्याविषयीं आपल्या आठवणी देण्याबद्दल विनति केली स्वामिजी म्हणाले, 'परकीय राज्यकर्त्यांकडून स्वराज्य कसें मिळवावें हें ज्यानें जन्मभर आपल्या अलौट देशभक्तीच्या व मुत्सद्देगिरीच्या उदाहरणानें लोकास शिकविलें तीच त्याची खरी आठवण होय! इतर सटरफटर गोष्टी घेऊन काय करावयाचें आहे ?' तरी पण माझा विशेष आग्रह पाहून ते म्हणाले 'त्याचा माझा फारसा सबध आला नाहीं व आता या वेळीं काहीं आठवतहि नाहीं, तथापि एक प्रसग सागतों अमृतसरच्या कॉंग्रेसच्या वेळीं टिळक तेथें आले असता कॉंग्रेसचा स्वागताध्यक्ष मीच असल्यामुळें त्यास उद्देशून ते मला म्हणाले "स्वामीजी, खरा ससार–राष्ट्राचा खरा ससार–सुरळीत चालावा म्हणून स्वत स्वार्थसन्यास घेतलेले तुमच्यासारखे शेंकडों सन्यस्त स्वामी आपल्या देशात जर निर्माण होतील तर भगवद्गीतेंतील 'सन्यास' या कल्पनेचा व शब्दाचा खरा अर्थ लोकास चटकन समजेल तुम्हीं आपल्या आचरणानें भगवद्गीतेच्या सिद्धाताचा अर्थच लावीत आहात असें मी समजतों " आर्यसस्कृतीबद्दल टिळकाचें प्रेम कसें विशेष होतें, हें त्यानीं

सांगितलें व नंतर लगेच भरलेल्या श्रीशिवाजीमंदिरांतील सभेंत वरील गोष्टीचा त्यांनीं उल्लेखहि केला.

(१५५) लोकमान्य व श्री. जगन्नाथमहाराज यांचा संबंध पिता-पुत्राप्रमाणें असल्याचें मला माहीत असल्यामुळें श्रीमंत जगन्नाथमहाराज यांनीं लोकमान्यां-विषयींच्या आपल्या कांहीं आठवणी लिहाव्यात अशी त्यांस विनंति करण्याकरितां मी त्यांजकडे मुद्दाम गेलों होतों. पण अनेक कारणामुळें महाराजांचें मन जरा व्यग्र झालें असल्यामुळें 'त्या लिहून काढण्यास मला तूर्त मन स्वास्थ्य व वेळ नाहीं, तरी पण तुम्हांस मी मला आठवेल ती हकीकत सांगतों, तुम्हीच त्या लिहून काढा' असें ते म्हणाले. त्यास मी रुकार दिल्यावर त्यांनीं मोठ्या प्रेमानें व अगत्यपूर्वक सांगितलेल्या हकीकतीवरून पुढील आठवणी लिहीत आहें. लोकमान्यांविषयीं महाराजांचें मन व अंतःकरण प्रेमादरानें व कृतज्ञतेनें इतकें भरून गेलेलें आहे कीं, त्यांच्याविषयीं ते अगदीं जिव्हाळ्याचे त्यांचे उद्गार सांगत, त्या वेळीं वेळोवेळीं त्यांचा कंठ सद्गदित होई, डोळे अश्रूंनीं भरून येत, व मुखावाटें शब्द बाहेर पडणें मुष्किलीचें होई! असो, श्रीमंत, खानदानीच्या, व जुन्या लोकांच्या रोजनिशी लिहिण्याच्या पद्धतीस महाराजांनीं रजा न देतां ती पद्धत चालू ठेविलेली पाहून मला आनंद झाला, व त्या जुन्या रोजनिशीवरूनच त्यांनीं मला पुढीलप्रमाणें थोडीबहुत हकीकत सांगितली —

(१५६) महाराज म्हणाले, "लोकमान्य विलायतेस गेले त्याचे आदले दिवशीं रात्रीं मुंबई येथें सरदारगृहांतील गच्चीवरील त्यांचे खोलींत जाऊन मी त्यांस म्हणालों, "दादा, तुम्ही तर उद्यां विलायतेस जाणार, केसरी वगैरे बाकी सर्व कामाची तुम्ही नीट व्यवस्था करून ठेविली आहे असें समजतें, पण माझी व्यवस्था काय?" ते म्हणाले 'तुमची व्यवस्था! कसली तुमची व्यवस्था! जी व्यवस्था करावयाची ती (दत्तक शाबीत करणें व इस्टेट मिळविणें) केव्हाच कायमची करून टाकली आहे. आतां काय?' मी म्हणालों 'होय, तें सर्व केवळ आपल्याच कृपेचें फळ होय. पण या पायीं आपणास माझ्याकरितां साठ हजार रुपये भुर्दंड भरावा लागला आहे त्याचें काय? ती सर्व रक्कम आपण माझेकडून परत घ्यावी अशी माझी विनंति आहे.' 'एकूण तुमच्या व आमच्या इस्टेटींत

बोलवेना. तेव्हां त्यांनीं मला पोटाशीं धरून माझ्या पाठीवरून हात फिरविल्यावर मला अल्पकाळ काहीं अद्भुत संचार झाल्यासारखें वाटलें! तरी पण जसा परमार्थ तसा योग्य व्यवहार हा ज्याचा त्यासच करावा लागतो व तो एक मानवाचा धर्मच असल्याचें माझे मनात विंबल्यामुळें मी पुन: त्यास म्हणालों 'दादा, तुम्ही म्हणता तें सर्व मला कबूल आहे, इतकेंच नव्हे तर आपण आता बोललेले शब्द ऐकून माझ्यासारखा भाग्यवान् मीच असेंहि मला वाटतें ! तरी पण हें पितृऋण फेडण्यात मला एक प्रकारचा सात्विक आनंद होणार असून एक ऐहिक कर्तव्य केल्यासारखें मनास वाटून त्यायोगें मला पराकाष्ठेचें समाधान होणार आहे ' तेव्हा ते म्हणाले ' ठीक आहे, अशानें तुम्हाला समाधानच होणार असेल तर बगलाबागेची तुमची काहीं जमीन मला द्या. तिची आज किंमत तीस हजार रुपये होईल. ती जागा, उत्साहानें व राष्ट्रीयत्वाच्या अभिमानानें काम करणाऱ्या मंडळीस न्यू पूना कॉलेजाकरिता भाड्यानें मी देणार आहें बाकीचे तीस हजार मी तुम्हास माझा मुलगा समजतों म्हणून प्रेमपूर्वक बक्षीस म्हणून देत आहें ! मग तर झालेंना ? ' ही हकीकत लोकमान्याचे उभयता चिरंजिवास मीं मागेंच सांगितली असून दादांचे जिवलग स्नेही श्रीमंत अण्णासाहेब नेने यास तर हें सर्वच इत्थभूत माहीत आहे."

(१५७) महाराज म्हणाले 'लोकमान्य १९२० साली विलायतेहून येथें परत आल्यावर माझें पहिलें कुटुंब निवर्तल्याचें त्यांना समजल्यामळें एके दिवशीं ते माझ्या समाचारास व सांत्वनार्थ आमचे वाड्यात आले. ती धीरोदात्त मूर्ति पाहून कोणाचें दुःख एकदम विरघळून जाऊन त्याचे मनास पराकाष्ठेचें समाधान होणार नाहीं ? आणि खरोखरच त्या महात्म्यानें मला त्या प्रसंगीं कोणता अमृततुल्य उपदेश केला तो ऐका. ते मला एकदम म्हणाले ' तुम्ही असें दुःख करीत काय बसता ! मृत्यूबद्दल दुःख ? ' मरण प्रकृति शरीरिणाम् " हें कसें विसरता ? होय, मनुष्यानें दुःख करावें, पण केव्हा ? तर तो कर्तव्य करण्यास चुकेल तेव्हा ! मृत्यूस भिता ? व त्यानें कोणास गाठलें म्हणून दुःख करिता ? माझे बद्दल मी तुम्हास सांगतों कीं, मृत्यु जरी मजकडे आला तरी मी त्याला माझें काम संपेतोंपर्यंत बाहेर जाण्यास सांगेन ! मी तुम्हाला विचारतों, तुम्हालासुद्धा मनावर इतका ताबा का ठेवता येऊ नये ? का तुम्हीं माणसें नाहींत ? अभ्यासानें सर्व कांहीं साध्य होतें. ' मी म्हटलें 'पण दादा, आपण आमची व आपली बरोबरी कशी करता ? ' हसत पण किंचित् उद्वेगानें ते म्हणाले ' हें पहा ! प्रत्येक मनुष्य मला नेहमीं अगदीं असाच सन्देहें बोलतो ! काहीं न करता निसटण्याची ही पळवाट मोठी सोयीची आहे खरी ! पण जगातील अनुभवानें मी असें स्पष्ट म्हणतों कीं, कोणीहि स्वत तसें होण्याबद्दल प्रयत्न करीत नाहीं. अभ्यास व मनाची स्थिरता हा काय पदार्थ आहे हेंहि कधीं पहावयाचें

नाहीं, आणि मग म्हणे मला असें होतें आणि तस होतें म्हणून सदैव तक्रार करावयाची ! अशानें काहीं होणार नाहीं. करावयास लागा म्हणजे आपो आप सर्व सुचतें—पुढील दार उघडतें—सर्व काहीं होतें. पण केल्याखेरीज होणार कसें ?'

(१५८) महाराज म्हणाले '१९२० साली लोकमान्य विलायतेहून परत आल्यावर मुबईसच सरदारगृहात एके दिवशी रात्रीं मी त्यास विचारलें 'विला यतेस ज्या दिवशी चिरोल केसचा निकाल झाला त्या दिवशी तुम्हास वाईट वाटून किती तरी दु ख झाल असेल नाहीं ?' प्रशातपणें व माझी समजूत पटेल अशा रीतीनें ते मला म्हणाले 'अरे, दु ख म्हणजे काय ? प्रतिकूलसवेदनो त्पादक दु खम् असें म्हणतात. पण ज्यानें अभ्यासानें व विवेकान मुळात नि सवे दित्वच जेथें प्राप्त करुन घेतलें तेथें मग आता दु ख कसल ? दु खाचें बीजच जर उपटलें तर तेथें अकूर फुटणार कसा ? अपेक्षा, आसक्ति व कर्तव्यच्युति यात दु ख आहे, तरी पण तुम्ही ज्या कल्पनेनें दु खाकडे पाहता ती कल्पनाच मुळीं आम्ही निर्मूल केलेली आहे.' तथापि मी त्यास म्हणालों 'हो, तुमच्या कल्पनेप्रमाणेंच का होईना, तस दु ख झालें तर तुम्ही कस करता ?' ते चटकन म्हणाले Yes I make my mind quite vacant and allow it complete rest मन निर्विकार करून तें जितका अधिक काल या स्थितींत ठेवावें तितकी अधिक शाति व प्रसन्नता मनास प्राप्त होते कारण हा एक प्रकारचा योगच आहे, व त्यास मुख्य एकाग्र चित्तत्वाची (कॉन्सेन्ट्रेशन) अत्यत जरूर आहे त्याशिवाय हें काहीं साधणार नाहीं ! कॉन्सेन्ट्रेशनच्या पर मावधीची स्थिति म्हणजे द्रोणाचार्यांनीं आपला आत्मा ब्रह्माडीं नेला म्हणतात ती होय असो ' मीं त्यास विचारलें 'तुम्ही, बिछान्यावर पडताच तुम्हास चटकन झोंप रोज कशी येते ?' ते एकदम म्हणाले 'That is due to my concentration तुम्हाला ऐकून कदाचित् खरेंहि वाटणार नाहीं—अगदींच आश्चर्य वाटेल कीं, मला गेल्या वीस वर्षांत स्वप्न म्हणून कधीं पडलें आहे असें मला आठवत नाहीं मडालेस असताना सतत एकसारखें कित्येक दिवस मी Mind vacant—मन निर्विकार—ठेवण्याचा अभ्यास वाढविल्यानें भगवद्गीतेंत सागितल्याप्रमाणें मनुष्य सुखदु खातीत कसा असू शकतो यानी मला कल्पना येते तुमच्यासारख्या तरुणानी राज प्रात काळीं स्नानोत्तर गायत्रीजपाच्या साधनानें चित्तैकाग्र्याचा अभ्यास केल्यास सूर्याच्या प्रभाप्रमाणें तुमची बुद्धि सर्वभेदक होईल, इतकेंच नव्हे तर विषय अभ्यासानें पुढें ती आत्मसाक्षात्कारीहि होइल. नाहीं तर उलट तीच बुद्धि कुचलीप्रमाणें होते हा तर सर्वांचा अनुभवच आहे !' पुढें मी त्यास विचारलें 'तुम्ही रोज दोन प्रहरीं निजता त्या वेळीं तुम्ही झोंपीं गेलां आहात असें सर्वांस वाटतें पण मी आज कित्येक दिवस बारकाईनें

पाहत आहे की, तुम्ही निचला तरी फक्त घोंग्याखालील पाय–पाऊल तेवढें–एकसारखें हळूहळू हलवीत असतां हें कसें ?' जरा हसत ते म्हणाले 'होय, मी दिवसा लौकिकदृष्ट्या रोज निजतों खरा, पण मला त्या वेळीं क्वचितच झोंप लागते हें अगदीं खरें पण आता तुम्ही विचारता म्हणूनच सागतों कीं, रोज दोन तास mind vacant मन विचाराशिवाय निर्विकार ठेविल्यानेंच चैनच पडत नाहीं व देहास आणि मनास विश्रांतीहि मिळत नाहीं पण तेवढ्या दोन तासांनीं पुढील सबंध दिवसाचे माझे सर्व व्यवहार नीट चालू राहतात धब्या ळास जशी किल्ली तसें हें आम्हास आहे *विचार–विकाररहित मन* 'हणजे अगदीं रिकामें–मोकळें–स्वच्छ कोऱ्या पाटीप्रमाणें–मन ठेवणें प्रथम कठीण जातें पण तसें करण्याचा एकदा तो अभ्यास हस्तगत झाला, म्हणजे त्यापुढें सब सुख तुच्छ वाटतें इंग्रजी शब्दात बोलावयाचें म्हणजे हेंच कान्सन्ट्रेशन आणि योग योग म्हणतात तो तरी हाच !'

मन अस्वस्थ असताहि वेळ खर्च करून महाराजांनीं मोठ्या प्रेमानें आपल्या आठवणी मला अगत्यपूर्वक सागितल्याबद्दल त्याचे अंत करणपूर्वक आभार मानून मीं त्याची रजा घेतली

(१५९) प्राणवायूचा निरोध करून इच्छाशक्तीच्या जोरावर इच्छामरणी भीष्माचार्य, उत्तरायणामध्यें प्रयाण करण्याकरिता, शरपंजरीं पडल्याची पौराणिक कथा अर्वाचीन शास्त्राभिज्ञास कादंबरीवजा किंवा अद्भुतरम्य नवलकथेप्रमाणें वाटत असे पण अलीकडे पाश्चात्यांच्या गूढ शास्त्रसंशोधनानें अनुभवसिद्ध झालेल्या इच्छाशक्तीच्या (Will-power) प्रयोगावरून तरी आता लोक मान्याच्या खालीं दिलेल्या चित्योद्गाराची किंमत सर्वांस कळून येण्यास हरकत नाहीं लोकमान्य शेवटच्या दुखण्यात मुंबई येथें आजारी पडले असता त्यांच्या पल्गाभोंवतीं उभे असलेल्या मडळींस, विशेषत त्यांचे भाचे बाबासाहेब विद्वास व डॉ मडकमकर याजकडे वळून ते म्हणतात ' I am living by my will and if I am to die I shall die only by my will (मी माझ्या इच्छाशक्तीच्या बलावर जगतों आहें, व माझ्या इच्छेशिवाय मृत्यु मला कांहींएक करू शकणार नाहीं) हे आत्मसाक्षात्काराचे दिव्योद्गार प्रस्तुत लेखकास महद्भाग्यानें ऐकावयास मिळाल्यानें त्यास धन्यता वाटत आहे पण त्यासच काय, तर प्र यक्ष महात्माजींसारख्यासहि, ते या वेळीं तेथें नुकतेच येऊन लोकमान्यास भेटून गेल्यामुळें, लोकमान्याच्या वरील उद्गारांनीं कौतुकाश्चर्य वाटलें. *त्यांनीं अहमदाबादच्या मडळींस लोकमान्याविषयीं जी तार केली त्यात* 'प्रकृति चिंताजनक आहे तथापि लोकमान्यांच्या अद्वितीय इच्छाशक्तीमुळेंच आजवर ते टिकले व यापुढें ते त्रास निभावणार, असा माझा विश्वास आहे असें म्हटलेलें होतें ! "

(१६०) शुद्ध ऐहिक वस्तु-प्राप्तीबद्दलच लोकमान्याचा देह खर्ची पडला म्हणून निवळ रजतम-गुणविशिष्ट जनानींच तेवढा त्याच्या अवतारसमाप्तीबद्दल शोक प्रदर्शित केला नसून हर्षविषादातीत मायानदी तरून केवळ ब्रह्मैक्य पावलेल पचवटींतील समस्त सन्यस्त, साधू, वैराग्यवत, महत व गोसावी अशा सार ख्यांसहि लोकमान्य निजधामास गेल्याबद्दल आषाढ वद्य ८ रविवार शके १८४२ रोजीं सभा भरवून व्यावहारिक दृष्टया दु खप्रदर्शन करावेंसे वाटलें ! त्या वेळीं तेथील वैष्णव महत म्हणाले "आम्ही विरक्त, निरिच्छ सन्यासी आईबाप, आप्त, इष्ट, गणगोत वगैरे सर्व मायापाश तोडून सुखदु ख समसमान मानून स्फटिका प्रमाणें राहणारे आम्ही साधू, पण गगाधरसुत बलवताच्या निधनानें आम्हालाहि दु ख झालें. त्याच्या आत्म्याच्या स्थलातरानें आमचे आत्मेहि सवदना पावले त्याच्या आत्म्याची प्रचड शक्ति ऐहिक जनाच्या कल्याणार्थ खर्ची न पडती तर ती सायुज्य मुक्तीच प्राप्त करती इतकेंच काय पण ती 'बलवत' शक्ति साक्षात् ईश्वरी अशमात्र असल्यानें तो अश आज पूर्णाशात विलीन झाल्यानें आमचीं हृदयेंहि आज विगलित झालीं आहेत पुन असे ईश्वरी अश अवतीर्ण होतील तरच ससारी जनाचा उद्धार होईल."

---

## सिताराम बुवा निंबगांवकर.

[ह भ प वरळी-मुंबई]

(१) लोकमान्याच्या अगीं लहानपणापासून धैर्य, वीरत्व आणि आत्मविश्वास ह्या त्रयीची उत्तम सागड जमलेली असे वस्तुत गर्भांतच या गुणाचा त्याच्याशीं सबध झालेला होता म्याट्रिकच्या परीक्षेस लोकमान्य नसले असताना, धुडळ पेन नीट करण्याकरिता ते चाकून त्यास बनवीत ... त्याच वाचनाचें पुस्तक तसेंच पुढें होत, आणि त्या पुस्तकाकडे त्याच ... ... गलें होतें ता चाकू अत्यत तीव्र असल्याकारणानें डाव्या हाताच्या अगुलीवर त्याचा आघात लागून रक्त वाहू लागलें, तरी लोकमान्याची दृष्टि तिकडे नव्हती त्याच्याजवळ बस लेल्या मित्रानीं घाबरून त्याचें लक्ष तिकडे वेधविले तो मित्र घाबरला परतु त्यानीं हासत हासत सागितलें कीं, 'तें फडकें पाण्यात भिजवून आण म्हणजे पाणपट्टी बोटास बाधू ' गोष्ट अल्प आहे, परतु हींत रहस्य अतिशय आहे त्याचा स्वभावच असा असे कीं, एकवार जो निश्चय झाला तो कांहीं केल्या बदलावयाचा नाहीं.

(२) कॉलेजांत असतांना लोकमान्य, आगरकर आणि नेने आडनावाचा एक विद्यार्थी असे मुळामुठा नदीवर पोहण्याकरितां गेले. नेने हा नुकताच पोहावयास लागला होता अभिमानानें तो टिळक–आगरकरांबरोबर नदींत उडी टाकून पोहूं लागला. परंतु नेनेबुवा वहात चालले आगरकर मागें राहिले, घाटावर कोणी नाहीं, अशी परिस्थिति होती, तरी लोकमान्यांनीं आपल्याहूनहि तो विद्यार्थी मोठा होता, तरीं त्याचा लंगोट धरून आणि आपण लांब राहून त्यास ओढीत काठावर आणून टाकलें. गोष्ट क्षुल्लक आहे, परंतु हिच्यामध्यें त्यांच्या पुढील अगाध कार्याचें बीज दिसतें.

---

## विपिनचंद्र पाल

[ जुन्या राष्ट्रीय पक्षाचे बंगालचे एक प्रसिद्ध पुढारी, १९१९ मधील विलायतेंत गेलेल्या काँग्रेस डेप्युटेशनचे एक सभासद व खासदार, कलकत्ता ]

१९०६ सालच्या आगष्ट महिन्यांत प्रथम टिळकांची व माझी ओळख झाली व पुढें चौदा वर्षांच्या निकट परिचयानें त्या ओळखीचें निकट स्नेहांत पर्यवसान झालें चौदा वर्षांच्या या काळांत निरनिराळ्या परिस्थितींत व कार्यांत स्वदेशांत व परदेशांत टिळकांच्या सांनिध्याचा मला लाभ झाला आहे, व नेहमीं मी त्यांची अनन्य साधारण देशभक्ति पाहून मुग्ध होऊन जात असे

लोकांनीं टिळकाचें नाव ऐकिलें. पण त्या वेळीं टिळकांच्याबद्दल आम्हाला आदर वाटला नाहीं. पुण्याच्या बैठकीच्या वेळीं पुण्याच्या प्रतिगामी पक्षानें सामाजिक परिषदेला राष्ट्रीय सभेचा मंडप मिळू नये, म्हणून मोठी चळवळ आरंभिली. या चळवळीच्या लाटा भारतवर्षाच्या सर्व भागापर्यंत जाऊन पोंचल्या. याच चळवळीच्या वेळीं समाजसुधारणेचे प्रतिरोधी म्हणून आम्हीं टिळकाचें नाव प्रथम ऐकलें. यामुळें टिळकांच्याविषयीं आमच्या मनात विरोधबुद्धीच जागृत झाली.

यानंतर स्वदेशीचें युग आलें. या वेळीं सर्व देशभर स्वाभिमानाची भावना जागृत झाली होती. इंग्रजांनीं स्वदेशसेवेकरिता ज्यांना लांछित केलें होतें ते लोकांना आदरणीय वाटू लागले होते. टिळकांच्या कारागृहवासाचा डाग टिळकांचा गौरव-मुकुट झाला. यापूर्वीच महाराष्ट्रात शिवाजीच्या उत्सवाला सुरुवात झाली होती. त्या वेळीं सखाराम गणेश देऊस्कर हे हितवादी पत्राच्या संपादकवर्गात होते. त्यांच्याच प्रेरणेनें कलकत्यात शिवाजीच्या उत्सवाला सुरुवात झाली. त्या स्वातंत्र्याच्या प्रेरणेच्या दिवसात प्राचीन स्वातंत्र्यवीरांच्या उत्सवापासून देशाला स्फूर्ति आणण्याचे प्रयत्न सुरू होते. यासाठींच शिवाजी, प्रतापादित्य यांचे उत्सव तेव्हा उद्भवले. १९०६ सालच्या शिवाजीच्या उत्सवाकरिता टिळक व महाराष्ट्राचे इतर पुढारी बोलाविले होते. हें आमंत्रण स्वीकारून टिळक आगष्टच्या पाच किंवा सहा तारखेला कलकत्यास आले. यापूर्वी ज्या ज्या वेळीं शिवाजीचा उत्सव कलकत्यास झाला, त्या त्या वेळीं विलायती पद्धतीप्रमाणें केवळ एक सभा भरवून शिवाजीविषयीं आमचा आदर व्यक्त करीत आलों होतों. या खेपेला पूर्ण स्वदेशी पद्धतीनें शिवाजीच्या उत्सवाचा समारंभ करावयाचा असें ठरलें होतें. या उत्सवाचे मुख्य प्रवर्तक ब्रह्मबांधव उपाध्याय हे होते. त्यांनीं मला उत्सवकमिटीचे सेक्रेटरी नेमलें. शिवाजी रामदासाचा शिष्य व भवानीचा उपासक होता, म्हणून या खेपेच्या शिवाजीच्या उत्सवात तीन दिवस [illegible] पद्धतीचा पर-

अनुष्ठान नव्हे, तर भारताच्या नवीन जनशक्तीच्या साहाय्यानें हा एक स्वदेश-सेवेचा यज्ञच टिळकांनीं प्रस्थापित केला आहे

शास्त्रज्ञ सुपंडित टिळकांनीं गणपति शब्दाचा वास्तविक अर्थ ओळखला होता. इंग्रजींत ज्याला डेमॉस म्हणतात त्यालाच प्राचीन काळीं गण ही संज्ञा होती लोकसमुदायाच्या समष्टीचेंच नाव गण, डेमॉसचीच अधिष्ठात्री देवता गणपति भारतीय गणशक्तीला जागृत करणें हाच गणपत्युत्सवाचा उद्देश होय. महाराष्ट्रांत ब्राह्मण, शूद्र सगळेच गणपतिपूजनाचे अधिकारी. या उत्सवात जातिवर्णविचार नाहीं टिळकांनीं गणपतिपूजेला आधुनिक स्वरूप दिलें. या उत्सवाच्या निमित्तानें मेळ्यातून देशभक्तिपर पद्यें म्हटलीं जात व व्याख्यानें होत. आमच्या बंगाल्यात ज्याप्रमाणें देशमातेचें प्रतीक म्हणून कोणी दशभुजा देवीची पूजा करू लागले व विस्ट्रेकांनीं त्याप्रमाणें राजराजेश्वरीची उपासना आरंभिली, तसल्याच प्रेरणेनें टिळकांनीं महाराष्ट्रात गणपत्युत्सवाची सुरुवात केली.

टिळक समाजसुधारणेला प्रतिकूल होते असें नाहीं साधारण जनतेला घेऊन त्याची संमति मिळवून समाजाची सुधारणा घडवून आणावी, असें टिळकांचें मत होतें

शिवाजीच्या उत्सवात मला याचा स्वत ला अनुभव आला. त्या वेळीं टिळक वगैरे पाहुण्यांची भोजनाची सोय स्वतंत्र केली होती त्यांचा आचारी त्यांच्या बरोबरच आला होता. आम्ही कोणी पाकशाळेंत जात नव्हतों. कमिटीचा सेक्रेटरी म्हणून मला चोवीस तास त्या उत्सवमंडपातच काढावे लागत फक्त दोन वेळा एका मित्राच्या घरीं जाऊन जेवून येत असे एके दिवशीं दोन प्रहरीं मला तिकडे जायला सवड झाली नाहीं. माझें जेवण झालें नाहीं, हें पाहून स्वयंसेवकांनीं मला त्यांच्या मंडळींत जेवणाचा आग्रह केला. मी त्यांना सांगितलें, टिळक वगैरेंच्या अन्नापैकीं कांहीं उरलें असेल तेंच मी खाऊन घेतों तेथलें अन्न खाण्याची माझी इच्छा ऐकून टिळकांनीं दुसरे दिवशीं आपल्याबरोबर जेवण्याचें मला आमंत्रण दिलें मला शंका वाटायला लागली. पण दुसरे दिवशीं टिळक स्वत येऊन मला जेवायला घेऊन गेले व त्यांनीं मला आपल्याजवळ जेवायला बसविलें. आम्ही जेवायला बसलों असता विजयचंद्र चतर्जी व रजतनाथ राय हे टिळकांना भेटायला आले मी टिळकांच्याबरोबर जेवायला बसलों आहे, हें ऐकून ते विस्मित होऊन गेले जेवणान्तर रजतनाथांनीं टिळकांना विचारलें, ' टिळक, तुम्ही पुण्यात आपल्या घरीं पालला असे आपल्याजवळ जेवायला बसवून घ्याल का ? ' टिळकांनीं उत्तर दिलें " हो अल्बत. हें पहा, पूर्वी मराठ्यांच्या राज्यात राजे शूद्र व त्यांच्या हाताखालचे नोकर ब्राह्मण अशी स्थिति होती आता महाराष्ट्रात खाण्यापिण्याविषयींची दृष्टि सैल झाली आहे. आमच्या महाराष्ट्रात दृष्टिदोष मानीत नाहींत. "

राष्ट्राचें स्वातंत्र्य हेंच टिळकांचें अंतिम ध्येय होतें. ही स्वातंत्र्यदेवीच टिळकांची उपास्यदेवता होती स्वातंत्र्य हाच टिळकांच्या आयुष्याचा मूलमंत्र होता. ही किल्ली चालवून त्यांच्या जीवनाचें रहस्य ओळखिलें पाहिजे. ज्यांच्या अंतःकरणांत ही स्वातंत्र्याची ज्योत जागृत झाली आहे, तेच टिळकांचें चरित्र समजण्याला अधिकारी होत

---

## सी. वाय. चिंतामणी

[ 'लीडर' पत्राचे संपादक, संयुक्त प्रांताचे एक माजी दिवाण व नेमस्त पक्षाचे पुढारी, प्रयाग ]

१८९५ च्या डिसेंबरमध्यें लोकमान्यांचें नांव मी प्रथम ऐकलें. टिळक हे सामाजिक सुधारणेच्या विरुद्ध आहेत अशी त्यांची त्या वेळीं प्रसिद्धी होती.

१८९६ सालच्या काँग्रेसमध्यें पंचवार्षिक वसुलीबाबत करारासंबधींच्या मोठ्या भानगडीच्या ठरावावर टिळक यांचें भाषण झालें हा विषय अत्यंत गुंतागुंतीचा होता तरीसुद्धा तो प्रतिपादण्यांत त्यांचें खरें महाराष्ट्रीय तेज झळकलें असें पंडित मालवीय यांनीं त्या वेळीं कबूल केलें.

१८९७ सालीं टिळकांना पकडण्यांत आल्यामुळें झालेल्या चळवळींत मीही भाग घेतला होता या खटल्यांत टिळकांना शिक्षा झालेली ऐकून माझ्या अंतःकरणास मोठा धक्का बसला. ॲडव्होकेट ऑफ इंडिया पत्रानें आपल्या पत्राची पुरवणी म्हणून टिळकांचे फोटो वाटले होते हा फोटो मीं तसेच रंगीत चौकटींत बसविला रोज सकाळीं उठतांच या फोटोचें मी प्रथम दर्शन घेत असे व लोकमान्यांना लवकर मुक्त करण्याबद्दल मी परमेश्वरी प्रार्थना करीत असें पुढें ते बंधमुक्त झालेले ऐकून तर माझा आनंद गगनांत मावेनासा झाला, व तो दिवस आम्ही सणासारखा पाळला.

व 'शब्दाबद्दल इतकी ओढाओढ कशाला' असें सुरेंद्रबाबू म्हणत होते यावर 'ॲटिटयूड' हा शब्द बंगाली कानाला बरा लागत असेल, पण महाराष्ट्रीय कानाला तो कर्कश वाटतो' असें टिळकांनीं त्यांना हसत उलट उत्तर दिलें!

१८९९च्या लखनौ येथील कॉंग्रेसमध्यें सब्जेक्ट्स कमिटींत टिळक व गोखले यांचा एका क्षुल्लक विषयावर वादविवाद झाला या वादविवादात गोखले अगदीं चिडून गेले, म्हणून सुरेंद्रबाबूंनीं त्यांची समजूत घातली, पण टिळक हें आपल्या प्रतिपक्षाचें हें मनोदौर्बल्य पाहून त्यांच्याकडे पाहून हसत, पण आतून मनानें खिन्न दिसत मुंबईचे गव्हर्नर लॉर्ड सँडहर्स्ट यांच्यासंबंधानें निंदाव्यंजक ठराव कॉंग्रेसनें करावा याबद्दलहि बराच वादविवाद झाला या बाबतींत मुधोळकर प्रभृतींनीं टिळक यांना विरोध केला त्या वेळचे कॉंग्रेसचे अध्यक्ष मि रमेशचंद्र दत्त हेहि सदर ठरावाच्या विरुद्ध होते, पण इतकें असूनहि टिळक जेव्हा हट्ट सोडीनात व या प्रश्नावर त्यांचें बहुमत होण्याचा रंग दिसत चालला तेव्हा आपण अध्यक्षस्थानाचा राजीनामा देऊं असें निर्वाणीचें शस्त्र दत्तांनीं उपसल्यामुळें थोर मनानें टिळकांनीं हा ठराव मागें घेतला यापुढें त्यांचेसंबधानें माझें फारच अनुकूल मत झालें शिवाय त्यांच्या साध्या राहणीचा तर माझ्यावर फारच परिणाम झाला

१९०० सालीं लाहोरच्या कॉंग्रेसमध्यें मीं त्यास पुन पाहिलें सर नारायण चंदावरकर हे त्या कॉंग्रेसचे अध्यक्ष होते चंदावरकरांच्या निवडणुकीसंबंधानें टिळकांनीं जाहीर नापसंती व्यक्त केली होती

या कॉंग्रेसच्या सब्जेक्ट्स कमिटींतहि जुन्या पक्षाच्या विरुद्ध बाजूलाच टिळक होते लाला लजपतराय व विजयराघवाचारीयर हे टिळकांच्या पक्षाला नुकतेच जाऊन मिळाले होते दुष्काळ व दारिद्र्य या विषयावर ते कॉंग्रेसमध्यें बोलले व अबकारी विषयावरहि त्यांचें भाषण फारच परिणामकारक झालें 'एकादा संकट प्रसंग आला म्हणजे त्याचा दोष दुसऱ्यावर टाकावयाचा हा मनुष्यस्वभाव असून बोलूनचालून आमचें परकाय सरकार दुष्काळाचा दोष सूर्यावर दिसणाऱ्या कलंकावर टाकीत आहे यात कांहींच आश्चर्य नाहीं, असे ते म्हणाले कॉंग्रेसनंतर 'वेदांचें प्राचीनत्व' या विषयावर त्यांचें अत्यंत विद्वत्तापूर्ण भाषण झालें

१९०१ सालीं कलकत्ता कॉंग्रेसमध्यें टिळक व लजपतराय यांनीं कॉंग्रेसचें सर्व काम फेरोजशहाच्या तंत्रानें चालून सर्व ओंगाळपणाचा कार्यक्रम पार पाडण्यात येतो अशी तक्रार करून कॉंग्रेसविरुद्ध लोकमत बनविलें व 'कॉंग्रेसमध्यें सुधारणा तरी करा, नाहीं तर हा फार्स बंद करा' असें वर्तमानपत्रांत लिहून शिवाय त्यांनीं कॉंग्रेसच्या प्रतिनिधींमध्यें कॅनव्हासिंग केलें

१९०२ सालीं ताईमहाराजांच्या खटल्याच्या भानगडींत टिळक सापडले होते याच वर्षी मी प्रथम पुण्यास गेलों टिळक, केळकर, विजापूरकर यास मीं

भेटलों या वर्षी मी कॉंग्रेसला येणार नाहीं असें टिळक म्हणाले पण शेवटीं दोन दिवस तरी ते कॉंग्रेसला हजर राहिलेच.

१९०३ सालीं 'दि आर्क्टिक होम इन् दि वेदाज' हें त्यांचें अमूल्य पुस्तक प्रसिद्ध झालें आणि त्याच वेळीं ताईमहाराजांच्या खटल्याच्या बाबतींत मि. क्लेमटस् यांनीं टिळकांना १८ महिन्याची सक्तमजुरी व एक हजार रु. दंडाची शिक्षा फर्माविली यामुळें उभ्या देशांतील शाब्द लोकांहि तप्त झालीं व टिळकांबद्दलच्या सहानुभूतीला भर आला त्यास मदत करावी म्हणून त्यांच्या पुस्तकाच्या बऱ्याच प्रती मीं मागवून खपविल्या

१९०४ सालीं कॉंग्रेस मुंबईस भरली त्या वेळीं केसरींतून टिळकांनीं प्रत्यक्ष कार्याएक काम न करण्याचा कॉंग्रेसचा हा वार्षिक तमाशा बंद करा व लोकांचा पैसा उधळू नका, असें जोरानें प्रतिपादल्यामुळें कॉंग्रेसच्या मंडळींना दक्षिणेंतून पैसा मिळेना अशी त्यांनीं कॉंग्रेसच्या अधिकाऱ्याकडे तक्रार केली।

१९०५ सालीं टिळकपक्षाची संघटित चळवळ सुरू झाली कॉंग्रेसचे अध्यक्ष गोखले होते सबजेक्टस् कमिटींत युवराजाच्या स्वागताच्या ठरावावर रण माजलें आपलें म्हणणें न ऐकल्यास आपण हा प्रश्न उघड कॉंग्रेसपुढें मांडू असा आग्रह टिळकांना धरला पण रमेश दत्त यांनीं मध्यस्थी करून दोनहि पक्षांची समजूत काढली।

१९०७ सालीं सुरत येथें घडून आलेल्या दुःखद प्रसंगानें व त्याच्या पुढच्या टिळकांवर आलेल्या महादुःखद प्रसंगाच्या संबंधामुळें माझ्यानें कांहींच लिहवत नाहीं.

१९१४ सालीं ते मंडालेहून सुटून परत आल्यानंतर १९१६ मध्यें मी त्यांना भेटलों व त्यांचेच घरीं दोन दिवस पाहुणचार घेतला, व त्या वेळीं माझें व्याख्यान त्यांच्या अध्यक्षतेखालीं झालें असतां ते म्हणाले, "स्वराज्याचा भरपूर हप्ता प्रत्यक्ष लोकांच पदरांत टाकून हिंदुस्थानास स्वराज्याचे हक्क देण्याचें कायदेशीर व बंधनकारक रीतीनें सरकारकडून जाहीर करण्यांत आलं तर संपूर्ण स्वराज्याचे हक्कांकरितां आपण पन्नास वर्षेंहि थांबू !"

१९१६ नंतर आमचे मार्ग भिन्न झाले. १९१८ सालीं इंग्लंडमध्यें मी त्यास भेटलों व इंग्लंडहून परत येतांना आम्ही एकाच बोटीनें परत आलों. त्या वेळीं टिळकांच्या संगतींत माझे बरेच दिवस आनंदांत गेले. ते मला स्पष्ट म्हणत 'दोन्ही पक्षांच्या विचारसरणींत मुळांतच मुख्यतः मतभेद आहे.'

---

आम्ही सर्व तहाहयात कार्य करण्यास तयार आहोंत. तसेंच केसरी नावाचें एक मराठी व मराठा नावाचें एक इंग्रजी वृत्तपत्रहि काढण्याचा आमचा हेतु आहे. या कामीं रानडे याची आम्ही संमती घेतली आहे. त्यांनीं आपली पूर्ण सहानुभूति आणि पाठिंबा दिला आहे. आपलीहि सल्ला घ्यावी, म्हणूनच निघालों होतों." या निवर्गाचे म्होरके आगरकर हेच सर्व सांगत होते आणि टिळक हे अगदीं स्तब्ध होते. पंडितानीं आपला रुकार दिल्यावर आम्ही पुढें निघालों

"दुसरे दिवशीं सकाळीं मी आणि पंडित न्या. रानडे यांचे घरीं गेलों. पंडित यानीं आदले दिवशीं झालेली हकीकत त्यास कळविली. त्याच वेळीं 'डेक्कन स्टार' नावाचे पत्राबद्दलहि गोष्ट निघाली. ह्या पत्राचे संपादक नामजोशी हे होते, आणि टिळक हेहि संपादकीय शाखेपैकीं एक होते हें पत्र त्या वेळीं सरकार, आणि समाजसुधारक यांचेवर यरान्त तावेरा झाडीत असे या नूतन कंपूचा सरकार, सुधारक आणि सुधारणा यावर कोणत्या प्रकारचा उपयोग होईल याबद्दलच्या थोड्याशा साशक वृत्तीचीच चाटाघाट झाली. त्या वेळीं रानडे म्हणाले 'आता पर्यंत सार्वजनिक कामात पडणारी मंडळी बहुतेक सर्व सरकारी नोकर असून त्याना फावेल त्या वेळीं ती तें कार्य करीत. पण आता ही तरुण तरतरीत मंडळी देश सेवेला यावज्जन्म वाहून घेण्यास तयार झालेली आहेत. अर्थात् हें आपलें एक पाऊल पुढें पडत आहे, तरी त्याच्याकडे साशंक दृष्टीनें पाहण्यापेक्षा त्याना उत्साह देणें हेंच आपलें आद्यकर्तव्य होय.'

(२) १८९० सालच्या सुमाराला सरकारच्या कोणत्याशा एका धोरणाला विरोध करण्याकरिता मुंबईस एक सभा झाली. ही सभा फ्रामजी कावसजी हॉल मध्यें सर फेरोजशहा यांच्या अध्यक्षतेखालीं झाली. सर फेरोजशहानीं टिळकाना या सभेला येऊन वादविवादात भाग घेण्यासाठीं खास आमंत्रण दिलें. या सभेच्या पूर्वी याच विषयावर खासगी बैठकींत खल सुरू झाला, तेव्हां कोणीसे म्हणाले कीं, 'तुम्ही आपलें विघातक धोरण सोडलें नाहीं, तोंपावेतों अशा जाहीर सभेत सरकारावर टीका करून त्याना विरोध करण्याचा काय उपयोग ! ' हें ऐकताच आतापर्यंत मुग्ध बसलेले लो. टिळक एकदम उसळले, आणि म्हणाले, 'जें सरकार आम्हाला उच्च जागा देऊन राज्यकारभारातील जबाबदारी आमच्यावर सोंपवि ण्याइतकें आम्हाला विश्वासात घेत नाहीं, त्याच्याशीं संघटनात्मक रीतीनें वागणें हें आमचें कर्तव्य आहे, असें मला वाटत नाहीं. राज्यकारभाराची जबाबदारी असणाऱ्याचें हें कर्तव्य होय.'

(३) त्याची निर्भयता, साधेपणावर आसक्ति, जनतेमध्यें त्याच्यापैकीं एक होऊन राहण्याची हातोटी, त्याची अगदीं साधी परंतु जोरदार मराठी भाषा, आणि सर्वांपेक्षा त्याचें अत्यंत पवित्र खासगी आचरण, यामुळेंच त्याची अखिल जनतेवर छाप बसली, नव्हे जनतेला ते देवस्वरूपी वाटू लागले. इतक्या सर्व गुणावर

देतील, जर त्यांच्या अंगीं संकटांशीं निधड्या छातीनें झगडण्याची धमक नसती तर पाणीच पडलें असतें. त्यांच्या पुष्कळ—बहुतेक सर्वच—चाहात्यांना ते धर्मरक्षक आहेत अशी खात्री वाटे. त्यांच्यावरील पहिला राजद्रोहाचा खटला हायकोर्टांत चालूं असतां एके संध्याकाळीं मी आपल्या कन्येला शाळेंतून आणण्यासाठीं अलेक्झांड्रा इन्स्टिट्यूटमध्यें गाडींतून गेलों होतों. मी गाडीबाहेर वाट पहात उभा होतों. तोंच एक महार मजकडे आला, आणि म्हणाला, 'साहेब, टिळकमाराजांच्या खटल्याचें काय झालें?" मीं त्याला सांगितलें "खटला अद्याप चालू आहे, पण कायरे, तुला त्याची एवढी काळजी कां वाटते?" तो म्हणाला "टिळक महाराज हे आमच्या धर्माचे रक्षणकर्ते आहेत," मग मी त्याला "तूं कोण आहेस? व काय करतोस" म्हणून विचारलें तेव्हां त्यानें सांगितलें कीं, "मी महार असून मुंबई—जिमखाना क्लबचा नोकर आहे." कर्नाटक आणि मद्रासकडील अनेक खेड्यापाड्यांतून कै. टिळकांना हाच बहुमान देण्यांत येत आहे, हें मीं प्रत्यक्ष पाहिलें.

---

## दामोदर सावळाराम यंदे.

[मालक इंदुप्रकाश छापखाना, लोकमान्यांचे एक स्नेही व नेमस्त पक्षाचे अभिमानी.]

(१) इंदुप्रकाशाची व्यवस्था आम्हीं शिरावर घेतली, त्या वेळीं तें साप्ताहिक होतें. तें दैनिक करावें, असें कांहीं मंडळींच्या विचारानें ठरलें; सन १९०० मध्यें या गोष्टीचा निश्चित विचार ठरविण्याकरितां रा. सा. रानडे यांच्या बंगल्यावर एका रविवारीं कांहीं निवडक मंडळींची खासगी बैठक भरविण्यांत आली होती. त्या प्रसंगीं रा. सा. रानडे म्हणाले—इंदुप्रकाश दैनिक करावयाचें असेल तर सुधारलेल्या इंग्रजी पत्राप्रमाणें वेगवेगळ्या विद्वान् मंडळींकडून आठवड्यांत, निदान पंधरवड्यांत तरी एकेक लेख मागविण्याची व्यवस्था केली पाहिजे. त्यावरून मंडळींनीं लेखकांच्या नांवाची एक याद तयार केली, व ती रावसाहेबांपुढें ठेविली. रावसाहेबांनीं यादींतील सर्व नांवें लक्षपूर्वक वाचून पाहिलीं, व म्हणाले; 'या यादींत एक महत्त्वाचेंच नांव दिसत नाहीं.' असें कोणतें नांव चुकून राहिलें, त्याची कल्पना मंडळीस होईना. तेव्हां रावसाहेब म्हणाले, अहो, 'आज आपल्या गर्जनेनें जो सर्व महाराष्ट्र हालवीत आहे, त्या बळवंतराव, त्या बळवंतराव टिळकांचें नांव तुमच्या ह्या यादींत कसें चुकलें!' मंडळीस रावसाहेबांच्या या म्हणण्याचें अर्थात् आश्चर्य वाटलें. कारण दोनच आठवड्यांपूर्वीं

केसरींत रावसाहेबांवर व सुधारकपक्षावर टीका आली होती, आणि १८९५ तील पुण्यांतील कॉंग्रेसचा बखेडाही स्मरणांतून गेलेला नव्हता, असें असतां रावसाहेब बळवंतरावांचें नांव इंदूच्या लेखक वर्गांत कसें सुचवितात व इंदूकरितां लेख ते कसे लिहिणार याचें मंडळीला नवल वाटलें. एका वयोवृद्धानें तसा प्रश्नही रावसाहेबांस केला. तेव्हां रावसाहेब हांसले आणि म्हणाले, 'तुम्हांस अद्याप बळवंतरावांची खरी ओळख झाली नाहीं. त्यांची विद्वत्ता व बुद्धिमत्ता फार मोठी आहे. ते इंदू॰ करितां लिहूं लागल्यास इंदूच्या ध्येयास शोभेल असेंच लिहितील. एकदां जो पक्ष स्वीकारला त्या पक्षास चिकटून राहून त्याचें मंडण कसें करावें, हें बळवंतरावांइतकें तुमच्यांतील पुष्कळांस साधणार नाहीं. त्यांची टीका किती मार्मिक व मर्मभेदक असते ती पहा. अशा टीकेनें रागावण्याऐवजीं त्यांच्या भाषाशैलीचें कौतुकच करावेंसें वाटतें.' रावसाहेबांचें भाषण ऐकून दुसरे एक गृहस्थ म्हणाले 'परंतु बळवंतरावजीस कोणत्या विषयावर लिहावयास सांगणार ! त्यांचीं राजकीय व सामाजिक मतें आम्हांस रुचणार नाहींत.' त्यावर रावसाहेब म्हणालेः—' सामाजिक बाबतींच्या मतांत ते आमच्याइतकेच सुधारक आहेत, हें मी खातरीनें सांगतो, आणि राजकीय बाबतींत तर त्यांचें पाऊल आमच्याही पुढें आहे.'

त्यावर तिसरे गृहस्थ म्हणाले, 'पण त्यांस पत्र कोण लिहिणार !' तेव्हां रावसाहेब म्हणाले, 'आपणा कोणास पत्र लिहवत नसलें तर मी त्यास पत्र लिहितों. मला खातरी आहे कीं, माझ्या पत्राचा ते कधींही अनादर करणार नाहींत.' रावसाहेबांचें असें आत्मविश्वासाचें उत्तर ऐकतांच सर्व मंडळी चुप बसली; आणि इंदूच्या लेखकवर्गाच्या यादींत लो. बाळ गंगाधर टिळक यांचें नांव दाखल करण्यांत आलें.

( २ ) सन १८९९ सालीं येथील मराठी ग्रंथसंग्रहालयाचा वार्षिक समारंभ रावसाहेब रानडे यांच्या अध्यक्षतेखालीं झाला होता. कार्यक्रमाप्रमाणें चिटणीसांनीं संस्थेचा रिपोर्ट वाचून दाखविला. रिपोर्टांत रा.रा. बळवंतरावजी टिळक यांनीं संस्थेस भेट दिल्याबद्दल रिपोर्टांत प्रामुख्यानें उल्लेख केला होता. बळवंतरावजींचें नांव ऐकतांच प्रेक्षकवर्गापैकीं एकाचें मस्तक भणाणलें. तो मध्येंच उठून उभा राहिला आणि म्हणालाः—'ज्या माणसास राजद्रोहाच्या आरोपावरून सरकारनें शिक्षा केली, अशा माणसास संस्थेंत आणणें आणि त्याच्या नांवाचा रिपोर्टांत समावेश करणें अगदीं गैरशिस्त आहे. रिपोर्टांतील तेवढा मजकूर काढून टाकावा.' तेव्हां रावसाहेब खुर्चीवरून उठले; आणि त्या आक्षेपक वक्त्यास म्हणाले. "मराठी ग्रंथसंग्रहालय ही ज्ञानार्जनाची संस्था आहे. या ठिकाणीं प्रत्येक शारदाभक्ताचा मुक्तद्वार असणेंच वाजवी आहे. बळवंतरावजी टिळक हे सरस्वतीदेवीचे खरे भक्त आहेत. त्यांनीं मराठी भाषेच्या द्वारें तिची जी सेवा केली आहे, व अद्याप करीत

करीत आहेत तितकी फार थोड्यानीं केली असेल त्याची विद्वत्ता, बहुश्रुतपणा, बुद्धिमत्ता, फार थोर आह राजकीय बाबतींत आम्हास काहीं कर्तव्य नाहीं. सरकारच्या प्रेमास कोणी अपात्र झाला म्हणून त्याची विद्वत्ता व योग्यता कमी समजणें, हें कोत्या बुद्धीचें लक्षण आहे टिळक आयपुत आहे, शारदेचा खरा भक्त आहे थोर विद्वान् आहे, अशा माणसास ग्रथसग्रहाल्यात आणून त्याचा गौरव करण्यात सग्रहाल्यास दूषण देण्यापेक्षा भूषण मानणें जरूर आहे सग्रहाल्याच्या चालकानीं टळवतरावनीसारख्या एका थोर विद्वानास सग्रहाल्यात आणून त्याचें शिफारसपत्र घेतलें ही गोष्ट फार चागली केली आहे ' रावसाहेबाचें हें भाषण ऐकताच तो बिचारा जागच्या जागीं बर्फाप्रमाण थड बसला आणि वार्षिक समारभाचें काम शेवटपर्यंत आनदान पार पडल

---

## सौ. अवतिकाबाई गोखले

[ प्रसिद्ध विदुषी महात्मा गाधीच्या चरित्र-लेखिका, मुबइ ]

लोकमान्याचें हिंदमहिलासमाजातर्फे सुमार ६ महिन्यापूर्वी ज भाषण झाल होतें त्या भाषणापैकीं मला ज काहीं आठवत आहे, तें मी या लेखात लिहिणार आहे कारण लोकमान्याविषयीं स्वतत्र लेख लिहिण्याची माझी योग्यता नाहीं पण लोकमान्य स्त्रीशिक्षणाच्या विरुद्ध होते, अशा काहीं लोकाचा गैरसमज झालेला आहे अस ऐकण्यात येत तरी तो समज दूर करण्याकरिता त्याच्या स्वत च्या शब्दातच मी पुढील लेख लिहीत आहें लोकमान्याच्या भाषणाचा विषय ' स्त्रिया व राष्ट्रकार्य ' हा होता, व तो त्यानीं फारच चागल्या तऱ्हेन व सोप्या मार्गेत स्त्रियाच्या समाजाला समजावून सागितला होता त्यानीं आपल्या भाषणात मुख्य तीन मुद्दे माडिले होते ते असे —

पहिला मुद्दा—स्त्रियाची राष्ट्रकार्याविषयीं पहिली कामगिरी म्हणजे महान् देशभक्त राष्ट्रीय पुरुष उत्पन्न करणें ही होय, व अशा तऱ्हेन स्त्रियानीं आपल्या घरची जबाबदारी ओळखून राष्ट्रकार्य केल्यास देशाची उन्नति फार लवकर होणार आहे कारण आपल्यामध्यें म्हणच आहे कीं ' खाण तशी माती '

दुसरा मुद्दा—स्त्रिया या राष्ट्राच्या शिक्षक होत लहानपणीं मुलें विशेषत स्त्रियाच्या सहवासात जास्त असतात, आणि म्हणूनच त्या वेळीं मुलाना ज्याप्रमाणें शिक्षण मिळेल त्याप्रमाणें तीं पुढें होतात ह्या वेळचें शिक्षण केवळ

पुस्तकी नव्हे, परंतु ज्या शिक्षणाच्या योगानें मुलांचें शील उत्तम बनत, व तीं स्वार्थत्यागी, दीर्घोद्योगी व आपल्या देशाकरितां निरपेक्ष बुद्धीनें काम करणारीं निपजतील, अशा तऱ्हेच्या भावना त्यांच्यामध्यें उत्पन्न करणें, हें मातेचें मुख्य कर्तव्य होय. टिळकांनीं आपल्या भाषणांत वेदकालीन स्त्रिया आपल्या मुलांना काव्याचें शिक्षण देत असत, इतकेंच नव्हे तर सुमारें ४० वर्षांपूर्वी स्त्रिया संस्कृत भाषेंत चांगल्याच प्रवीण होत्या, व त्या संस्कृत भाषेंत आपल्या घरांत अस्खलित तऱ्हेनें बोलत असल्याचें आपण पाहिलें होतें, असें त्यांनीं सांगितलें. त्या गोष्टी वरून स्त्रियांचा त्या वेळेस शिक्षणाच्या बाबतींत व इतर ज्ञानांतहि दर्जा फार मोठा होता असें दिसून येतें.

तिसरा मुद्दा—स्त्रिया या राष्ट्राच्या रक्षक होत. इतिहासावरून आपल्याला कळून येईल कीं, राष्ट्रावर आलेलीं संकटें स्त्रियांनीं केव्हां आपल्या शौर्यानें तर केव्हां आपले देह अग्निकुंडांत अर्पण करून निवारण केलेलीं आहेत. पूर्वी स्त्रिया महान् देशभक्त असल्यामुळेंच आजपर्यंत हिंदुस्थान देश जिवंत राहूं शकला.

वरील तीन मुद्दे मला आठवले त्याप्रमाणें लिहिले आहेत. लोकमान्यांना स्त्रियांविषयीं फार आदर होता व देशाची पूर्ण उन्नति होण्याकरितां स्त्रियांच्या मदतीची राष्ट्राला फार जरूर आहे, असें ते म्हणत असत.

आतां लोकमान्यांच्या साध्या व प्रेमळ वर्तणुकीबद्दलच्या एकदोन गोष्टी सांगून मी आपला लेख पुरा करणार आहे. पहिला प्रसंग लोकमान्य कलकत्त्यास कॉंग्रेसला गेलेले होते व मीहि नपाराण्यामधून महात्मा गांधींबरोबर तेथें गेले होतें त्या वेळचा. कलकत्त्यास असतांना एके दिवशीं सकाळीं विहारमध्यें काम करीत असलेले आम्ही सर्व स्वयंसेवक लोकमान्यांना भेटावयास गेलों होतों. लोकमान्य त्या वेळीं एक साधा सदरा घालून बसले होते व त्यांच्या भोंवतीं मंडळीचा जमाव जमलेला होता. आम्ही गेल्याबरोबर मोठ्या प्रेमानें आमचें स्वागत करून

मंडळींनीं वाचली असेल त्यांना सहज कळून आलें असेल कीं, ती प्रस्तावना किती गूढ अर्थानें भरलेली व विद्वत्ताप्रचुर आहे. ती प्रस्तावना लिहीत असताना लोकमान्य विलायतेस जाण्याच्या अगदीं गडबडींत होते. तशा घाईंतहि ती त्यांनीं लिहून दिली होती. हें सर्व लिहिण्याचें कारण इतकेंच कीं, एका अपरिचित स्त्रीनें केलेल्या विनंतीचा अनादर न करता तिला आपल्या कामांत प्रोत्साहन यावें म्हणून आपल्या कडून होईल ती मदत यांनीं केली व ह्याबद्दल मी यांची सदैव ऋणीच राहीन.

दुसरा प्रसंग आमच्या समाजामध्यें भाषण करण्याविषयीं मी त्यांना जी विनंति केली होती ती होय. ह्या वेळीं देखील लोकमान्य अतिशय कामामध्यें होते, तरी त्यांनीं मुंबईला खास आमच्याकरिता येऊन आम्हाला बोधामृत पाजलें. दुर्दैवानें लोकमान्यांचें खास स्त्री-वर्गापुढें हें पहिलेंच व शेवटलें भाषण झालें. ह्याबद्दल मला अत्यंत वाईट वाटतें. कारण अशा थोर विभूतीच्या उपदेशाचा योग आम्हाला वेळोवेळीं यावा अशी माझी फार इच्छा होती, परंतु माझ्या दुर्दैवामुळें ती पूर्ण होऊं शकली नाहीं. ईश्वरानें लोकमान्यांना आमच्यामधून अकस्मात् नेल्यामुळें माझ्या सर्व आशा लयास गेल्या. आतां ईश्वराजवळ एवढीच विनंति आहे कीं, लोकमान्यांसारखे महान् देशभक्त हिंद-भूमींत पुष्कळ उत्पन्न होवोत.

---

## कै० गोविंद वासुदेव कानिटकर

[बी. ए., एलएल. बी. लोकमान्यांचे सहाध्यायी व स्नेही, पेन्शनर सबजज्ज, सुधारक पक्षाचे कैवारी, पुणें]

आम्ही एल्फिन्स्टन कॉलेजांत बी. ए. चा अभ्यास करीत असतांना रा. बळवंतरावजीविषयीं मला एक गोष्ट आठवते ती सांगण्यासारखी आहे. आमचे वर्गांत कै. घोंडोपंत आगाशे म्हणून रत्नागिरीचे एक फार बुद्धिमान् विद्यार्थी होते. त्यांचे घरची स्थिति गरीबीची होती, तथापि त्यांचें घराणें शास्त्र्यांचें म्हणून रत्नागिरींत प्रसिद्ध असे. गणित हा त्यांचा आवडता विषय असे व ते डॉक्टर भांडारकर ह्यांचे व विशेषेंकरून प्रो. हयॉर्नथ्वेट ह्यांचे फार आवडते होते. त्यांच्यांत व बळवंतरावजींमध्यें अहमहमिका असे. रा. घोंडोपंत आगाशे परीक्षेचे प्रश्न सोडवितांना किंवा क्लासांत फळ्यावर एखादें गणिताचें उदाहरण सोडवितांना प्रसिद्ध टॉड्हंटर ह्यांच्या बुकांबरहुकूम सोडवीत, व जितक्या स्टेप्स किंवा रीति टॉड्हंटरच्या असतील तितक्या ते घेत. एवढेंच नव्हे तर टॉड्हंटरचीच ए. बी.

सी. अक्षरें मुद्दां घेत; त्यामुळें प्रो. हॅथॉर्नथ्वेटची त्यांच्यावर मोठी वहाल मर्जी असे. परंतु रा. बळवंतराव म्हणत कीं, उत्तर बरोबर आलें म्हणजे झालें, त्याच रीती किंवा तींच अक्षरें कशास पाहिजेत ? मधल्या पायऱ्या सोडून एकदम उडी मारून जर उत्तर आपणास काढतां आलें तर कां काढूं नये ? अशा प्रकारचें रा. बळवंतरावजींचें भांडण त्या वेळीं आपल्या गणिताचे गुरूबरोबर चाले. ही त्यांची चिकाटी व एक प्रकारचा हट्टी स्वभाव त्यांच्या सहाध्यायांसही चांगला ठाऊक होता, व सत्य बोलण्याचे कामीं गुरुजनाशीं प्रसंग पडल्यास ते माघार घेत नसत.

(२) रा. कुलकर्णी यांनीं आपल्या ग्रंथाच्या भाग २ (पृष्ठ १८९, २१९) मांत रा. बळवंतरावांची 'सामाजिक सुधारणेबद्दलचीं मतें' या सदराखालीं जी हकीकत दिली आहे ती वाचकांनीं वाचून पहावी. त्यांत लिहिल्याप्रमाणें स्त्री-शिक्षण, प्रौढविवाह, परदेशगमन इत्यादि कांहीं सुधारणांस रा. बळवंतराव विरुद्ध नाहींत एवढेंच नव्हे तर त्या त्यांनीं अमलांत आणिल्या आहेत. जातिबंधनें पूर्वीच्याइतकीं आतां कडक राहणें शक्य नाहीं व त्यांपैकीं कांहीं बंधनें तर लयकरच नाहींशीं झालीं पाहिजेत असें रा. बळवंतराव यांसहि वाटतें. परंतु सर्व धर्मोच्या लोकांचे रोटीबेटी व्यवहार सुरू झाल्याशिवाय आमची उन्नति कदापि व्हावयाची नाहीं हें म्हणणें मात्र त्यांस कबूल नाहीं. सारांश, सामाजिक सुधारणा-संबंधानें निरनिराळ्या प्रसंगीं त्यांचे जे उद्गार आम्हीं ऐकले आहेत, व लेख वाचले आहेत, त्यावरून सामाजिक सुधारणा ही हळूहळू होणें इष्ट आहे व शक्य आहे. आपण हिंदुस्थानांतले लोक निरनिराळ्या होड्यांत बसलेले आहोंत, त्या होड्या सामाजिक सुधारणारूप समुद्रांतून कमीअधिक व निरनिराळ्या वेगानें चालणाऱ्या आहेत. परंतु राजकीय बाबींसंबंधानें आपण सर्व एकाच बोटींत बसलों आहोंत व ती पुढें चालण्याला सगळ्या बोटींना एकच वेग लागणार आहे.

---

## शंकर विष्णु फडणीस

[ बी. ए.; १९१८ सालच्या सुमारास टिळक हे मुंबईस सरदारगृहांत उतरले असतां "कर्मयोगसंस्था" काढावी असें सुचविण्याकरितां श्री. फडणीस यांनीं लो. टिळकांची गांठ घेतली त्या वेळेची हकीकत संवादरूपानें खालीं दिली आहे. ]

लोकमान्य—पण अहो, फर्ग्यूसोनियन पदवीधर तेव्हांच ओळखतां आला पाहिजे, तसे तुमचें नाहीं. तुमची शरीरयष्टि कांहीं समाधानकारक नाहीं.

फडणीस—मी जरी बळकट नसलों, तरी निरोगी आहे ल्हानपणीं मी अतिशय रोगानीं पीडलेला असे, म्हणून माझें शरीर कृश दिसतें

लोकमान्य—या तुमच्या म्हणण्यात काहीं हशील नाहीं माझ्याच अनुभवा धरून सागतों, १५ वर्षांचा असताना पोट पुढें आलेलें, कबुतराच्या छाती एवढी छाती, व उसाच्या कांड्यासारखे हातपाय, अशी प्रकृति होती, पण नतर मकम व्यायाम केला, आणि माझें आयुष्य २० वर्षांनीं वाढल आहे माणसाची जन्मत प्रकृति कशीहि असो, पण व्यायामानें, विशेषत १५ ते २० च्या दरम्यान केलेल्या व्यायामानें प्रकृतींत शाति झाल्याशिवाय रहात नाहीं बरें, तें कसेंहि असो, तुमचें पुढ म्हणणें काय आहे ?

फडणीस—लोकमान्य, आपण एक कर्मयोग नामक संस्था काढावी अशी माझी नम्र व कळकळीची विनति आहे तद्विषयक माझ सविस्तर पत्र आपण वाचलें असेलच

लोकमान्य—तुमचें पत्र मी समग्र वाचून पाहिलें गीतारहस्यावरून तुम्हास समजून आल असेलच कीं माझा कटाक्ष सप्रदायाविरुद्ध आहे आणि मला तुम्ही सप्रदाय काढा म्हणता हें कस जमल ?

फडणीस आपला कटाक्ष सर्व वैय्यक्तिक सप्रदायावर आहे, हें मी जाणून आहे, म्हणूनच आपण टिळकसघ न काढता कर्मयोगसघ काढावा आणि तसा तो काढण्यास आपल्यासारख्या अनन्यसामान्य कर्मयोग्यानेंच पुढें झालें पाहिजे, असें मला वाटतें प्रस्तुत कार्यांत जर काहीं सांप्रदायिकपणा येत असला तर तो गीतेचा आहे, आपला नव्हे हें खास

लोकमान्य—कर्मयोगसघ तुम्हीं काढावा मीं मार्ग दाखविला आहे आमचा तुम्हांला पूर्ण आशीर्वाद आहे

फडणीस—गुरुवर्य, आमची योग्यता नाहीं व ऐपतहि नाहीं, म्हणूनच आपल्या चरणापाशीं आलो आहोत आपल्या शब्दानें होईल तें आमच्या खटाटोपानेंहि होणार नाहीं

लोकमान्य—खूप हसत Do you advise me to marry at this age ? माझें म्हातारपणी नव्यानें लग्न लावू इच्छिता काय ? मी फार तर पाचचार वर्षें जगेन आणि मी करीत आहें तेवढ कार्य मला सध्या पुरेंस आहे

फडणीस—लोकमान्य, आपण अध्यात्मिकतेनें तरुण आहात

लोकमान्य—ऐका माझा म्हाताऱ्याचा अनुभव ऐका मी विधायक लौकिक दृष्टीनें विधायक-स्वरूपाच्या कार्यानें सुरुवात केली हें तुम्हालाहि मान्य आहे. पण दहा वर्षांच्या अनुभवानें शहाणा झालों व संस्था वगैरे काढण्याच्या फंदात

पडलों नाहीं. १०० वर्षांच्या हिंदुस्थानच्या इतिहासावरून पाहता असें आढळून येतें कीं, सार्वजनिक जागृतीच्या अभावीं कार्यक्षम माणसें, व पुष्कळ कार्यकारी अतएव जिवत सस्था निपजावयाच्या नाहींत. [ शांकर सप्रदाय, रामदासी पंथ, भारतसेवासमाज, प्रार्थनासमाज, स्त्रियांची युनिव्हर्सिटी व फर्ग्युसन कॉलेज इत्यादि महाराष्ट्रीय सस्थांचे गुणदोष व त्याचप्रमाणें सदर सस्थांशीं निकट संबंध असलेल्या कित्येक विद्यमान व मयत पुरुषासंबधानेंहि त्यांनीं थोडाफार उल्लेख केला. ] परमेश्वरानें आपल्याला दिलेल्या बुद्धीचा व कर्तबगारीचा योग्य उपयोग करणें यालाच मी अधिक महत्त्व देतों. रा. गोपाळराव देवधर (सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटींतील) हे एक, प्रो. कर्वे हे एक व प्रार्थनासमाजाचे अध्वर्यु डॉ. भांडारकर यांनींच काय तो ईश्वरी देणगीचा माझ्या मतें तसा उपयोग केला आहे. Whether you agree with their work or not is another matter. त्यांच्या कार्याशीं तुमचे विचार जुळतात किंवा नाहीं हा प्रश्न वेगळा, पण ते कळकळीनें कार्य करणारे आहेत हें मात्र खरें. मला प्रेमासाठीं-सुद्धा दोन योग्य माणसें मिळावयास फाळ लागला, मग मच्या राष्ट्रव्यापी सस्थेची गोष्ट कशाला? एवंच कर्मयोगसंघासारखी सस्था न काढण्याचें प्रबळ कारण म्हटलें म्हणजे कर्त्या माणसाचा अभाव हें होय.

आतां सस्था काढण्याचा काळ येत चालला आहे, पण हा येण्याला जी जागृति करण्याची आम्हीं खटपट केली–कित्येकांच्या मतें, आम्हीं जी खटपट केली–ती निरुपयोगी होती. या कामीं आम्हीं २० वर्षे फुकट घालविलीं. परंतु मला वाटतें तिचाच कदाचित् हा परिणाम असेल.

या मुलाखतीची जी त्रोटक हकीकत वर दिली आहे तीवरून मद्रासच्या हिंदु पत्रानें त्याविषयीं जे उद्गार काढिले आहेत, ते किती योग्य आहेत हें कळून येणार आहे. "He was not so much a man as an idea" टिळक ही व्यक्ति–पण व्यक्तीपेक्षा ती एक प्रचंड शक्ति व स्फूर्तीच होय हेंच हिंदु पत्राच्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे टिळक ही एक ज्योत होय आणि त्या ज्योतीच्या साहाय्यानें त्यांच्यापेक्षा कमी योग्यतेचे पुरुष टिळकांच्या कामगिरींत जें जें वैगुण्य आमच्या या जड बुद्धीस दिसतें तें तें नाहींसें करतील व असे समानधर्मी या राष्ट्रांत अनेक उदयास येवोत अशी देवापाशीं प्रार्थना करू या.

---

## वामन मल्हार जोशी

[ एम ए , श्रीसमर्थ विद्यालयातील माजी अध्यापक व "मराठा" पत्राचे माजी सहसंपादक, हल्लीं प्रोफेसर व लाईफ मेंबर, भारत महिला विद्यापीठ, हिंगणें ]

शिवाजी, रामदास, विष्णुशास्त्री चिपळूणकर, जॉन्सन, बर्क, टिळक, गोखले, यांच्यासारख्या थोर विभूतींजवळ पांच मिनिटें बोलण्यास सापडलीं तर एवढ्याशा वेळात देखील तार्किक बुद्धीला चालना देणारें व अंत करणवृत्तींना शुद्धतर करणारें उच्च शिक्षण किती तरी मिळण्यासारखें असतें शास्त्रीय ग्रथात किंवा वक्तृत्व पूर्ण व्याख्यानात ज्या गोष्टी समजत नाहींत त्याचा अशा मुलाखतींत एकदम असा उलगडा होतो कीं, तर्काला किंवा हृदयाला जें समाधान पाहिजे असतें तें मिळून जिवाला कृतार्थता वाटते एका सुभाषितात असें म्हटलें आहे कीं,

" यास्तेषां स्वैरकथास्तान्येव भवन्ति शास्त्राणि । "

पण मी म्हणतों कीं, या थोर विभूतींच्या स्वैरकथाची योग्यता शास्त्राहून देखील अधिक आहे. कारण ग्रथात बद्ध झालेलें शास्त्र हें पुष्कळ वेळा निर्जीव असतें, त्याच्यात शकानिवृत्तीला सुलभ साधन नसतें, स्फूर्ति मिळण्याचा सभव फारच कमी असतो व ज्या गोष्टी वाणीच्या व तर्कांच्या पलीकडच्या असतात तेथें तर शास्त्रग्रथाना हातच टेकावे लागतात विभूतिसमागमाची गोष्ट याहून निराळी आहे विभूतींच्या एका प्रेमळ शब्दान किंवा साभिप्राय दृष्टिपातान किंवा मार्मिक स्मितानें किंवा मौनानें पुष्कळ वळा—

" भिद्यते हृदयग्रंथि छिद्यन्ते सर्व सशया । "

( हृदयातली गाठ तुटते व सर्व सशय फिटतात ) यात काहीं शका नाहीं.

माझ्या हृदयातल्या काहीं गाठी अशाच रीतीनें तुटलेल्या आहेत एक गाठ टिळकांविषयींच होती त्यांच्याविषयीं माझ्या मनात आदरबुद्धीच नव्हे तर पूज्यबुद्धि वसत होती व आहे पण हृदयातल्या एका कोपऱ्यात अशी एक गाठ बसली होती कीं, टिळक हे कितीहि बुद्धिमान्, विद्वान्, देशाभिमानी, स्वार्थत्यागी असले तरी त्यांची प्रकृति (शारीरिक नव्हे तर मानसिक प्रकृति) तर्कप्रधान व कठोर स्वभावी, *मनाचें मार्दव त्यांच्यात बरेंच कमी असावें असा* माझा समज होता. "मराठा" ऑफिसमध्यें एक वर्षभर काम केल्यावर हा समज दृढ होऊ लागला होता परतु त्यानतर एके दिवशीं–शनिवारीं रात्रीं अकरा बाराच्या सुमारास–"मराठ्याचीं प्रुफें तपासण्याकरिता मी ऑफिसमध्यें गेलों असता ते सहज तेथें आले आणि त्यांच्याशीं त्या वेळीं जें समाषण झालें त्यावरून माझी अशी खात्री झाली आहे कीं, लोकोत्तर साधुसतप्रमाणें टिळकाना देखील 'मऊ मेणाहूनी आम्ही विष्णुदास । कठिण वज्रास भेदू ऐसे ॥" असें म्हणण्याचा यथायोग्य अधिकार होता इकडच्या तिकडच्या गोष्टी बोलता बोलता जेथें मी

विन्हाड करून राहत होतों त्या वाड्याच्या म्हणजे शनिवारांतील तांब्यांच्या वाड्याबद्दलच्या गोष्टी निघाल्या. या वाड्याचा खरा कांहीं योगायोग आहे कीं, पुण्यांतील कांहीं मोठमोठ्या व्यक्ति येथें केव्हांना केव्हां तरी राहिलेल्या आहेत. टिळक, आगरकर, गोखले, श्रीधरपंत सदाशिव करंदीकर, शंकरराव लवाटे इत्यादिकांना या घरानें आपल्या छत्राखालीं स्थान दिलेलें आहे. या वाड्याची व तेथील बोळाची गोष्ट निघाल्यावर ओघाओघानें तेथें कांहीं दिवस टिळकां-शेजारींच राहत असलेल्या त्यांच्या जिवलग स्नेहासंबंधानें, म्हणजे आगरकरां-संबंधानें गोष्टी निघाल्या व टिळकांनीं आगरकरांना "सुधारक" कोणत्या परिस्थितींत व कोणत्या कारणास्तव काढावा लागला हें सर्व सांगितलें. तांब्यांच्या वाड्यांतील वास्तव्याच्या व आगरकरांच्या जुन्या आठवणी जागृत झाल्यावर, सहसा भावनांना वश न होणारे टिळक थोडेबहुत देहभान विसरले व आगरकरां-विषयीं बोलतांना तर त्यांचें हृदय भरून येत होतें. त्या वेळेस ते काय बोलले हें मला स्पष्टपणें आठवत नाहीं, पण एवढें स्पष्ट आठवतें कीं, आगरकरांचें आणि त्यांचें वर्तमानपत्रांत कितीं जरी वांकडें दिसलें तरी टिळकांच्या हृदयाच्या अगदीं आंतल्या गाभ्यांत आगरकरांविषयीं प्रेम व आदर यांशिवाय दुसऱ्या कशाला स्थान जर असतें, तर त्या वेळीं ते माझ्याशीं ज्या रीतीनें, ज्या स्वरांत, ज्या कळकळीनें, ज्या उमाळ्यानें बोलत होते तसें बोलणेंच शक्य नव्हतें. टिळकांनीं मीं त्या वेळेपर्यंत भावनावश झालेले कधीं पाहिलेलें नव्हतें, पण त्या वेळीं त्यांचें हृदय फारच उचंबळून आलेलें दिसलें व त्या हृदयानें डोळ्यांच्याद्वारें आपल्या दिवंगत संवगड्याला जलदान केलें! गोष्ट क्षुल्लकच आहे, पण थोर विभूतींच्या बाह्य आचरणाच्या द्रवशून्य मेरुप्रदेशांत स्नेहरसपूर्ण कोमलतेची सरस्वती कशी गूढ स्वरूपांत वसत असते हें माझ्या त्या प्रसंगानें चांगलेंच निदर्शनास आलें.

(२) आगरकर, गोखले वगैरे लोकांशीं टिळकांसारख्या मोठमोठ्या लोकांचें भांडण तरी कां व्हावें हा प्रश्न माझ्या मनांत वारवार येत असे. कुत्सितपणा, मत्सर, अनुदारता इत्यादि कारणें अशा उदाहरणांत लागू पडत नाहींत. मत भेद होणें शक्य आहे, पण मतभेदामुळें हृदयें कां कलुषित व्हावींत हा माझ्या-पुढचा प्रश्न होता, व मी एकदां टिळकांशीं बोलतां बोलतां हा प्रश्न काढला. तात्त्विक दृष्ट्या थोडेंसें विवेचन केल्यावर गंभीर स्वरानें ते मला जें म्हणाले त्याचा आशय असा कीं, "वामनराव, हा प्रश्न केवळ युक्तिवादाचा नाहीं; हा प्रश्न अनुभ-वाचा आहे.ज्याला ज्याला म्हणून जगांत कांहीं कार्य करावयाचें असतें त्याला आपल्या प्रतिपक्षाचें मन मोडणें प्राप्त होतें. आरामखुर्चीवर बसूनच ज्याला विचार करावयाचा आहे त्याला कोणाचें मन मोडण्याचा प्रसंग येत नाहीं व तो पोकळ पोक्तपणाच्या व तात्त्विक सौजन्याच्या हजारों गोष्टी सांगूं शकतो. पण आपल्या संगीकृत कार्याला अडथळा करणाऱ्या किंबहुना त्या कार्याची नरडी दाबणाऱ्या प्रतिपक्षाशीं झुंजतांना

मनाचा समतोलपणा राखणें कोणालाहि कठीणच जातें आपणाला अत्यन्त प्रिय व पूज्य असलेलें कार्य जीवितसमयात जो आणतो त्याच्याशीं सख्य राखणें अशक्य नसलें तरी फार कठीण आहे आपल्याकडचाच हा अनुभव नाहीं तर सगळीकडचा हा अनुभव आहे तुम्ही आपलेपणा धरून एकादें काम केलें असलें तर तुम्हालाहि असा अनुभव आला असल व पुन असें काम करू लागा म्हणजे ताच अनुभव पुन येईल" आणि तत्पूर्वीच्या व सदनतरच्या माझ्या अनुभवाच्या व कार्यांच्या अल्प आणि आकुंचित क्षेत्रात मला या गोष्टीची सत्यता पटलेली आहे

(३) टिळकाच्या लेखात प्रतिपक्षाना असह्य असें तेज असे, हें कोणालाहि नव्यानें सागावयास नकोच सागोपाग विचार, बिनतोड युक्तिवाद, मुद्देसूद व सरळ माडणी, सुबोध व कार्यवाज भाषा इत्यादि गुणाचें मीं वर्णन केलेंच पाहिजे असें नाहीं लेख लिहिण्यापूर्वी त्या त्या विषयावरची इत्थंभूत माहिती मिळ विण्यात ते बराच काळ दवडीत असत हहि पुष्कळ लोकाना ठाऊक असेलच पण एकादा अपरिचित व कठिण विषय लोकाना चागला कळावा, तो त्याना पटावा, त्याच्या मनात तो ठसावा एतदर्थ प्रसगोचित असे आटपशीर, सुटसुटीत नवीन शब्द बनविण्यातही थोडाबहुत काळ दवडणें ते कमीपणाचें समजत नव्हते, इतकेंच नव्हे तर हें आपले कर्तव्य आहे असें ते मानीत, हें काहीं लोकाना जरी ठाऊक असलें तरी येथें नमूद करण्यास हरकत नाहीं त्याच्या सुधारणाच्या कल्पना कडे प्रागतिक प्रतिपक्षाचें अभय दुर्लक्ष होतें व आहे अशी माझी समजूत आहे "*गीतारहस्या*"तील तत्त्वविवेचनात त्याना काहीं नवीन शब्द बनवावे लागले, पण हे सर्वच शब्द प्रयत्नाशिवाय त्याना सुचले—ते त्याच्या विद्वत्तेमुळें किंवा बुद्धि वैभवामुळें त्याच्या निद्रामीं येऊन बसत—असा जर कोणी मानीत असल तर तें अगदी साफ चुकीच आहे "गीतारहस्यातील काहीं काहीं शब्दाकरिता मला दोनदोन चारचार दिवस घालवावे लागले आहेत" असे ते एकदा माझ्याजवळ बोलले लेखक म्हणून त्याना जगापुढें यावयाचें आहे त्यानीं ही गोष्ट ध्यानात धरली तर त्याच हित होण्याचा सभव आहे पण याहून महत्त्वाची एक गोष्ट आहे आणि ती ही कीं, ज्या विषयावर आपणास लिहावयाचें त्या विषयाबद्दल आपणास इतकी आस्था आणि कळकळ असली पाहिजे कीं, त्यासबधानें बोल ताना किंवा लिहिताना आपण त्याच्याशीं क्षणभर तरी तन्मय होऊन गेलें पाहिजे लेख लिहिताना टिळक कित्येक वेळा तन्मय होऊन जात, याचा एक चमत्का रिक अनुभव मला एकदा आला मद्रासच्या कायदे कौन्सिलपुढें आलेल्या एका विषयासबधानें मराठ्याकरिता स्फुट लिहावयाचें होतें त्यासबधानें मला माहिती देण्याकरिता व विचाराची दिशा दाखविण्याकरिता ते आफिसात आल्यावर आमची थोडीबहुत त्या विषयावर चर्चा झाली, पण माझ्या मद बुद्धीमुळें म्हणा, मला विचाराची ती दिशा चागलीशी पटेना व आमचा थोडासा वादविवाद

झाला. माझी समजूत घालीत नसण्यापेक्षा स्वत च स्फुट लिहून टाकलेलें बरें असा विचार करून ते लवकरच निघून गेले व काहीं वेळानें मी त्याचेकडे तें स्फुट मागण्याकरिता गेलों ते त्या वेळीं आपल्या लेखकाला तेंच स्फुट तोंडानें सागत होते व लेखाचा प्रवाह प्रतिपक्षाच म्हणणें खोडून काढण्याच्या भर रगात आलेला होता

' स्फुट लिहून झालें का ? ' अस मीं विचारलें असेल नसेल, तोंच त्या विषयासबधानें मला मूर्तिमत प्रतिपक्षच समजून ते इतक्या उत्साहानें, जोरानें व आवेशानें किंबहुना सतापानें बोलू लागले कीं, माझें वादात्मक जीवित त्या विषयापुरतें व त्या वेळेपुरतें तरी मूर्छित झाल मद्रासच्या कायदेकौन्सिलात बिलें आणणारा बाजूला राहिला, पण त्याच्यावरच्या आणि त्या बिलावरच्या सगळ्या रागाची आग क्षणभर माझ्यासारख्या गरिबाला सहन करावी लागली! सागण्याचा मतलब एवढाच कीं, विषयाशीं योग्यायहुत मानानें त्याची अशी तन्मयता होत असे

या कारणाची जोड विद्वत्व, कुशाग्रबुद्धित्व, इत्यादि कारणास मिळाल्यामुळेंच त्याच्या लेखामध्यें, प्रतिपक्षाना तापदायक होणारें तेज दृग्गोचर होत असे

## यशवंतबुवा ब्रह्मनाळकर

[ पडित, कीर्तनकार व "कीर्तन" मासिकाचे सपादक ]

लोकमान्य मडालेच्या एकातवासातून रहस्याचा ज्ञानसूर्योदय दाखवीत पुण्यास आले. रहस्यावर प्रवचन झालीं मध्यतरीं भेटी झाल्या रहस्याबद्दल आमची हरिदास मडळी—अर्थात् थालर्कीचालकी वर्तमानपत्रें—आपलें काय मत देताव तें पाहू असें विनोदानें ते म्हणाल चारदोन दिवसानीं भेटावयास गेलों "कीर्तनसस्था समाजात धार्मिक नीति व श्रद्धा उत्पन्न करणारी अशी एक अपूर्व शक्ति आहे. सामाजिक सुधारणेच्या अवडबरानें, समाजाची आनुवंशिक परपरा, चालीरीति याचा काहींच विचार न करता, एकदम भलताच सुधारणेचा प्रश्न त्याच्यापुढ ठेवून, मग तो त्यानें न मानल्यास आपण एकटेच बाजूस राहावयाचें असें करण्यापेक्षा त्याच्याशीं मिसळून त्याच्यासह एकेक पायरी वर चढण्याचा हेतु धरल्यास साध्य होतो याकरिताच नवशिक्षिताचीं मनें वळवून, स्वधर्मनिष्ठेची बाजू कायम ठेवून, नीतितत्त्वाचें महत्व सागणारा उपदेशकवर्ग तयार करण्याचें तुम्हीं मनावर घ्याव व दोनशें अडीचशे वर्षांची श्रीथानदमूर्ति महाराजाची ही कीर्तनपरपरा मूळ पुरुषाइतकी नसली तरी अशत आपण उपयोगात आणावी असें मला वाटतें " हें लोकमान्याचें बोलणें मनांतील मूळ प्रेरणेशीं तंतोतंत जुळल्यानें श्रीहरिकीर्तनालय काढण्याचा उद्देश दृढ झाला व उद्देशपत्रिका लिहिली.

" कीर्तन " मासिक काढलेलें पाहून समाधान दर्शवून ते म्हणाले, " समाजात विशिष्ट मताची परिस्थिति उत्पन्न करणें झाल्यास—मग तें मत राजकीय असो वा धार्मिक असो—आपल्या मताचें प्रस्थापन समाजात करणें झाल्यास, त्यास कीर्तनसंस्थेसारखें दुसरें साधन नाहीं इतकेंच नव्हे परंतु माझें असें ठाम मत आहे कीं, ' मी जर वर्तमानपत्राचा एडिटर झालों नसतों तर कीर्तनकार झालों असता "

---

## मधुसूदन दामोदर टेंबे

[ एम् ए एल् एल् बी, लोकमान्यांचे एक चहाते ]

आपण ज्या समाजामध्यें बोलतों, त्या समाजास आपले पदरात घेऊन त्यांचमध्यें आपल्याविषयीं विश्वास उत्पन्न करण्याची जी टिळकांची शैली होती यावद्दल मीं स्वत पाहिलेला असा एक दृष्टान्त देतों १९१७ च्या उन्हाळ्यात सातारा जिल्ह्यापैकीं लिंब गोव्यास टिळक गेले होते तेथ त्यानीं एक स्वराज्यावर व्याख्यान दिलें समाज दोन तीन हजार असल तो बहुतक सर्व अशिक्षित शतकरी वर्गातीलच होता टिळक म्हणज कोणी दवमाणूस आहे व ता आपल्याशीं प्रत्यक्ष बोलायचा, मुद्दा नाहीं च जात्यप्रमाणें केवळ अधृष्य (unapproachable) असायचाच, अशी मनाची पक्की समजूत करून घऊन हे लोक आल्ले त्यांचे चेहऱ्यावर भीति व आदर यांची छटा दिसत होती टिळकानीं आपल्या भाषणास आरभ केला मी त्यांचेजवळ मजाशीं बसलेला असल्यामुळ त्यांचे शब्द स्पष्ट ऐकावयास मिळून त्यांचा समाजावर काय परिणाम झाला हें पहावयास मिळालें टिळक म्हणाले— " मी कोणी मोठा माणूस आहे असें तुम्ही समजू नका तुम्ही जसे काबाडकष्ट करून पोट भरता तसा मीहि कष्ट करून पोट भरतों तुम्हीं नागर घेऊन जमीन नागरता, तर मी लेखणी घेऊन खर्डेघाशी करतों तुमच्या माझ्या कपड्यातही फरक नाहीं तुम्ही रादीची वंडी घालता तर मीहि तसाच अंगरखा घालतों तुम्ही डोक्याला मुंडासें गुंडाळता तस माहि माझं डोक्यावर मुंडासें ठेवतों फरक इतकाच कीं, तुम्हीं खेडेगावात राहत असल्यामुळें तुमच मुंडासें जरासें मळकट असेल तर माझ तुमच्यापेक्षा काहींसें स्वच्छ असत " एवढी प्रस्तावना झाली ताच सर्व शेतकरीसमाजानं आपल्या माना डोलवून लोकमान्यांच्या म्हणण्यास आपली पसती दाखविली ह्याप्रमाणें टिळकानीं श्रोतृवर्गास आपल्याशीं तादात्म्य पावण्यास लावून त्याना त्यांच्याच भाषत कुणबट दृष्टातानींच स्वराज्याची कल्पना पटवून दिली !

---

## व्यंकटेश गणेश जावडेकर

[ वकील, जुन्या राष्ट्रीय पक्षाचे व स्वराज्यपक्षाचे एक सभासद आणि सार्वजनिक चळवळीचे प्रचारक, धुळें ]

(१) लोकमान्य मंडालेच्या तुरुंगांतून सुटून आल्यानंतर थोड्याच अवधींत सार्वजनिक सभेच्या दिवाणखान्यांत मकरसंक्रमणानिमित्त तिळगुळाचा समारंभ करण्यांत आला होता. सदरहू प्रसंगीं रा. शंकरराव लवाटे यांचें मद्यपाननिषेधासंबंधीं व्याख्यान झालें. तें नेहेमीप्रमाणें करुणाप्रधान असेंच होतें, व त्यांत सत्तेच्या अभावी लोक कसे लाचार आहेत, ह्याचें रसभरित वर्णन होतें. सभेस लोकमान्य हजर होते. सभा आटोपल्यावर लोकमान्यांच्या घरीं गेलों व भेटींत प्रश्न केला कीं, "शंकररावांचें भाषण आपणास कसें काय आवडलें?" त्यांच्याकडून उत्तर असें आलें कीं, "रडगाणें गात बसून कांहीं एक होणार नाहीं. मी भाषण करणार होतों. थोडासा संतापहि आला होता, पण केवळ तो आवरून धरला इतकेंच." मीं म्हटलें आपण भाषण केलें नाहीं हेंच ठीक झालें, नाहीं तर एका भानगडींतून नुकतेच सुटून आल्यानंतर दुसरी भानगड लागलीच उभी व्हावयाची. त्यानंतर आणखी एक उद्गार मीं काढला कीं, पंचाण्णव सालच्या सुमारास पुण्यांत जो एक प्रकारचा "राम" मला दिसत होता, तो कांहीं आजकालच्या पुण्यांत मला दिसत नाहीं. त्यावर लोकमान्य उद्गारले कीं, 'वीस वर्षांपूर्वी ब्रुइनसाहेब पुण्यास पोलिस-सुपरिंटेंडेंट असतानाच त्यांनीं सरकारांत असा रिपोर्ट करून ठेविला आहे कीं, 'Take away Tilak and Poona is nothing"
(

मीत असे कीं, सबंध दोन वर्षांच्या विद्यार्थिदशेमध्यें मी चुकून एकदासुद्धा त्यांना कसलीहि शंका म्हणून विचारली नाहीं. ते स्वत खालीं मान घालून कायद्यावर भाषण चालविल्याप्रमाणें सारखे भडभड बोलत सुटत त्यांना शंका विचारणारेच अगोदर थोडे असत शंका विचारणाराच्या तोंडाकडेसुद्धा ते सहसा पहात नसत. शेदीडशें मुलांतून कोठूनहि का शंका येईना, त्याचें उत्तर वर न पाहताच दिलें जायचें. शंकेखोर फारच समोरील बसणारा दिसला, तर एकदा मान वर करून पाहून घ्यायचें व फिरून पूर्ववत् सुरू! हिंदुधर्मशास्त्रावरील त्यांच्या व्याख्यानाच्या वेळीं एकदा दोनहि डोळ्यांनीं आंधळे पण फार बुद्धिवान् असे के भार वकील वर्गात येऊन बसलेले मीं पाहिले आहे.

(५) आजकाल राजकीय कैदी तुरुंगातून सुटून येताच त्यांच्या मिरवणुकी काढण्यात येतात व मोठा सन्मान करण्यात येतो हें ठीकच आहे राष्ट्राकरिता स्वार्थत्यागपूर्वक आत्मक्लेश भोगण्याची तयारी ज्यांनीं प्रत्यक्ष सोदाहरण प्रत्ययास आणून दिली, त्यांचा मान करण्यात अस्वाभाविक असें माझ्या मतें कांहींच नाहीं. पण लोकांच्या ह्या वरपागी उत्साहाच्या व मिरवणुकींच्या विरुद्ध लोकमान्य किती होते, हें ता. २४-१०-८२ च्या केसरींतील खालील उताऱ्यावरूनहि दिसणार आहे —

" रा टिळक व रा. आगरकर हे तुरुंगातून आल्यावर त्यास वाजत गाजत सन्मानानें आणावें, अशी "दीनबंधु "कर्ते यानीं सूचना केली आहे ह्यासबधानें रा टिळक व रा आगरकर ह आग्रहास असें कळवितात कीं, " ही गोष्ट त्यास बिलकूल सम्मत नाहीं, कारण त्यांच्या हातून हा सन्मान मिळण्याजोग कांहीं महत्त्वाचें अद्यापि घडून आलें नाहीं लोकांनीं आपली मान देण्याची इच्छा दर्शविली, एवढेंच त्यास पुरें आहे, प्रत्यक्ष मिरविण्याची कांहीं जरूरी नाहीं " फार लांबवर नजर पोंचवून लोकमान्यांनीं १८८० सालीं जी राजकीय चळवळीची दिशा व जें धोरण आखलें, तें त्यांनीं मरेपर्यंत कायम ठेवलें हें "केसरी"च्या जुन्या फाइली चाळल्या असता कोणालाहि सहज कळून येणार आहे.

---

## महादेव गोविंद अभ्यंकर

[ रामायण व महाभारत ग्रंथाभ्यासी, लोकमान्यांचे एक स्नेही, पुणें. ]

(१) लो० टिळकांची धारणाशक्ति दांडगी होती त्यांनीं एकादें पुस्तक वाचलें म्हणजे पुढें कित्येक वर्षांनीं त्यावर त्यांतील अवतरणें ते सहज देऊ शकत प्रि आपस्याच्या सस्कृत कोशातील निम्मे श्लोक मला पाठ आहेत असें ते म्हणत. त्यांच्या तीक्ष्ण बुद्धीची मी एकच गोष्ट देतों पंडित गट्टूलालजी मोठे शीघ्रकवि

होते हे १८७६ साली डेक्कन कॉलेजात आले असता विद्यार्थ्यांनी एकत्र जमून त्यास कोणती समस्या घालावी याचा विचार केला व "ओतुना भक्षित शिव" ( मांजरानें शंकराला खाल्ला ) हा चरण तयार केला पंडितांचे कविता करण्याचे इतर चमत्कार पाहिल्यावर त्यास वरील समस्यापूरण करण्यास सांगितली व त्यांनी तात्काळ खालील श्लोक रचला—

"नवनीतमय लिंग पूजार्थ केनचित् कृतम् ।
हन्त तस्य प्रमादेन ओतुना भक्षित शिव ॥"

या गोष्टीस चाळीस वर्षे झाल्यावर पंडित गट्टूलालविषयी बोलणें निघालें असता लोकमान्यांना हा श्लोक म्हणून दाखविला

(२) संकट आलें असता मन शांत राहणें, व युद्धाचा प्रसंग येणार हें पाहून त्याच आनंद होणें अशा धैर्याच्या दोन बाजू आहेत लो० टिळकांची धैर्याविषयी प्रत्येकानें स्तुति केली आहे त्याची दोन उदाहरणें मी देतों एकदा टिळक म्हणाले, ' १८९७ साली मी दाजीसाहेब खरे यांचे बंगल्यावर उतरलों असता रात्रौं ९-३० वाजता एक युरोपियन पो० सुपरिंटेंडंट आला व बाहेर बोलावून घेऊन १२४ कलमाखालचें वारंट त्यानें मला दाखविलें मी त्यास पाच मिनिटें थांबण्यास सांगून आत गेलों व दाजीसाहेबांबरोबर त्या कलमासंबंधी चर्चा केली त्यांनी प्रे० मॅजिस्ट्रेटचे बंगल्यावर जाऊन जामीनाचा अर्ज करावा व त्याचा निकाल काय होतो तो मला तुरुंगांत कळवावा असें ठरवून मी दहाचे सुमारास पोलिसांबरोबर तुरुंगांत गेलों जामीनाच्या अर्जाचा काय निकाल होतो, याची कोणासहि आरोपीस नियमाना लागली असती व त्यास झोंप आली नसती १०॥ वाजता तुरुंगांत गेल्याबरोबर अंथरुणावर निजलों व लगेच मला गाढ झोंप लागली ११-३० वाजता दाजीसाहेब आले, त्यावेळीं मी घोरत होतों व त्यांनी दोन हाका मारल्यावर मी जागा झालों " संकटकालांत इतकें मन शांत ठेवणारा पुरुष खरोखरच विरळा

(३) प्लगवर रामबाण औषधाच्या मोठमोठ्या जाहिराती इंग्रजी व मराठी वर्तमानपत्रातून १८९९ साली फार येत असत व त्यांतील भपक्याची वर्णनें वाचून पुष्कळ लोक फसत व तीं औषधें विकत घेत या सरकारनें कांहीं आळा घालावा म्हणून "टाईम्स ऑफ इंडिया" मध्यें प न नॉस्ट्रम्स" या मथळ्या खालीं मीं एक पत्र प्रसिद्ध केलें होतें, त्या जाहिराती देणारास फार झोंबलें त्या पैकीं एकानें मला सॉलिसिटरमार्फत नोटिस दिली कीं, "तुमचे पत्रांतील मजकुरानें आमचे मालाची बेअब्रू व नुकसान झालें आहे, तुम्ही माफी मागून आपलें पत्र परत न घ्याल तर तुमच्यावर फौजदारी व दिवाणी फिर्यादी करण्यांत येतील " ही नोटीस मिळताच मी प्रसिद्ध झालेल्या जाहिराती, माझें पत्र व ती नोटीस घेऊन लो० टिळकांकडे गेलों, व पुढें काय करूं असा सल्ला विचारला. कागद

पत्र वाचून ते हसले व म्हणाले, " म. गो.! या नोटिशीचें उत्तर असें द्या कीं, माझें लिहिणें अगदीं बरोबर आहे. तुमची जाहिरात लबाडीची आहे. तुम्हास काय वाटेल तें करा. यामुळे तुमचेवर खटला होऊन मॅजिस्ट्रेट कदाचित् दोषी ठरवील, परंतु तुम्ही हायकोर्टांत सुटाल. माझ्यावर हा प्रसंग आला असता तर मीहि असेंच केलें असतें." लोकमान्यांचें धैर्य माझे अंगीं नसल्यामुळें मीं कमी धोक्याचा मार्ग स्वीकारला व नशीबानें मजवर माफी मागण्याचा अगर फिर्यादीचा प्रसंग आला नाहीं

(४) प्रिव्ही कौन्सिलनें जगन्नाथमहाराजांचें दत्तविधान शाबीत धरल्यावर कांहीं दिवसांनीं ते एकटे असतां मीं प्रश्न केला कीं, हा खटला तुमचेसारखा झाला, याचा तुम्हास आनंद झाला कीं नाहीं, व ता बुडाला असता तर तुम्हास दुःख झालें असतें का? ते म्हणाले, "खटला बुडाला असता तर मला दुःख झालें नसतें परंतु तो मी जिंकला हें ऐकताच चित्तांत आनंदाची ऊर्मि उठली, ती न उठण्याइतका मीं स्थितप्रज्ञ अद्यापि झालेलों नाहीं!"

(५) लो० टिळकांचा दैवावर व पूर्वकर्मावर थोडासा भरवसा होता ते एकदा म्हणाले, "मी तीन वेळा तुरुंगांत गेलों, परंतु आभिपाई लेख माझ्या लेखांनीं लिहिले होते, व ज्याबद्दल स्तुति झाली ते लेख माझे हातचे होते १८९७ सालीं शिवाजीचे उद्गार ही कविता तीन आडवडे कपोज होऊन जागा नसल्यामुळें छापण्याची राहिली होती व भानूचे व्याख्यानाच्या नोटा व ती एकाच अंकांत छापली गेली या दोहोंमध्यें राणीसरकारचा जयजयकार हा माझा लेख प्रसिद्ध झाला होता पूर्वजन्मार्जित कर्मानें या जन्मीं माझ्या लेखांनीं लिहि- लेल्या लेखांबद्दल शिक्षा भोगून मला प्रायश्चित्त भोगावें लागलें. एका दृष्टीनें पाहिलें असतां १९०८ सालीं मला शिक्षा देण्यांत ईश्वराचा चांगला हेतु असावा जॅक्सनसाहेबाचे खुनाचे वेळीं मी मोकळा असतों तर कटाचा प्रवर्तक म्हणून सरकारनें मजवर खटला केला असता व कदाचित् दोषी ठरलो असतों. तसेंच माझी सहा वर्षांची शिक्षा १९१४ सालीं महायुद्ध सुरू होण्यापूर्वी संपली म्हणून बरें, युद्धाचे सुरवातीनंतर जर ती संपती तर कोणती तरी सबब लावून सरकारनें मला युद्ध संपेपर्यंत तुरुंगांत ठेविलें असतें "

(६) " मातृवत् परदारेषु परद्रव्येषु लोष्टवत् ।
आत्मवत् सर्वभूतेषु यः पश्यति स पश्यति ॥ "

या महाभारतातील श्लोकांत वर्णन केल्याप्रमाणें लोकमान्य टिळक होते माझी त्यांची ३५ वर्षांची ओळख. मी पुष्कळ दिवस घरच्या माणसाप्रमाणें त्यांच्याशीं वागलों, त्यामुळें त्यांचें वर्तन पाहण्याचे मला कितीतरी प्रसंग आले त्यांनीं काम हा बलवत्तर रिपु अगदीं जिंकला होता. त्यामुळें परस्त्रीविषयीं सभ्यपणा अगर थट्टेचा एकहि शब्द त्यांचे भाषणांत येत नसे. उलट शृंगाररसप्रधान नाटकाचा व

गाण्याचा त्यास कंटाळा असे कारण तो महावैराग्यवंत पुरुष असे याचें एकच उदाहरण देतों श्रीमद्भगवद्गीतेच्या अकराव्या अध्यायांत 'पितेव पुत्रस्य सखेव सख्युः प्रियः प्रियायार्हसि देव सोढुम् ॥ " असा एक श्लोक आहे श्रीकृष्णाचें विश्वरूप पाहून एवढ्या महात्म्याशीं आपण सलगी केली याचें अर्जुनास वाईट वाटलें व त्यानें भगवंताजवळ वरील शब्दानें क्षमा मागितली यांतील शेवटला दृष्टांत रंगेल पुरुषास फार आनंद देणारा आहे परंतु गीतेसारख्या अध्यात्मिक ज्ञानाचे ग्रंथास शृंगाराचा विटाळसुद्धा उपयोगी नाहीं म्हणून लोकमान्यांनीं त्याचा अर्थ गीतारहस्यांत बदलला आहे

(७) लो. टिळकांना परद्रव्य मिळविण्याचे पुष्कळ प्रसंग आले होते व त्यांनीं मनांत आणलें असतें तर ताईमहाराजांचे संस्थान चाळून त्यांनीं आपलें जन्माचें दारिद्र्य फेडून घेतलें असतें परंतु परद्रव्य म्हणजे माती हा त्यांचा पहिल्यापासून बाणा आपल्या श्रमाचा मोबदला म्हणून देखील ते पैसा घेत नसत याचें एकच उदाहरण देतों कायद्याचा सल्ला फुकट देण्याचें त्यांचें मत सर्व लोकांस ठाऊक होतें एकदा कोणा एका गोसाव्याचे सरकारी तिजोरींतून येणारे दरसालचे ५०० रुपये कांहीं कारणानें जप्त झाले होते त्या गोसाव्यानें लोकमान्यांकडून अर्ज लिहून मुंबईसरकारकडे पाठविला व त्याचा दोन वर्षांनीं अनुकूल निकाल होऊन वीस वर्षांचे सर्व रुपये त्या गोसाव्यास मिळाले त्यानंतर ५०० रुपये घेऊन तो गोसावी लोकमान्यांकडे आला व आपले हातास यश आलें, आपले श्रमाबद्दल फुलाची पाकळी म्हणून एक वर्षाचें उत्पन्न रुपये पांचशें मी आपले चरणीं अर्पण करतों त्याचा कृपेनें स्वीकार व्हावा, असा त्यानें हट्ट धरला लोकमान्य त्यास म्हणाले ' मीं तुला अर्ज लिहून दिला, ही गोष्ट देखील माझे लक्षांत नाहीं तुझ्या नशिबानें मिळालेल्या पैशांत मी भागीदार होऊं इच्छित नाहीं तुला अर्ज लिहून देणें एवढें माझें कर्तव्य होतें तें मी केलें त्याचा मोबदला कसला ! " हें ऐकून तो गोसावी या निरिच्छ ' राष्ट्रीय गोसाव्यास " नमन करून आश्चर्यचकित होऊन चालता झाला !

त्यास प्रोत्साहन देण्याचा हा त्यांचा गुण आता कोठेंहि पाहावयास मिळत नाहीं.

(९) लो० बाळ गंगाधर टिळक हे परमेश्वराची विभूति होते असें म्हणण्यास मला तिळमात्र शंका वाटत नाहीं. रायगडास एका शिवाजीच्या उत्सवाचे वेळीं लोकांनीं डोकीं ठेवल्यामुळें सुजलेले त्याचे पाय प्रत्यक्ष मीं पाहिले आहेत व इतर ठिकाणींहि लोकांनीं पाहिले असतील या पाद सेवनात पाश्चात्य विद्याविभूषित मंडळींहि रंगड असत, पण कोणास न दुखविता पायावर मस्तक ठेवणारास दूर करता करता त्याचे हातहि सुजून एकसारखे दुखत असल्याचेहि त्या वेळीं मीं ऐकलें आहे.

---

## म. वा. मोरे

[ लोकमान्य टिळकांचे एक चहाते ]

इसवी सन १९१६ च्या मे महिन्याच्या सुटींत आम्ही समवयस्क असे चार-पाच सहाध्यायी सिंहगड पाहावयास गेलों त्या वेळीं लोकमान्याचें वास्तव्यहि तेथेंच होतें व आम्ही गेल्यानंतर लगेच दुसऱ्या दिवशीं ते बेळगावला जाण्यासाठीं म्हणून रवाना झाले. ही वेळ म्हणजे लोकमान्य सुटून आल्यावर कॉंग्रेससंबंधीं ते कोणतें धोरण स्वीकारतात या प्रसंगाची होय सिंहगडास गेल्यानंतर तेथें काय अनुभव आला हें थोडक्यात सांगतों

दुपारीं जेवण झाल्यावर आम्ही सर्वजण त्यांचेकडे निघालों त्या वेळीं तेहि जेवण करून व्हरांड्यावर इकडेतिकडे फिरीत होते अंगात फक्त पातळ सदरा होता आम्ही जाताच ते व आम्ही मिळून खोलींत गेलो खोली स्वच्छ झाडलेली होती. एका बाजूला एक पलंग व वर पातळ गादी व दोन उशा एवढें सामान होतें. त्या जवळच एक टेबल व खुर्ची, व टेबलाच्या दुसऱ्या बाजूस एक आरामखुर्ची असून नजीकच एक कॉट येणाऱ्या मंडळींस बसण्याकरिता ठेवलेली होती. टेबलावर चिरोलकृत " Indian Unrest " हें पुस्तक उघडें असून त्यामध्यें तांबडी निळी पेंसिल होती शिवाय गीतारहस्याचें हिंदी भाषांतर व इतर तीनचार पुस्तकें पडलेलीं होतीं खोलींत गेल्यावर लोकमान्य आरामखुर्चीवर बसले व आम्ही समोर कॉटवर बसलों त्यांच्याशीं बोलण्याची सर्वांची उत्सुकता होतीच. त्यांनीं आमची काय शिकता वगैरे चौकशी केली व नंतर पुढीलप्रमाणें संभाषण झालें —

प्रश्न—पुण्यामध्यें गीतारहस्याच्या खंडनार्थ शास्त्री मंडळीचे जारीनें प्रयत्न सुरू आहेत.

लोकमान्य—तुमची काहीं प्रोफेसर मडळीहि त्यात आहेत. चालावयाचेंच. आज इतकीं वर्षें हार्डीमासी खिळलेल्या कल्पना इतक्या लवकर जाणें शक्य नाहीं. एवढ्यानेंच काय झालें ? आमच्या पुस्तकाचीं हिंदी, तामील वगैरे इतर भाषातून भाषांतरें झालीं म्हणजे दूरच्या शास्त्री लोकांचा आम्हाला तीव्र विरोध होईल, पण २०–२५ वर्षांनीं आमचें म्हणणें लोकास पटल यात शका नाहीं

प्रश्न—हा ग्रंथ इंग्रजींत अगोदर लिहिला असता तर क... .. ...

लोकमान्य—नाहीं, हा ग्रंथ मुख्यतः आमच्या लोकाकरिता लिहिला आहे. तेव्हा सर्व हिंदुस्थानभर त्याचा प्रसार झाला म्हणजे पुढें इंग्रजी भाषातर करिता येईल

प्रश्न—आपण तुरुंगात असताना गणित, जर्मन भाषा, पाली, वगैरेंचा अभ्यास केला असून गीतारहस्यारोरीज आणखी काहीं ग्रंथ लिहिणार असे ऐकतों.

उत्तर—होय लिहिण्यासारखें पुष्कळ आहे. पण कोणत्याही विषयाचा अभ्यास करून त्यावर ग्रंथ लिहिणें ह्या गोष्टीला फुरसत पाहिजे. तुमच्या प्रोफेसर मडळींचीं हीं कामें आहेत. त्याना ह्या गोष्टीकडे लक्ष देण्यास वेळ असतो. माझ्यासारख्या Public Life मध्यें पडणाऱ्या माणसास तसा वेळ मिळणें शक्य नाहीं (टेबलावर पडलेल्या गीतारहस्याकडे बोट दाखवून) हा ग्रंथ लिहिण्यास जशी फुरसत सापडली तशीच पुन्हा फुरसत सापडल्यास ( हसत ) असलीं कामें करता येतील.

लोकमान्यांशीं बोलत असता त्यांच्या जवळच्या ग्रंथसभाराची माहिती असावी, निदान सिंहगडावर ते कोणत्या विषयाचें चिंतन करीत आहेत याचा बोध व्हावा, असें आमच्यापैकीं प्रत्येकाच्या मनात होतें. परतु आमच्या टेहेळणींत एका पुस्तकाचें ज्ञान आम्हास होईना, म्हणून लोकमान्यांच्या अत्यत प्रेमळ वर्तनामुळें त्याना त्यासबधीं जराशा सलगीचा लडिवाळ प्रश्न विचारण्याचें साहस आमच्यातल्या एका विद्यार्थ्यानें केलें. लोकमान्यांनीं या चौकस प्रश्नावर विरजण घातलें नाहीं. त्यानीं 'आम्ही स्वराज्य मागतों म्हणजे काय करतों' या सबधाचें तें पुस्तक आहे असें सांगितलें. हिंदी राज्यकारभाराच्या नियमांचें तें सरकारी पुस्तक होतें. स्वराज्यासाठीं त्यात ज्या फेरफारांची अवश्यकता होती, त्यांच्या निदर्शनाच्या निरनिराळ्या भागांवर खुणा होत्या.

बळवंतराव म्हणाले, " आमची मातुश्री तपस्विनी होती. पुत्रप्राप्तीस्तव तिनें वर्ष दीड वर्ष सूर्याराधनेचें खडतर तप केलें होतें. तिनें प्रेमानं जें नाव ठेवलें व जें सर्वांनीं प्रचारात आणलें त्याची योग्यता शास्त्रप्रेमापेक्षा कमी नसल्यामुळें तेंच मी उपयोगात आणू लागलों."

(२) ज्याला एकदा आपलें म्हटलें तो जन्माचा आपलाच झाला असें समजून ते त्याच्याशीं वागत असत. मग ती एखादी व्यक्ति असो अथवा संस्था असो. त्या व्यक्तीचें अथवा संस्थेचें व आपलें सघट्टण असो वा नसो, मतभेदामुळें कायमचें रिनसो अथवा न निनसो ऐनवेळेला याचा आपलेपणा पुढें यावयाचाच असे काहीं प्रसंग माझे लक्षात आहेत. त्यातील एक प्रसंग आगरकराच्या मृत्यूसंबधाचा होय याच्या हातून काहीं मृत्युलेख लिहिले गेले पण ते लिहवितांना हृदय दाटून आल्यामुळें दुःखाचे सुसकारे टाकीत, इकडे तिकडे फिरत, डोळ्यातील अश्रु पुशीत, जर कोणाचे मृत्युलेख लिहिले असतील तर ते आगरकर व रानडे याचे होत पहिल्या प्रसंगाचे वेळीं मी समक्ष होतों दुसऱ्याचे वेळीं नव्हतों, म्हणून दुसऱ्याविषयीं मला एकिवापेक्षा जास्त काहीं सागता येत नाहीं. या वेळीं लोकमान्य म्हणाले, आगरकर आणि मी कितीं जरी भाडलों, वाक्प्रहार करण्याकरिता आम्ही आपल्या तीक्ष्ण शस्त्रास्त्रानीं वेचडे जरी प्रहार केले असले तरी आगरकरासारखा योद्धा आगरकरच ! लगडा पाय रणागणावरून कसा नाच वावा ही विद्या आगरकरासारखी दुसऱ्यास साधावयाची नाहीं

(३) कॉलेजातील आगरकराची जागा रिकामी झाली होती, ती भरून काढण्यासारखा त्याच्या जोडीचा व तोडीचा टिळकाखरीज दुसरा कोणी नाहीं असें वाटणाऱ्यापैकीं एक गृहस्थ लोकमान्याकडे आले. त्या गृहस्थानीं आगरकराचे जागेवर आपण याल काय ? असा हसत हसत प्रश्न केला तेव्हा टिळक म्हणाले, " कॉलेज आमचें आहे. त्यास कमीपणा येत असल्यास सर्वांनीं आपले मतभेद बाजूस सारून संस्था चालवणें हें सर्वांच कर्तव्य आहे तशी जरूरच असल्यास ती भागविण्यापुरता मी येईन." लोकमान्याच्या या उत्तरानं त्याचें समाधान झालं व ते म्हणाले, " आपले मनाचा थोरपणा आणि संस्थेबद्दलचा आपला अभिमान पाहून आनंद झाला, तो व्यक्त केल्यावाचून राहवत नाहीं."

(४) कै. विष्णुशास्त्री चिपळूणकरानीं न्यू स्कूल काढण्याचें ठरविलें तेव्हा नामजोशी यास आपले मदतीस घतल नामजोशी हे अवघे मॅट्रिक झालेले होते. तथापि इग्रजी व मराठी भाषा चागली लिहीत व वाचीत, वक्तृत्वाचें अगदी चागलें होतें. धाडस, कल्पना, निर्भय, प्रसगीं " आपडी थपडी " करण्यास मागें न घेणारे, लॉर्ड रे सारख्या गव्हर्नरास बगलेंत मारून आपलें काम करून घेणारे. सूक्तासूक्ताची पर्वा न करता कामाशीं गाठ घालणारे, नामजोशी यासारखे अद्याप कोणी आढळले नाहींत. इतकें असताहि नामजोशी यास 'आपला' म्हणण्यास

पुण्यात लोकमान्यांखेरीज दुसरा कोणी तयार नव्हता. याचें कारण सामाजिक वर्तणुकींतील त्यांचा पंगूपणा होय. लोकमान्यांचें लक्ष राष्ट्रहिताकडे असे. राष्ट्रहिताचे कामीं जो त्यास मदत करितो तो त्यांचा खरा बनण्यास नड नसे. कै. नामजोशी यांची लोकमान्यास अहर्निशीं मदत असल्यामुळे ते त्यांच्या इतर दुर्गुणांकडे दुर्लक्ष करीत इतकेंच नाहीं, तर इन्डस्ट्रियल कॉन्फरससारखीं जारमेचीं, दगदगीचीं आणि खर्चाचीं कामें लोकमान्यांनीं नामजोशी यांजवर पूर्णपणें सोंपविलीं व त्यांनीं त्याचें चीज करून दाखविलें. तरी नामजोशांच्या संगतीत टिळक गुंतल्यामुळें त्यांचें वजन हलकें झालें असें म्हणणारे बरेच प्रतिष्ठित त्या वेळीं होते इतकेंच नाहीं, तर नामजोशी यांची संगत टिळकांनीं सोडावी म्हणून कित्येकांनीं प्रयत्नहि केला होता. त्यास 'सर्व गुणानीं पूर्ण असा कोणी नाहीं लोकांच्या दृष्टीनें नामजोशी कसेही असले तरी राष्ट्रीय कामांत त्यांचा उपयोग लब्धप्रतिष्ठितांपेक्षा पुष्कळ अधिक होतो, म्हणून त्यास दूर करणें अथवा त्यांचा अव्हेर करणें कदापि घडावयाचें नाहीं " असें कोरडे उत्तर देऊन त्यांनीं परत लावलें आहे. नामजोशांचा व लोकमान्यांचा हा आपलेपणा नामजोशी यांच्या हयातीपुरताच नव्हता तर त्यांचे पश्चात् त्यांचे मुलाबाळांचे पोषणांतहि तो आपलेपणा लोकमान्यांनीं

प्रमुख वीरास इतर मेळेवाल्यापेक्षा अधिक बक्षीस दिलें ! लोकमान्याच्या या कृतीमुळें बहुतेक वीर सर्द झाले. तेव्हा लोकमान्य म्हणाले, "तुमच्या वर्गी आता सचरलली वीरश्री पाहून समाधान वाटलें. हीच तुमची वीरश्री परवशतेच्या नादीं न लागता स्वतंत्र घरात आणि राष्ट्रकार्यात गुंतून राहील, तर देशाचे कल्याणास फार काळ लागणार नाहीं, अशी माझी खात्री आहे परंतु तुमच्या या वीरश्रींत शोध आणि साराासारविचार यांचा पुष्कळच अभाव असल्यामुळें दिला दुबळेपणा आलेला आहे, हें आपण लक्षात घेतल्याचें दिसत नाहीं ज्या आपल्यातील थोरातील थोर पुढाऱ्यानें स्वदेशीचें निशाण खांद्यावर घेतलें, व त्या निशाणाचे छायेत आपल्या गंभीर वाणीनें सर्वांस ओढून घेतलें, तो मजूरपणानें, हलगर्जीपणानें, अथवा जाणूनबुजून आपले थोर अधिकारास कलंक लावून घेईल काय ? या प्रश्नाचे होकारार्थी उत्तर कोणी देईल असें मला वाटत नाहीं यदाकदाचित् आपल्यातील एखाद्या वीरानें होय म्हटलें तर त्यास मी असें विचारीन कीं, जरी तुम्ही म्हणता हें खरें असलें तरी एका गाडीकरिता तुम्ही आपलेपणाचें थोर निशाण दारूच्या गोटात फडून देण्यास तयार व्हाल काय ? या प्रश्नाचें योग्य उत्तर आपापसात ठरवून उद्या दोन प्रहरीं मला कळवा" अशा आशयाचे भाषणात आपलेपणावर त्यांनीं किती जोर दिला आहे, हें सहज लक्षात येईल.

(६) टिळकचरित्र लिहिण्याचे उद्देशानें मी त्याचे घरीं राहिलों असता त्यांचे चुलते गोविंदराव काका यांनीं सांगितलेल्या पुढील दोनतीन गोष्टी देत आहे —

बळवंत हा सन १८६९ मध्यें पुणें येथें हायस्कुलात शिकत होता त्या वेळीं एकदा शास्त्रीबोवानीं 'नैषधा'तील काहीं श्लोकाचें भाषांतर मुलास सांगितलें, पण बळवंतानें तें लिहून घेतलें नाहीं साहजिकच आपलें भाषांतर हा मुलगा लिहून घेत नाहीं, म्हणून शास्त्रीबोवा रागावले तेव्हा 'स्वतः भाषांतर करण्यानें जितका फायदा होतो तितका दुसऱ्याचें पाठ केल्यानें होत नाहीं !'" असा सरळ जबाब त्यांनीं दिला

(७) बळवंताच्या वयाच्या १२ व्या वर्षी पुण्याच्या सिटीस्कुलात मराठीच्या तासाचा मास्तर मराठीत शुद्धलेखन सांगत असता पाच ओळींत 'संत' हा शब्द तीन वेळा आला हा बुद्धिमान् मुलानें एकदा 'संत' दुसऱ्या खेपेस 'सन्त' व तिसऱ्या खेपेस 'सन्‍त' अशा तीन प्रकारानीं तो शब्द लिहिला शिक्षकानें पहिला बरोबर धरून बाकीचे दोन चुकीचे धरले बळवंतानें तक्रार केली तंटा फार माजला तेव्हा तंटा हेडमास्तरपर्यंत जाऊन हेडमास्तरानीं बळवंतासारखा निकाल दिला सिद्धि मिळेपावेतों प्रयत्न सोडावयाचा नाहीं हा जन्मस्वभावच

(८) बळवंत हायस्कूलमध्यें शिकत असता त्याचे संस्कृत व गणित हे दोन विषय अत्युत्तम होते. मुलांना बहुधा हेच विषय जड जातात तेव्हा मुलें नेहमीं

आपल्या शंका याला विचारीत, व यामुळें वर्गामध्यें याचेभोंवता नेहमीं मुलांचा गराडा असावयाचा पहिल्यापासून यास मुलास शिकवावयाची फार हौस एकदा कोणी काहीं खोडी केली पत्ता लागेना सबब हेडमास्तर जेकब हे फार रागावले व त्यानीं प्रत्येक मुलास दोन दोन छड्या मारावयाचा ठराव केला त्याप्रमाणें पहिल्या मुलापासून त्यानीं छड्या मारण्यास सुरुवात केली मुलास छड्या घेऊ नका असें बळवतानें पुष्कळ सांगितलें, परंतु मुलानां छड्या घतल्या याच्यावर ज्या वेळेस पाळी आली त्या वेळीं यानें सुरतेस दाखविलेलें काठिण्य जकर साहेबास दाखविलें साहेब फार संतापले व बळवतास वर्गाबाहेर जाण्यास फर्मावलें आश्चर्याची गोष्ट ही कीं, सर्व मुले त्याच्याबरोबर बाहेर पडलीं

(९) बीजगणितातील गूढ प्रश्न बळवतरावानीं दानतानदा सोडविलेले पाहून इथॉर्नथ्वेट हे हा सारा आपल्या शिक्षणाचा परिणाम आहे असे समजू लागले पण सत्वनिष्ठ व निर्भीड अशा बळवतरावास हें कसचें मानवतें? त्यानीं एकदा वर्गांत "मी केरोपंत छत्र्यांचा शिष्य आहे, असें ठासून सांगितलें " तेव्हांपासून हॅथार्नथ्वेट साहेबाचें मन टिळकाविषयीं कलुषित झालें पुढें बळवतराव एम् ए च्या परीक्षेला एकदा बसले असताना हथार्नथ्वेट परीक्षक होते व तेथें त्याचा काहीं खटका उडून बळवतराव एम् ए चा परीक्षा पास होऊ शकले नाहींत असें सांगतात टिळकाना जसा करोपंताचा अभिमान वाटे तसे केरोपंतहि टिळकास फार प्रिय मानीत केरोपंत आसन्नमरण झाले तेव्हा त्यांच्यासभोंवार एकदा पाचसातशें विद्यार्थ्यांचा व केरोपंताच्या काहीं स्नेह्यांचा गराडा पडला होता केरोपंताच्या एका भोळ स्नेह्यानें विचारलें "नाना, तुमच्यामागे गणितशास्त्र पारकें झालें आहे, तें जिवत राहील कसें?" यावर केरोपंत–बळवतराव सर्वांच्या मागे कोपऱ्यात बसले होते–तिकडें बोट करून म्हणाले, 'हा पोर काहीं दिग्विजय लावील त्याचें पाणी निराळें दिसतें "

(१०) कै आगरकराचा व माझा परिचय ते कॉलेजमध्यें असल्यावेळेपासून त्यांच्या मामामुळें झाला होता लोकमान्यांबरोबर भाषण करण्यास जितकें मन सकोचित होत असे तितकें आगरकरांबरोबर गप्पागोष्टी करताना होत नसे एकदा आपणा उभयतांची विद्वत्ता सारखी असता वृत्तींत फरक का दिसतो म्हणून आगरकरास प्रश्न केला असता ते म्हणाले, "त्यांच्या खासगी वर्तनाकडे लक्ष पुरवा म्हणजे आम्हा उभयतांच्या वृत्तींतील फरक आपणास कळून येईल" व आगरकरांच्या या म्हणण्याचा अनुभव घेण्याकरिता लोकमान्यांचा प्रत्येक क्षण वाया न जाऊ देण्यांत मी दक्ष असे यामुळें घरच्या मंडळींपेक्षा माझी लगट अधिक असून वडाल्कीचा मान मला मिळतो व भिडस्तपणाचा गुण लोकमान्यांत आहे त्याचा उपयोग मासेमार्फत करून घेतल्यास हें सकट टळेल असें वाटून घरच्या मंडळींनीं या प्रकरणात मला मध्यस्थ बनविलें मला तरी यांच्या प्रवृत्तीचा आदरा

उद्योगास मंडळी लागली व त्यांतील कांहीं मंडळी जड धंद्यासह जड शिक्षानें मुंबईस रवाना झाली. हें समजतांच मात्र रामरावजीस निराशेनें घेरलें. तथापि उद्योगाची सीमा संपेपर्यंत दैवाकडे वळावयाचें नाहीं अशा विचारांत ते होते.

या वेळीं हायकोर्टाचे बेंचांत के. माधव गोविंद रानडे हे एक जज होते. यांच्या कानावर सर्व कची हकीकत गेल्यास अन्याय होणार नाहीं अशी लोकांची खात्री होती. ती खरी होती, पण हें काम तशाच मोठ्या गृहस्थाखेरीज व्हावयाचें नाहीं व असा मोठा व परोपकारी गृहस्थ मुंबई इलाख्यांत टिळकांखेरीज दुसरा नाहीं असा लोकांचा समज होता. पण याव लहान, व्यक्ति एक आणि कार्यकर्ते व करविते यांचें सामाजिक व सार्वजनिक सभेच्या कामांत विळ्याभोपळ्या-इतकें सख्य! तेव्हां हें काम यांस सांगणेंच प्रशस्त नाहीं असें वाटलें. तथापि खडा टाकून पाहावा, लागल्यास लागला, असें वाटून रामरावजींचे एक स्नेही धारवाडाहून निघून पुण्यास आले, लोकमान्यांस भेटले व संक्षेपतः हकीकत सांगितली. लोकमान्यांनीं कांहीं जरूरीचें काम आहे कीं काय याची चौकशी करून ते धारवाडाहून आलेल्या देशस्थासह रात्रीच्या गाडीनें मुंबईस आले, माधवरावजीस भेटले, व येण्याचें कारण सांगितलें. तेव्हां माधवरावजी म्हणाले, "जें काम चिठ्ठीनें व्हावयाचें त्याकरितां इतके श्रम करावा घेतलेत?" लोकमान्य म्हणाले, "आपणां उभयतांच्या संबंधानें समाजांत ज्या चुकीच्या समजुती पसरल्या आहेत त्यांचा निरास करण्याकरितां समक्ष येणें बरें वाटलें." माधवरावजी हांसले; "अशा हजारों समजुती चुकीच्या आहेत. वकिली धंद्यानेंच निघतील तेव्हां निघतील." असें भाषण चालू आहे तों चहा आला व सह्यांचे कागद घेऊन शिपाईहि आला. चहा घेतां घेतां कागद चाळीत होते तों त्यांत सनदाहि होत्या. त्यांतील राम-रावांची सनद फाडून त्या सनदेंत धारवाड डिस्ट्रिक्ट होतें त्याचेच मागें "धारवाड आणि" या अक्षरांचा शोध घालून "झालें आपलें काम!" असें लोकमान्यां-बरोबर आलेल्या गृहस्थांस सांगितलें. तो गृहस्थ उठून बाहेर गेला. लोकमान्य सुमारें पंधरा मिनिटें बोलत बसून निघाले. बरोबर आलेला गृहस्थ चौकाकी तयार ठेवून वाट पाहातच होता. उभयतां गाडींत बसून स्टेशनवर येऊन तेथून पुण्यास आले. त्यांच्या गाडीभाड्याचा वगैरे खर्च द्यावा, अशा इच्छेनें रामरावाचा मित्र आडवूं लागला. तें या चाणाक्ष पुरुषाचे लक्षांत तेव्हांच आलें आणि म्हणाले, "मी कां भाडोत्री तांगेवाला अथवा वकील आहे म्हणून तुम्ही संकोचवृत्तीनें उभे राहिला! खुळे कोठले, जा स्नान करा. तुमचे स्नेह्यास तार करायची असल्यास करा आणि रात्रीचे गाडीनें जा!"

(१२) स्वदेशीची लाट बंगाल्यांतून इकडील स्तंभित झालेल्या लाटेंत मिसळून लोकमान्यांच्या पाठिंब्यानें ती जोरांत आली. टोप्यांचा होम तरुण विद्यार्थ्यांनीं करून फार दिवस झाले नाहींत तोंच परदेशी साखरेवर बहिष्कार घालविणारांच्या

व टोप्या जाळणाराच्या घरींच परदेशी साखर येऊन त्या सटवीनें स्वदेशी साखरेस बाटविलें ! या प्रकाराने भिक्षुकांच्या जिव्हा वळवल्या, टीकाकारानीं वस्तऱ्या मार्गे सारून कागद टाक सजविले, कवींची कवित्वशक्ति तप्त झाली, तरुण विद्यार्थ्यांचा धिंगाणा सुरू झाला. छापखानेवाल्याना एक नवें काम आलें, मेळेवाल्यांच्या टिपऱ्या आणि घुंगरू लावलेल्या काठ्या खणखण वाजूं लागल्या. अर्थात्च ह्या हल्लयाची बातमी लोकमान्यांपर्यंत आली. इकडे हा प्रकार चालला आहे तो काहीं तरुण विद्यार्थी हातात कवितांचीं प्रुफें घेऊन लोकमान्याकडे आले, त्यानीं तीं त्यास दाखविली. लोकमान्यानीं मुलास बसवून आपणच त्या कविता वाचल्या. कवित्वाच्या रचनेची तारीफ केली आणि मुलास म्हणाले, " शहाण्यास मार शब्दाचा आणि मूर्खास मार टोणप्याचा. " ही म्हण तुम्हाला पाठ झाली आहेना ? मुलाना "हाय" असें उत्तर देताच लोकमान्य म्हणाले, "शहाण्यास जो मार बसावयाचा तो त्याचे कृतीपेक्षा जास्त बसला आहे; झालें तर तुमचें काम. शत्रु चीत झाल्यानतर त्यावर हत्यार धरणें हें मूर्खाचें काम आहे, असं मी म्हणेन " झाली मुलाची समजूत. टाकल्या कविता तेथेंच आणि गेलीं आपल्या उद्योगाला !

(१३) एका सोमवारीं लोकमान्य आपले "केसरीचे ' कामास सुरवात करणार तों एक भटजी आले. त्यास पाहताच बसावयास सांगून म्हणाले, " आपण कोंकणचे भटजी देशावर आलेले दिसता. आपण ब्राह्मण लोकानीं, त्यातून कोंकणच्या लोकानीं, देशावर हिंडून लोकास त्रास द्यावा व आपली मानहानि करून घ्यावी यापेक्षा एकादा उद्योग करून कुटुंबनिर्वाह करावा हें चागलें नाहीं का ? " अनतभट म्हणाले, " उद्योग करू, पण त्याला भांडवल कोण देणार ! " यावर लोकमान्य म्हणाले, " आपणाला परमेश्वरान शरीरसंपत्ति दिली आहे, बुद्धि दिली आहे, पोटासाठीं देशोदेश हिंडत आहात यावरुन जबरदस्तीनें का होईना पण उद्योगशक्ति दिली आहे, हें भांडवल नव्हे काय ? आता मला अधिक वेळ नाहीं, आपण आज येथेंच भोजन करा आणि परमेश्वराने आपणास जें भांडवल दिलें आहे तेवढ्यावरच काहीं उद्योग करता येईल किंवा नाहीं हें शहरात हिंडून पहा. उद्या सकाळीं मला भेटा म्हणजे काय ते सांगेन " इतकं सांगून लोकमान्य आपले उद्योगास लागले व अनतभटजी बाहेर गेले.

लोकमान्यानी सांगितल्याप्रमाणें त्या दिवशींचा परिलाभ घेऊन अनतभटजी जे गडप झाले ते पुढें चारसहा महिन्याना म्हणजे दुर्गाबाईंच्या लग्नात उगवले ! मध्यतरीं असाच एका घाटोळी पाहुण्यावरुन अनतभटजींचें स्मरण झालें, तेव्हा मी म्हणालों, " आता हे वर्हाडी येतात आणि भेटतात तरी कशाला ! " तेव्हा लोकमान्य म्हणाले, " अनतभटजी कोंकणस्थ आहेत, त्यातून त्याच्या मुद्रेवरुन

ते रें रें करीत भटकणारे नव्हेत असें म्हणता यईल " झालें, ह भाषण इतक्या-वरच संपलें पुन कोणाला त्याचें स्मरणही झालें नाहीं दुर्गाताईच्या लग्नाचेपूर्वी आठदहा दिवस अनंतभटजी येऊन दादास (लोकमान्यास घरची व कारखान्यातील मडळी दादा म्हणत असत) नमस्कार करुन राजूस उभे राहिले त्यास पाहताच "काय भटजी, आपणास बिनभांडवली धंदा आढळला कीं नाहीं अद्याप?" असा प्रश्न केला भटजी म्हणाले, " बिनभांडवली, अल्प भांडवली, भांडवल उभें करून देणारे असे दानतीन धंदे आढळले, यांपैकीं काहीं चातुर्मासात कोंकणात घरीं राहून करण्यासारखे, काहीं खेडेगावात, घाटावर राहून करण्यासारखे व काहीं पुण्यासारख्या शहरात राहून करण्यासारखे आहेत आता दुर्गाताईच्या लग्नात जो धंदा करण्याकरिता मी येणार आहे त्या धंद्यावर आपणाकडून गेल्यापासून पाऊणशें रुपये मिळाले, पैकीं पंनास घरप्रपंचा-करिता पाठवून पंचवीस मुख्य भांडवलाकरिता पोंगात ठवल आहेत हा धंदा संभाळून ना रिकामा वेळ सांपडतो त्यात कधीं शाडूचीं चित्रें कधीं तैलंगणी द्रोण पत्रावळी कधीं यज्ञोपवीत, कधीं नाटक कंपन्याच्या जाहिराती अथवा हस्त-पत्रकाचें काम करतों बाघले कामात पडण्याची इच्छा नसल्यामुळ शिळे छुळण्याचें काम पाहिलें, पण शिकलों नाही येथे वडाच्या, पळसाच्या वगैरे अगदीं साध्या पत्रावळासुद्धा तीन साडेतीन रुपये हजार मिळतात आम्ही कोंकणात तैलंगी पत्रावळीप्रमाणें पत्रावळी तयार कल्यास अगदीं गेला बाजार रुपया शेंकडा विकण्यास नड नाहीं, व ह काम घरातील नायकामुलेंही करू शकतील आणखी चारपाच लग्नसराया साधल्या तर स्वतंत्र धंदा उभारण्याइतक भांडवल जुळेल असा अंदमास आहे " दादानीं हें सर्व ऐकलें आणि म्हणाले "खालच्या सोप्यात जे गृहस्थ लिहीत वाचीत बसले असतील त्याना मी आपणाकडे पाठविलें आहे असें सांगा"

दादाच्या सांगण्याप्रमाणे अनंतभटजी यऊन भेटून गले भोजनाचे वळीं दादानीं अनंतभट भटून गेल्याची हकीकत विचारली, व त्यानीं सांगितल्याप्रमाणें मीं सांगितली तेव्हा ते म्हणाले "त्याचे चहऱ्यावरून मीं जें अनुमान केलें होतें तें चुकलें नाहीं तर!" अर्थात् आम्ही गप्प बसलों तेव्हा दादा म्हणाले, "परकीय सत्ता आणि तीहि पण व्यापारी राज्य आमच्या देशाचे राशीस लागल्यामुळें आमच्यातील चांगली माणसें कशीं व्यर्थ जात आहेत हें तुमचे नजरेस यावें म्हणून अनंतभटजीस तुम्हाकडे पाठविलें हेंच अनंतभटजी अवघ्या दहापाच वर्षांत उद्योगाचें उदाहरण होतील "

(१४) रा बळवंतराव दामोदर काळे या नावाच्या गृहस्थाचे डोक्यात पैसाफंडाची कल्पना प्रथम आली हें सर्वांस माहित आहेच या कल्पनेबरोबरच स्वार्थत्यागा खेरीज आपलें कल्पनेचें कार्य सिद्धीस जाणार नाहीं असें त्याचे मनानें घेतलें त्याच्या नावावरूनच हे फाटकेतुटके साहेब नाहींत, तेव्हा याच्या कल्पनेचा देव्हारा

कसा माजणार ? अर्थात्‌च ती बाजू लंगडी पडली. दुसरें, हे पदवीधर नाहींत. तिसरें, हे जहागिरदार नाहींत, याचें घर म्हणजे "चन्द्रमौळी" आणि संपत्ति म्हणजे "केळीवर नारळी" असा तऱ्हेवें! असें होतें, तरी उद्योग, चिकाटी आणि निःस्पृहता हीं तीन हत्यारें मोठीं मजबूत होतीं. यानीं कुटुंबास कोराच भिक्षेची दीक्षा दिल्याप्रमाणें करून आपल्या मताचा प्रसार करीत काहीं पादचारी, काहीं गाडी, काहीं आगगाडी, करीत करीत स्वारी लखनौच्या कॉंग्रेसला आली. जेथें मल्याभल्याची दाद लागण्याची पर्वाईत तेथें त्याना कोण विचारणार? ज्याच्याजवळ ते आपल्या कल्पनेचें आणि कल्पनेंतून वाढलेल्या अचाट्याचें थाड काढीत, तथें तेथें त्याची थट्टाच होत असे व अशक्य! अशक्य! अशक्य! वेडगळ कल्पना इत्यादि प्रकारची हेटाळणी होई. यापैकीं ह लेखक तेथे होते व रा रा गणेश लक्ष्मण पागे या नावाचे राष्ट्रीय सभाभक्त तेथें होते. रा पागे हे मोठे नकले, विनोदी गडबडे आणि चपल असल्यामुळ आणि प्रत्येक राष्ट्रीय सभेस सभेच्या प्रारभापूर्वी महाराष्ट्रीय लोकाची व्यवस्था करीत असल्यामुळें हे सर्व प्रातांच्या परिचयाचे होते. यानीं रा काळे याच गणित ऐकल होतें! रा काळ्याची भोजनाची सोय यानीं करून दिली. राष्ट्रीय सभेच्या कामाचे वेळीं काळ्यासारख्या माणसाला पैसे खर्च न करता मंडपात प्रवेश हाण अशक्य होतें, तरी रा० पागे यानीं एकाचा बूट, एकाचें स्वच्छ धोतर, एकाची पगडी, एका डेलिगेटचें तिकीट मिळवून स्वारी तयार केली आणि त्याचा आत प्रवेश केला. सभेचें काम संपल्या नतर काळ्यानीं मंडपाचे बाहेरील मैदानात आपल्या पुराणास सुरुवात केली. रा० काळे बोलके बरे असून आपला विषय लोकापुढें कसा माडावा हे निरनिराळ्या ठिकाणचे अनुभवानें शिकले हाते. यामुळें जाणारे येणारे लोक थाडा वेळ याचें भाषण ऐकत आणि अशक्यतेचें अथवा वेडगळपणाचें सर्टीफिकीट देऊन चालते हात!

याच दिवशीं रात्रीं लोकमान्य वगैरे सदस्य भोजनास बसले असता रा० पागे वा, दुसर कोणी हें स्मरत नाहीं–विनोदानें रा० काळ्यास म्हणाले, "टिळक हे आमच्यातील गणिती आहेत. यास आपलें गणित सागा." इतकें म्हणण्याचा अवकाश ता काळ्यानीं त्याच्या कुळकथेपासून सागण्यास सुरुवात केली! लोकमान्यास पाल्हाळाची फार चिरड असे, ते मध्येच म्हणाले, 'कुळकथेचें कारण नाहीं. तुमचा मुद्दा काय आहे तो सागा." तेव्हा काळ्यानीं आपल व्याख्यान आवरून मुद्दा सागितला. टिळकानीं "कल्पना ठीक आहे, शक्य आहे, पण कार्यास प्रारंभ तुमचेकडून झाला पाहिजे व काहीं दिवस तरी तें काम तुम्हासच करावें लागेल. पतकरत असल्यास पुण्यास मला भेटा म्हणजे योजना करू." असें सागितलें. हा विषय इतकाच येथें सपला. अशक्यतेस शक्यतेचें रूप आलें याचा आनद रा० काळे यास होणें रास्तच आहे.

रा॰ काळे हे पुण्यास आल्यानंतर लोकमान्यांनीं या विषयाचा विचार करून आणि कांहीं गृहस्थांचा सल्ला घेऊन एक कमेटी स्थापन केली या कमेटीची अंतररचना वगैरे सिद्ध झाल्यानंतर रा॰ काळे व महाराष्ट्र यांचा परिचय "केसरी"चे द्वारें, खासगी पत्रानें आणि समक्ष भेटीनें करून देऊन कामास सुरुवात झाली

---

## के. वी जोशी

[ वेळास येथील नाना फडणविस उत्सव कमिटीचे एक प्रमुख अधिकारी, मुंबई ]

(१) लोकमान्य टिळक हे राष्ट्रीय पुरुष होते वेळास येथील श्रीमंत नाना फडणविसाचा उत्सव सन १९०० सालीं सुरू करण्याविषयीं स्फूर्ति व प्रोत्साहन उत्सवाच्या चालकांना लोकमान्यांनींच दिलें होतें, हें कळविण्यास मला अभिमान वाटतो रायगड येथें शिवाजी उत्सव मोठ्या प्रमाणांत झाल्यानंतर त्यांनीं आम्हांस वेळास येथें श्री॰ फडणविसाचा उत्सव सुरू करा, असें सन १९०० सालीं मोठ्या कळकळीनें सांगितलें, व त्याप्रमाणें उत्सव सुरू होता तोंपर्यंत सतत १२ वर्षें उत्सवाच्या कामीं लोकमान्यांनीं सर्वतोपरी मदत केली

१९०० सालीं नाना फडणविसाचा काळ होऊन शंभर वर्षें भरत होतीं त्यासबंधीं शतसांवत्सरिक उत्सव करण्याची कल्पना प्रथम रा॰ विष्णु मोरेश्वर गोखिलकर यांनीं "केसरींत" पत्र लिहून लोकांपुढें आणली पुढें लोकमान्यांच्या या उत्सवाचें निमित्तमात्र आमच्यावर आलें १९०० सालीं नानाचे शतसांवत्सरिक उत्सव वेळास, मुंबई, मेणवली व पुणें (बेल्बाग) या चार ठिकाणीं झाले लोकमान्यांची संमति व सल्लामसलत घेऊन आम्ही वेळासच्या उत्सवाच्या तयारीला लागलों आम्ही आपल्याकडून उत्सवसामुग्रीची जुळवाजुळव करूं लागलों आमच्या समजुतीप्रमाणें व वकुबाप्रमाणें आम्ही प्रयत्न करीत होतों सार्वजनिक उत्सव कसा करावे, त्या प्रसंगीं उपक्रमादाखल भाषण कोणत्या धोरणानें करावें,

तसबीर व उद्याच्या मापणाची लेखी प्रत बरोबर देऊन येथें पाठविले आहे. या जिनसा तुमच्या स्वाधीन केल्यावर तावडतोब परत येण्याविषयीं सांगितलें आहे." आम्हास रा० धोंडोपंताची गोष्ट ऐकून सानंदविस्मय वाटला उत्सवासाठीं नानाची एक तसबीर आम्ही प्रयासपूर्वक मिळविली होती, पण वेळासच्या उत्सवाची आठवण ठेवून लोकमान्यांनीं आमची नड भागविली, व उत्सवाच्या यशात भर घातली. हें पाहून लोकनायकाला स्वीकृत कार्याचा उत्साह आणि आस्था किती असावी लागते, याची कल्पना आम्हास आली. लोकमान्य नुसती तोंडीं सलामसलत्तच देऊन थांबले नाहींत, त्यांनीं आपली उत्सवासबंधाची कळकळ प्रत्यक्ष साह्य देऊन कृतींत वाढविली, याबद्दल आम्हास राहून राहून धन्यता वाटत होती, आणि अद्यापि वाटत आहे.

(२) १९०४ सालीं लोकमान्यांनीं स्वत अध्यक्षस्थान स्वीकारून उत्सव साजरा केला. वेळास, केळशी, आंजर्ले व हर्णे या चार गावांचा त्यांना फार अभिमान असे. लोकमान्यांचा जन्म कोंकणातला व ते कोंकणात आले म्हणून तेथील लोकांचा आनंद गगनात मावेना त्या वेळीं प्लेगसराई सुरू होती. लोकमान्यांसारख्या अभ्यागताचा सन्मान करण्याची हौस त्या प्रसगीं सर्वांसच होती. त्यामुळें पानसुपाऱ्यांच्या निमत्रणांची चोरंकरून झड पडली, तथापि लोकमान्यांनीं उत्सवाच्या प्रवर्तकाच्या घरीं मुक्काम असल्यामुळं त्याच्या परवानगीवाचून पान सुपाऱ्यांना जावयाचें नाहीं, असा निर्धारच केला होता त्याच्या घरीं आपण पाहुणे आहोंत त्याला मोठेपणा देण्याकरिता त्याच्या तावेदारींत वागण्याची लोकमान्यांची वृत्ति बोध घेण्यासारखी आहे उत्सवप्रसगीं त्यांच्या चळवळीचें धोरण आणि कार्य किती व्यापक व दैन्यशून्य स्वरूपाचें होतें, याचें उदाहरण आमच्या नजरेस पडलें "उत्सव हे लोकजागृतीचें एक साधन म्हणून अमलात आणले जातात. अर्थात् तेथें ब्राह्मण, मुसल्मान, कोळी, माळी, कुणबी हा भेदाभेद ठेवून वागणं योग्य नव्हे," असें ते म्हणत असत. नानाचा उत्सव देवळांत होत असे. "देऊळ हें धार्मिकस्थान, उत्सवाचा व्यापक हेतु तडीस आण्याला बाधत असेल, तर अगोदर उत्सवाची जागा बदला," असं त्यांनीं आम्हास बजावलें. त्यासबंधीं बोलताना ते म्हणाले —"नानाच्या उत्सवाला बाण-कोटचे मुसल्मान देखील आले पाहिजेत. जातिभेद उत्सवाच्या आड येता कामा नये."

या उत्सवाला टिळक आले असता त्यांच्या साधेपणाचा प्रत्यय आला. केळशी गांवीं त्यांच्या बहिणीचे सासरे होते. तेथील मडळींना भेटण्याकरिता ते गेले, व परत येण्याच्या दिवशीं वेळासकरानीं त्यांच्या स्वागताची फार जगी तयारी ठेवली होती. वेळासच्या दिशेंत त्यांचें पाऊल पडल्याबरोबर लोकानीं नानाविध वाद्यांचा गजर करून सोडला. हा प्रकार पाहून टिळकांना राग आला. ते म्हणाले·—

"हीं वाद्यें बंद कराल, तर मी तुमच्या गावांत येतों. मी शंकराचार्य अथवा दुसरा कोणी संतमहंत नाहीं. माझ्यासारख्या क्षुद्र मनुष्यजीवाचा गौरव इतका कशाला हवा ?" लोकमान्यांचा आग्रह पाहून लोकांनीं वाद्यें थोडा वेळ बंद केलीं परंतु तें पुन: वाट चालू लागताच पूर्वक्रम सुरू झाला लोकमान्य पदोपदीं तक्रार करीत होतेच काहीं वेळ लोकांनीं लोकमान्यांच्या आग्रहास मान द्यावा, काहीं वेळ देऊं नये, अशी तऱ्हा चालली होती, पण लोकांची ही अधभक्ति लोकमान्यांना आवडली नाहीं, एवढें मात्र खास.

उत्सवाच्या कार्यक्रमांत सार्वजनिक भोजनाची योजना ठरलेली होती. उत्सव प्रवर्तकांच्या चुकीनें लो०मान्यांचें भोजन त्या दिवशीं खासगी रीतीनें झालें भोजन उरकून ते वामकुक्षीकरितां बिछान्यावर पडले असतां ही चूक प्रवर्तकांना उमगली सर्व निमंत्रित मंडळी पानावर बसल्यानंतर त्यांनीं लोकमान्यांशिवाय अन्नग्रहण करावयाचें नाहीं, असा हट्ट दाखविला लोकमान्यांकडे प्रवर्तकांपैकीं एकानें जाऊन भीतभीत विनंतीचा शब्द टाकला ते तात्काळ उठले व पंक्तींत येऊन बसले त्याच्या प्रस्तुत वर्तनासल्या आल्हादाचें विवरण मी करावयास नको.

वेळासला होणाऱ्या नाना फडणिसांच्या स्मरणोत्सवांत एके दिवशीं त्यांच्या तसबिरीची मिरवणूक काढण्याची रीत आहे. ही मिरवणूक भानूंच्या घरासमोर आली म्हणजे तेथें थोडा वेळ थांबून पानसुपारीचा लहानसा समारंभ भानूंच्या घरीं केला जातो. त्या वेळीं तसबीर भानूंच्या घराच्या ओटीवर ठेवण्याची पद्धत आहे ज्या घराण्यांत नाना फडणिसांचा जन्म झाला, तें मूळ वेळासचें, ही गोष्ट इतिहासज्ञांना सांगावयास नको. या घराण्याच्या ज्येष्ठ शाखेची परंपरा सदरहू उत्सवापर्यंत अखंड चालली होती त्या वर्षी सदर घराण्यांतील अखेरचे औरस घराणें हयात होते कै. हरि बाप्पाजी भानू हेच ते वंशज होते. ते व त्यांची सच्छील पत्नी गंगाबाई हे दाम्पत्य जुन्या घरंदाज लोकांच्या चालीरीति कशा उदात्त व

सार्वजनिकरीत्या पडली. तेव्हा टिळकांनीं कै. हरि अप्पाजींचा अपूर्व सन्मान करून मिरवणुकीसाठीं जमलेल्या सर्व लोकांच्या नेत्रांतून प्रेमाश्रूंचा महापूर वाहावयास लाविला. नानाची मिरवणूक रीतसर भानूंच्या घरीं आली. टिळक तेथें गेले, आणि मध्येंच एकदम उठून त्यांनीं कै. हरि अप्पाजींना चरणस्पर्शपूर्वक साष्टांग नमस्कार केला. हरि अप्पाजी व टिळक या दोघानाहि प्रस्तुत प्रेमप्रसंगानें गहिंवर आला. टिळकांना ऐतिहासिक घराणीं आणि त्यातील सध्याचे वंशज याविषयीं विलक्षण अभिमान वाटत असे, ही गोष्ट सुप्रसिद्ध आहे. परंतु त्याचें प्रत्यंतर या प्रसंगानें वेळासकरांच्या नजरेस आलें, तेव्हा तर परस्पराना कडकडून भेटणाऱ्या थोर पुरुषाप्रमाणें त्याचेंहि हृदय हेलावून गेलें टिळकासारखा अर्वाचीन महात्मा आपला सन्मान करतो हें न रुचून हरि अप्पाजी त्याना निवारीत होते व टिळक त्यांची थोरवी गाऊन त्यांच्याविषयीं सन्मानबुद्धि व्यक्त करीत होते. हा देखावा अद्यापि डोळ्यासमोर दिसत आहे. आणि त्यावेळीं टिळकांनीं उच्चारलेले शब्द अजून कानामध्ये दुमदुमत आहेत. असा सोहळा क्वचितच माणसानें पहावयास सापडत असताना अशी समजूत आहे टिळक केवळ हरि अप्पाजी याची भेट घेऊनच स्वस्थ राहिले नाहींत, त्यांनीं नतर त्यांच्या पत्नीच्या पायावर डोकें ठेविलें, तों माउलीदेखील आश्चर्यवेगानें गहिंवरून टपटप अश्रु टाकू लागली. " सूप शर्तीन " मराठ्यांच्या डळमळींत सिंहासन कित्येक वर्षें सभाळून ठेवणाऱ्या यशवंत फडणीस नानाच्या वंशजांना आज खालावलेली विपन्न स्थिति याची या कालचक्राच्या विपरीत फेऱ्याचा झपाटा लक्षांत येऊन टिळकाचेंहि अंतःकरण गडगडून आलें. "आपल्यासारखें ऐतिहासिक परंपरेचे दुवे आजकाल दृष्टीस पडणें दुर्लभ झालें आहे " अशा अर्थाचे उद्गार टिळक त्या वेळीं काढीत होते.

(२) राष्ट्रीय उत्सवांतून जातिभेद न पाळता अन्नसंतर्पण झालें पाहिजे, असें लोकमान्याचें ठाम मत होतें, व तें त्यांनीं रायगडाच्या शिवाजीउत्सवामध्यें अमलांत आणलें होतें. रायगडाच्या उत्सवांत हजारों मावळ्यांना त्यांनीं जेवण घालण्याचा प्रघात ठेविला होता. ल्हानपणीं त्यांनीं कमावलेल्या शरीरसंपत्तीची चमक आम्हांला रायगडास उत्सवाचे वेळीं दिसली होती. रायगडाची चढण अत्यंत बिकट आहे. चांगल्या सशक्त जवानाला देखील त्या चढणीची मजल संपविण्यापूर्वीं एक दोन वेळा विसावा घेण्याची अवश्यकता भासते, परंतु लोकमान्यांची सर्वच तऱ्हा निराळी. ते एका दमांत झपाट्यानें रायगड चढून गेल्याचें पाहून आमच्याप्रमाणें अनेकांना चमत्कार वाटला. रायगडास मावळ्यांचें भोजन सुरू असता रा० नरसोपंत केळकर वगैरे मंडळी वाढण्याचें काम करीत होती. जरूर पडल्यास आपण देखील वाढण्यास कचरणार नाहीं असें ते म्हणाले. त्या वेळीं त्यांच्याजवळ कै. वेदशास्त्रसंपन्न त्र्यम्बकरशास्त्री होते. या शास्त्री लोकांच्या सल्लामसलतीखेरीज टिळकाचें एकहि पान हालत नसे, इतका

त्यांच्यावर टिळकांचा निस्सीम विश्वास होता. सदर शास्त्री लोकांची शारीरिक व बौद्धिक संपत्ति अलोट होती. "तुम्हाला वाढण्याचें काम करवणार नाहीं," अशा अर्थाचे उद्गार काढून त्यांनीं लोकमान्यांस हटकलें. "प्रयोगच पाहावयाचा असेल तर मी पांच हजार माणसांच्या पंक्तीला एकटा वाढण्यास तयार आहें" असें टिळक म्हणाले. हा प्रयोग पहाण्याची वेळ आली नाहीं, पण टिळकांची चालण्यांतली, पोहण्यांतली व काम करण्याची धमक पाहिलेल्या माणसांना टिळकांनीं वाढण्यासंबंधीं काढलेले उद्गार पोकळ फुशारकीचे द्योतक नव्हते, अशी खात्री होती.

(४) १९०२ सालीं यांनीं मुंबई प्रेसिडेन्सी असोसिएशनसमोर "आर्यांचें मूळ वसतिस्थान" या विषयावर व्याख्यान दिलें. त्या वेळीं सदर सभेमध्यें मुंबईतील बहुतेक सुप्रसिद्ध विद्वानांचा समूह होता. टिळकांच्या प्रस्तुत व्याख्यानानंतर त्या सर्वांची टिळक हे एक प्रचंड पंडित आहेत अशी खात्री झाली. त्यानंतर "आर्क्टिक होम" प्रसिद्ध होऊन १९०३ सालच्या सरकारी रिपोर्टांत या पुस्तकाचा मुद्दाम उल्लेख केलेला पहाण्यांत आला. तेव्हा त्यांच्या योग्यतेविषयीं चांगलीच साक्ष पटली. सरकारतर्फे "Moral and Material Progress of India" या नांवाचें एक पुस्तक ठराविक कालावधीनें प्रसिद्ध होत असतें. सरकारचें व टिळकांचें सख्य सर्वश्रुत आहे. त्यामुळें टिळकांच्या पुस्तकाचा गौरव सरकारी रिपोर्टांत आढळून येईल, हें कोणासही शक्य वाटणार नाहीं. परंतु त्या पुस्तकाचा प्रभाव सरकारी रिपोर्टरांच्याही मनावर झाला. "A noteworthy book of this year" अशा स्तुतीच्या शब्दांनीं या पुस्तकाचा त्या रिपोर्टांत स्पष्ट उल्लेख केला आहे. टिळकांना ही गोष्ट माहीत नव्हती. सहजगत्या प्रस्तुत लेखकावरून ती त्यांच्या कानावर जाण्याचा योग

अग्रभागीं चाभाराचा गणपति प्रथम जातो असें सांगितलें. तसेंच अन्नसंतर्पणाच्या जोरावर गोरगरीब ब्राह्मणेतरांचेंहि चित्त उत्सवाकडे वेधून घ्यावें असें टिळकांनीं त्यावेळच्या उत्सवप्रसंगीं मुद्दाम बजाविलें होतें.

(६) सन १९०४ सालानंतर त्यांचे पाय कोंकण प्रांताला लागले नाहींत. मरणापूर्वीं पुढच्या कार्याच्या धाटाघाटींत ते कोंकणांत जावयाचें, असें बोलत होते "कोंकणातील माणसें आपल्या दर्शनाकरितां आतुर आहेत, आपण आल्यास स्वागताची त्यांची तयारी आहे," असें कोणीं म्हणाल्यास ते सहज म्हणत "कोंकणांत माझें घर आहे कोंकणांतल्या रहिवाश्याइतकाच माझा त्या प्रांतावर हक्क आहे माझ्या घरीं मी जाणार त्यांत स्वागत कसलें? मी अद्यापि कोंकणच्या खोतीचें सरकार देणें भरीत असतों!"

कोंकणांत जाऊन तो प्रांत जागृतीनें हलवून सोडावयाचा असें टिळकांच्या मनांत घोळत होतें सुधारलेल्या कायदेकौन्सिलांत डेमोक्रॅटिक पार्टीचीं माणसें निवडून आलीं पाहिजेत, असा त्यांचा मनोदय होता किंबहुना तीं निवडून आलींच आहेत, अशा आत्मविश्वासानें ते शेवटच्या आजारांतल्या क्षणिक शुद्धिपणांत देखील बोलत होते त्या आजारांत एकदा डॉ. मुंजे, श्री० दादासाहेब करंदीकर हे भेटल्यावर ते एकदम म्हणाले, "रत्नागिरीचा रिप्रेझेंटेटिव्ह कोठें दिसत नाहीं?" त्यांचे उद्गार ऐकून डॉक्टर लोक बुचकळ्यांत पडले, तथापि टिळकांच्या उद्गारांतलें रहस्य रत्नागिरीकडची मनांत घोळणारी विशिष्ट व्यक्ति दिसल्यावर समजलें.

(७) टिळकांच्या स्वभावांत मार्मिक विनोदीपणा अतिशय होता. शेवटच्या आजारांतहि ते कृत्रिम अथवा नैसर्गिक ग्लानीच्या व बेशुद्धीच्या अमलांतून बाहेर पडले म्हणजे एखादी विनोदी कोटी उच्चारून आसपासच्या मंडळींना हसवून सोडीत. डॉक्टरांनीं जेव्हां इंजेक्शन दिलें तेव्हां ते सावधपणाच्या स्थितींत म्हणाले, "काय हो, Injection by Proxy करण्याची युक्ति कोणी शोधून काढलेली नाहीं काय?" या चुटक्यांतील खोंच मर्मज्ञ वाचकांच्या सहज ध्यानांत येण्याजोगी आहे.

---

## मि. जे. चौधरी

[ बी. ए., बॅरिस्टर कलकत्ता. १८९७ मधील लोकमान्यांचा खटला चालविण्यास इतर बॅरिस्टरांबरोबर कलकत्तेकरांनीं मुंबईस पाठविलेले बॅरिस्टर ]

सन १८९० साली त्रिव्होली बागेंत भरलेल्या राष्ट्रीय सभेला मी प्रेक्षक म्हणून गेलो होतों सभेच्या कामात पुढाकार घेणाऱ्या सर्व मंडळींमध्यें एक सावळी मूर्ति, लालभडक पगडी घातलेली, बुद्धिमत्तेच्या तेजस्वी चेहऱ्याची व विद्वत्तेची चमक असणाऱ्या तीव्र दृष्टीची, आपल्या अंगीं असलेल्या शुचित्वानें माझें मन इतकें आकर्षूं लागली कीं, तिचें नावगावहि मला माहीत नसताना तिचे ठायीं मी अगदीं तल्लीन होऊन गेलों. ती व्यक्ति नावाजलेल्या वक्त्यापैकीं नव्हती, परंतु तिच्या भाषणात दिसून येणारी जाज्वल्य स्वदेशभक्ति, आणि जळजळीत देशाभिमान यायोगानें कोणाच्याहि अंतःकरणावर त्या भाषणाचा उदात्त परिणाम झाल्यावाचून राहिला नाहीं. विशेषतः ज्या मराठे वीरांनीं थोड्याच काळापूर्वी थेट अटकेपर्यंत आपला विजयध्वज फडकावला, त्याच मराठ्यांचें रक्त अद्यापहि आमचे नसांतून वाहत आहे, या गोष्टीचें जेव्हा तिनं आम्हांस स्मरण करून दिलें, तेव्हा तर यच्चयावत् तरुण मंडळीप्रमाणें मलाहि अगदीं स्फुरण चढलें. ती त्या वेळची आमची वीरस्फूर्ति त्या विभूतीच्या दरनकाल्च्या व्याख्यानेंहि

करतों. न्यायमूर्ति स्ट्रॅची यानीं जो टिळकास दोषी ठरवून शिक्षा सुनावली, तेव्हां बराच उशीर झाल्यामुळें न्यायमूर्तींच्या निकालाची नक्कल घेऊन आम्ही सर्वांनीं दुसरे दिवशीं सकाळीं मायखळा जेलमध्यें जाऊन तेथें प्रिव्ही कौन्सिल पुढें करण्याच्या अपिलाचे मुद्दे काढावेत असें ठरलें त्याप्रमाणें आम्हीं तेथें जातों तोंच जेलचा शिपाई कांहीं कागद घेऊन आमची वाटपाहत आहे, असें आढळलें आणि ते कागद कसले आहेत हें पाहताच तर आम्हीं अगदीं आश्चर्यमूढ होऊन गेलों ते कागद म्हणजे आम्हीं काढणारे अपिलाचे मुद्देच होते! टिळकांनीं निकाल फक्त ऐकला होता, पण तो त्याच्या स्मरणात इतका पक्का होता कीं, त्यानीं जेलमध्यें जाताच अपिलाचे सर्व मुद्दे पेन्सिलीनें लिहून काढले तें पाहून बॅरिस्टर न्यू आणि सर गार्थ यानीं स्पष्टपणें कबूल केलें कीं टिळकानीं काढलेल्या मुद्यापेक्षा त्यानाहि जास्त चांगल्या तऱ्हेनें काढता आले नसते टिळकानीं आपल्या बचावात असें दाखवून देण्याचा प्रयत्न केला होता कीं, सरकारला हा राज द्रोहाचा खटला करण्यास "टाईम्स ऑफ इंडिया" नें चिथावलें आहे, आणि हें त्यानीं इतक्या वक्तृत्वपूर्ण व जोरदार मार्गेत सांगितलें कीं, गार्थ याची त्याबद्दल खात्री होऊन त्यानीं ते "टाइम्सचे" अंक आपले वडील रिचर्ड गार्थ यास दाखविण्यास मुद्दाम नेले राजकीय गोष्टींत त्याचा माझा पुष्कळ वेळा मतभेद होई तरी मी एक वेळ त्याचें थोडेंसें काम केलें आहे, हें मान ते कधींही विसरले नाहींत माझ्या मनात त्याच्याबद्दल फार आदर आहे, आणि सहि मला नेहमीं प्रमाणेंच वागवीत ते सर्वस्वी लोकाना वाहिलेले होते त्याचें वागणें अगदीं साधें होतें. ते स्वार्थत्यागी, निर्भीड आणि धैर्यवान् होते त्याच्यावर इतके संकटाचे प्रसग आले तरी त्याची वृत्ति नेहमीं आनदी असे त्याच्याइतके मनापासून हसणारे लोक तर मीं फारच थोडे पाहिले आहेत.

---

## गणेश लक्ष्मण पागे

[ राष्ट्रीय पक्षाच्या सार्वजनिक चळवळींतील एक कार्यकर्ते व उपसपादक "लोकमान्य," मुंबई ]

(१) न्यू स्कूलची स्थापना, व "केसरी" पत्राची सुरुवात झाली, तेव्हा प्रथम मी नागपुरास होतों लोकमान्याना कोल्हापूर प्रकरणात १०१ दिवसाची शिक्षा झाली. त्याची तुरुगातून मुक्तता झालीं त्या दिवशीं लो॰ टिळक, कै॰ आगरकर व कै॰ केशव नारायण बखले या मडळीस मीं त्या वेळीं प्रथमच

पाहिलें. कै० केशव नारायणराव बरवे यांना मीं मुंबईस पाहिलें असल्यामुळें मी त्यांची ओळख करून घेतली. त्यामुळें माझी व लोकमान्यांची मूळ ओळख झाली

(२) डोंगरीच्या तुरुंगांत रा. आगरकर यांनीं हॅम्लेट नाटकाचें भाषांतर केलें. हें लेखनाचें काम केल्यानंतर ते इतर विषयांवर लोकमान्यांशीं वादविवाद करीत. लॉजिक ( न्यायशास्त्र ) व मॉरल फिलॉसफी ( तत्त्वज्ञान ) घेऊन एम्. ए. झाले असल्यामुळें नैय्यायिक म्हणून त्यांची ख्याति होती. परंतु आपल्या कोटिक्रमानें लोकमान्य त्यांना एखादे प्रसंगीं इतकें निरुत्तर करीत कीं, कै० आगरकर लोकमान्यांस " तुम्ही उपजतच नैय्यायिक आहांत " असें म्हणत असत.

(३) कै. महादेव बल्लाळ नामजोशी यांचा गोड स्वभाव, काम करण्याची हातोटी, वाटेल तितके श्रम पडले तरी पाताळयंत्राप्रमाणें बातमी काढण्याबद्दलचें त्यांचें कौशल्य, लोकांवर छाप बसविण्याची त्यांची उत्कट कला, याबद्दल लोकमान्यांचें कै. नामजोशी यांच्याबद्दल फारच चांगलें मत होतें. कै. नामजोशी हे मॅट्रिक्युलेशनची परीक्षा पास झाले होते त्यांचें इंग्रजीचें ज्ञान विशेष होतें. हे इंग्रजी शिकविण्यास फर्ग्युसन कॉलेज येथें येणार अशीहि बातमी पुण्यांत होती. [illegible] [illegible] [illegible] मदतीखेरीज [illegible] यांनीं पैसा उसन

होतें. पुण्याच कोणतीहि विशेष हकीकत कळवावयास ते नेहमीं तत्पर असत. रा. मुजगराव मानकर हे सरकारतर्फे लो० टिळकाचें भाषण घेण्यास आले तरी खरा रिपोर्ट ते करतील अशी लो० टिळकाची रा० मानकराच्याबद्दल पूर्ण खात्री होती. ही गोष्ट ते नेहमीं नेहमीं माझ्याजवळ व इतराच्याजवळ सागत असत. रा. मानकर याचेंहि प्रेम लो० टिळकाच्याबद्दल कायम होतें. मुबईस लोकमान्य आल्यावर मानकरास भेटल्याशिवाय राहत नसत. लोकमान्याच्या राजकीय बाबतींत पूर्वीच्या गोष्टींची माहिती असणारा इसम मानकराच्याप्रमाणें प्रमुखतींत दुसरा नाहीं असें म्हटलें तरी चालेल.

(५) १८९७ सालात लोकमान्यावर खटला झाल्याची हकीकत सर्वविश्रुत आहेच. लोकमान्य, आम्ही याच्या बाईंत दाजीसाहेब खरे याच्याकडे असत. लोकमान्याच्या दिमतीस मुबईचे इजीनिअर रा गगाधर सदाशिव ऊर्फ तात्या साहेब गोखले, एल. सी. ई. याची बगी असे. हायकोर्टात लोकमान्याच्या खटल्याचा निकाल सागण्याच्या दिवशीं ह्या बगींत लो टिळक, रा. सा. बापट व रा. बासुकाका जोशी असे तिघे बसणार व कोर्टात जाणार हें पाहून एका वृद्ध गृहस्थानें त्याना विनति केली. तेव्हा लोकमान्य म्हणाले, "काय तें बोला". तेव्हा ते वृद्ध गृहस्थ म्हणाले, "न गच्छेत् त्र्याम्हणत्रय" असा आमचा व्यवहारातला परपरागत न्याय आहे. तेव्हा बगींत चौथा इसम घेऊन जा. याबरोबर, त्या गृहस्थाच्या म्हणण्याला मान देण्याकरिता, मी नेटिव्ह ओपीनिअन छापखान्यात बसलों होतों तेथून मला त्यानीं बोलावून घेतलें व आम्ही चौघे कोर्टात गेलों. वाटेंत बोलणें चाललें असता त्या वृद्ध गृहस्थाचें म्हणणें खऱ्या भावनेचें असून त्यात त्याचा सद्धेतु असल्यामुळें अशा गोष्टी व्यवहाराकरिता तरी करणें अगत्याचें असतें असें लो० टिळक म्हणाले.

(६) लो० टिळक आपल्या नातवाच्या व्रतबधानिमित्त मार्गे नाशिक येथें आले होते. त्या वेळीं नाशिक येथें प्रो० राममूर्ति याच्या कसरतीचे खेळ चालू होते, त्या मध्य सर्कशीच्या तबूत प्रसिद्ध रिसले सक्युंलरचा निषेध करण्याकरिता नाशिक येथील नागरिकाची सभा भरली होती. त्यावेळीं देशभक्त लाला लजपतराय याची अक्षदेश येथें मडालेच्या तुरुगात रवानगी झाली होती, त्याचा उल्लेख करताना 'मला तरी सरकार मडाले येथें पोंहोचविणार नाहीं, कशावरून ?' असा त्यानीं भाषणात उल्लेख केला होता पुढें लोकमान्याना मडालेसच ठेवण्याची सरकारनें आपली मनीषा तृप्त केली हें सर्वांस विदित आहेच

(७) १९०५ सालची काशी येथील काग्रेसची बैठक झाल्यानंतर लो० टिळक अलाहाबाद ( प्रयाग ) येथें आपले व्याही रा. रा साने याच्याकडे उतरले. हे व्याही त्या वेळीं त्याचे स्वत चे घर तयार होत असल्यामुळें होळकर याच्या दारागज येथील वाड्यात बिन्हाडानें रहात होते. कर्मधर्मसयोगानें कोणास पूर्वी

न कळविता एकाएकीं दत्त म्हणून आपल्या बरोबरच्या अगदीं निवडक मंडळीनिशीं इंदूर संस्थानचे माजी अधिपति कै० शिवाजीराव होळकर हे आपल्या वाड्यात आले. त्या ठिकाणीं साने याच्या बिऱ्हाडाच्या बाजूकडे लो० टिळक बसले होते. दुसऱ्या दालनात इंदूरचे महाराज उतरले होते. लो० टिळक पूर्वी एकदा इंदुरास गेले होते, परंतु त्या गोष्टीस पुष्कळ दिवस झाल्यामुळें व दोघांच्याही चेहऱ्यात वयपरत्वें व परिस्थितीच्या प्रमाणें फरक पडला असल्यामुळें दोघानींहि एकमेकांस ओळखिलें नाहीं, व इतर रीतीनें न ओळखण्यासबधीं दोघाचीं कारणेंहि योग्य होतीं. बराच वेळ गेल्यानंतर इतर मंडळींच्या बोलण्यावरून लोकमान्याना वडवाई येथून श्रीमंत शिवाजीराव होळकर आल्याचें समजलें व श्रीमंत शिवाजीराव महाराज याना लो० टिळक आल्याचें समजलें. श्री० शिवाजीराव महाराज हे त्रिवेणीस स्नान करून आल्या नतर गोरगरिबास भाडीं, वस्त्रें वाटिलीं, नतर संस्थानिकाना अजिनात त्याचे इच्छेविरुद्ध संस्थानातून उचलबांगडी करून नेऊन दुसरीकडे ठेवण्यात येतें व त्याचे हक्क सरकार काढून घेतें याबद्दल राष्ट्रीय सभेसारखी देशहितैषि सभा का विचार करीत नाहीं ? यावर लो० टिळक म्हणाले "संस्थानिकाच्याच हक्काचे काय, पण देशातील प्रत्येक व्यक्तीच्या हक्कासबधानें कॉंग्रेसनें तत्पर असणें हें योग्य आहे व याबद्दल कोणीहि विरोध दर्शवील असे मला वाटत नाहीं, परंतु राष्ट्रीय सभा, किंवा दुसऱ्या देशहिताच्या संस्था किंवा देशी पत्रकार यानीं तरी, देशी संस्थानाचा एका रीतीनं दरकार तरी काय म्हणून करावा ? राष्ट्रीय सभेने किंवा सभेच्या मंडळींनीं खालसा मुलखात चळवळ केल्यास व त्या ठिकाणीं खळबळ उत्पन्न झाल्यास त्याची फारीयादी दाद लागून बरावाईट का होईना परंतु काहींएक मुदतींत निकाल तरी मिळतो. संस्थानाकडे पहावें तर प्रथमपासूनच अर्थाअर्थी संबंध नसता देशी संस्थानात राष्ट्रीय सभेस विरोध दर्शविण्यात येतो. राष्ट्रीय सभेचा कोणी इसम संस्थानात आल्यास त्याची मुस्कटदाबी होते."

राष्ट्रीय सभेला किंवा देशी वर्तमानपत्रकाराना जितके संस्थानिक आपले वाटतात तितकी एकदर संस्थानिकाना राष्ट्रीय सभा आपली वाटत नाहीं, वगैरे धाटणीचें टिळकाचें श्रीमंताशीं भाषण झालें.

(८) माझ्याजवळ देशी औषधासबधाची निरनिराळीं पुस्तकें होतीं. तीं त्यानीं वाचून त्यातील उत्तम औषधाचा प्रसार करण्याबद्दल मला सूचना केल्या होत्या. त्यात मधुमेही मनुष्यास अन्नपचन न होण्याचीं कारणें व पाचक चूर्ण हीं लिहिलीं होतीं. तें पाचक चूर्ण त्यानीं मागितलें. मीं तें करून दिलें. त्यानें त्याना उत्तम गुण आला परंतु गोष्ट अशी कीं, कोलंबोहून विलायतला जाण्याचे गडबडींत असता माझा दिर्घेकर यांजबरोबर त्यानीं आठवणीनें एक सर्टिफिकेट मजकडे पाठवून दिलें

(९) एके दिवशीं मी सरदारगृहात लोकमान्यांशीं गप्पागोष्टी मारीत बसलों होतों. त्या वेळीं त्यांनीं बनारसला त्यांचे परमप्रिय मित्र बाबू मोतीलाल घोस हे अर्धांगवायूनें अत्यवस्थ असल्याची गोष्ट सांगून पुढील हकीकत बोलून दाखविली. ते म्हणाले, "बाबू मोतीलाल घोस यांना मी भेटण्याकरिता गेलों असता त्यांना बोलण्याची शक्ति नसताहि त्यांनीं अस्पष्ट रीतीनें माझ्याजवळ समाधान केलें. 'आपण आसन्नमरण आहों, आपण देशकार्याला निरुपयोगी झालों, पण तुम्ही देशकार्याचा बोजा यशाच्या पैलतीराला वाहून न्या, परमेश्वर तुम्हाला दीर्घायुष्य देवो,' असे मोतीबाबूंनीं सद्गदित कंठानें उद्गार काढले." टिळकांना आपल्या मित्रपरिवाराचा मोठा अभिमान असे. मोतीबाबूंच्या दुःखाची व उद्गाराची माहिती देताना लोकमान्यांचें मनहि क्षणभर निराशेच्या प्रदेशांत संचरताना आढळलें.

(१०) आपल्या माणसाचा पाठपुरावा ते केवळ राजकीय बाबींपुरताच करीत होते असें नाहीं. खासगी सबंधातहि त्यांची अशीच दक्षता होती. पुण्यास न्यू इंग्लिश स्कूल व डेक्कन एज्युकेशन सोसायटी स्थापन झाल्यावरहि अध्यापक मंडळी एका बाईच्या खाणावळींत जेवावयास जात असे तिचें नाव पुढें 'आर्य भूषण काकू' असं पडलें. या खाणावळकाकूनें सोसायटीच्या मंडळींना फार ममता पूर्वक वागविलें. तिच्या सौजन्याचें स्मरण लो. टिळकांना अखेरपर्यंत होतें. त्य बाईची नात अथवा मुलगी सांगलीस एका गरीब घराण्यात नांदत आहे टिळक सांगलीस गेले तेव्हा त्यांनीं तिच्या घरची चौकशी केली व मुद्दाम तिच्या घरं भेटण्याकरिता गेले. तसेच टिळक पुण्यास आजारी असताना सांगलीचे विख्यात वैद्य साबरे त्यांची प्रकृति पाहण्याकरिता त्यांच्याकडे आपण होऊन तीन वेळा गेले होते. सांगलीस ज्योतिषसंमेलनाकरिता गेले असता वरील वैद्याच्या आमंत्रणाची वाट न पाहता टिळक स्वत: त्यांच्या घरीं गेले वे. शा स. दामुअण्णा साबरे यांच्याशीं वैद्यक विषयावर संवाद झाला. वैद्यक विषयातील टिळकांचें ज्ञान पाहून वैद्यक ज्ञानांत व धंद्यात जन्माचा जन्म घालविणाऱ्या लोकांना अतिशय विस्मय वाटला

(११) मुंबईस पूर्वी एक संशोधनमंडळ अस्तित्वात होतें. त्याचे अध्यक्ष मरहूम ए. के. कामा होते १८९७ सालची शिक्षा भोगून टिळक मोकळे झाल्यावर त्या मंडळात टिळकांचें एक भाषण झालं. त्यांनीं प्राचीन हिंदी गणितशास्त्राच्या व्यापकतेवर व्याख्यान दिलें. त्यांच्या व्याख्यानातील गहन ज्ञान पाहून श्रोत्यांवर अपूर्व परिणाम घडला अध्यक्ष मरहूम कामा यांनीं टिळकांना अत्यंत कळकळीने सांगितलें कीं, तुम्ही संशोधनकार्यात आपल्या बुद्धिमत्तेचा व्यय केल्यास तुम्हाला राजकारणात भोगाव्या लागणाऱ्या यातना चुकतील व जगावर ज्ञानदानाचे उपकार घडतील.

(१२) १८९८ सालीं मद्रासच्या कॉंग्रेसला टिळक गेले तेव्हा कौंसल फर्मान नावाच्या विलिगिरी अय्यर यांच्या जागेंत उतरले होते. त्या स्थळीं पूर्वी क्लाइव्ह-

साहेब रहात होते अशी ऐतिहासिक आख्यायिका आहे. त्या जागेचें ऐतिहासिक महत्त्व समजल्यावर टिळक म्हणाले, "या जागीं क्लाइव्ह रहात होता त्याचें महत्त्व मला वाटत नाहीं. या स्थळीं प्रथम विवेकानंदाना धर्मकार्याचें प्रोत्साहन मिळालें याबद्दल मला जास्त अभिमान वाटतो."

(१३) १८९५ सालीं टिळक नामदारीवर आधिष्ठित झाले, त्यावेळीं ब्राम्हण सभेच्या विद्यमानें त्यांच्या अभिनंदनाची सभा भरविली गेली होती. सर भालचंद्र भाटवडेकरानीं अध्यक्षस्थान विभूषित केलें होतें. ते टिळकाबद्दल म्हणाले " ना टिळकाची तक्रार नेहमीं अशी असते कीं, दिवसाचे चोवीस तास आपल्या कामाला पुरे पडत नाहींत यांच्या कामाचा व्याप फार मोठा असल्यानें याना दिवसाच्या चोवीस तासाऐवजीं अधिक तास ईश्वरानें ठेविले असते तर बरें झालें असतें!"

(१४) १८९२ सालीं कै. न्यायमूर्ति रानड्यांचा व टिळकाची आपसात खडाजंगी उडाली " न्यायमूर्तींनीं आपली नौकरी सोडून राष्ट्रकार्याचें धुरीणत्व घेतल्यास आपण त्याचे अनुयायी होण्याला एका पायावर तयार आहोंत " असा टिळकानीं कै रानड्याना जबाब दिल्याचें मला पक्कें स्मरत आहे.

---

## दत्तात्रय राजाराम गुप्ते

[ बी. ए एलएल बी वकील, जुन्या राष्ट्रीय पक्षाचे व स्वराज्य पक्षाचे समासद, पुणें ]

(२) गेल्या सोलापूर प्रांतिक परिषदेच्या देखाव्यास लढाईतील चारिकशा चकमकीचें स्वरूप प्राप्त झालें होतें. प्रतिपक्षाहून वरचढ लोकमान्यांचीहि कडेकोट तयारी होती मंडपाच्या दरवाज्यावर निकराचा हल्ला झाला. त्यावेळीं रक्तपातहि झाला. स्वागताध्यक्ष आपलें भाषण वाचीत असतां मध्येंच धयकले व मंडपांत चलविचल उडाली वेळ निकराची होती व प्रतिपक्षाचा डोळाहि लोकमान्यांवर होता, परंतु ते समुद्राप्रमाणें शांत होते. श्री सामंतास ते म्हणाले, "तुमचें भाषण चालू द्या, त्यांत काय आहे !"

---

## जगन्नाथ रघुनाथ आजगांवकर

[ मराठी वाङ्मयसेवक व लोकमान्यांचे एक चाहते, मुंबई. ]

(१) लो बळवंतरावजींचा आणि माझा प्रथम परिचय १९०५ सालच्या नोव्हेंबर महिन्यांत झाला. तत्पूर्वी सुमारें पांच वर्षे "केसरी" पत्रांत शुन्या मराठी कवींवर माझे पुष्कळ लेख प्रसिद्ध झाले होते व लोकमान्यांचीं अनेक व्याख्यानें मुंबईतील गणेशोत्सवांत मीं ऐकिलीं होतीं सुरत येथील राष्ट्रीय सभेच्या वेळीं केसरीच्या संपादकवर्गांत माझा समावेश करून घेण्याचा आपला उद्देश त्यांनीं मला स्पष्ट बोलून दाखविला होता, परंतु दुर्दैवानें तो योग आला नाहीं.

(२) सुरतेस धरसेडा होऊन राष्ट्रीय सभेचीं दोन शकलें झाल्यावर बहुतेक मवाळ पुढारी व त्या पक्षाचीं वर्तमानपत्रें यांनीं, त्याबद्दल सापर बळवंतरावजींच्या कपाळावर फोडण्याचा अट्टाहासानें प्रयत्न चालविला होता, व त्या सर्वांस तोंड देण्यास बळवंतराव तयारच होते, परंतु प्रतिपक्षाच्या पुढाऱ्यांनीं व वर्तमानपत्रांनीं अगदींच ताळतंत्र सोडून नुसत्या शिव्यांच्या भडिमारानेंच वादविवादपटुतेची जागा भरून काढण्याचा निश्चय केला व त्यांच्या भरांत बळवंतरावजींसंबधीं त्यांनीं इतके असभ्यपणाचे शब्द वापरले कीं, ते ऐकून किंवा वाचून माझ्यासारख्या बळवंतरावांच्या अनुयायांच्या अंगाचा अगदीं तिळपापड होऊन गेला, पण वाद विवादांत दुसऱ्यावर कठोरपणानें अनेक प्रहार करण्यांत व दुसऱ्याचे तसलेच कठोर प्रहार एखाद्या रणनिपुण योद्ध्यास सर्वथैव योग्य अशा आनंदानें सहन करण्यास आपल्या धीरोदात्त स्वभावाचें प्रदर्शन करणाऱ्या बळवंतरावजींस या क्षुद्र कोलाहलाची तिळमात्र पर्वा वाटली नाहीं, त्यामुळें त्यांच्या शांतवृत्तीचा लवलेशही भंग झाला नाहीं त्या वेळीं केसरी आफिसांत बळवंतरावजींच्या सभोंवतालीं निरनिराळ्या अनेक लोकांच्या मतांचा जणू काय वेढाच पडलेला असे. एके दिवशीं रेव्हेन्यू

खात्यात काम करून रा. ब. पदवी मिळविलेले बळवतरावजींचे एक बाळपणाचे स्नेही या गर्दीत मोठ्या आवेशानें सुरुन " बळवतराव, मुरतेस कॉंग्रेसला मूठमाती देऊन देशाचा तुम्हीं केवढा घात केला आहे याची तुम्हास कल्पना तरी आहे काय ? " अशा प्रकारच्या शब्दानीं बळवतरावजींस टोंचून बोलू लागले, व तें त्याचें थोडेंसें असभ्यपणाचें वर्तन पाहून माझ्या शेजारीं बसलेल्या एका तरुणाचा राग अनावर होऊन तो त्या रा. ब. च्या अंगावर तितक्याच आवेशानें उसळून उठला. तेव्हा बळवतराव त्या तरुण गृहस्थास म्हणाले, "अहो, मीं स्वत जर याचें भाषण निमूटपणें ऐकून घेत आहे, तर तुम्हीं असें वर्दळीवर येऊन भांडण कशास करता ? " बळवतरावजींची ही शांतवृत्ति पाहून तो तरुण गृहस्थ उठून गॅलरींत जाऊन उभा राहिला व मला म्हणाला, " अहो, बळवतराव कसले जहाल ? हे देखील मवाळच आहेत मला सांगितलें असतें तर त्या रा. ब. च्या श्रीमुखात मीं अशा दोन ठेवून दिल्या असत्या कीं, त्याला जन्मभर आठवण राहिली असती !"

(३) लोकमान्य स्वर्गस्थ झाले त्यापूर्वी सुमारें सहा महिने सरदारगृहात येऊन ते उतरले असताना, काहीं कामासाठीं मी त्यांच्या भेटीस गेलों असता, आपला मृत्यु जवळ आला आहे व आपण काहीं आता फार दिवस वाचत नाहीं अशा अर्थाचें जें निरवानिरवीचें भाषण त्यानीं केलें होतें त्याचा विस्तृत उल्लेख "टिळक-गुणकलापात " मीं केलाच आहे याशिवाय आणखी काहीं गोष्टींची चर्चा त्या वेळीं त्यानीं केली ती महत्वाची वाटल्यावरून तिचा येथें समावेश करतों. फल-ज्योतिषाविषयीं बोलणें निघालें असता ते म्हणाले, " फलज्योतिषावर माझा बिलकूल विश्वास नाहीं. ताईमहाराज प्रकरणात मजवर जो फौजदारी खटला करण्यात आला होता, त्या खटल्याच्या निकालाचे दिवशीं मी कोर्टांत जावयाला निघण्यापूर्वीं खटल्याचा निकाल काय होणार हें एका कागदावर लिहून व तो कागद पाकिटात घालून पुण्यातल्या अनेक ज्योतिष्यानीं मजकडे दिले होते व त्यातील बहुतेकानीं मी दोषमुक्त होऊन सुटणार असेंच भविष्य वर्तविलें होतें, परंतु असल्या गोष्टीवर माझा विश्वास नसल्यामुळे मला शिक्षा होणार हे तर्कानें जाणून, मॅजिस्ट्रेटनें शिक्षा ठोठावल्यावर सेशनजज्जाकडे जामिनावर खुलें करण्यासाठीं करा वयाचा अर्ज खिशात घालून मीं कोर्टात गेलो व माझ्या अनुमानाप्रमाणें मॅजिस्ट्रेटनें मला दोषी ठरवून शिक्षा केली. अर्थात् भविष्यवाद्यांचीं सर्व भविष्य साफ चुकलीं व मीं नेलेला अर्जच जामिनावर खुलें होण्याच्या बाबतींत उपयोगी पडला."

(४) याच गुलाबजतीच्या वेळीं राजकारणाचा विषय निघाला असता, लोकमान्यानीं अमळ भीत भीत हलक्या आवाजात मला विचारलें, "काय हो, आजगावकर, गांधींची जात कोणती ?" मीं म्हटल "गांधी जातीनें वैश्य असून, धर्मानें वैष्णव आहेत " ही माहिती ऐकून लोकमान्याना थोडेंसें आश्चर्य वाटल्या सारखें दिसलें ते मला म्हणाले, "खरें विचाराल तर, गांधींचा धर्म कोणता हें

या घटकेपर्यंत मला माहीत नव्हतें. परंतु गांधींसारख्या मोठ्या माणसाचा धर्म कोणता हें देखील यांस ठाऊक नाहीं असें म्हणून लोक माझ्या अज्ञानास हसतील या भीतीनें, हा प्रश्न मीं आजपर्यंत कोणास विचारला नव्हता. गांधी जैन आहेत अशीच माझी समजूत होती. कारण, त्यांचीं सर्व मतें व शिकवणूक जैन-धर्माची आहे. अहिंसा, सत्याग्रह, उपवास, प्रायोपवेशन, वगैरे प्रकार हिंदुधर्मापेक्षां जैनधर्मासच विशेष शोभण्यासारखे आहेत. विशेषतः राजकारणांत तर असल्या उपायाचा मुळींच उपयोग नाहीं. वारांगनेप्रमाणें क्षणोक्षणीं ज्याची राजनीति निरनिराळे वेष धारण करीत असते आणि राजकारणांत सत्यासत्याची, धर्माधर्माची न्यायान्यायाची जे फारशी चाड बाळगीत नाहींत, अशा अत्यंत कुशल राजनीति-निपुण राजकर्त्यांच्या मनावर सत्याग्रह आणि उपवास यांचा काडीमात्र परिणाम होईल असें मला वाटत नाहीं. त्याच्याच शस्त्रांनीं त्याच्याबरोबर लढलें पाहिजे; आणि ते आपले डावपेंच जसजसे बदलतील तसतसे आपले डावपेंच आपण बदलले पाहिजेत. हरताळ पाडणें हा गांधींचा एकच उपाय आपण उदाहरणार्थ घेऊं. रक्तपात हा शब्द ऐकून गांधींच्या अंगावर शहारे येतील, परंतु त्यांची इच्छा नसताहि, हरताळाचें पर्यवसान शेवटीं रक्तपातांतच होणार अशी माझी ठाम समजूत आहे. कारण, हरताळ पडला कीं, आपल्या इभ्रतीस कमीपणा आला असें वाटून, तो हरताळ मोडण्याचा शक्य तो प्रयत्न अधिकारी करणार. कांहीं दुकानदारांस व्यक्तिशः धाकदपटशा दाखवून किंवा कांहीं लालूच दाखवून त्यांस आपलीं दुकानें ते उघडावयास लावणार. आपल्यांतल्या कांहीं लोकांनीं दुकानें उघडलेलीं पाहून, इतर दुकानदार तेथें जमून त्यांच्याबरोबर हुज्जत घालूं लागणार. लोकांचा घराव मोठा जमाव झाल्यावर, जवळच तयार असलेले पोलीस गर्दी मोडण्यासाठीं म्हणून तेथें जाणार व लोक सामोपचारानं जमाव मोडीत नाहींत या सबबीवर गोळीबार होऊन दहापांच लोक ठार व पांचपंचवीस जखमी होणार!"

(५) प्रो. विजापूरकरांच्या जुन्या समर्थविद्यालयासाठीं पैसे गोळा करण्यास टिळक सोलापूर जिल्ह्यांत गेले असतां, तिकडील एका गांवच्या लोकांनीं आपल्या गांवांत एक नवें देऊळ बांधलें होतें त्यांतल्या मूर्तीची स्थापना लोकमान्यांच्या हातून व्हावी या उद्देशानें त्यांनीं एक "डेप्युटेशन" त्यांजकडे पाठविलें. त्यांचें म्हणणें ऐकून घेतल्यावर लोकमान्यांनीं त्यांस स्पष्ट सांगितलें कीं, "या कामास सर्वस्वी नालायक असा जर कोणी मनुष्य असेल तर तो मी आहें. मी कधीं वेळेवर संध्या करीत नाहीं आणि ब्राह्मणाचे इतर आचारहि पाळीत नाहीं. तेव्हां मजपेक्षां योग्य असा दुसरा एखादा गृहस्थ किंवा धर्मशील विद्वान् ब्राह्मण पहा, आणि त्याजकडून मूर्तिस्थापना करवा."

(६) डॉ. रघुनाथ पुरुषोत्तम परांजपे हे नुकतेच रँग्लर होऊन आले असतां मुंबईतल्या ग्रॅज्युएट्स् असोसिएशनपुढें 'गणित' विषयावर त्यांचें व्याख्यान झालें.

आपल्या विद्वत्तेस साजेल अशी पुष्कळ नवीन माहिती त्यांनीं सांगितली व आपल्याकडेहि गणितशास्त्रावर पूर्वी पुष्कळ शोध झाले होते असं म्हणून, अमुक एका गणितसिद्धांताविषयीं मात्र आपल्या प्राचीन ग्रंथांत काहीं उल्लेख सांपडत नाहीं व यावरून हा सिद्धांत आपल्या लोकांस माहीत नसावा, असें विधान केलें. व्याख्यान संपल्यावर अध्यक्षांनीं, इतर कोणास कांहीं बोलावयाचें असल्यास त्यानें बोलावें असें सांगितलें परंतु गणितासारख्या गहन आणि रुक्ष विषयावर रँग्लर सारख्या व्याख्यात्यापुढें बोलावयास कोण उभा राहतो ? शेवटीं एकटे टिळक पुढें आले व त्यांनीं आरंभीं रँग्लरसाहेबांचें अभिनंदन करून, नंतर वेदांतील यज्ञविषयक एक ऋचा उद्धृत केली व त्या ऋचेंत, जो सिद्धांत आमच्या लोकांस माहीत नसल्याचें रँग्लरसाहेबांनीं विधान केलें होतें, तोच सिद्धांत कसा ग्रथित झाला आहे हें सविस्तर रीतीनें सिद्ध करून दाखविलें. या व्याख्यानाचा रिपोर्ट दुसऱ्या दिवशीं "टाइम्स ऑफ इंडिया" पत्रांत आला, त्यांत शेवटीं असें वाक्य होतें "Only Mr Tilak responded and what he spoke on the subject was quite worthy of the author of the Orion."

(७) सर जगदीशचंद्र बोस यांचें कांहीं वर्षांपूर्वीं मुंबईतील 'ऑपेरा हाउस' मध्ये व्याख्यान झालें होतें. पुष्कळ युरोपियन, पारशी व्याख्यानास हजर होते. लोकमान्य अध्यक्ष होते त्यांनीं आपल्या भाषणांत सर जगदीश यांच्या शोधाची ओळख इतक्या चांगल्या रीतीनें श्रोत्यांस करून दिली कीं पुढें डॉ बोस यांनीं जेव्हां आपलें भाषण सुरू केलें तेव्हां ते म्हणाले, "टिळक यांनीं आपल्या भाषणानें माझें काम पुष्कळच सुलभ केलें आहे. माझ्या शोधाचें स्वरूप थोडक्यांत त्यांनीं इतकें स्पष्ट करून दाखविलें आहे कीं, एखाद्या 'प्रोफेशनल सायंटिस्टला' देखील तें तसं करून दाखविता आलें नसतें "

(८) 'आपण आतां फार दिवस जगणार नाहीं' असे उद्गार लोकमान्यांनीं आपल्या मरणापूर्वीं सुमारें सहा महिने, सरदारगृहांत मजपाशीं काढले होते त्या वेळीं, गोखले, आगरकर, नामजोशी वगैरे आपल्या बरोबरीची मंडळी आपल्या-पूर्वीं कां वारली, या गोष्टीचा उल्लेख त्यांनीं केला, त्या वेळीं, सदर गृहस्थाच्या आठवणींमुळें त्यांचे डोळे पाण्यानें भरून आलेले मीं पाहिले.

(९) माझ्या कविचरित्राच्या पहिल्या भागाची एक प्रत मी लोकमान्यांस नेऊन दिली त्या वेळीं सुरत कॉंग्रेसचें काहूर उठलेलें होतें, पण तसल्याही मन-स्थितींत त्यांनीं माझें पुस्तक वरवरचाळून पाहिलें व त्यांतली कोणकोणती माहिती केसरींतील माझ्या लेखांत पूर्वी येऊन गेली होती हें नुसत्या आठवणीनें अगदीं बिनचूक सांगितलें !

(१०) कलकत्ता येथील शेवटच्या कॉंग्रेसच्या वेळीं तेथेंच हिंदी भाषेची परिषद भरली होती लोकमान्य अध्यक्ष होते. परिषद सुरू झाली तेव्हा कॉंग्रेसच्या विषय नियामक कमिटींत नुकताच कडाक्याचा वादविवाद करून आले होते. असें असता अध्यक्ष या नात्यानें हिंदी भाषेवर त्यानीं जें भाषण केलें तें ऐकून महात्मा गांधी इतके चकित झाले कीं, सबजेक्ट कमिटींतला वादविवाद नुकताच संपवून आलेल्या टिळकास हिंदी भाषेवर इतकें विद्वत्तापूर्ण व माहितीनें भरलेलें भाषण कसें करता आलें, हें त्यास एक कोडेंच वाटलें व तशा अर्थाचे उद्गार महात्माजींनीं आपल्या 'यंग इंडिया' पत्रात काढले होते

(११) लोकमान्याच्या निधनापूर्वी सुमारें सहा महिने ते मुंबईत सरदारगृहात उतरले असता मी सहज त्याच्या दर्शनास गेलों होतों, त्या वेळीं ज्या विषयाची चर्चा झाली त्यात ज्योतिषाचाही विषय निघाला होता बोलता बोलता लोकमान्य म्हणाले " आजगावकर, मी आता फार थोड्या दिवसाचा सोबती आहे माझ्या पत्रिके वरून माझे ज्योतिषी मित्र सागतात कीं, हें वर्ष मला वाईट आहे परतु फल ज्योतिषावर माझा फारसा विश्वास नाहीं. तथापि माझें मलाच अलीकडे असें वाटू लागलें आहे कीं, मी काहीं फार दिवस जगणार नाहीं डॉक्टराचीं औषधें सुरू आहेत, परतु त्याचा काहीं फारसा उपयोग होत नाहीं इद्रियें शिथिल होत चाललीं आहेत, शक्ति क्षीण होत चालली आहे अन्न तुटत चाललें आहे पूर्वीचे योगी आणि सत आपल्या मृत्यूचा दिवस पूर्वींच सागून ठेवीत असत, ही गोष्ट पुष्कळास खोटी वाटते, परतु माझ्या मतें त्यात अशक्य काहीं नाहीं. स्वत च्या शरीराच्या हालचालींवर इद्रियाच्या व्यापारावर सूक्ष्म दृष्टि ठेवणारास आपला मृत्युकाल अगाऊ बिनचूक सागता येणें शक्य आहे मी माझ्या अनुभवावरून

गेलों. तेथें जामिनावर खुलें होण्याचा विधि होण्यापूर्वीच माझा झोंपेचा वेळ झाल्यामुळें मी तेथेंच झोंपीं गेलों. मजबरोबरचा सार्जंट बिचारा जागाच होता. काहीं वेळानें त्यानें मला हाक मारून उठविलें व विचारलें कीं, 'अशा स्थितींत तुम्हांस झोंप तरी कशी येते?' मी म्हटलें, त्यात काय आहे! झोंपेची वेळ होताच झोंप आली."

---

## इंदुप्रकाश टिळकगुणकलाप

(१) मद्रासचे गव्हर्नर लॉर्ड पेंटलंड यानीं न्यू इंडिया पत्राबद्दल जामिनकी घेतली तेव्हा एका बातमीदारानें त्याविषयीं के. टिळकाचें मत काय आहे, तें समजून घेण्याचा यत्न केला त्यानें टिळकांची भेट घेतली, तेव्हा टिळकांनीं सांगितलें, 'माझे विचार सर्वविश्रुत आहेत, व ते इतके प्रखर आहेत कीं, त्यांची प्रसिद्धि न्यू इंडिया पत्रांत झाल्यास त्याबद्दल त्याला आणखी शासन भोगण्याचा प्रसंग येईल.' टिळकांनीं मुलाखतदारास असेंही बजावलें कीं तो 'न्यू इंडिया' च्या जामिनकीविषयीं आपलें मत घ्यावयास आला होता, याची देखील वाच्यता होता कामा नये. मुलाखत घेणारा बातमीदार उठून जाऊं लागला, तेव्हा स्मित वदनानें लोकमान्य म्हणाले, "अमेरिकेंतल्या साहसी बातमीदाराच्या वर्तनाचा कित्ता तुम्ही गिरवूं नका. निदान लॉर्ड पेंटलंड तुमच्या प्रांतांतून प्रयाण करीपर्यंत तरी तुम्ही त्याची परिस्फुटता करूं नका."

त्याच्यापुढें तें प्रमेय त्यांनीं टाकलें लोकमान्यांनीं सुमारें सात आठ मिनिट एकाग्रतेनें त्यावर विचार करून समाधानकारक रीतीनें त्याची फोड करून सांगितली

(३) विलायतेंत लोकमान्य एका मशिनरीच्या कारखान्यांत गेले, व तेथें त्यांनीं जें मशीन घ्यावयाचें ठरविलें तें पाहून तर सर्व लोक चकित झाले किंमत तर स्वत कारखानदारालाहि माहीत नव्हती परंतु टिळकांनीं तेंच मशीन घेण्याचें खरें कारण कारखानदाराला सांगताच त्यालाहि त्याची किंमत समजली तें मशीन अमेरिकन तज्ज्ञ यांत्रिकांनीं अगदीं निरुपयोगी ठरविलें होतें, पण तें टिळकांनीं पसंत करताच ते लोक द्रव्याच्या थैल्याच्या थैल्या घेऊन वरचढ करू लागले होते पण टिळकांचा सवदा अगोदरच झाला असल्यामुळें त्याचा निरुपाय झाला शिवाय त्या कारखान्यांतील यंत्रकलाप्रवीण लोकांना त्यांनीं अशीं कांहीं प्रश्नोत्तरें केलीं कीं, त्यानाही वाटलें हे कोणी तरी जाडे तज्ज्ञ आहेत परंतु यांचा खरा व्यवसाय कळताच यांचा अद्वितीय बुद्धिमत्तेची तारीफ केल्यावाचून त्याच्यानें राहवलें नाहीं सारांश, जो जय अमेरिकेच्या कुबेरी राजिन्यांनं मिळविला नाहीं तो टिळकांच्या बुद्धिमत्तेनें हस्तगत केला

(४) तसेंच 'आर्क्टिक होम इन् दी वेदाज' हें पुस्तक लिहिण्याची त्यांची तयारी झाली तेव्हां त्यांनीं नुस्तें मॅक्समुल्लरचें ऋग्वेदावरील मूळ पुस्तक वाचलें होतें त्याच अपुऱ्या सामुग्रीनें केवळ आपल्या बुद्धिमत्तेच्या जोरावर त्यांनीं उत्तर ध्रुवाला गाठलें दुसरा एक असाच ग्रंथ त्यांनीं केवळ एका महिन्यांत लिहिला त्यांच्या तीन चार खणाच्या खोलींत पुस्तकांचे भारे आणि कागदाच्या फायली भरून गेलेल्या असत पदवीधर लेखक एकामागून एक सवंध सोळा तास लिहीत असत, परंतु टिळकांनीं त्यांना लिहिण्याचें सांगतांना एकाही पुस्तकाचें पान चाळलें नाहीं, किंवा एकादा कागद अवलोकन केला नाहीं! इतका त्या पुस्तकांतील व फायलींतील विषय त्यांच्या डोक्यांत पूर्णपणें साठून गेलेला होता हे सर्व तैल्बुद्धीचे दाखले नव्हेत असं कोण म्हणेल?

(५) अमृतसर कॉंग्रेसचे अगोदर थोडे दिवस लोकमान्य टिळक आणि मि देशपांडे हे मद्रासस गेले होते तेथील कांहीं लोकांनीं मि देशपांडे यांना विचारलें कीं, लोकमान्य विलायतेहून आल्यापासून त्यांच्यांत तुम्हांला काय बदल झालेला दिसत आहे? तेव्हां मि देशपांडे स्मितपूर्वक म्हणाले कीं, लोकमान्य आता स्त्रियांशीं जरा जास्त मोकळेपणानें व मिळून मिसळून वागू लागले आहेत परदेशीं जाण्यापूर्वी लोकमान्य स्त्रियांचा संबंध येई तेथें फार संकोच धरीत आणि त्यांच्याशीं कधींहि मोकळ्या मनानें बोलत नसत परंतु विलायतेंतील अनेक सुशिक्षित स्त्रियांबरोबर त्यांना राजकीय गोष्टींचा खल करावा लागल्यामुळें त्यांच्याशीं मोकळेपणानें वागण्याशिवाय त्यांना गत्यंतरच नव्हतें आणि त्याच कारणानें त्यांची ती स्त्रियांबद्दलची संकोचित वृत्ति आता नाहींशी झाली मद्रासला जातांना

वाटेंत स्टेशनावरून काहीं त्रियाशीं राजकीय वाटाघाट ते इतक्या मोकळ्या मनानें करताना पाहून मि. देशपांडे याना आनंदाश्चर्य वाटलें. त्यांच्यात झालेला हा नवा बदल पाहून त्याना मोठी मौज वाटली आणि तितकाच हर्षहि झाला.

(६) एकदा योगशास्त्रावर भाषण करताना लोकमान्यानीं, शंका आली म्हणून खुर्चीवरून उठून आतील खोलींतून डिक्शनरी आणून त्यानीं शब्द सांगितला व बराच वेळ भाषण झालें. त्या वेळीं सर्व प्राण्यात मनुष्याला जास्त महत्व का, सुधारणेचें मूळ कोठें सुरू झालें, सूक्ष्मावलोकनानें मनुष्याला काय समजलें, विचारशक्तिनें मनुष्यानें काय करून घ्यावें इ. विषयावर एका पंडिताशीं चर्चा झाली, त्या वेळीं लोकमान्य म्हणाले, "पाणी दाखविल्यावर तहान लागलेला बैल जशी ओढ घेतो, तसें मनुष्यानें करून चालणार नाहीं. रस्त्यानें जात असताना दोन्हारून चाललेल्या बाईकडे मान फिरवून पाहण्याचें मनुष्याला प्रयोजन काय? हा मनाचा उच्छृंखलपणा आहे, याला पूर्ण दाबून ठेवणं म्हणजेच योग."

---

## अनंतानुज

[ टिळक–गुण–कलापावरून ]

१ बॅ. बॅप्टिस्टाच्या अध्यक्षत्वाखालीं पुण्याची गाजलेली कॉन्फरन्स पार पडल्यानंतर एके दिवशीं लोकमान्यांच्या नित्य सहवासातल्या माझ्या मित्राजवळ मीं लोकमान्यांच्या दिनचर्येबद्दल गोष्ट काढली. "लोकमान्य सारा दिवस गप्पा मारण्याशिवाय दुसरें काय काम करतात?" असा मीं त्याला प्रश्न केला. त्याला या माझ्या प्रश्नाचें साहजिकच आश्चर्य वाटलें. 'लोकमान्याचें रामायण सदैव राष्ट्रकार्यापुरतेंच चाललेलें असतें. ते वेगवेगळ्या राष्ट्रकार्यांच्या गोष्टी भिन्न भिन्न

महाकवींच्या कालनिर्णयाची चर्चा त्या समायणात निघाली होती व विद्याभिरुचि असणाराला त्याचा तो सवाद रुचित उपयुक्त वाटला असता हा त्याचा सवाद चालू होता इतक्यात एकजण प्रातिक परिषदेच्या अहवालाचीं प्रुफें घेऊन आला लोकमान्यानीं तीं प्रुफें चाळून टाकलीं, त्यात कोणत्या गोष्टी महावयाच्या हें त्यानीं अगाऊच ठरवून टाकलें असावें असें मला वाटलें त्यानीं नेमक्या हव्या होत्या त्या दुरुस्त्या केल्या त्याच्या प्रूफ तपासणींत मुत्सद्देगिरीचें प्रत्यतरही होतें प्रातिक परिषदेला हजर असलेल्या दोघा रावबहादुराचीं नावें त्यानीं प्रुफातून गाळलीं त्या रावबहादुराच्या हजर राहण्याचा फायदा प्रातिक परिषदेच्या चाल्कानीं घेतला, पण सरकारी कटाक्ष त्याच्यावर येऊ नय म्हणून त्याचीं नावें परिषदच्या रिपोर्टात नकोत, असा भाव त्यानीं व्यक्त केला व तीं नावें खोडलीं पोलिसातल्या गुप्त हेरानीं त्याचीं नावें कदाचित् आपल्या रोजनाम्यात टिपलेलीं असतील, पण सदर रावबहादुराविरुद्ध आपल्या हातान रिपोर्टांत पुरावा ठेवण योग्य नव्हतें, असें त्यासबधीं बोल्ताना ध्वनि काढला, व तशा प्रकारच्या सूचना आपल्या कामकरी मडळीला दिल्या. प्रुफाचें काम झाल्यावर पुन ते मास कालिदासाकडे वळले थोडा वेळ त्याविषयीं बोलण्यात गेला असेल नसेल तोंच एक गृहस्थ हातात कागदाचें पुडकें घेऊन आला त्या गृहस्थाच्या बधूना सरकारनें अटकेत ठेवलें होतें, व त्याच्या मुदतेसबधच्या अजावे कागद त्याच्या हातात होते लोकमान्यानीं त्यावरून एकदा नजर टाकली व तुम्हीं लिहिलेल्या सुदर इग्रजी भाषेवर मोहून सरकार तुमचा इष्ट हेतु तडीस नेणार नाहीं व त्या अर्जात कायद्याचे मुद्दे जसे वठावेत तसे वठलेले नाहींत. आता मी सागतों त्याप्रमाणें मुद्दे घालून अर्ज लिहा असा जबाब दिला त्या गृहस्थान इग्रजी भाषेचे किती कोश उलथेपालथे करून आपल्या अर्जाची भाषा सजविली होती देव जाण! लोकमान्याच्या अभिप्रायामुळें त्याची निराशा झाली, तथापि त्याच्या सागण्यातलें तथ्य पटल्यामुळें तो गृहस्थ शेजारच्या खोलींत अर्ज तयार करण्यासाठीं निघून गेला पुन लोकमान्य आपल्या मूळच्या विषयावर बोलू लागले तथापि त्याच्या सवादात फिरून खड उत्पन्न झाला त्याच्याकडे एक ज्योतिर्विद् पडित आले. प्रथम त्याच्याशीं काहीं वेळ औपचारिक पण ज्योतिषविषयासबधीं बोलणें झाल्यावर लोकमान्यानीं काहीं वैदिक ऋचाचा अर्थ शुद्ध ज्योतिषाच्या ज्ञानानें लावावा लागतो, सायनाचार्यांना त्याचा गर्भितार्थ योग्य रीतीनें उगलडला नाहीं, असें सागितलें आपण तुरुगात असताना या ऋचाचा अर्थ ज्योतिर्विद्येच्या अनुरोधानें उकलून काढला व त्याखेरीज त्याचा दुसरा अर्थ लागणें शक्य नाहीं अशी खात्री करून घेतली, इत्यादि माहिती सागितली, व सावकाश उठून त्या अर्थाचें लिहून ठेवलेलें टिपण आणून आलेल्या ज्योतिर्विदास दाखविलें त्याचें लोकात विवेचन होण्याकरिता लोकमान्य एखादा

लेख लिहिण्याच्या विचारात असावे असा त्यांच्या बोलण्याचा रोख होता ज्योतिर्विदांचा व लोकमान्यांचा सदर विषयाबद्दल खल चालला होता, इतक्यात एक सुप्रसिद्ध पाली भाषाभिज्ञाकडून बौद्धधर्मातल्या ग्रंथातील मूळ उताऱ्याचा कागद घेऊन एक मुलगा आला गीतारहस्यातल्या एका मुद्द्याच्या खुलाशासाठीं त्यांना या उताऱ्याची जरूर होती व त्यांच्या हयातींत गीतारहस्याची दुसरी सुधारलेली आवृत्ति काढण्याचा योग आला असता तर त्यांनीं या उताऱ्याचा उपयोग करून घेण्याचें ठरविलें होतें, असा त्या उताऱ्यावरून निघालेल्या वादविवादाचा आशय होता.

मीं लिहिलेली बरीच हकीकत सुमारें तीन तासात घडलेली आहे. तिच्यातील ठळक गोष्टींपरीज बारीकसारीक कामाची व्यवस्था ते पाहतच होते.

---

## चिंतामण विनायक वैद्य

[ एम्. ए एलएल. बी , लोकमान्यांचे स्नेही, रामायणमहाभारताचार्य, कल्याण. ]

( १ ) लोकमान्यांचा महाभारताचा परिचय फारच दांडगा होता. त्यांनीं महाभारत समग्र तीनदा तरी वाचलें असावें आणि तें मोठ्या चौकस दृष्टीनें. आणि ज्या ज्या विशेष गोष्टी लक्षांत त्यांच्या आल्या त्या त्यांच्या डोक्यांत स्मरणशक्तीनें नेहमीं अव्यत तयार असत लोकमान्यांनीं कधीं एखादें नोटबुक ठेविलें होतें असें मला वाटत नाहीं त्यांच्या आवाढव्य वाचनाचें नोटबुक त्यांची प्रचंड स्मरणशक्ती होती असें मला वाटतें, यामुळें त्यास कोणत्याहि वेळीं अडचण पडत नसे यद्दिदृशी गोष्ट लक्षात घेऊन 'अमुक ग्रंथात अमुक ठिकाणीं आहे, पहा पाहू' असें म्हणण्याचा त्यांचा विलक्षण अधिकार होता महाभारतान्त उपसंहार मीं 'सरदार गृहा'त दोनतीन महिने राहून लिहिला. त्या वेळीं लोकमान्य विरोल केसखटल्यानें तेथेंच मुंबईत होते रात्रीं आमच्या तिकडच्या इकडच्या गप्पा चालत, त्यात ते माझ्या ग्रंथाविषयीं गोष्टी बोलत त्याचें वर्णन खाल आहे असें मी एका प्रसंगीं

साधन मिळतें ही गोष्ट तुम्हास ठाऊक आहे काय आणि याचा प्रयत्न तुम्हीं उपसहारात केला आहे काय ? " मला ही गोष्ट ठाऊक नसल्यानें मीं 'नाहीं' म्हटलें व 'कोठें उल्लेख केला आहे' असें विचारलें. तेव्हा त्यानीं " उद्योगपर्वात श्रीकृष्ण शिष्टाईस जाण्याच्या वेळीं भीमाच्या तोंडीं जें भाषण घातलें आहे त्यात 'चीनाना धौतमूलक ' असा उल्लेख आहे. हा धौतमूल कोण हें तुम्ही पहा " असें उत्तर दिलें. हा प्रसग मीं वाचला होता परतु भीमानें आजपर्यंत अठरा कुलागार राजे झाले असें म्हणून यावीं जीं नावें दिलीं आहेत तीं सर्व काल्पनिक होत असें माझें मत झाल्यानें मी नावाकडे लक्ष दिलें नव्हतें परतु काल्पनिक गोष्टी सागताना मध्येंएखादी खरी गोष्ट येते. सर्वच खोटें चालत नाहीं, त्यात थोडेंबहुत सत्याचें मिश्रण पाहिजे, या न्यायानें या यादीकडे पाहिलें पाहिजे होतें याशिवाय भारती युद्ध सुमारें इ. स. पूर्वी ३००० वर्षे झालें. तेपूनच्या किंबहुना त्यापूर्वीच्यादि काळाच्या इतिहासात तेव्हापर्यंत हिंदुस्थानच्या निरनिराळ्या देशात कोण कोण राजे झाले ही माहिती हल्लीं मुळींच मिळत नाहीं ती इ स. पूर्वी ३०० च्या वेळीं प्राचीन पुराणावरून किंवा दतकथावरून सौतीला माहित असावी तेव्हा त्यानें सर्वच कल्पित लिहिलें असेल असें मानण्यास आधार नाहीं. ह्या गोष्टी गत मन्वतराच्या किंवा भविष्य मन्वतराच्या नाहींत, त्या कल्पितच होत हा निश्चय असो सर ही कुलागाराची यादी येथें सर्व देणें जरूर नाहीं उद्योगपर्व अ. ७४ त श्रीकृष्ण शिष्टाईस जातेसमयीं भीमानें केलेल्या भाषणात हे श्लोक आहेत.

> अष्टादशो मे राजान: प्रख्याता मधुसूदन ।
> ये समुच्चिच्छिदुर्ज्ञातीन् सुहृदश्च सबांधवान् ॥ ११ ॥

त्यानीं आपली सर्व जात व बाधवासह मित्र, याची आहुति माडणात दिली असे हे अठरा राजे प्रसिद्ध आहेत त्यात

> आजविंदु: सुवीराणां सुराष्ट्राणामुपार्दिक ।
> अर्कजश्च बलाह्वानां चीनाना धौतमूलकः ॥ १४ ॥

असा एक श्लोक आहे तेव्हा चीनच्या इतिहासातील ही गोष्ट सागितली आहे. चिनी नावें फारच चमत्कारिक असतात त्याचा आणि धौतमूलक याचा मेळ कसा जमावा ? तथापि चीनचा प्राचीन इतिहास यां त्यानतर मुद्दाम काढून पाहिला, परतु त्यात मला चागलेंसे पद्म आलें नाहीं. चीनच्या इतिहासात इ सनापूर्वी ३०० किंवा २०० च्या सुमारास राज्यक्राति होऊन एक नवीन बादशाही सुरू झाली असें दिसतें, परतु ती कशी झाली ? कुलातक कोण राजा झाला, त्याचें नाव धौतमूल या नावाशीं शब्दद्दष्ट्या किंवा अर्थदृष्ट्या जुळतें किंवा नाहीं याचा छडा मला लागला नाहीं. त्याप्रमाणें मीं लोकमान्यास सागितलें, परतु त्यानाहि या ळीं या गोष्टीचा खोल पत्ता लावण्याची फुरसत व इच्छा नसल्यानें त्यानीं हा

प्रयत्न केला नाहीं. त्यामुळें या गोष्टीचा उल्लेख महाभारताच्या उपसंहारांत मीं केला नाहीं. ही गोष्ट जिज्ञासु वाचकांपुढें ठेविली आहे. " कालोह्यय निरवधिर्विपुला च पृथ्वी " केव्हां तरी ही गोष्ट संशोधकाच्या उपयोगी पडेल म्हणून लिहून ठेविली आहे.

आतां दुसऱ्या एका गोष्टीचा उल्लेख करतों. महाभारताच्या कालासंबधानें लोकमान्यांचें व माझें ऐकमत्य आहे हें प्रसिद्ध आहे किंबहुना महाभारत ग्रंथ इ. स. पूर्वी ३०० पासून २५० किंवा त्या सुमारास झाला हें माझें मत त्यांनीं ठामनिर्देश करून आपल्या भगवद्गीतेच्या जगप्रसिद्ध गीतारहस्यांत मान्य केलें आहे भारती युद्धाच्या कालासंबंधीं मात्र मतभेद होता व अजूनहि आहे. 'महाभारत ए क्रिटिसिझम' या इंग्रजी पुस्तकाचें परीक्षण त्यांनीं केसरींत पांच सहा लेखांत केलें, त्यांत हा मतभेद त्यांनीं नमूद केला. पुराणांतील पिढ्या विश्वसनीय नाहींत, मेग्यास्थेनिसनें सांगितलेल्या पिढ्या विश्वसनीय आहेत, असें माझें मत असून लोकमान्यांनीं उलट पक्ष स्वीकारला आणि भारती युद्धकाल इ स पूर्वी ३००० न मानतां इ स. पूर्वी १४०० च्या सुमारास मानला यानंतर कित्येक वर्षांनीं ' भारती युद्धकालाचें वैदिक प्रमाण ' हा माझा निबंध मीं प्रसिद्ध केला आणि तो डेक्कन कॉलेजांत मीं वाचला त्या वेळीं त्यास्तव एक गेलें. शतपथ ब्राह्मणाचा काळ इ स. पूर्वी ३००० हा येतो असें कै शंकर बाळकृष्ण दीक्षित यांनीं ' कृत्तिका थेट पूर्वेस उगवतात ' या ज्योतिर्विषयक वाक्यावर गणित करून ठरविलें होतें. तो आधार मुख्यत माझ्या प्रमाणाचा आहे. या मूळ आधारावर सारखळी अशी बसते कीं, शतपथापूर्वी संपूर्ण ऋग्वेद, कारण त्यांत सर्व ऋग्वेदाचा एकंदर ऋचांसह उल्लेख आहे ऋग्वेदांतील सूक्तकर्ते देवापि आणि शतनु हे बंधु, तसेच सोमक व साहदेव्य हा द्रुपदाचा पणजोबा, त्याचा उल्लेख एकदोन सूक्तांत आहे. तात्पर्य, ऋग्वेदाच्या कालाच्या अर्ता भारती युद्ध भीष्म–द्रुपदाचें ठरत. या प्रमाणाबद्दल एके वेळीं लोकमान्यांचें व माझें भाषण झालें त्यांत ते म्हणाले, " शंकर बाळकृष्ण दीक्षित यांनीं आपल्या ॲंटिक्वेरीमध्यें शतपथ ब्राह्मणाच्या काळासंबंधीं लेख लिहिला तो माझ्या समक्ष लिहिला. तो मला पूर्णपणें मान्य आहे कीं नाहीं हें मीं अद्याप ठरविलें नाहीं कृत्तिका थेट पूर्वेस उगवतात हें प्राचीसाधनाचें एक गमक विरुद्ध ग्रंथकारांनीं घेतलें आहे तें केवळ परंपरागत.

राजकीय -रिस्थितसिवघानें सर्व दिवस अविश्रांत मेहनत करणाऱ्या पुरुषानें प्राचीसाधनाचा नियम शुल्वसूत्रांत किंवा इतर ठिकाणीं कसा सांगितला आहे या गणितमिश्र ज्योतिषाच्या गहन विषयांत डोकें घालण्याची व निश्चय करण्याची शक्ति व महत्त्वाकांक्षा ठेवावी हें त्याच्या सर्वव्यापक बुद्धीचें निदर्शक होय

असो याप्रमाणें हा विषय पूर्वविषयासारखा अर्धाच राहिला आहे माझ्या समजुतीनें जोंपर्यंत शंकर बाळकृष्ण यांनीं केलेलें गणित व त्यावर बसविलेला शतपथब्राह्मणाचा काळ कोणी खोडिला नाहीं, तोंपर्यंत भारतीय युद्धकाल ठोकळ मानानें इ स पूर्वी ३१०० असाच मानला पाहिजे मी ठोकळ मानानें म्हणतों याचें कारण इ स पूर्वी ३१०१ हा कलियुगारंभ गणितगतच आहे असें जें लोकमान्याचें मत होतें तें मीं पूर्वी जरी मान्य केलें नव्हतें तरी पुढें पुढें मान्य केलें, आणि तें मीं लोकमान्यास एके प्रसंगीं सांगितलेंहि होतें कारण ही अगदीं नक्की तारीख इ स पूर्वी ३१०१ चैत्र शुद्ध १ कलियुगारंभाची, त्या वेळचे ग्रह शून्य मध्यम भोगाचे होते या सिद्धान्तावर काढली आहे, असें जे कोणी म्हणतात तें मला मान्य नव्हतें आणि असा सिद्धांत कोणी स्वकपोलकल्पित करूं शकत नाहीं व तशी प्रत्यक्ष ग्रहांची स्थितीहि नाहीं हें प्रसिद्धच आहे परंतु दुसरी यांनीं केलेल्या एका गणितावरून दुसऱ्या प्रकारानें हा काल गणितगतच होऊं शकतो हें माझ्या लक्षांत आलें कल्पारंभीं ग्रह शून्यभोग एकसूत्रग्रथित होते ही कल्पना करणें शक्य आहे आणि कोणत्याहि वर्षी प्रत्यक्ष ग्रहस्थिति घेऊन मागें गणित करून सर्वग्रहशून्यभोग कधीं होतो, हें गणितानें काढता येईल म्हणजे गणिताच्या वर्षी कल्पारंभाला किती वर्षे झालीं हें निश्चित झालें म्हणजे इकडचें कलियुग कधीं सुरू झालें हेंहि त्यावरून निघालें असो मध्यम शून्यभोग कल्पारंभीं ग्रह होते ही कल्पना चुकीची व हें गणित चुकीचें हें जरी ठरलें तरी, कल्पारंभ जर काढतां येतो तर त्याबद्दल इकडचा कलीचा आरंभही काढता येईल, आणि त्याप्रमाणें मी लोकमान्यास आपलें मत या बाबतींत बदललें आहे असें सांगितलें ही गोष्ट आश्चर्यकारक नव्हे किंबहुना, लोकमान्यहि आपलें मत बदललें असल्याचें तसें सांगत मीं पूर्वी एके प्रसंगीं सांगितलेंच आहे कीं, 'अयाति भद्रयोपेत' इत्यादि श्लोकांत अयाति शब्द संन्यास न घेणारा अशा अर्थी घ्यावा असें माझें मत आहे तें बरोबर आहे अप्रयत्नवान् हा अर्थ बरोबर जुळत नाहीं, गीतारहस्याच्या पुढच्या आवृत्तीच्या वेळीं हा अर्थ मी देईन, असें लोकमान्य दिवंगत होण्यापूर्वी पधरा दिवसच अगोदर मला म्हणाले होते प्राचीन गोष्टींचा प्रेमी आणि इतका खोल अभ्यास केलेला व माहितगारीचा विद्वान् पुरुष महाराष्ट्रांत काय पण हिंदुस्थानांत राहिला नाहीं असें पाहून वाईट वाटतें त्याच्या पुण्याईनें यापुढें कोणी तरी महाभारत, वेद, गणित, ज्योतिष यांचा व्यासंगी भारताभिमानी पुरुष उत्पन्न होईल अशी आशा प्रदर्शित करून हा लेख पुरा करतो

(२) १९०५ साली बनारसेस काँग्रेस झाली त्यावेळीं राष्ट्रीय शिक्षणाचा प्रश्न प्रथम पुढें आला हें प्रसिद्ध आहे. त्या वेळीं देशांतील सर्व पुढाऱ्यांनीं राष्ट्रीय महाविद्यालय किंवा विद्यापीठ बनारसेस निघावें आणि त्यांत आम्ही शिकवण्यास तयार आहों अशीं आश्वासनें दिलीं. पंडित मदन मोहन मालवीय यांनीं हा प्रश्न हातीं घेतला आणि नेटानें सिद्धीस नेला हेंहि प्रसिद्ध आहे. पण या उद्योगांत राष्ट्रीय शिक्षणाचें महत्त्वाचें ध्येय सुटलें. सरकारी किंवा निमसरकारी मदत घेतल्यास स्वातंत्र्य नाहींसें होईल आणि अर्थात् राष्ट्रीय शिक्षणाची तेजस्विता आणि उपयुक्तता राष्ट्रीय दृष्टीनें कमी होईल असें लोकमान्यांचें स्पष्ट मत मला त्या वेळीं कळलें. कारण जेव्हां पंडितजी फंड जमविण्याकरितां मुंबईकडे आले त्यावेळीं मी लोकमान्यांना विचारलें कीं, आम्हीं काय मदत करावी. तेव्हां लोकमान्यांनीं स्वच्छ सांगितलें कीं, पंडित मालवीय यांचें ध्येय वरील बाबतींत बदललें आहे. तेव्हां आपणास त्यांना मदत करतां येणार नाहीं.

(३) 'मध्ययुगीन भारत' चा पहिला भाग लिहून इंग्रजी हस्तलिखित त्यांस मीं एकदां दाखविलें. त्यांत कोठेंसें असें वाक्य आलें होतें कीं, 'हिंदुस्थानचें स्वातंत्र्य, पानिपतच्या संग्रामांत पृथ्वीराजाच्या वेळीं पुनः परत मिळणें अशक्य आहे अशा रीतीनें नष्ट झालें.' हें वाक्य वाचीत असतां लोकमान्यांच्या चेहऱ्यावर उद्वेग स्पष्ट दिसूं लागला आणि ते मला म्हणाले, "Never to regain it. हें कशाला लिहितां ?" लोकमान्यांचें भरतभूमीवरील निःसीम प्रेम आणि हिंदुस्थानच्या भावी स्वातंत्र्यप्राप्तीचा दृढ विश्वास यांचें स्पष्ट चित्र त्यांच्या चेहऱ्यावर आणि त्यांच्या या लहानशा प्रश्नांत दृग्गोचर होत होतें. मीं लागलीच तें वाक्य खोडून टाकलें हें सांगावयास नको.

अनुमति व सल्ला घेण्याकरिता मी व रा. कद्याळकर एके दिवशीं त्यांचेकडे गेलों. त्या वेळीं ते नुसता एक सदरा अंगात घालून आरामखुर्चीवर बसले होते. मीं आमची ठरलेली योजना त्यांना सांगितली व ही ऐकून घेतल्यावर पत्राचा विस्तार व व्यापकपणा यास अनुलक्षून ते म्हणाले कीं, 'प्रत्येक जिल्ह्यास अशा प्रकारचें एक तरी चांगल्या तऱ्हेनें व उत्साहानें चालणारें पत्र आवश्यक आहे. सातारा जिल्हा मोठा आहे, तेव्हा सबंध जिल्ह्याची संघटना करून लोकमत तयार करण्याची तुमची कल्पना चांगली आहे व त्या दृष्टीनें तुम्ही आपल्या पत्राचा व्याप वाढविल्यास चांगलें होईल.' हें ऐकताच मीं म्हणालो, 'पण आपली सहानुभूति पाहिजे' तेव्हा एकदम मोठ्या व रागाच्या आवाजात ते म्हणाले, 'तुमच्या पत्रासंबधानें माझी सहानुभूति नव्हती कधीं?' हे शब्द त्यांनीं इतक्या परिणामकारक रीतीनें उच्चारले कीं, त्यापुढें त्यासंबधानें जास्त बोलण्याचें धाडस मला करवेना. तथापि काहीं मिनिटे थांबून मी म्हटलें, 'पूर्वीपार आपली सहानुभूति आहेच, परंतु आम्ही नवीन व तरुण माणसें आहों व प्रसिद्ध परंतु काहीं दिवस बंद पडलेल्या एका तालुका पेपरचें पुनरुज्जीवन करण्याची ही बाब असल्यामुळें आपणासारख्याची सहानुभूति व सल्लामसलत घ्यावी असें वाटलें' तेव्हा ते म्हणाले, "ठीक आहे. तुम्ही बेलाशक कामाला लागा व काम करून दाखवा" इतकें बोलणें झाल्यावर आम्ही त्यांचा निरोप घेऊन त्यांच्या तडफदार बोलण्याचें कौतुक करीत घरीं गेलों. त्यांच्या बोलण्यानें आमचा उत्साह द्विगुणित झाला व आम्ही योजिलेल्या कार्यास लवकरच सुरुवात केली.

(२) यानंतर लोकमान्यांकडे जाऊन त्यांची सल्लामसलत घेण्याचा दुसरा प्रसंग आमचेवर (मी व रा. कद्याळकर) १९०६-७ साल्च्या दरम्यान लॉर्ड लॅमिंग्टन मुंबईचे गव्हर्नर असतांना आला होता. हे लाटसाहेब एका दुष्काळ च्या सालीं महाडास गेले असतांना तेथील लोकांनीं त्यास मानपत्र दिलें. त्यास उत्तर देतांना त्यांनीं काहीं अप्रबुद्ध प्रकारची भाषा वापरून मानपत्र देणाऱ्या लोकांचा उपहास करून त्यांच्या (दुष्काळजन्य) दु:खावर डागण्या दिल्या होत्या. त्या प्रसंगास अनुलक्षून 'प्रतोदा' मध्यें झणझणीत टीका आली होती. तिनें त्या वेळचे कलेक्टर व डि. मॅजिस्ट्रेट मि. चक्रवर्ती यांची तब्बेत गरम होऊन त्यांनीं '१२४ अ कलमाखालीं तुमचेवर खटला का करू नये याचें कारण दाखवा' म्हणून नोटीस काढली. तेव्हा त्यासंबधानें पुढें काय करावयाचें हें ठरविण्याचे बाबतींत सल्ला घेण्याचे हेतूनें मी व रा. कद्याळकर बळवंतरावांकडे गेलों. त्या वेळीं ते दोन प्रहरचा उपहार करीत होते. म्हणून आम्ही त्यांच्या बसावयाच्या खोलीच्या शेजारच्या दालनात बसलों. तेथें त्यांचे एक मदतनीस बसले होते त्यांच्याशीं आम्ही सदर विषयासंबधानें वाटाघाट सुरू केली. त्यात असा एक प्रश्न उपस्थित झाला कीं, सदर बाब क्षुल्लक असल्यामुळें खेद प्रदर्शित करून

मोकळें व्हावें कीं काय ? याविषयीं तुमचें मत काय, म्हणून मी त्यांस विचारलें तेव्हां ते म्हणाले, ' यासंबंधानें मत देणें धोक्याचें आहे. हें ज्याचें त्यानें ठरविलें पाहिजे. खेद प्रदर्शित न करतां काम चालवा म्हणून जर मीं सांगितलें तर मी मर दिल्यासारखें होईल. तेव्हां मी तसें कसें सांगूं ! याप्रमाणें बोलणें होतें न होतें तोंच बळवंतराव तेथें आले व त्यांनीं ' काय करणार ? ' म्हणून पृच्छा केली. तेव्हां मी म्हटलें, ' आपण सुचवाल तें करूं ' तेव्हां ते हासून म्हणाले, " त्यांत काय विशेष आहे ? कोणी तरी वकील अलिबागेस पाठवा व त्याच्या-मार्फत आपलें म्हणणें डि. मॅजिस्ट्रेटपुढें मांडा म्हणजे झालें. नोटीस बेकायदेशीर आहे व ज्या मजकुरावरून ती काढली आहे तो खटला करण्यासारखा कितपत आहे याची शंकाच आहे. तथापि आपली बाजू पद्धतशीर रीतीनें डि. मॅ. पुढें मांडणें जरूर असल्यामुळें वकीलामार्फत तसें करा, स्वतः जाऊं नका; कारण न जाणो त्याच्या हद्दींत गेल्यास अरेस्ट करण्याची त्याची इच्छा असल्यास आयतेंच त्याच्या हातीं लागाल व अडकून पडाल." इतकें बोलल्यावर आमच्या विनंती-वरून त्यांनीं एकदोन वकिलांचीं नांवें सुचविलीं व त्यांपैकीं एकास पुढें आम्ही कुलाब्याच्या डि. मॅजिस्ट्रेटकडे पाठविलें व रा. बळवंतरावांच्या अपेक्षेप्रमाणें तें प्रकरण उभयतांची मुलाखत झाल्यावर आपोआप मिटलें. या बाबतींत अचूक व निश्चित प्रकारचा सल्ला चटकन् त्यांनीं दिल्याबद्दल आम्हांस त्यांचें कौतुक वाटलें व त्यांच्याविषयींची आदरभावना जास्त दृढ झाली.

(२) १९०८ साली नाट्यकलाप्रवर्तक म्हणून विनोदी पुस्तक मी प्रसिद्ध केलें. तें वाचावें म्हणून लोकमान्यास विनंति केली तेव्हां 'वेळ होत नाहीं' म्हणून ते म्हणाले त्यावर मी म्हणालों कीं ' कंटाळा आला असता लाइट रीडिंग (मेंदूस शीण न देणारें ) म्हणून वाचावें ' त्यावर लोकमान्य म्हणाले कीं, " मी लाइट रीडिंग म्हणून जें वाचतों तें इतराच्या मानानें किती भारी असतें हे तुम्ही पाहिलें म्हणजे तुम्हास मारी म्हणणें पटेल ! "

(३) मुंबईस दैनिक राष्ट्रमत पत्र निघाले, तेव्हां त्यातील व्यवस्थेसंबंधानें तक्रार करण्याकरिता काहीं तरुण मंडळी त्याजकडे गेली होती तेव्हां मी तेथ होतों. गोष्टी होताना एकानें त्यास प्रश्न केला कीं, " तुमच्या मागें तुमचें कार्य सभा ळणारे इसम कोणी तयार करीत आहां काय ? " त्यावर ते म्हणाले " अशी माणसच मिळत नाहींत * * * हे एल्एल् बी गृहस्थ मजजवळ काहीं महिने होते परंतु पुढें ते येथून जाऊन वकिली करू लागले दुसरे एका ग्रॅजुएटास मी ३० रुपये दरमहा देऊन ठेविलें आहे त्यास मी एक पुस्तक वाचण्यास सांगितलें परंतु दोन महिने झाले तरी त्या पुस्तकासंबंधान मजजवळ त्यानीं गोष्ट काढली नाहीं कीं दुसरें काहीं विचारलें नाहीं. आधीं कोणी येतच नाहीं व आले तरी त्याना अभ्यास करावयाला नको एकदम सणसणीत लेख लिहावयास पाहिजे "

(४) हल्लीं पूर्ण असत्याचारसंप्रदायात असलेले एक गृहस्थ पूर्वी गुप्त संस्थाप्रिय लोकांचें आदरस्थान म्हणून समजले जात असत हे गृहस्थ व इतर काहीं मंडळी लोकमान्याच्या येथें चर्चा करीत बसली असता निरनिराळ्या चळवळी व त्यांचें यशापयश याच्या गोष्टी चालल्या होत्या त्या वेळीं हे गृहस्थ एकदम म्हणाले, " तें काहीं नाहा असल्या ह्या चळवळींनीं काहीं व्हावयाचें नाहीं " त्यावर लोकमान्य त्याचा रोख ओळखून म्हणाले ' मला सगळें ठाऊक आहे पण माणसें तयार कोठें आहेत ? हातावर शिर घेऊन तयार असलेलीं मला ५०० माणसें दाखवा म्हणजे मी वाटेल त्याला तयार आहें '

(५) लढाईचे सुरवातीस माझे एक बंधु जर्मनीत होते, तेथून सुटून ते येथें आले, तेव्हां त्याचा संशय येऊन काहीं महिने सरकारनें त्याना डिफेन्स ऑफ इंडिया ॲक्टाखालीं तुरुंगात ठेविलें होतें त्यासंबंधीं मी लोकमान्यास सल्ला विचारण्यास गेलों होतों बोलता बोलता ते म्हणाले, ' कांहीं क्रांतिकारक हिंदी लोक परदेशात राहून चळवळी करतात, त्यामुळें सरकारास संशय येतो ' असें म्हणून एका बंगाली मनुष्यासंबंधान सरकारदप्तरीं असलेल्या माहितीच्या टिप णाची एक अस्सल प्रत त्यानीं मला काढून दाखविली ( त्या टिपणांतील माहिती आता माझ्या लक्षात नाहीं, परंतु सदरहू बंगाली गृहस्थ श्री सरोजिनी नायडू याचे बंधु होते असें वाटतें ) हें टिपण सरकारातील अगदीं गुप्त ठिकाणच्या

टिपणापैकीं होतें. लोकमान्यांचें बातमीदारांचें किती खोलपर्यंत पसरलें होतें हें ह्यावरून दिसून येतें व हिंदुस्थानांतील उघड किंवा गुप्त रीतीनें कार्य करणाऱ्या सर्व शक्तींचा यथायोग्य अदमास त्या वेळीं लोकमान्यांशिवाय दुसऱ्या कोणा हिंदी इसमास असेलसें मला वाटत नाहीं.

(६) मिसेस ॲनी बेझंट ह्या रोज १६ ते २० तास काम करितात असें एकदा कोणी लोकमान्यांच्या समोर म्हटलें, तेव्हां लोकमान्य म्हणाले, "ज्याला मोठा मनुष्य व्हावयाचें असेल त्यानें काम रपाटून केलें पाहिजे. पुष्कळ काम केल्याशिवाय मोठेपणा येत नाहीं व आलेला टिकत नाहीं."

---

## महादेवशास्त्री दिवेकर

[ प्रमुख आचार्य जुनें श्रीसमर्थ विद्यालय व प्रचारक ग्रामपाठशाळा, वाई ]

(१) १९१६ सालीं बेळगावास प्रांतिक परिषदेस जातांना कुडची स्टेशनवर मी त्यांच्या डब्यांत शिरलों. पुढें चिकोडीपासून प्रत्येक स्टेशनावर त्यांच्या स्वागताची अतिशय गर्दी होऊं लागली. प्रत्येक स्टेशनवर खालीं उतरणें, पानसुपारीचा स्वीकार करणें आणि धक्काबुक्कींत जाणें येणें यामुळें त्यांना त्रास होऊं लागला. मी म्हटलें, "दादा! आतां गाडींत बसूनच आपण पानसुपारी घ्यावी. कारण जाण्यायेण्यापासून आपणांस त्रास फार होतो." तेव्हां ते म्हणाले, "लोकांचा विरस करण्यापेक्षां आपणाला थोडासा त्रास झालेला पत्करला."

(२) १९१७ सालच्या कलकत्ता कॉंग्रेसकरितां "होमरूल" स्पेशल निघाली होती. मनमाड स्टेशनवर मी त्यांच्या डब्यांत शिरलों. कॉंग्रेसहून परत येतांना मलाही नागपुरास कीर्तनसंमेलनास जावयाचें होतें. त्या कीर्तनसंमेलनाचे अध्यक्ष लोकमान्य असल्यामुळें मला त्यांच्याशीं पुष्कळ बोलावयाचें होतें. कीर्तनसंस्थेसंबंधीं व संमेलनांत ठराव कोणते करावयाचे याजबद्दल त्यांची माझी पुष्कळ चर्चा झाली. ग्रामपाठशाळेंत आम्हीं केलेल्या विचारांचें व अभ्यासाचें टांचण हि त्यांनीं काळजीपूर्वक वाचलें. यानंतर अनेक गोष्टी निघाल्या, त्यांत नुकत्याच निघालेल्या एका संस्थेसंबंधीं, विशेषत उत्पादक व्यक्तींविषयीं आणि लोकमान्यांनीं त्यांना दिलेल्या सर्टिफिकीटाविषयीं चारदोन गोष्टी विचारल्या. लोकमान्य जरा संतापानें म्हणाले, "अहो! मला कोण मनुष्य कसा आहे हें ठाऊक नाहीं असें समजतां काय? मी प्रत्येक मनुष्याच्या गुणावगुणाची पारख करून आहें. आहे

त्या स्थितींत त्याचा काय उपयोग करून घेता येईल हेंच पहात असावें आणि तुम्हालाहि सरयेचें काम चांगलें करावयाचें असेल तर हेंच केलें पाहिजे."

(३) नागपूरच्या कीर्तनसमेलनास लोकमान्य टिळक आले, त्या वेळीं स्वराज्य-शिष्टाईच्या दौऱ्यात आगगाडींत त्यांच्या पायास दुखापत झाली. धनतोलींत समेलनाचा मंडप होता. लोकमान्य हे लाब बुट्टींच्या बगल्यात उतरले होते. समेलनाच्या पहिल्या दिवशीं अध्यक्षाचें भाषण केल्यावर लोकमान्य गेले. दुसरे दिवशीं विषयनियामक कमिटीस पायामुळें व गावात सकाळीं मिरवणूक निघाली त्या वेळीं मानगड झाल्यामुळें लोकमान्य येऊ शकले नाहींत. समेलनाचे ठराव करावयाचे होते यात एकवाक्यता काहीं केल्या होईना. कृष्णशास्त्री तेलंगानीं, हरिदासाना ' तुमच्यावरही आपत्ति आहे बरें ! ' असा डेंजर सिग्नल दाखविला. सगळाच विचार गोंधळात येणार म्हणून दुपारी मी लोकमान्याकडे बुट्टींच्या बगल्याकडे गेलों. दादासाहेब कापरकर वाट पाहतच होते. आम्ही जाऊन लोकमान्याना सगळा प्रकार निवेदन केला व ' आपण नाहीं आलात तर हें सगळें भागातीं येतें ' असें सांगितलें. लोकमान्य म्हणाले, ' माझा पाय कितीही दुखत असो, मी समेलनाकरिता आलों आहें. आणखी दोन दिवस समेलन लांबलें तरी चालेल. तुमचीं कीर्तनें चालू द्यात. उद्या सध्याकाळीं मी दोन तास येतों व समेलनाचें काम पूर्ण करितों दिवसाचा किंवा वेळाचा प्रश्न माझ्यापुढें नसतो फक्त कार्याचा असतो. तेव्हा तुमचें काम केल्याशिवाय मी काहीं जात नाहीं." दुसरे दिवशीं सायकाळीं लोकमान्य सभेच्यापूर्वी एक तास आले. विषयनियामक मडळात चर्चा केली व " न वदेत् यावनीं भाषा " असें म्हणणाराचें समाधान केलें, व शिफारशींच्या ठरावास अनुकूलता घेतली.

(४) चिकोडी येथें पाहली बेळगाव जिल्हा परिषद झाली. वैष्णवस्वामी त्या वेळीं तेथें होते गीतारहस्यासबधीं वाद करण्याचाच त्याचा हेतु होता. स्वामींच्या मुक्कामीं २।३ तास वाद झाला, त्यात काहींच निष्पन्न असं झालं नाहीं घरीं आल्यावर मीं लो० टिळकाना विचारिलें कीं, ' या वादातून काहीं निष्पन्न झालें नाहींच, पण उलट आपणाला त्रास झाला. ' लोकमान्य म्हणाले, "आम्हा नवीन सुशिक्षिताची विचारसरणी, विषय माडण्याची शास्त्रीय पद्धति आणि अर्वाचीन एकदर जग काय आहे याची कल्पना, जरी एवढ्या वादावरून स्वामींना व त्यांच्या आश्रित शास्त्र्याना आली तरी मी माझ्या श्रमाचें सार्थक झालें असें समजेन."

(५) बेळगाव जिल्ह्याची दुसरी परिषद अथणी येथें झाली. गणेशवाडीच्या मडळींचा लोकमान्याना आपल्या गावीं नण्याचा फार आग्रह होता. लोकमान्यांच्या भोंवतालचे कोणतेही गण हजर नसताना मीं त्यांची भेट घेतली. त्यांनीं गणेशवाडीस येण्याचें कबूल केलें. अथणीहून गणेशवाडीस जाऊन शेडबाळ स्टेशनवर रात्रीं

८ वाजतां Poona Mail गांठावयाची होती. सभेचें काम दोनप्रहरीं १ वाजेपर्यंत लांबलें. बराच उशीर झाल्यामुळें माझी फार त्रेधा उडाली. सभा संपून लोकमान्य बिन्हाडीं जातात तोंच मी त्यांना भेटलों. लोकमान्य म्हणाले, ' आतां मी माझ्या स्वाधीन आहे. शौच, स्नान, जेवण सर्व अर्ध्या तासांत आटपतों; मोटार घेऊन या. ' आश्चर्याची गोष्ट ही कीं, लोकमान्य अवघ्या २० मिनिटांत वरील सर्व गोष्टी आवरून माझीच वाट पहात होते. अंतुकाका फडणिसांनाच येण्यास उशीर लागला. तात्पर्य इतकेंच, एकदां अमुक एक कार्यक्रम करावयाचा म्हणजे लोकमान्य त्यांत निरलस व दक्ष असत.

( ६ ) मोटारचा रस्ता फक्त कागवाडपर्यंत होता. तेथून पुढें सारवट गाडींतून जाऊं लागलों. रस्ता खराब असल्यामुळें गाडींत फार हिसके बसू लागले. मी म्हटलें, 'आपल्याला आज बराच त्रास होतो आहे;' लोकमान्य म्हणाले, 'अहो आगगाडीचे डबेसुद्धां यापेक्षां जास्त हलत असतात. त्रास हा सर्वत्र आहेच. आवडीचें काम असलें म्हणजे त्रास वाटत नाहीं इतकेंच.'

( ७ ) गणेशवाडीस गेल्यावर लोकमान्य आधीं गणपतीचें दर्शन घेऊन नंतर व्याख्यानास आले. दर्शनास जातांना दुतर्फा आरत्या घेऊन स्त्रिया उभ्या होत्या. तो दिवस दिवाळीचाच होता. लोकमान्य प्रत्येक आरतींत रुपरुपाया टाकीत चालले होते. २०।२५ आरत्यांत ओवाळणी टाकल्यावर तेथील व्यवस्थापकांचें नजरेस ही गोष्ट आली. ते लगेच लोकमान्यांकडे आले व ' आपणास जावयास उशीर होईल' असें सांगून त्यांनीं ओवाळण्या पुढें बंद केल्या.

(८) देशभक्त गंगाधरराव देशपांडे यांच्या अध्यक्षतेखालीं चांदा येथें जिल्हा-परिषद होती. वर्धा येथून चांद्याला जाण्याची Railway line ही यथातथाच आहे. लोकमान्य सकाळीं निघाले ते सायंकाळीं ४ वाजतां चांदा स्टेशनवर आले. वाटेंत वरोडा स्टेशनवर इतर सर्व मंडळींचें जेवणखाणें झालें. लोकमान्यांचें मात्र स्नानदेखील झालें नव्हतें. चांदा स्टेशनवर अतिशय गर्दी स्वागतार्थ जमली होती. स्टेशनवर चमत्कार असा झाला कीं, जे स्वयंसेवक लोकमान्यांच्या भोंवतीं गर्दी मोडण्याकरितां होते, तेच त्यांच्या अंगावर पडूं लागले. मग उन्हांत निघालेली मिरवणूक ५ वाजतां बाबासाहेब देशमुखांच्या घरीं आली. लोकमान्य घर गेले व जरा स्वस्थ बसले. अंतुकाका जखम धुवूं लागले. इतक्यांत स्नानास तापून पाणी आलें. लोकमान्यांना त्या दिवशीं अतिशयच त्रास झालेला दिसला. मी म्हटलें, ' आतां या मिरवणुकी वगैरे बंद केल्या पाहिजेत. ' लोकमान्य म्हणाले " अहो, अजून आमच्या लोकांत तारतम्यच नाहीं. आज सकाळीं नागपूरची सर्व मंडळी माझ्या डब्यांतच शिरली. बरें, एकदां भेट झाल्यावर दुसऱ्या डब्यांत बसावें तर तसेंही कोणी नाहीं. माझा पाय मधू, मला सबंध गाडींत पाय लांब करून

बसण्यासही जागा नव्हती. स्टेशनवर आलों तो स्वयंसेवकांनींच माझा कुस्करा केला. अजून लोकांना साधा व्यवहारसुद्धा कळत नाहीं अशी स्थिति आहे पण यातच काम करावयाचें आहे.'

(९) लोकमान्य स्वराज्यशिष्टाईकरितां कोलंबोला मुंबईहून मद्रास मेलनें निघाले तळेगाव स्टेशनवर ह. भ. प. पटवर्धनबुवा व मी पुणें स्टेशनवर गर्दी होईल म्हणून भेटण्याकरितां त्यांच्या डब्यांत गेलों. लोकमान्य जागेच होते. नमस्कार केल्यावर लोकमान्य म्हणाले, "आम्ही लंकादहनाला निघालों आहोत आम्ही तेवढें करून येतों. तुम्ही मात्र आतां वानरगण जमवा.' पटवर्धनबुवा म्हणाले 'आपली चळवळ फक्त शहरांतच आहे.' लोकमान्य म्हणाले, अहो खेड्यापाड्यांत चळवळ करण्याकरितांच मला हरिदास पाहिजेत, पुराणिक पाहिजेत फार काय पण याज्ञिकहि पाहिजेत. खेड्यापाड्यांतील अज्ञ समाजांत हा वर्ग जसें काम करील तसें आमच्यानें होणार नाहीं मला प्राशपाठशाळेची उपयुक्तता याच दृष्टीनें वाटते. समर्थांच्या महंतांचें कामच या लोकांनीं आतां करावयास लागलें पाहिजे.'

---

## चित्तरंजनदास

[ बॅरिस्टर, देशबंधु, अखिल भारतीय स्वराज्यपक्षाचे अध्यक्ष, कलकत्ता ]

लो. टिळकाचें राजकारण व्यावहारिक होतें आणि तें दूरवर नजर पोंचविणारें ध्येयनिष्ठ नव्हतें असें वारंवार म्हणण्यांत येतें. त्यांच्या बुद्धीचें वर्गीकरण करण्यास माझी साहजिकच छाती होत नाहीं. कारण जीं माणसें खरोखर मोठीं असतात त्यांच्या स्वभावाचें पृथक्करण करणें कठीण असतें. मी त्यांच्या आयुष्यांतील एकच गोष्ट सांगतों व पुढील निर्णय ठरविण्याचें काम वाचकांवरच सोंपवितों. १९०६ सालीं कलकत्त्यास राष्ट्रीय सभा झाली. तेव्हां लोकमान्य व माझे महाराष्ट्रीय मित्र मजकडे पाहुणे म्हणून राहिले होते. एके दिवशीं लखनौहून एक गृहस्थ त्यांस भेटावयास आला. मीहि तेथेंच होतों. हा गृहस्थ नेमस्त असून जरा रागावून बोलत होता. राष्ट्रीय सभेंत फूट पाडीत असल्याबद्दल त्यानें लोकमान्यांस दोष दिला. तो म्हणाला 'मुसलमान काय करीत आहेत हें तुम्हांस माहीत आहे ? हिंदूविरुद्ध जूट बनवून पॅन इस्लामिझमची चळवळ काढण्याच्या बेतांत आहेत.' टिळक म्हणाले, 'खरें कीं काय !' सदर गृहस्थ अधिकच रागावून म्हणतो, 'खरें म्हणजे ! मी तुमच्याशीं बोलत आहे ही गोष्ट जितकी खरी आहे तितकीच हीहि हकीकत खरी आहे. मीं त्यांचीं पत्रें पाहिलीं आहेत. तुम्ही हिंदूत फूट पाडीत

आहा आणि मुसलमान तुम्हास विरुद्ध टाकण्यास एक होत आहेत ' या वेळी लोकमान्यांनीं असें हास्य केलें कीं, त्याचें वर्णन करणें अशक्य आहे. ते म्हणाले, " मग आमची बंधमोचनाची वेळ जवळ आली म्हणावयाची मुसल्मान एक झाले कीं, सरकार त्यांच्या राशीस लागणार. सरकार त्यांच्या राशीस लागलें कीं, मुसलमान आम्हास येऊन मिळणार. "

यानतर लवकरच राष्ट्रीय सभेस विरोध करण्यास मुस्लीम लीग स्थापन झाली. यानतर लवकरच मुस्लीम लीग राष्ट्रीय सभेशीं मिळून वागू लागली. यानतर लवकरच पजाबात हिंदु मुसलमानांचें ऐक्य हा गुन्हा ठरला. आता काय चालू आहे तें आपणास माहीतच आहे मग लोकमान्यांचें राजकारण व्यावहारिक होतें कीं तें दूरदृष्टीचे ध्येयवादी होतें.

---

## सीताराम केशव दामले

[ बी ए एलएल् बी , माजी संपादक राष्ट्रमत व राष्ट्रोदय, लोकमान्यांचे एक भेदी, पुणें ]

(१) १९०७ सालीं गणपतीच्या उत्सवामध्यें पुण्यास शुक्रवार पेठेंत मायकाच्या गणपतीपुढें लो टिळकांनीं जें व्याख्यान दिलें, त्यात राष्ट्रीय प्रगतीकरिता जाति भेदाच्या काहीं खुळचट कल्पनाना फाटा दिला पाहिजे आणि 'वेदोक्ता'सारखीं प्रकरणें माजवून जातिजातींमध्य दुही माजविता कामा नये असें त्यानीं आपल्या अधिकारयुक्त वाणीनें लोकास बजावून सागितलें राष्ट्रपुरुष हा जर पुरुषसूक्तात वर्णन केल्याप्रमाणें एक देवधारी पुरुष आहे तर अत्यज म्हणजे पायाचा आगठा हा एकाद्या वरील भागाला म्हणजे हाताला किंवा तोंडाला शिवला तर वरच्या भागाला विटाळ झाला असें कोणाला म्हणता यावयाचें नाहीं. सामाजिक सुधारणेच्या कल्पना अशा प्रकारें आपल्याच शास्त्रांतील आधारानें लोकास लो टिळक पटवीत असत.

(२) लो टिळक हे सामाजिक सुधारणेचे द्वेष्टे आहेत अशी खोटीच हूल काहीं लोक उठवितात, म्हणून कित्येक ठिकाणीं त्यांच्याबद्दल व्यर्थ गैरसमज झालेला आहे १९०८ सालीं मे महिन्यातील वऱ्हाडमध्यें फिरत असता जो एक प्रकार घडला तो वाचल्यावर पुष्कळाचा गैरसमज दूर होईल अकोला येथें लो टिळकाचा मुक्काम असता तेथील महार लोकांच्या मनामध्यें त्यास पानसुपारीस बोलवावें असें आलें अकोल्याच्या महारसमाजानें त्या सुमारास आपल्या

शर्तीमध्यें कट करून दारू पिण्याचें दोन महिने अजीबात बंद केलें होतें. तेव्हां महाराच्या वतीनें पानसुपारीस निमंत्रण करण्यास तेथील सुधारक म्हणून गाजत असलेल्या घराण्यांतील एक बी. ए., एलएल्. बी. वकील टिळकांच्याकडे आले. टिळक यानीं कांहींएक काकू न करतां महाराची पानसुपारी स्वीकारण्याचें कबूल केलें व जाहीर रीतीनें त्यानीं खुद्द महारवाड्यांत जाऊन सायंकाळीं व्याख्यानानंतर पानसुपारीचा स्वीकार केला.

(३) लो० टिळकांचे इतर अध्ययनाबरोबर राजनीतिशास्त्राचें अध्ययनहि चालू असेच. राजनीतिशास्त्रावर (Politics) एक विस्तीर्ण ग्रंथ लिहिण्याचें त्यांचे मनांत बरेच दिवस होतें. सन १९०८ सालीं हा विचार त्यांचे मनांत घोळत असतां ॲरिस्टॉटल, प्लेटो, मनु, फ्रीमन, सीली, ब्लटइली इत्यादि विख्यात राजनीतिशास्त्र्यांच्या ग्रंथांचें निरीक्षण करून व प्राचीन आणि अर्वाचीन अशा सर्व साम्राज्यांच्या इतिहासाचें आलोडन करून त्रिकालाबाधित अशीं राजनीतिशास्त्रविषयक सूत्रें ज्यांच्यामध्यें सांगितलेलीं आहेत असा एक विस्तृत ग्रंथ लिहिण्याची त्यांनीं तयारी केली होती व ग्रंथातील निरनिराळ्या अध्यायांचें व भागांचें एक Syllabus किंवा अनुक्रमणिकापत्र त्यांनीं तयार केलेलें प्रस्तुत लेखकाच्या पाहण्यांत आलेलें आहे. या भावी ग्रंथातील विवेचनाबद्दल मुंबईच्या गजबजलेल्या रस्त्यांतून चालतांनाहि ते पुष्कळ वेळां चर्चा करीत असत. या ग्रंथाच्या तयारीकरितां त्यांनीं २५०।३०० ग्रंथ काळजीपूर्वक वाचून ठेविले होते व आणखी २५०।३०० ग्रंथ वाचल्यावर पुढल्या वर्षीच्या उन्हाळ्यामध्यें सिंहगडावर महिना दोन महिने राहून हा ग्रंथ लिहून काढावयाचा त्यांचा विचार होता. पण 'मन एक चिंतितें व दैव दुसरेंच चिंतितें' या म्हणीप्रमाणें पुढला उन्हाळा सिंहगडावर न जातां मंडालेच्या तुरुंगांत जावयाचा आहे याचें कोणाला स्वप्न पडलें होतें !

(४) 'केसरी' पत्र लो० टिळक यानीं स्वतः अंगावर घेतलें, तेव्हां त्या पत्राची सांपत्तिक स्थिति फारच शोचनीय होती. त्या प्रसंगीं लो० टिळक यानीं कोणत्या स्थितींत दिवस काढले याची कल्पना त्यानींच सांगितलेल्या एका गोष्टीवरून करतां येईल. १९०८ च्या उन्हाळ्यात वऱ्हाडांत अकोला येथें त्यांचा रा. देसाई वकील यांच्या घरीं मुक्काम असतां कांहीं गप्पागोष्टी चालल्या होत्या. 'राष्ट्रमत' दैनिक मुंबईस चालविण्यास खर्च वगैरे काय येईल याबद्दल वाटाघाट चालली असतां ते म्हणाले "हल्लींच्या नवीन एडिटरांना खुर्च्या, टेबलें व कपाटें मिळाल्याशिवाय काम करितां येत नाहीं. मी केसरी पत्र प्रथम हातीं घेतलें तेव्हां गादीचें टेबल करून सतरंजीवर बसून लेख लिहावयाचे असा आमचा क्रम असे. शिवाय छापखान्यांतील केसी इकडून तिकडे उचलण्यास देखील आम्ही लागत असू."

(५) एकदा एखाद्या मनुष्याची, एखाद्या पक्षाची किंवा एखाद्या संस्थेची बाजू उचलून धरण्याचें त्यांनीं ठरविलें म्हणजे हरप्रयत्न करून आकाशपाताळ धुंडाळून त्याचे मदतीस धावावयाचें अशा प्रकारची लो० टिळकांना सवयच पडून गेली होती हे शिवरामपंत परांजपे यांना पकडल्याची बातमी समजल्याबरोबर नाशिकास नातवाच्या मुंजीकरितां गेले असतांही एक मिनिटाचा अवधि न लावतां त्यांची स्वारी मुंबईस येऊन धडकली व शिवरामपंत यास पोलिसांच्या चौकींत ठेवतात तोंच त्यास भेटण्याकरितां बळवंतराव हजर !

(६) लो० टिळकांना स्वतःच्या कर्तबगारीची फाजील घमेंड कधींच नसे त्यांनीं म्हटलें कीं, आम्हांला ही गोष्ट करतां येणें शक्य नाहीं तर ते म्हणत कीं तुमच्या वयाचा असतांना मीं ही केली, मग तुम्हांला काय झालें ? तुमचा दृढनिश्चय असेल तर तुम्हांलाहि ही करितां यईल आपल्याप्रमाणें सर्व लोक धडाडीपणानें व दृढनिश्चयानें वागतील तर सर्वांना आपल्यासारखी कृति करितां येईल असें त्याचें म्हणणें असे प्रस्तुत लेखकानें एकदा त्यास म्हटलें कीं, How do you expect us to be all Cæsears आम्ही सर्वांनींच टिळक व्हाव अशी तुम्ही अपेक्षा कशी करितां ? यावर ते म्हणाले कीं, 'मी कांहीं सीशरसा वा अद्वितीय पुरुष नाहीं 'नर करणी करे तो नरका नारायण होय' असा सिद्धांत असतां दृढनिश्चयानें सार्वजनिक काम करावयास काय लागतें ? असें दर्शन पाहिलें तर बळवंतरावा । फाजील अभिमान नव्हता हे स्पष्ट आहे तथापि आपण कांहींतरी अचाट कर्तृत्व करण्याकरितां जन्मास आलों आहों असा विचार त्यांचे मनात येत

चळवळींच्या घुमश्चक्रीमध्यें कदाचित् पडलों नसतों. स्वस्थ वाचीत पडावें व लोकामध्यें फारसें मिसळूं नये असा माझा स्वभाव तरुणपणीं असे व टेबलाशीं बसून लावलचक लेख लिहिण्याचा तर मला मनापासून कंटाळा आहे असे उद्गार ते काढीत. स्वाभाविक आवडीविरुद्ध सार्वजनिक चळवळींच्या एटाटोपामध्यें मी पडलों, परतु एकदा पडल्यावर येईल ती कामगिरी नेटानें व निश्चयानें करीत गेलों म्हणून थोडेसें यश मिळालें.

---

## एस् सत्यमूर्ति

[ बी. ए बी एल् हायकोर्ट वकील, मद्रास, विलायतेस १९१९ सालीं गेलेल्या कांग्रेस डेप्युटेशनचे एक प्रमुख मद्रासी सभासद व स्वराज्यपक्षाचे मद्रासचे एक आमदार सभासद. ]

(१) मी कै. लोकमान्य टिळकांस प्रथम कलकत्त्याच्या राष्ट्रीय सभेंत पाहिलें. टिळक हे कॅाग्रेसच्या प्लॅटफॉर्मवरच एक लोकसत्तेचे मोंचे होते असें नव्हे, तर हें व्रत दिवसाचे चोवीस तासहि ते पाळीत असत ही गोष्ट माझ्या विशेष डोक्यांत भरली. राष्ट्रीय सभेचें काम संपलें कीं, इतर प्रांताचे पुढारी आपल्या खास बगल्यात जाऊन राहत व इतर प्रतिनिधींची काळजीहि करीत नसत. पण टिळकांचें तसें नव्हतें. हा पुढाऱ्यांचा पुढारी महाराष्ट्र प्रतिनिधींतच राही व त्यांचे बरोबरच जेवणखाण करी. टिळकांची अनुयायांवर एवढी विलक्षण छाप कां पडते याचा उलगडा मीं या उदाहरणावरून केला.

(२) टिळक विलायतेस जावयास प्रथम मद्रासेवरून कोल्बोस आले, तेव्हां मद्रासच्या स्वागतकमिटीचा मी चिटणीस होतों. तेव्हां त्यांचा साधा, मनमिळाऊ आणि प्रेमळ स्वभाव माझ्या प्रत्ययास आला. दिवाणबहादुर एस. भवानंदम् पिले हे मद्रासचे डेप्युटी कमिशनर ऑफ पोलीस होते. ते टिळक कोल्बोस जावयाच्या वेळीं एगमोर रेल्वेस्टेशनावर सी. आय. डी. चे स्पेशल अधिकारी म्हणून आले होते. त्यांची व टिळकांची ओळख करून देण्यांत आली. तेव्हां टिळक मजेनें हसले आणि म्हणाले 'स्वराज्य मिळाल्यावर आम्ही तुम्हांस नोकरीवरून कमी करणार नाहीं. पण डेप्युटी कमिशनरच्या जागेवर रखडत न ठेवता पोलीस कमिशनराच्या जागेवर तुमची नेमणूक करूं.'

(३) राष्ट्रकार्यात टिळक खासगी बरे वाईट संबंध विसरून जाण्यास तयार असत. डॉ. बेझंट यांनीं १९१९ सालीं टिळकांविरुद्ध हिंदुस्थानांत दांडगी चळवळ सुरू केली होती. मी व टिळक राष्ट्रीय सभेच्या शिष्टमंडळाचे सभासद या नात्यानें विलायतेस असतां बाईचें इग्लंडांत येण्याचें ठरलें. तेव्हां स्टेशनावर जाऊन बाईंचें स्वागत करण्यास टिळक तयार झाले. या त्यांच्या कृतीनें टिळकांच्या तत्त्वास बाध येईल अशी आम्हाला शंका आली. तेव्हां ते म्हणाले 'डॉ. बेझंट असो किंवा दुसरें कोणी असो, त्यांच्या मदतीनें राष्ट्रकार्य साधणार असल्यास मी आपला खासगी बरा वाईट संबंध त्याच्या आड येऊ देणार नाहीं.'

(४) लंडनहून हिंदुस्थानास येण्यास टिळक व मी एस्. एस्. ईजित बोटी" वरून एकदम निघालों. आम्ही तीन आठवडे एकत्र होतों. मीं त्यांना विचारलें 'आपण परत गेल्यावर समुद्रोल्लंघनाबद्दल प्रायश्चित्त घ्यावें काय?' ते म्हणाले आपण इग्लंडांत स्वार्थासाठीं गेलों असतों तर प्रायश्चित्त घेणें जरूर होतें; पण राष्ट्रकार्यासाठीं गेलों असल्यामुळें प्रायश्चित्ताचें कारण नाहीं.'

(५) आगबोटीवर पुष्कळ युरोपियन प्रवाश्यांनीं 'आर्यांची उत्तर ध्रुवाकडील भूमि' या विषयावर व्याख्यान देण्यास टिळकांस विनंति केली. त्या विनंतीस मान देऊन त्यांनीं एक तासभर भाषण केलें. त्या भाषणांत विद्वत्ता, चिकित्सकपणा, आणि साधी, विनोदी पण परिणामकारक मांडणी पाहून युरोपियन श्रोतृसमाज चित्रासारखा स्तब्ध राहिला.

(६) आम्ही मुंबईस उतरण्यापूर्वींच मॉंटेग्यू-चेम्सफर्ड सुधारणेवरील जॉइंट कमिटीचा रिपोर्ट प्रसिद्ध झाला व आम्ही मुंबईस उतरलों तों बिलहि प्रसिद्ध झालें. मद्रासेस जाण्यापूर्वी मी सरदारगृहांत त्यांच्या आवडत्या खोलींत जाऊन त्यांची भेट घेतली. 'बिलाबद्दल आपलें मत काय?' असें मी त्यांस विचारलें. त्यांनीं अर्थपूर्ण हास्य करून भर्तृहरीचा पुढील श्लोक सावकाश व तालावर म्हणाला:—

रत्नैर्महार्हैस्तुतुषुर्न देवा
न भेजिरे भीमविषेण भीतिम् ।
सुधां विना न प्रययुर्विरामम्
न निश्चितार्थाद्विरमन्ति धीराः ॥

(७) मृत्यूपूर्वी या थोर व देशभक्त पुरुषाची काशीस गांठ पडली. ते व मी काशीस ऑ. इ. कॉ. कमिटीकारितां गेलों होतों. खिलाफत-प्रश्नाचा विचार करण्यास अलीबंधूंनीं त्यास अलहाबादेस येण्याचें निमंत्रण दिलें होतें. तेव्हां राष्ट्रीय सभेत राष्ट्रीय धोरण ठरत असल्यामुळें राष्ट्रीय सभेशिवाय दुसऱ्या कोणत्या प्रकारच्या सभेत आपण हजर राहणार नाहीं, असें त्यांनीं अलीबंधूंस सांगितलें

मद्रासेस त्यानीं यावें अशी आमची इच्छा होती व त्यानीं आपल्या दौऱ्याची तयारी करण्यासाठीं मला सांगितलें होतें, पण त्यांच्या मृत्यूमुळें तो संकल्प जागच्या जागींच राहिला.

---

## वामन मोरेश्वर पोतदार

[ बी ए एलएल बी लोकमान्याचे एक शिष्य, सार्वजनिक सभेचे कार्याध्यक्ष, स्वराज्य पक्षाचे एक प्रमुख सभासद, पुणें ]

( १ ) लोकमान्याशीं प्रत्यक्ष संबंध येण्यापूर्वी लोकमान्यांच्या संबंधाची एक *आठवण अशी आहे कीं, शास्त्रीबुवा हे सन १८७९ चे मे महिन्यांत जे* रत्नागिरीहून पुण्यास आले ते परत गेले नाहींत त्यानीं नोकरी सोडून १८८० पासून न्यू इंग्लिश स्कूल काढलें शास्त्रीबुवांच्या वैयक्तिक आकर्षणानें व पुण्याच्या या 'मॅशुएट पंचायतनाच्या' कीर्तीमुळें रत्नागिरीचे पुष्कळ विद्यार्थी पुण्यास येण्यास उत्सुक झाले व आलेहि. पंचायतनांत टिळक यांचा उल्लेख प्रामुख्यानें होत असे ते एक गणित विषयात 'बाप' च आहेत अशा प्रकारानें त्यांचा नामनिर्देश होत असे.

( २ ) याच तेजस्वितेचा पगडा त्याचे सहाध्यापकांवर थोडा फार असे सन १८८४ च्या 'स्थानिक स्वराज्याच्या' नवीन कायद्याप्रमाणें येथील म्युनिसि-पालिटींत लोकनियुक्त सभासद निवडावयाचे होते. लोकमान्याचे परमस्नेही माधवराव नामजोशी हे वेताळ पेठेतर्फे उमेदवार होते त्यावेळीं 'निवडणूक' ही चीज *नवीनवाळीचीच होती. त्यामुळें मतदारास हा नवा कायदा समजावून देण्याकरितां* वगैरे राटपटी कराव्या लागत व त्या करतांना लोकमान्याकडून त्यांच्या शाळेच्या कामांत केव्हां केव्हां अनियमितपणा घडे. म्हणजे वेळेवर तास न येणें वगैरे हा प्रकार शाळेचे त्या वेळचे प्रमुख ( प्रिन्सिपाल ) कै. वामन शिवराम आपटे यास खपत नसे. परंतु टिळकांच्या आगच्या तेजस्विता, विद्वत्ता वगैरे गुणसमुच्चयामुळें ह्या अनियमितपणाची जाणीव टिळकास ते स्वतः करून देत नसत टिळकहि एखादा तास अगर त्यातील अंश बुडाला तर तो पुढें केव्हां तरी जास्त तास घेऊन भरून काढीत असत.

( ३ ) सन १८८३–८४ सालीं टिळक, गोपाळराव आगरकर व वामनराव आपटे हे तिघे शनवार पेठेंत ताबे यांचे वाड्यांत राहत असत. बर्वेप्रकरणांत

पडलेले डोंगरींतील १०१ दिवस संपल्यावर, सन १८८२-८४ सालीं टिळक व आगरकर यांचे धार्मिक व सामाजिक गोष्टींसंबंधीं फार कडाक्याचे वाद होत मी १८८३ मध्यें इंग्रजी सहावे इयत्तेंत व १८८४ मध्यें सातव्या इयत्तत ( म्याट्रिकचे वर्गांत ) होतों व वर्गांतील 'सेक्रेटरी' या नात्यानें मला त्यांच्याचे वाड्यात जावें लागे, बहुतकरून रविवारीच मी जात असे. एखादे रविवारीं फारच मोठा मौजेचा वाद ऐकावयास सांपडे तो वाद मुख्यत टिळक व आगरकर या दोघा लोकांतच चाले. आपल्याचें त्यात फारसा लक्ष नसे ते आपल्या शाळेच्या कामातच गुतलेले असत मात्र वाद अगदीं मरात येऊन उभयता वादी अगदीं निकरावर आल्यावर आपटे एखाद वाक्य बोलत वाद फार कडाक्याचे होत वादात आगरकर पाश्चात्य 'तार्किकाचा' विशेषेंकरून मिल'चा उल्लेख फार करीत, व मिलचें तर्कशास्त्र त्यास फार पसत असे आमचीं शास्त्रें, पुराणें वगैरे हीं अगदी भाकडकथाच नव्हतीं तरी निरुपयोगी आहेत व त्यामुळें आमच्या समाजाचे फार नुकसान झालें आहे व होत आहे, अर्थात् त्या शास्त्राची कोंडी फोडून बाहेर पडल्याशिवाय आपला समाज सुधारणार नाहीं वगैरे बाजू आगरकर मांडीत व टिळक हे त्यास उत्तरें देताना उलट बाजू मांडीत. टिळकहि वादात पाश्चात्य भौतिकशास्त्रवादी ह्यांच्या मताचा उल्लेख वारंवार करीत प्रा. हक्सले याचा उल्लेख फार होई शिवाय टिंडाल, फॅरेडे व स्पेन्सर याचाहि नामनिर्देश अनेक वेळा होई या वादात आगरकरांच्या मताचा झोक नास्तिकपणाकडे स्पष्ट दिसे, पण टिळकांचा तसा दिसत नसे त्या वादावरून मला वाटे कीं, त्यांचीं मत तेव्हां दृढश्रद्धेचीं नव्हतीं, तीं काहींशीं अज्ञेयवादाचे स्वरूपाचीं होतीं, म्हणजे त्याला इंग्रजींत Agnosticism म्हणतात, तसें दोघेही जाडे विद्वान् व विवादपटु. त्यातल्यात्यात टिळकांच्या बुद्धीची कुशाग्रता व अष्टपैलुपणा याचा त्यास फारच उपयोग होई टिळक हे तेव्हां 'मराठ्या'चे संपादक होते व आगरकर हे 'केसरी'चे संपादक होते परंतु दोही पत्रांतील स्फुटें वगैरे मजकूर बहुतेक एकाच धोरणाचा असे व 'केसरी'चे मजकुरात 'मराठ्या'तील मजकुराचा उल्लेख करताना 'आमचे दादा असें म्हणतात' अशा शब्दांनीं तो होत असे परंतु या एक धोरणाच सोडून काहीं मजकूर लिहिणें झाल्यास संपादक आपाप पत्रात आपल्या सहीनें पत्रादाखल तो प्रसिद्ध करीत असे याप्रमाणें 'केसरीं'त आगरकरांनी आपल्या सहीनें अशा प्रकारचीं काहीं पत्रें प्रसिद्ध केलीं आहेत

(४) सन १९०५ सालीं अक्षेत्र काशी येथें राष्ट्रीय सभेचें २१ वें अधिवेशन होतें, तेव्हां टिळक हे तेथील श्रीकाशीविश्वेश्वराच्या दर्शनास गेले होते परंतु त्या सभेचे अध्यक्ष गोपाळराव गोखले हे देवदर्शनास गेले नाहींत याविषयीं त्यावेळीं काशीकरांत बरीच चर्चा झाली तसेंच ते पंढरपुरास गेले तेव्हां श्रीविठ्ठलाचें दर्शन त्यांनीं घेतलें व १८९७ सालीं त्यास शिक्षा झाली ती एक वर्ष भोगून

ते परत आल्यावर प्रथम कसब्याचे श्रीगणपतीचें दर्शन घेऊन मग ते परमपूज्य अण्णासाहेब पटवर्धन यास भेटण्यास आले व अगोदर घरीं जाऊन आला का असा प्रश्न तेथें निघताच टिळक म्हणाले कीं 'प्रथम श्रीगणपति नंतर तुम्ही,' इतकी त्याची अण्णासाहेबाविषयीं पूज्यबुद्धि होती. आगरकराची मातोश्री वारली तेव्हा त्यानीं धर्मशास्त्राप्रमाणें अत्यविधि केला नाहीं, परतु टिळकानीं पच होदमिशनचें '४२ वें चहाप्रकरण' संपल्यावर प्रायश्चित्त घेतलें. तत्पूर्वी त्यानीं स्मृतिग्रंथ चाळून आपल्या कुशाग्र बुद्धीनें 'चहावाल्या'ची बाजू उचलून धरण्याचा प्रयत्न केला होता, परतु शेवटीं बहुजनसमाजाचे मतास मान देऊन त्यानीं प्रायश्चित्त घेतलें. तसेंच त्यानीं व्रतबंध, विवाह वगैरे आपल्या मुलामुलींचे यथाशास्त्र केलें.

(५) सुमारें ५।६ वर्षांपूर्वी सकेश्वरमठाचे गुरुस्वामी (वाईचे दांडे) व शिष्य स्वामी (वाडीकर) हे येथें आले होते, त्यावेळीं शिष्यस्वामींचें लक्ष व्यावहारिक गोष्टींकडे फारसें नसल्यामुळें कोणी माहितगार गृहस्थ श्रींचा सर्वाधिकारी म्हणून नेमावा अशी कित्येकांची इच्छा होती व त्याप्रमाणे के नाना ओक, अप्पाराव वैद्य वगैरे वरीच मडळी गायकवाडवाड्यात जमली व श्रींचा विचार घेऊन सर्वाधिकारित्वाचें आज्ञापत्रहि माझे नावें काढलें परतु मी तें स्वीकारण्यापूर्वी लोकमान्यानीं मला माझा विचार काय आहे तें पुसलें मीं सांगितलें कीं, सध्या महाराष्ट्रात धर्मग्लानि फार दिसत आहे, धर्मास राजनियत्रण नाहीं त्यामुळें समाज विस्कळित झाला आहे करिता श्रींच्या पीठाचे मदतीनें यास काहीं उपाय झाल्यास पहावा अशा हेतूनें मी हें काम करण्यास तयार आहें. यावर लोकमान्यानीं आपण स्वत याच दिशेनें कसकसे प्रयत्न केले व ते कसे व्यर्थ गेले हें मला सागून म्हटलें कीं 'पहा हें असें आहे. यात तुम्हास यश येईल असें वाटत असल्यास काम पत्करा ' इतकें झाल्यावर तें काम मीं पत्करलें नाहीं हें सागणें नकोच

(६) सन १९१४ सालीं जून महिन्यात लोकमान्य मंडालेहून पुण्यास आले. त्यास भेटण्यास सर्व शहर लोटलें पहिली गर्दी मोडल्यावर मीहि भेटण्यास गेलों. त्यांचे वाड्यात थोरल्या दरवाजापासून तो आत सर्व माणसाचा समुद्रच पसरला होता लोकमान्य घरात झोपाळ्यावर विश्रांति घेत बसले होते मलाहि त्यानी तेथेंच बसवून घतलें नतर काहीं कुशल प्रश्न वगैरे झाल्यावर मी म्हणालों कीं, 'आजपर्यंत दोनतीन तुरुगवासाचे प्रसग झाले. ईश्वराची कृपा व आपली प्रकृति निर्दोष म्हणून त्या प्रसंगातून आपण पार पडला आता वयमानाप्रमाणें आपण ही दगदग न करिता विश्रांति घ्यावी' अशा अर्थाचें माझें भाषण ऐकून किंचित् आश्चर्यचकित व किंचित् रागीट अशा मुद्रेनें मजकडे वळून ते म्हणाले "अहो, मी करीत आहें हें काम कोणी तरी केलेंच पाहिजे आमच्या कृत्याचा परिणाम सरकारचे स्वैर वर्तनास थोडा तरी आळा घालण्याकडे होत आहे. परतु आपण

स्वस्थ बसल्यास हे इंग्रज लोक आपली मुळींच पर्वा करणार नाहींत." सहा वर्षांचा कारागृहवास भोगून आलेल्या व वयाचीं साठ वर्षे भरत आलेल्या एका गृहस्थाचे हे उद्गार आहेत, हें पाहून मी विस्मित झालों.

(७) १९१४ चे सुमारास लोकमान्य, मी व आणखी एकदोन गृहस्थ काहीं बोलत असता सरकारवर टीका करताना 'केसरींत फार कडक भाषा वापरण्यात येते व त्यामुळें प्रतिपक्षी चिडून जातो व टीकेचा व्हावा तितका उपयोग होत नाहीं,' अशाबद्दल बोलणें चाललें असता टिळक एकदम मध्येंच म्हणाले, "अहो, हें पहा वाघ म्हटला तरी खातो व वाघोबा म्हटले तरी खातो, अशी म्हण आहे. आमची भाषा कडक असते म्हणता परंतु मवाळाची अगदीं मऊ भाषा असते ना! मग त्याच्या टीकेचा काय उपयोग झाला आहे व सरकारनें काय दिलें आहे? मग मनातील भावना स्पष्टपणें बोलणें काय वाईट!"

(८) खासगी भाषणामध्यें बळवंतरावजी एखादे वेळीं थोडा विनोदहि करीत हें प्रसिद्ध आहे. तळेगाव येथील जुनें समर्थ विद्यालय स्थापण्याचे कामीं बळवंतरावजींनीं फार मेहनत घेतली होती. तें विद्यालय पुढें सरकारनें बंद केलें. त्यानंतर त्या विद्यालयाची जागाहि नवीन समर्थ विद्यालयास देण्याकरिता त्या जागेचें खरेदीखत १९२० सालीं तयार करण्याचें काम बरेंचसें मजकडे आलें होतें. तें तयार करून टिळकाकडे त्याच्या सहीकरिता नेलें व सही झाल्यावर त्याजवर साक्ष घालण्यास मला अतुकाका फडणीसानीं सांगितलें. परंतु लोकमान्य हसून म्हणाले, "अहो त्याची साक्ष घालू नका. ते आता म्हातारे झाले आहेत. म्हाताऱ्याची साक्ष घालू नये. पुढें कागद शाबीद करण्यास अडचण पडते!" असें विनोदानें म्हणून त्यांनीं अतुकाकास आपली साक्ष घालण्यास सांगितलें.

(९) जुनें समर्थ विद्यालय मोडल्यावर ती जागा, इमारती व इतर सामान तसेंच कायम होतें. त्या ठिकाणीं पुनः राष्ट्रीय शाळा सुरू करण्याकरिता प्रो. विजापूरकर यानीं खटपट चालविली. ती टिळकाच्या मार्फत चालविणें अर्थात् शक्यच नसल्यामुळें प्रो. गोखले याचे मार्फत चालविली. परंतु त्या खटपटीस मूर्त स्वरूप येण्यापूर्वींच गोखले दिवंगत झाले. नंतर माधवरावजी ऊर्फ बाळासाहेब चौबळ याच्या परिश्रमामुळें व सहानुभूतीनें नवीन समर्थ विद्यालय निघालें, परंतु ही खटपट चालली असताना टिळक व विजापूरकर याच्या पूर्वींच्या स्नेहसंबधात बराच बिघाड झाला होता, व जुनें समर्थ विद्यालय मोडल्यावर बरेच वर्षेपर्यंत ती जागा, इमारती वगैरे रिकाम्या पडल्या होत्या. त्या पैसाफंड कारखान्यास याव्या असा विचार त्या जागेच्या दूरदींचा होता. दूरदींत टिळक हे एक होतेच. परंतु हा विचार फलद्रूप होण्यापूर्वींच 'नवीन समर्थ विद्यालय' निघालें. तेव्हा ती जागा व इमारती वगैरे त्यानींच व्यापिल्या. पैसाफंड कारखानामंडळास हें

रुचलें नाहीं. ती जागा वगैरे आपणास मिळावी असें त्यास साहजिकच वाटत होतें, त्याप्रमाणें त्यांनीं त्या जागेपैकीं बराच भाग कारखान्यास मिळावा म्हणून प्रयत्न चालविले. नानासाहेब देशमुख हे कारखानामंडळाचे अध्यक्ष असल्यामुळें त्यांचा काहीं उपयोग आपणास होईल असें त्या मंडळापैकीं काहींस वाटलें असावें. परंतु या गोष्टीचा अखेर निकाल करण्याकरितां मंडळी जमली, तेव्हां लोकमान्यांनीं निक्षून सांगितलें कीं, 'तळेगावची जागा वगैरे ही मूळ राष्ट्रीय शिक्षणाचे कार्याकरितां घेतलेली आहे. ती दुसऱ्या कामास देण्यास मी तयार नाहीं तिचा उपयोग शिक्षणाकडेच होत आहे. सबब मूळ हेतूच्या विरुद्ध त्यांतली वाटेल तितकी जागा इतरास देणें योग्य नाहीं, व याविषयीं कोर्टांत जबानी देण्याचा प्रसंग आला तरी मी असेंच सांगेन' अशा अर्थाचें सुमारें एक तासभर सडेतोडपणाचें *भाषण त्यांनीं केलें. तेव्हां नानासाहेब कारखान्यातील मंडळीस म्हणाले कीं, 'लोकमान्यांनीं जर असे निर्वाणीचे उद्गार काढले तर आतां मी कारखान्याची तरफदारी करणार नाहीं व तुम्हीहि तो नाद सोडून द्या.'*

(१०) सन १९२० सालीं बेळगांवा येथें स्पेशल कॉंग्रेस भरविण्याचें ठरलें होतें. एक ल्हानशी 'आठवण' अशी आहे कीं, ज्या रात्रीं लोकमान्य पुण्याहून मुंबईस गेले व गेले ते पुन पुण्यास परत आले नाहींत–त्या रात्रीपूर्वी दिवस सकाळीं मी त्यांजकडे गेलों असतां ज्या कामाकरितां गेलों होतों तें झाल्यावर मीं सहज विचारलें कीं, 'कॉंग्रेस बेळगांव्यास होणार होती, पण आतां असें प्रसिद्ध झालें आहे कीं, ती जागा बदलून कलकत्त्यास सभा भरणार. हें असें का झालें?' यावर लोकमान्यांनीं साश्चर्य मुद्रेनें उत्तर दिलें कीं, 'अहो हें सर्व त्या नेहरूंनीं केलें आहे. त्यास नवीन असहकारिता पुढें आणावयाची आहे व बेळगांव्यास बहुमत मिळणार नाहीं, याकरितां कलकत्त्यास कॉंग्रेस त्यांनी नेली *तेथें मुसलमानांचीं मतें पुष्कळ असून तीं सर्व गांधींना मिळतील असा त्यांचा भरवसा होता.'*

(११) टिळकांचे विचारांत कोणत्याहि गोष्टीची 'व्यवहार्यता', 'सुसाध्यता' व 'विमृश्यकारिता' या गुणांचें प्राबल्य असे. कोणतीहि गोष्ट करण्यापूर्वी ती व्यवहारदृष्ट्या शक्य आहे काय? ती करणं सोपें आहे काय? वगैरे विचार ते फार करीत व नंतर काय करावयाचें तें ठरवीत व एकदा तसें ठरल्यावर मग 'न प्राणान्ते प्रकृतिविकृतिर्जायते चोत्तमानाम्' या न्यायानें ते आपण आखलेल्या मार्गापासून परावृत्त होत नसत. याविषयीं एक गोष्ट सुमारें ४।५ वर्षांपूर्वींची मला आठवते. एकदां लोकमान्य व दत्तोपंत बेहेरे बोलत बसले असतां मी गेलों. दत्तोपंत हसत हसत अर्थात् विनोदानेंच लोकमान्यास म्हणाले, 'बळवंतराव, *तुम्ही अगदीं आताशा मवाळ झालात बुवा! आम्हाला तुमचें हल्लींचें धोरण अगदीं आवडत नाहीं.'* अशा अर्थाचे बेहेरे यांचे उद्गार ऐकून लोकमान्य जरा

रागावून म्हणाले, ' दत्तोपंत बोलणें सोपें, पण करणें फार कठीण आहे. येथें बसून नुसत्या शिळोप्याच्या गप्पा मारण्यास काय लागतें ! हा पहा, मी आतांच बाहेर पडतों मात्र. माझ्यामागें निदान २५००० तरी माणसें आलीं पाहिजेत ! काय ! आहे कां तयारी ? का आपलें उगाच ' मवाळ झालां, मवाळ झालां, ' म्हणून घोकीत बसावयाचें ? मीं आजपर्यंत यनदशीर मार्गानेंच चळवळ चालविली पण कित्येकांनीं त्याचा विपर्यास केला. आपण करतों त्याची शक्याशक्यता, जनतेची तयारी वगैरे पाहूनच कोणीहि पाऊल टाकलें पाहिजे.' अशा अर्थाचें तें भाषण ऐकून दत्तोपंत गप्पच बसले.

---

## रामकृष्ण दत्तात्रय पंत पराडकर

[ मोरोपंत काव्यग्रंथाचे प्रकाशक, माजी संपादक ' लोकसंग्रह ', मु. किन्हई, जि. सातारा. ]

मोरोपंताच्या हस्तलेखाच्या छायाचित्रांतहि पोकळ व भरीव दोहों तऱ्हेनें दिलेले अनुस्वार मोरोपंताच्या हजारों ग्राहकवाचकाच्या नजरेस पडले होते. असें असता वरीलप्रमाणें सूक्ष्म दृष्टीचा प्रश्न करणारे एकटे टिळकच व तेहि मंडाले सोडून आल्याबरोबर मला भेटावे याचें मला आश्चर्य वाटलें. मी दिलेलें उत्तर लोकमान्याना पटलें म्हणून येथेंहि नमूद करतों. मी म्हणालों, "राजवाड्यांच्या या विधानाशीं माझा मतभेद आहे. लिहिता लिहिता हात न उचलतां जेथें अनुस्वार देता आला किंवा द्यावासा वाटला तेथें पोकळ दिला गेला आहे, व जेथें हात उचलून अनुस्वार दिला आहे तेथें तो भरीव पडला आहे, हीच पोकळ व भरीव अनुस्वाराची मला योग्य उपपत्ति वाटते." हें उत्तर पटल्यामुळें समाधान होऊन लोकमान्य कांहीं वेळ बोलत उभे राहिले. ते म्हणाले, "मोरोपंत कवीनें मराठी भाषेला अभियुक्त भाषेचा दर्जा प्राप्त करून दिला असें माझें मत असल्यामुळें मला मोरोपंताबद्दल फार पूज्यभाव वाटतो मागें पागारकराकडून जेव्हां मोरोपंताचें सर्व स्वलिखित ग्रंथभांडार शाबूत आहे असें मला कळलें, तेव्हां तें कायमचें शाबूत ठेवण्याकरिता, पंताचे वंशज हजार दोन हजार रुपये घेऊन देण्यास तयार असतील तर खटपट करण्यासहि मी त्याना बोललों होतों." मी

आल्याबरोबर त्यांनीं पहिल्यानें जर कशाचा कबजा घेतला असेल तर आपल्या लायब्ररीचाच. हा देखावा माझे नजरेस पडून, पूर्वीइतकें लायब्ररीचें रान आतां मोकळें राहिलेलें नाहीं, किल्ल्या लोकमान्यांजवळ असतात, कोणास कांहीं पुस्तक लागल्यास त्याची घर्दी खुद्दांपर्यंत पोंचवावी लागते, हा अनुभव मलाहि आला होता. तथापि गीतारहस्य पहिल्यानें छापण्याचे वेळीं लोकमान्यांनीं बोलावलेल्या स्वयंसेवकांत मला गणलें होतें, इतकेंच नव्हे तर, दुसऱ्या आवृत्तीचा योग माझ्या आग्रहानेंच लवकर आणून एक महिन्यांत एकहातीं सर्व पुस्तकें तपासून छापून देण्याची जबाबदारीहि माझेवर सोंपविल्यामुळें परस्परांना परस्परांच्या स्वभावाची वागणुकीची ओळख पटली होती. आपल्या ज्ञानानें या अज्ञानानेंहि पण कोठेंहि कांहीं शंका आली कीं, थेट लोकमान्यांना जाऊन भिडावयाचें व शंकानिवृत्ति होईपर्यंत चिकाटीनें व धीटपणानें वाद घालावयाचा हा माझा स्वभाव त्यांना उमगला होता. मी मोरोपंतांच्या अष्टोत्तरशतरामायणाच्या छपाईच्या कामांत व्यग्र असतां, साररामायणांतील कित्येक प्रस्तारवृत्तें अडलीं, म्हणून सुप्रसिद्ध वृत्तशास्त्री वे. शा. सं. रंगाचार्य रड्डी यांचेकडे मी गेलों. त्यांनीं सांगितलें, हीं वृत्तें लावतां येण्यासाठीं, टिळकांच्या लायब्ररींत वृत्तालंकारांची एक बंगालकडील प्रत आहे ती आणा. मी तरी तहान लागल्यावरच आड खणणारा आळशी मनुष्य असल्यामुळें छापखान्यानें अगदीं गळा धरल्यानंतर रड्डीशास्त्रीबोवांकडे गेलों होतों. त्यांत त्यांनीं टिळकांच्या लायब्ररींतील सदर्भग्रंथाचा हवाला दिल्यामुळें तसाच दोन प्रहरीं २-२॥ चे सुमारास घाईघाईनें वाड्यांत गेलों. पाहतों तों टिळक व मद्रासकडील सुब्राव हे एकांतांत कॉंग्रेससंबंधीं मवाळ-जहाल तडजोडीच्या घाटाघाटींत गुंतले असून, त्याचे चिरंजीव श्रीधरपंत नाकेबंदीचें काम करीत होते. मी दार उघडून आंत पाऊल टाकतों न टाकतों तोंच टिळकांनीं "काय हो! कां आलां?" असा प्रश्न केला; मीहि ती वेळ ओळखून "मला अमुक अमुक पुस्तक पाहिजे आहे. जरा किल्ल्या पाहिजेत" असें आटपतें उत्तर दिलें. पण टिळकांनीं प्रश्न केला "तें वृत्तालंकाराचें बुक तुम्हाला कशाला पाहिजे?" मी उत्तर दिलें,

टीपा तोंडींच सांगून लगेच ' झालें तुमचें आतां काम ? ' असें मला विचारलें. पुनः मी पुस्तकाचें नाव काढताच, ' मी चुकलों असेन असें तुम्हास वाटतें कीं काय ? ' असें मला दरडावलें. पण लोकमान्य चुकले म्हणून मला पुस्तक नको असून, एकवार अशा पुस्तकावर नजर टाकलेली असावी, म्हणून मी ' पुस्तक ' किंवा असें पुटपुटत उभा राहिलों. हें पाहून टिळक म्हणाले, "आता तुमचें काम अडलें आहे म्हणालात, तें अगोदर करा उद्या परवा पुन केव्हां तरी भेटा मग मी तुम्हाला पुस्तक देईन. शिवाय मी डेक्कन कॉलेजांत विद्यार्थी असताना या सर्व प्रस्तारसूत्राची चटकन् समजूत पटण्याकरिता सहज एका कागदावर शिसपेन्सिलीनें एक कोष्टक रचून ठेवलें आहे तोहि कागद शोधून तुम्हाला देईन त्याचा तुम्हाला उपयोग आहे, तो तुम्हीच ठेवून द्या." लोकमान्यांनी अशा रीतीनें माझें तोंड गप्प केल्यामुळें मी आपल्या कामास निघून गेलो व नतर दोन दिवसानी टिळकाना भेटलों, तव्हा त्यांनीं तें वृत्तालकाराचें पुस्तक व तो आपल्या वयाच्या विशीच्या आत लिहून साठीपर्यंत जपून ठेवलेला प्रस्तार–कोष्टकाचा कागद माझे हवाली केला

(३) मी पुण्यात टिळकपक्षाचें दैनिक पत्र काढण्याच्या कल्पनेनें भारून गेलों, तेव्हा टिळक विलायतेंत असल्यामुळें ते या कल्पनेचें स्पष्ट कौतुक करतात किंवा मूक संमतीच दर्शवितात अथवा हा डोईजड बोजा शिरावर घेऊ नये असें सुचवितात यापैकीं काहींच तर्क करता येत नव्हता किंवा सर्वच तर्क सारखे संभवत होते, असें म्हटलें तरी चालेल. टिळकाचा केसरीविषयींचा जाज्वल्य अभिमान मला ज्ञात होता. किंबहुना अशा नमुनेदार अभिमान असल्यावाचून केसरीनें ' सर्व मराठी वर्तमानपत्रांचा शिरोमणि ' हें पद मिळविलेंच नसतें टिळक आपल्या कोणत्याही विचाराचा या लेखाचा फायदा केसरीशिवाय दुसऱ्या नियतकालिकास देण्याचे कामीं फारच कचरत होते व केसरी ऑफिसांतील इतर संपादक मंडळींनी

त्यातहि खुल्या दिलाऐवजीं जुलमाचा रामराम मला अनुभवावा लागल्यामुळें माझा उत्साहभंग होऊन मनाला खेद होई व टिळकाच्या या अतिरिक्त केसरी-प्रेमाबद्दल थोडा रागहि येई. ज्या बातम्या केसरीच्या साप्ताहिकत्वामुळें पडून राहून इतरत्र आगाऊ जाहीर होण्याच्याच स्वरूपाच्या असतात, तेवढ्या तरी लोकसंग्रहानें ताजेपणीं प्रसिद्ध केल्याचें श्रेय मिळवावें अशा वडजोडीच्या विचार-सरणीनें मी वागत असे. विलायतेहून आल्यानंतर उपस्थित झालेल्या वादविवादात रँग्लर परांजप्यांना लोकमान्यांनीं मुंबईच्या क्रॉनिकलमधून दिलेलें उत्तर मुंबईस क्रॉनिकलमध्यें व पुण्यास लोकसंग्रहामध्यें एकदम प्रसिद्ध करण्याचें श्रेय मिळ-विताना मला लोकमान्यांशीं बऱ्याच फटकळपणानें बोलून कार्यभाग साधणें भाग झालें होतें. एके वेळीं लोकमान्यांचा एक खुलासा अगदीं तावडतोब प्रसिद्ध व्हावयास पाहिजे होता; अशा कात्रींत सापडल्यामुळें नाइलाजास्तव लोकमान्यांनीं लोकसंग्रहाला स्वदस्तूरचें आपलेपणाचें सर्टिफिकेट एकदाचें दिलें. पण तें देतानाहि केसरी साप्ताहिक असल्यामुळें गैरसमज चटकन् दूर होण्याकरिता हा खुलासा तुमचेकडे पाठविला आहे असे उद्गार काढल्यावाचून त्याच्यानें राहवलें नाहीं, हें त्याच्या केसरीविषयक अव्यभिचारी निष्ठेचें द्योतक आहे.

(४) लोकसंग्रहाचे बाबतींत माझ्या स्वार्थाच्या भरतीकरिता टिळकांनीं जितका स्वार्थत्याग करावयाला पाहिजे असें वेड माझ्या मनानें घेतलें होतें तितका स्वार्थत्याग टिळकाकडून न घडल्यामुळें माझें मन खट्टू झालें होतें. एका मोठ्या गृहस्थानें मध्यरात्रीं आणून दिलेला मजकूर छापण्यालायक आहे किंवा नाहीं याविषयीं संपादकीय ऐटीनें विचार करण्याचे भरीस न पडता, मजकूर आणून देणारे टिळकसंप्रदायाचे आहेत म्हणून ओवाळयास घसल्याबसल्याच, तो मजकूर नीट कंपोज करून इहवृत्तात वरच्या बाजूस घाला असा हुकूम फर्मावून मीं झोंपीं गेलों. सकाळीं उठतों न उठतों तोंच तुम्हाला दादांनीं (टिळकांना, त्यांचे कारखान्यातील लोक बहुधा दादा म्हणत) आताच्या आता बोलावलें आहे असें एकजण बजावून गेला. इहवृत्तातील मानपत्रवादाच्या वेळचा तो मजकूर टिळकांना रुचला नाहीं व त्याबद्दल त्यांनीं माझी व या लेखकाची अशी खरड काढली कीं, इरसकमहाशयांच्या नेत्रावाटे गंगायमुनाच वाहू लागल्या. माझा खुलासा व समर्थन ऐकून टिळक बोलले कीं, "तुम्ही विनयानें आपणाकडे लहानपणा घेत असला तरी तो इतर व्यवहारात शोभेल, पण वर्तमानपत्राचा व्यवहार असा शोभणार नाहीं. आपण आपल्या वर्तमानपत्रापुरतें सर्व जनापेक्षा शहाणे आहों असा अहंभाव नव्हे, पण आत्मविश्वास धरल्यावाचून कोणत्याहि वर्तमानपत्राला तेज चढत नाहीं. तुम्ही तुमच्या कार्यक्षेत्रात असताना, एरवीं कोण काय पण मी स्वतः येऊनहि, हा मजकूर छापा असें म्हटलें तरी पूज्यभावानें किंवा आपलेपणानें तुम्हीं तो छापता कामा नये. मी माझ्या घरीं शहाणा, तसे तुम्ही

तुमच्या घरीं राहणे राहिले पाहिजे हा वर्तमानपत्राचा धंदा ज्यानें त्यानें आपल्या मनगटाच्या जोरावरच करावा तेव्हा तो उर्जितदशेला येतो हें लक्षात ठेवा। वादात तुम्हाला माहीत असलेल्या कागदाचाहि तुम्ही नीटसा फायदा घेतला नाहीं कागदपत्र येथें माझ्या ड्रावरमध्यें आहेत हें देखील तुम्हाला माहीत हात असें मला वाटतें मग ते कागद घेऊन प्रतिपक्षाच्या वर्तमानपत्र काराला साजेसा वेळींच प्रतिकार तुम्हीं का केला नाहीं?' थोडेसें विषयातर करूनहि टिळक माझेवरच घसरत आहेत असे पाहून मीं म्हटलें, 'आपलें ड्रावरमधील कागदपत्र आपल्या गैरहजेरीत मला बाबानीं घेऊ दिले असते काय?'' मी इतकें बोललों मात्र, लगेच टिळक चवताळून म्हणाले, ' टाकेवर उत्तर देण्याची जबाबदारी तुमचेवर होती, बाबावर नव्हता तुम्ही तुमच्या कार्याकरिता त्या वेळीं त्या कागदपत्राची माझे येथ चोरी केली असती तरी मी धाडसी वर्तमानपत्रकार म्हणून तुमचें कौतुक केलं असतें ' या चौथ्या परिच्छेदातील आठवणींतील शब्द विसरून रहस्यबोधक आठवणीचीच तेवढा आठवण ठेवण्या बद्दल वाचकाना विनंति करण्याची आठवण कायम ठेवणं मला जरूर वाटतें!

(५) उपरिनिर्दिष्ट प्रसगामुळे मला फायदा मात्र निःसशय झाला व तो असा कीं, आपण आपली लायकी पटविल्यावाचून लोकमान्य लोकसंग्रहाला जरूर तितकें जवळ घेणार नाहींत बाकी त्यांच्या मनात याणताहि क्षुद्र मनोविकार नाहीं हें मला कळून चुकलें व पुढें लवकरच प्रत्ययासहि आलं लोकसंग्रहाचा कारभार एकपायीं इमारतीसारखा असतानाच खिलाफतीच्या धारणानें तुर्की राजकारणावर मीं लिहिलेली लेखमाला प्रसिद्ध करीत होतो लेखमाला त्याचे हातची आहे हे तज्ञ सरकारच्या ध्यानात यईपर्यंत बरेच लेखाक प्रसिद्धहि झाले होते एके दिवशीं माझे कानावर माझ्या गुप्त हेराकडून अशी बातमी आली कीं या लेखमालेतील कित्येक लेखाक आक्षेपार्ह ठरवून सरकार लोकसंग्रहावर खटला भरणार आहे व त्यासाठीं भाषांतरें तयार करण्याचेंही काम अमुक ठिकाणीं चाललें आहे व उपजत शौर्यानें नसलें तरी परिस्थितिप्राप्त धैर्यानं मला या प्रसगाला तोंड देणें भाग होतें व तेवढी मनाची तयारीहि त्या वेळीं मी राखून होतों पण खटला होऊन आपण तुरुगात गेल्यास आपल्या मागें लोकसंग्रह कोण चालविणार! या

तुम्हाला कोणीकडून तरी गोत्यात आणावयाचें ठरलें असलें तर तुम्ही मवाळ लिहिलें काय, आणि जहाल लिहिलें काय, सरकारला सारखेंच. सरकार म्हणेल तेथे त्याला राजद्रोहाचें भूत दिसत असतें " मी म्हटलें, " तें सर्व खरें, पण मी तुरुंगात गेल्यावर माझे मागें लोकसंग्रह चालविण्याची व्यवस्था व्हावी " टिळक म्हणाले "तुम्ही एवढेंच लक्षात ठेवा कीं, टिळक पुण्यात मोकळा असून तुमचेंच काय पण कोणाहि व्यवसायबंधूचें वर्तमानपत्र त्याला सरकारच्या रोषाला बळी पडावें लागलें म्हणून बंद पडलेलें पाहणार नाहीं. ज्याचा तो परत आपले जागेवर आल्यावर मुखत्यार आहे " याला म्हणावें पुढारी! पण वैयक्तिक मोठेपणात टिळक डोंगरासारखे मोठे असूनहि सहृदयपणा, कळकळ वगैरे गुणात दुरून-जवळून कोठूनहि पाहिलें तरी सारखेच साजरे आहेत असें कोणाहि रहस्योद्ग्राही प्रवृत्तीच्या माणसास दिसत असे.

करण्याचा मला हुरूप आहे पण शास्त्रीबोवा तो चरकातला चरण शोधून देत आहेत तो हातीं आला कीं माझी पुर्फे तयार आहेत " या उत्तरानें टिळकांचा मोर्चा शास्त्रीबोवाकडे वळला " काय हो, शास्त्रीबोवा! इतका वेळ कसला चरण शोधीत बसला आहा ? " असें टिळकांनीं म्हणताच " नाहीं, झालेंच " असें धावऱ्याधावऱ्याच शास्त्रीबोवानीं उत्तर दिलें " झालेंच काय ? आणि ह्या इतक्या प्रती पुढें माडूनहि तो चरण तुम्हाला अजून सापडत नाहीं ? थावा, मी पाहतों " असें म्हणून टिळकांनीं तेथें पडलेल्या अनेक प्रतींतून त्यांच्या वाचनात आलेली म्हणून नेमकी एक प्रत उचलून घेतली व एक-दोन मिनिटें चाळल्यासारख करून तो चरण शोधून काढला!

(७) प्राय लोकविस्मृतींत पडलेल्या, स्वत टिळकाजवळ नसलेल्या पण त्यांच्या वाचनात येऊन गेलेल्या एका प्राकृत पद्यरूपी गीतेच्या पुस्तकातील वामनाच्या नागावाली मोडणाऱ्या एका श्लोकात मूळ गीतेतील त्या श्लोकाचा भाव नीट उतरला आहे असें यादून टिळकांनीं त्या पुस्तकाचा शोध करावयाची मला आज्ञा केली सुदैवानें तें जीर्ण पुस्तक माझे परमार्थगुरु विष्णुबोवा जोशी वाईकर याच्या संग्रहात आहे हे माझ्या लक्षात होतें, त्यामुळें मी वाईहून बोवासाहेबांकडून सदर पुस्तक आणून लोकमान्यास दिलें पण तें दुसऱ्या आहे, परत केलें पाहिजे वगैरे काहींच मी आत्मप्रौढीकरिता न बोलल्यामुळें, "हें पुस्तक माझेजवळच असू दे, तुम्हाला काय करावयाचें आहे ?' असें म्हणून लोकमान्यांनीं आपल्या रहस्य-सद्धर्मग्रंथसंग्रहात तें ठेवून दिलें व मी पुण्यात आलों त्याच सालीं महाराष्ट्र विद्यालयातील का कोठल्याशा विद्यार्थ्यांपुढें टिळकांनीं दिलेल्या एका व्याख्यानात " सद्धर्मग्रंथसंग्रहाकरिता इपापून थोडें पाप करावें लागतें तरी विद्यार्थी पेशाच्या माणसानें मागेंपुढें पाहू नये " हा त्यांनीं केलेला उपदेश " आधीं केलें मग सांगितलें " या खास आत्मप्रत्ययाच्या कोटींतील आहे, अशी खूणगाठ पडून मला मोठी गमत वाटली

---

## नारायण सदाशिव मराठे

[ बी. ए बी एस सी हे जर्मनींत विद्याभ्यासाकरिता गेले असता महायुद्धाचे आरंभीं याना सरकारनें हिंदुस्थानात आणून कैदेंत ठेविलें होतें धर्म आणि राजकारण याचा मेळ घालूं इच्छिणारे हे ब्रह्मचारी उदड सचार करीत असतात ]

राजकारणी पुरुषाचे आगीं काय काय गुण लागतात याविषयीं निरनिराळ्या प्रसगीं लोकमान्याचे तोंडून जो उपदेश ऐकावयास मिळाला त्यापैकीं काहीं खालीं देत आहे —

(१) राजकारणी पुढाऱ्याचे आगात दोन गुण असावे लागतात एक तर त्याच्या हृदयात प्रखर आग पेटलेली पाहिजे, व दुसरा म्हणजे त्या हृदयाच्या वरच्या बाजूस डोकें बर्फासारखें थड असलें पाहिजे हे दोनहि गुण एकसमयावच्छेदेंकरून नेहमीं ज्या पुरुषाजवळ उत्कटतेनें वास करीत असतील तो पुढारी होण्यास योग्य होय.

(२) राजकारण हा विषय विकाराच्या तीव्रतेनें मनाला भ्रष्ट करणारा आहे तें मन समतोल व शात राखण्याकरिता दररोज किंवा वेळ न मिळाल्यास निदान दर तीन चार दिवसानीं तरी घटका दोन घटका नेहमींच्या सर्व व्यापारापासून मन अगदीं अलग करून शक्य तितकें एकाग्र व शात ठेवण्याचा परिपाठ असावा या योगें अनेक प्रमादापासून बचाव होऊन चित्तशुद्धि राहते.

(३) आपण जी राजकीय चळवळ करू तींत अपयश आलें असता ती सहज क्रमप्राप्त गोष्ट आहे अशी मनाची वृत्ति राहिली पाहिजे. यश येणार नाहीं असें धरूनच चालल पाहिजे माझ्या २५–३० वर्षांच्या अनुभवात अपयश इतकें आगवळणीं पडून गेल आहे कीं, यापुढें जर काहीं चमत्कार होऊन सरकारनें माझ्या खटपटीस यश देण्याचें धोरण सुरू केलें तर मला अगदीं चुकल्याचुकल्या सारखें वाटेल

(४) लोकमान्याचे मृत्यूचे आधीं काहीं महिने लोकमान्याचे धोरणानें सार्वजनिक काम करणारी, सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटीचे धर्तीवर, एक सस्था स्थापन करावी अशाबद्दल त्याच्या काहीं प्रमुख अनुयायानीं विचार काढला होता. त्यासबधीं त्यास भेटण्यास मी गेलों असता लोकमान्य म्हणाले "मला अशी सस्था काढणें हें व्यक्तिशः मुळींच पसत नाहीं कारण ज्याप्रमाणें एका मोठ्या वृक्षाचे छायेंत दुसरा मोठा वृक्ष वाढू शकत नाहीं, त्याप्रमाणें पहिल्या दर्जाचे पुढाऱ्याचे शिक्षणींत त्याच दर्जाचीं माणसें उत्पन्न होत नाहींत. तीं स्वतत्रच आपल्या पायावर उभीं राहतात.

आता 'असा पुढारी कोणी पुढें आलाच नाहीं तर,' असें म्हणाल तर माझा दृढ विश्वास आहे कीं, हिंदुस्थानचा ऊर्जित काल आता समीप आला आहे. अर्थात् उत्तम पुढाऱ्यांची वाण ह्यापुढें परमेश्वर मुळींच पडू देणार नाहीं माझें काम शक्य त्या प्रमाणात मीं केलें. पुढील मार्गाबद्दल माझा परमेश्वरावर विश्वास आहे "

---

## व्यंकटेश भीमराव अलूर

[ बी ए एल्एल् बी वकील, लोकमान्यांचे अनुयायी, गीतारहस्याचे कानडी भाषांतरकर्ते, धारवाड ]

(१) महान् तपस्वी अरविंदबाबू असें प्रतिपादन करितात कीं, सर्व आयुष्यक्रमच एक प्रकारचा पूर्ण योग आहे या प्रतिपादनाची सत्यता लोकमान्यांच्या प्रत्येक कृतींत, त्यांच्या प्रत्येक आचारविचारात पूर्णपणें व्यक्त झाली आहे ज्या *गोष्टींना आम्ही मोठ्या व्यक्तींच्या आयुष्यांतील ठळक गोष्टी समजतों, त्या खरोखरी त्यांना सहज स्वभावसिद्ध असतात* त्यांच्या हातून घडणाऱ्या नैसर्गिक गोष्टींवर आम्ही आमच्या बुद्धीनें कृत्रिम ठळकपणाचा आध्यारोप करतो कै लोकमान्य टिळकांचा सुरत कॅाँग्रेसपासूनच मी जरी अनुयायी होतो, तरी पुढें लवकरच महालेस सहा वर्षे राहण्याचा त्यांना प्रसंग आल्यामुळें त्यांच्याशीं माझा दृढ परिचय झाला नव्हता गीतारहस्याचें कानडी भाषांतर सपर्यंत त्यांच्याशीं माझा केवळ पत्रोपत्रींच परिचय तदनंतर थोड्या दिवसांत त्यांच्याशीं दृढ परिचय होऊन त्यांच्या सांनिध्यात व साहचर्यांत असताना माझ्या भाविक हृदयपटलावर ज्या काहीं दोनचार गोष्टींचा ठसा उमटला आहे, त्यांपैकीं काहीं लोकांपुढें मीं थोडक्यात दिग्दर्शित केल्या आहेत

(२) *लोकमान्यांशीं माझा प्रथम परिचय पत्रोपत्रीं गीतारहस्याच्या कानडी भाषांतरासंबंधीं झाला तत्संबंधीं आमच्यात* जो पत्रव्यवहार झाला आहे तो आजच संपूर्णपणें प्रसिद्ध करणें शक्य व युक्त नसलें तरी त्यावरून त्यांच्या स्वभावाबद्दल काहीं अनुमानें काढल्यास मुळींच अन्यथा होणार नाहींत बारीक सारीक गोष्टींकडे *दुर्लक्ष्य असणें हें सामान्यत मोठ्या व्यक्तीचें लक्षण मानण्यात येते,* परंतु मोठ्या व्यक्तींच्या हातून कोणतेंहि कार्य मूर्त स्वरूपात येण्यास व तें विचारसृष्टीमध्यें विचाराच्याच उपणेनें वाहून न जाण्यास बारीकसारीक गोष्टींकडे लक्ष देण्याचा

गुण त्यांच्यात असणें हें अत्यन्त आवश्यक आहे. हा गुण लोकमान्यामध्यें होता म्हणून त्यांच्या हातून किती तरी महत्त्वाचीं मूर्त स्वरुपास आलीं आहेत. गीतारहस्याचें भाषांतर करण्याचें काम मजकडे सोंपविलें तेव्हां त्यांच्याशीं झालेल्या व्यवहारावरुन मला त्यांच्यातील हा गुण विशेष प्रामुख्यानें दिसला. भाषांतर करतांना हातीं धरण्यास सोईचें जावें म्हणून त्यांनीं गीतारहस्याचे तीन निराळे भाग करून मजकडे पाठविले होते. युद्धमूलक महर्घता वाढण्याच्या अगोदरच छपाईकरितां उत्तम कागद आणवून ठेविले होते, प्रुफें वेळेवर येऊन तीं योग्य रीतीनें वेळेवर दोनतीनदां तपासलीं जातात कीं नाहीं, यावरसुद्धां त्यांची बारीक नजर होती व यासंबधीं सर्व पत्रव्यवहार ते स्वदस्तुर चालवीत, हें पाहुन मला सादर आश्चर्य वाटे.

(२) नोकरशाहीशीं भांडून हायकोर्टामध्यें होमरूलची चळवळ कायदेशीर ठरवून घेतल्यावर लोकमान्य कर्नाटकाची भेट घेण्यास आले होते. कर्नाटकातील त्यांच्या प्रवासात मलाहि त्यांनीं आपल्याबरोबर नेलें होतें. या प्रवासात गदग येथें घडलेल्या क्लिष्ट टर्नरप्रकरणाची लोकांना सामान्य माहिती आहेच. लोकमान्यांची राजकीय चळवळ, आमच्या उदारमतवादी बंधूंच्या चळवळीप्रमाणें कायदेशीरच होती. परंतु दोघांच्या कायदेशीरपणांत एक प्रकारचें विलक्षण वैषम्य दिसून येतें. उदारमतवादी कायदा दाखवील त्या मार्गानें जातात, तर लोकमान्य कायद्याच्या शब्दांनी बंद केलेले काहीं मार्ग सोडून इतर असंख्यात वाटांनीं जात. कायदा म्हणजे निर्जीव शब्दजाल, सजीव चैतन्याला अडविण्याचें सामर्थ्य त्यांच्यात कोठून यणार ! कायदा म्हणजे निर्जीव अर्थबद्ध शब्दांनीं बनविलेला एक साचा त्या साच्यांत हरघडीं स्वरूप बदलणाऱ्या व विकास पावणाऱ्या जिवंत बुद्धीला तो कसा बद्ध करूं शकणार ! लोकमान्य म्हणतात "चळवळीचे कायदेशीर मार्ग अजून संपले नाहींत, तेव्हां बेकायदेशीर चळवळ करण्याचें हूर्त कारण नाहीं" लोकमान्यांचें धोरण कायदेबाजीचें होतें. लोकमान्य स्वतः पक्के कायदेबाज होते व या कायदेबाजीचा त्यांनीं जित हिंदुस्थानचें स्वराज्य प्रस्थापित करण्याकरितां उपयोग केला. लोकमान्य कायदेशीर असल्यामुळें सरकारलाच त्यांची चळवळ मोडण्याकरितां बेकायदेशीर बनावें लागे, अथवा नवीन जास्त जास्त जुलमी कायदे तरी करणें भाग पडे. लोकमान्यांची कायदेबाजी गदगमध्यें घडलेल्या प्रसंगावरून सहज व्यक्त होण्यासारखी आहे. तो प्रसंग असा —

लोकमान्य गदगला आल्यावेळीं तेथील मंडळींनीं अत्याग्रहानें त्यांच्या व्याख्यानाची तयारी केली. टर्नरसाहेब त्या वेळीं धारवाड जिल्ह्याचे कलेक्टर होते, त्या वेळीं त्यांचा मुक्काम गदगला होता. त्यांच्या मनांत तें व्याख्यान कसेंहि करून बंद पाडावयाचें होतें आणि त्यांनीं लोकमान्यांच्या व्याख्यानाला बंदी करणारा हुकूमहि पोलिससाहेबांच्या हातीं दिला होता. प्रत्यक्ष हुकुमाची अम्मल

वजावणी न करता व्याख्यान मोडण्याचे व लोकांना उठवून लावण्याचे, धकाबुकी मामुल्याचे व मुत्सद्याचे पोलिसी सर्व प्रयत्न फसले, व ठरल्याप्रमाणें लोकमान्य व्याख्यानाला उठल्यावर पोलिससाहेबानीं Harangue (प्रक्षुब्ध भाषण) बंदीचा हुकूम त्यांच्या हातात दिला. लोकमान्यांनीं हुकूम हातामध्यें घेतला. हुकूम दृष्टीनें तो वाचून पाहिल्यावर म्हटलें, "Yes, I shall obey the order and yet make speech (होय! मी हुकूम पाळीन व पाळूनसुद्धा भाषण करीन) व त्यानीं पोलीससाहेबास असें म्हटलें कीं, "गदगचे लोक माझें अभिनंदन करणार आहेत, त्याला उत्तरादाखल भाषण (Harangue नव्हे) करण्याची बंदी आहे काय ! या हुकुमावरून तशी बंदी करता येत नाहीं, तेव्हं मी भाषण करणार. तुम्हास मला दस्तगीर करावयाचें असल्यास तसें खुशाल करा" नंतर लोकमान्यांनीं मला एकीकडे बोलावून सांगितलें कीं, "तुम्ही अभिनंदनपर भाषण करून त्यात मीं ज्या मुद्याचा विचार माझ्या भाषणात करणार आहे त्या मुद्याचा उल्लेख करा. मीं उत्तरादाखल केलेलें भाषण प्रक्षुब्ध भाषण (Harangue) होणार नाहीं." इतकें झाल्यावर पोलिससाहेब किंकर्तव्यमूढ झाले व त्यानीं टिळकाना तसल्या भाषणबंदीचाहि हुकूम आणीपर्यंत भाषण न करण्याविषयीं विनंति केली. मीं सुचविलें "पोलिस जाऊं देत. ते परत येईपर्यंत आपलें भाषण सहज चालेल" मला ते म्हणाले, "तुम्ही चुकता! असल्या प्रसंगीं आमचें धोरण सरकारच्या हलगर्जीपणाचा क्षुद्र फायदा घेऊन लोकापुढें फक्त भाषण करावयाचें नसावें. जनतेच्या नजरेपुढें सरकारच्या अन्यायाची मजल कोर्टापर्यंत जाते हें आणण्याचें असावें" त्यानीं पोलिस साहेबांच्या म्हणण्यास रुकार दिला. पोलिससाहेब तास दीड तास बंदीचा हुकूम आणण्यास गेले. टर्नरसाहेबाना अभिनंदनास उत्तरादाखल दिलें जाणारें भाषण बंद करण्यास हुकूम देण्याचें धैर्य होईना, व समारंभ यथास्थित पार पडला. नंतर ते मला म्हणाले, 'मवाळ पक्ष' 'आम्हाला तुरुंगात जाण्याची हौस आहे' असा आमच्यावर आरोप करतो. पोलिसाना कायदेशीर तात्पुरता दस्तगीर करण्याचा अधिकार असल्यामुळें कायद्यानें निकाल मिळेपर्यंत छातीठोकपणा दाखवावा लागतो. भाषण केल्यास दस्तगीर होण्याचा प्रसंग अगावर ओढून घ्यावा लागतो, भाषण न केल्यास जनतेच्या हक्काची पायमल्ली होते. आम्ही छातीठोकपणानें जनतेचें आचारविचारस्वातंत्र्य कायद्याच्या निस्सीम टोकापर्यंत नेऊन भिडविलें पाहिजे"

(४) लोकमान्य धारवाडास आल्यावेळीं त्याच्या दर्शनास आतुर होऊन कितीतरी मोठा जनसमूह रस्त्यारस्त्यानीं उभा होता. लोकमान्य टांग्यामध्यें होते, मी जवळच होतो. टांगा जेव्हा हुब्बेरीसमोरील (आताच्या गांधी) चौकात आला तेव्हा तेथें जमलेला जनसमूह "टिळकमहाराजकी जय" "लोकमान्य

टिळकमहाराजकी जय " असा लोकमान्यांचा जयघोष करू लागला. तो जयघोष ऐकून जनतेच्या सरलतेबद्दल कौतुकानें त्यांच्या डोळ्यातून अश्रु आले. मी त्यांच्या कडे टक लावून पाहू लागलों. ते मला म्हणाले, " अरे, जनता आज कार्यापेक्षा व्यक्तिपूजेला महत्त्व देत आहे. व्यक्तिमहात्म्य कमी होऊन व कार्याचा गौरव वाढून राष्ट्रनिशाणाचा जयघोष करीत ही जनता इतक्याच उत्साहानें नाचू लागेल तर मला अत्यंत आनंद होईल. गुरुपूजा, प्रतिमापूजा या पायरीनें निर्गुण उपासना करण्याचें सामर्थ्य व्यक्तीला येतें. याच हिंदु संस्कृतींतील तत्त्वाचा अखिल राष्ट्राला देशकार्य करण्यास प्रवृत्त करण्याचा उपयोग केला पाहिजे " तेव्हा माझ्या मनात लोकमान्य व्यक्तींच्या गिरवणुकीला व उत्सवाला का महत्त्व देत याचा चटकन् प्रकाश पडला.

ाणि म्हणून तर त्यांना ' कर्मवीर ' ' कर्मयोगी ' असें संबोधिलें तर तें बरोबरीचं पर्यायांतर होईल.

(७) ' भाषावार प्रांतरचनेला भावी स्वराज्यव्यवस्थेंत प्रधानपद मिळालें ाहिजे ' ही कल्पना पसंत पडून त्याप्रमाणें प्रयत्न करणाऱ्या व्यक्तींमध्यें ोकमान्यांना अग्रस्थान द्यावें लागेल. जोसेफ बॅप्टिस्टा यांच्या अध्यक्षतेखालीं ्गें येथें भरलेल्या मुंबई प्रांतिक परिषदेंत लोकमान्यांनीं आणिलेल्या कें ना. ासल्याविषयींच्या दुसऱ्याच्या ठरावास अनुमोदन देण्याकरितां मी उभा राहिलों. ्हां " कर्नाटक भाषेचा हक्क प्रस्थापित करण्याकरितां तुम्ही कानडींतच भाषण रा " असें लोकमान्य मला म्हणाले. त्याप्रमाणें मी तेथें कानडींतच भाषण केलें. ोसेफ बॅप्टिस्टा यांनींहि आपल्या भाषणांत भाषावार प्रांतरचना आवश्यक सल्याचें प्रतिपादिलें होतें. परिषदेनंतर कांहीं दिवसांनीं मिनें दानें मी लोकमान्यांना ्हटलें " आपल्या उपदेशाचें फल म्हणजे कर्नाटक महाराष्ट्रापासून विभक्त व्याचें आहे " त्यावर ते गंभीरतेनें म्हणाले " बरोबरीच तुमच्या चळवळी ततंत्रण चालविण्यास तुम्ही शिकलें पाहिजे. हा पहिला धडा गिरविल्याशिवाय ्वराज्यास तुम्ही कसे पात्र व्हाल ? " या उपदेशाला अनुसरून जेव्हां स्वराज्य ाची कर्नाटकाकरितां निराळी शाखा मागितली तेव्हां त्यांनीं ती दिली. तदनंतर र्नाटकामध्यें स्वतंत्र प्रांतिक परिषद भरविण्याच्या आमच्या कल्पनेला त्यांनीं संपूर्ण म्मति दिली होती. यावरून लोकमान्यांचें हृदय किती उदात्त होतें, त्यांची ष्टि महाराष्ट्रापेक्षा किती विशाल व भविष्यकालांत किती दूरवर प्रवेश करणारी ोती आणि त्यांची बुद्धि किती निर्मल व क्षुद्र अभिमानानें दूषित न झालेली ोती, हें सहज ध्यनांत येणार आहे. लोकमान्यांनीं महाराष्ट्रांतच विशेष कामगिरी ेली असें जरी बाहत दिसलें तरी त्यांची कामगिरी सर्व राष्ट्रीयत्वाला ोकच होती

---

## नरहर गोपाळ सरदेसाई

[ एल् एम् अँड एस् डॉक्टर, प्राच्य विद्याभ्यासी, व्हाइस प्रे भाण्डारकर रिसर्च इं०, पुणें ]

(१) गीतारहस्याच्या टीपेंत लोकमान्यानीं एका लुप्त साख्यकारिकेचा ओझरत उल्लेख केला आहे, त्याचें स्पष्टीकरण करण्यासाठीं त्यानीं 'सकृस रिव्हर्स' व्हा १ अक २ मध्यें एक लेख लिहिला होता त्यात इ स ४०० पासून आजपर्यंत लुप्त असलेली साख्यकारिका टीकेंतील प्रतीकाच्या आधारावर जुळविता येते असें त्यानीं दाखवून दिलें होतें. त्या लेखाविषयीं बोलत असता "हा शोध लागला तेव्हा आपल्या मनास काय वाटलें" असा प्रश्न मीं लोकमान्याना केला तेव्हा ते म्हणाले, "प्रतर्कें जमवून कागदावर लिहून काढलीं व रात्रीं तीं वाचून विचार करीत असता या शोधाच्या खरेपणाबद्दल मनास खात्री पटली. तेव्हा अत्यत समाधान वाटलें व त्या आनदामुळें रात्रभर झोंप आला नाहीं "

(२) लोकमान्यानीं डॉ भाडारकर याच्यासबधीं राजकीय बाबतींत अनेक वेळा कडक टीकात्मक लेख लिहिले होते. त्यावरून दोघात फार वाकडें आलें असेल असा आमचा समज झाला होता परतु भाडारकर इन्स्टिट्यूटची उभारणी करताना लोकमान्याची सल्लामसलत घेण्याची सधी सस्थेच्या उत्पादकानीं अनेक वेळा साधली. त्यात एकदा एका प्रश्नासबधीं डॉ भाडारकराची समति मिळविणें अवश्यक असून ती कशी मिळावी याबद्दल धाराघाट सुरू होती तेव्हा लोकमान्य म्हणाले, ' त्याची तुम्ही काळजी करू नका डॉ भाडारकराची समति आणण्याचें काम माझ्याकडे लागलें माझी त्याच्या जवळ इतकी भीड आहे!"

(३) एकदा लोकमान्याचे घरीं गणपत्युत्सवाबद्दल व्याख्यात्याची यादी चालली होती लोकमान्य सिंहगडास जाण्याचे तयारींत होते मी सहजीं त्या वेळीं तेथें होतें ८।१० व्याख्यात्याचीं नावें आल्यावर लोकमान्यानीं मजकडे बोट करून ' याचें नाव घाला " म्हणून सांगितलें पण माझी तयारी नाहीं, यावर्ळी मला वगळावा अशी माझी विनति ऐकून ते मला म्हणाले कीं, "अहो, तयारी कसली! बोलावयाला उभे राहा म्हणजे झालें,' व रा चपडशास्त्रीबुवाना म्हणाले कीं, "मी याच्या लेक्चरचा अध्यक्ष होतों नाव घाला " लोकमान्य अध्यक्ष असल्यावर विषयहि नवीन पण धार्मिक असला पाहिजे, सबब "Religion as a social force' हा विषय घऊन व्याख्यानाचे मुद्दे टाचून रेमार्केटचे गणपतीसमोर व्याख्यानास सुरुवात झाली लोकमान्य अध्यक्ष, अर्थात् मी व्याख्याता म्हणून नव्हे–लोकाची गर्दी अतिशय झाली टाचण माझें व्याख्यान चालू असताना लोकमान्यानीं नजरेखालीं घातलेंच अतिशय गर्दी झाली होती.

ही लोकमान्याची अमृततुल्य वाणी ऐकण्यासाठींच आहे, ही जाणीव मला पूर्ण असल्यानें, लोकाकडून 'पुरे' शब्द व टाळ्या वगैरे हिस् फिस् होण्यापूर्वीच अर्धा तास व्याख्यान दिल्यावर "पुढील अर्धा विषय लोकमान्य आपणास सागतील" असें सागून मी व्याख्यान पुरें केलें एकदम व्याख्यान बद झाल्यावर लोकमान्य मला म्हणाले, "अहो, हें काय ! तयारी चागली केली असून मध्येंच का थाबलात?" पुढें अर्थात् लोकमान्यानी तोच उरलेला विषय सागताना टावण चागलें केलें आहे असें श्रोतृवर्गास मुद्दाम सागितलें.

(४) वसतो उत्सवात मी एकदा "सुप्रजाजनन" या विषयावर व्याख्यान दिलें. त्याचा गोषवारा 'केसरी'त प्रसिद्ध झालाच होता, पण शेवटीं समारोप करताना लोकमान्यानीं त्या व्याख्याचा मुद्दाम निर्देश करून सागितलें कीं, "ज्यात आमची स्थिति कशी आहे व ती सुधारण्यास काय उपाय केले पाहिजेत याचा विचार केलेला असतो अशींच व्याख्यानें देशाला पाहिजेत "

---

## वासुदेव कृष्ण भावे

[ बी ए उपसपादक केसरी, पुणें ]

(१) सन १९०८ सालाचें पिकेटिंग या चळवळींत लो टिळकाशीं माझा अल्पकाळ अल्पसा निकट सबध आला पुणें जिल्ह्याच्या कलेक्टराचे पर्सनल असिस्टट मि ॲंडरसन याजकडे पिकेटिंगच्या चळवळीमुळें त्याचें नुकसान झालें त्या दारूमक्तेदारानीं चळवळीविरुद्ध कागाळ्या नेल्या ॲंडरसनसाहेबाचा पुणें शहराशीं अधिकारी या नात्यानें काहीचाहि सबध नव्हता तरीपण अधिकारी गोरा असला म्हणजे त्यास कायदेकानू कसे गुडाळून ठवता येतात याचा अनुभव सर्वांस आहेच त्याप्रमाणें साहेबबहादुराची स्वारी लष्करातून पुणें शहरात लाढण्यासारखी घुसली आणि त्यानें प्रत्येक गुत्यावर उभ्या असलेल्या स्वयसेवकाची शेळ्यामेंढ्याप्रमाणें अवस्था करून सोडली गणेश पेठच्या गुत्यावरील स्वयसेवकास साहेबानीं हुसकून लावल्याचें वृत्त मला शनिवारच्या गुत्यावर समजलें व मी आणि माझे मित्र देशपाडे सदर गुत्यावर रखवालीचें काम करण्यास गेलों तों साहेब शहरातील सर्व स्वयसेवकास पळवून लावून लष्करात जाताना गणेश पेठेच्या गुत्यावर पुन आले त्यावेळीं माझी व साहेबाचा एक पार्शी हस्तक आर्देसर यांशीं नाइलानानें मारामारी होऊन मला व माझे मित्र देशपाडे याना गुत्यावर पोलिसानीं बसवून ठेवलें लो टिळक यानीं पिकेटिंगच्या चळवळीचें अप्रयुक्त

सोडून आपली सर्व शक्ति या स्वराज्याच्या चळवळीमध्यें एकवटली पाहिजे. दुसऱ्या गोष्टींकडे लोकांचीं मनें ओढून घेणें मुळींहि इष्ट नाहीं. सरकारला आमचीं मनें निरनिराळ्या चळवळींत गुतलीं जावीं व सर्वांची शक्ति स्वराज्याच्या चळवळींत एकवटू नये, असें मनापासून वाटत आहे. कारण सगळ्या लोकांनीं मनापासून स्वराज्याची चळवळ केली तर त्यास स्वराज्य देणें अपरिहार्य आहे. म्हणून सरकार आमच्या लोकांचीं मनें विविध चळवळींत अनेक युक्त्याप्रयुक्त्या करून खेंचीत असतें. ही गोष्ट पाहून आपल्या लोकांनीं इतर गोष्टींतून आपलीं मनें काढून एकाच स्वराज्याच्या चळवळींत घातलीं पाहिजेत तरच आज आपल्यापुढें असलेलें कार्य होईल

अशा प्रकारें बरेंच बोलणें झालें. त्या सर्व भाषणाचा रोंख 'केवळ स्वराज्याच्या चळवळीसाठींच सर्वांनीं आपणास वाहून घेतलें पाहिजे,' हा होता मला वाटतें जर असें घडलें तर स्वराज्य आपल्या हातातच आहे. पण हिंदुस्थानातील लोकमत आवळ्या-मोवळ्याच्या गाठोड्यासारखें आहे. त्याचें ऐकमत्य केव्हा होईल तो सुदिनच होय।

(२) माझा धंदा चित्रकाराचा होता व त्यामुळें माझ्या मनात लोकमान्यांचें चित्र तेलाच्या रंगात काढावें, असें पुष्कळ दिवसांपासून होतें. पण चित्र फोटोवरून काढण्यापेक्षा तें जर त्यांना समोर बसवून काढलें, तर त्यात सादृश्य अधिक चांगलें वठतें, याकरतां फोटोवरून तें न काढता, त्यांना समोर बसवून काढण्याचा बेत निश्चित केला पण हें घडावें कसें? कारण मी महाराष्ट्राच्या बाहेर रहात असें, त्यामुळें जेव्हा मी पुण्यात येई, तेव्हा लोकमान्यांस सवड नसे व जेव्हां त्यास फुरसत असे, तेव्हा माझा मुक्काम पुण्यास होत नसे. अशा कारणामुळें पुष्कळच वर्षें माझा बेत माझ्याच मनात राहिला!

वेळ सध्या नाहीं, जो वेळ तूर्त मजकडे आहे तो राजकीय चळवळीसाठींच आहे, चित्राची सध्या आवश्यकता नाहीं. "

अशा प्रकारें चित्रासाठीं समोर बसण्याची गोष्ट त्यांनीं टाळली. त्यावर मीं म्हटलें कीं "तास दोन तासापेक्षा मला अधिक वेळ लागणार नाहीं, तेव्हा आपण एवढी विनति अवश्य मानावी." तेव्हा बरेच आढेवेढे घेऊन त्यांनीं दुसरे दिवशीं चित्र काढण्यासाठीं दोन तास बसण्याचें कबूल केलें. या वेळीं माझ्या-बरोबर कै० मनोहरपंत अभ्यंकर होते त्यांनीहि वरील मतानुकूल्य मिळविण्यास बरीच मदत केली. पण त्याच दिवशीं त्यांना दुसरीकडे जरूरीच्या कामासाठीं जावें लागल्यामुळें मिळालेल्या परवानगीचा काहीं एक उपयोग झाला नाहीं व तसा योग पुन केव्हाहि जुळून आलाच नाहीं

(३) अथर्ववेदाच्या काहीं सूक्ताच्या अर्थाची वाटाघाट करण्यासंबधानें मी पुन्हा एकदा लोकमान्यांची गाठ घतली, वरील गोष्टीनंतर सुमारें दोन महिन्यांनीं हा भेटीचा योग आला असावा यावेळा काहीं महत्त्वाचें कागदपत्र पाहून काहीं केस तयार करण्याच्या कामामध्यें लोकमान्य गुंतले होते व तेथें आणखीहि काहीं सद्गृहस्थ त्याच्याशीं त्याच कामानिमित्त आलेले होते या महत्त्वाच्या कामामध्यें ते गुंतले असल्यामुळें अर्थातच त्यावेळीं मला अथर्वसूक्ताची वाटाघाट करता आली नाहीं पण तें काम संपल्यावर त्यांनीं सुमारें अर्धा तास या विषयावर बोलण्यासाठीं दिला त्यावेळीं मी त्या सूक्तासंबधानें जें काय मला म्हणावयाचें होतें तें म्हटलें तेव्हा तें ऐकून घेऊन त्यांनीं मला त्यासंबधानें इतकी माहिती दिली कीं, तरोतर त्यामुळें लोकमान्यांच्या अलौकिक बुद्धिमत्तेचें अत्यंत आश्चर्य वाटलें.

(४) वरील गोष्टी घडल्यानंतर लोकमान्यांवर खटला होऊन त्यास सरकारनें "गीतारहस्य" लिहिण्यासाठीं मंडालेस नेऊन ठेवलें ! तेथें सुमारें अर्धें तप काढून जेव्हां लोकमान्य परत आले, व राजकारणामध्यें भाग घेऊं लागले तेव्हां लखनौच्या कांग्रेसच्या वेळीं माझी व लोकमान्यांची गांठ पडली. लखनौला लोकमान्य ज्या बंगल्यांत रहात होते त्याच बंगल्याच्या दुसऱ्या भागामध्यें मला जागा मिळाली होती सकाळच्या वेळीं मी महाराष्ट्रीय प्रतिनिधींची भेट घेण्यासाठीं म्हणून निघालों व आपल्या खोलीच्या बाहेर पडलों, तों समोरून लोकमान्यहि तेथें आले मी त्यास नमस्कार केला व स्तब्ध राहिलों त्यांनीं मला एक दोन सेकंद निरखून पाहिलें व चटकन् ओळखलें. ते मला ओळखतील असें वाटलें नव्हतें. कारण मी यावेळीं लाहोरास रहात असल्यामुळें माझा पोशाख कोट, बूट, पाटलोण, असा असून डोकीवर कैंसहि वाढलेले होते. अशा पोशाखांत मला त्यांनीं कधींहि पाहिलें नव्हतें, म्हणून मला वाटलें होतें कीं, ते मला ओळखणार नाहींत, पण पहातां तों त्यांनीं ओळखलें व ते म्हणाले कीं– "अहो ! हा थाट कधींपासून केलात ? तुमची भेट अमूक वेळेस अमूक कारणासाठीं पुण्यास झाली होती, त्यावेळीं तुमचा हा पोषाख नव्हता !" असें म्हणून पूर्वींच्या भेटींतील सर्व वृत्तांत त्यांनीं सांगितला केवढा विलक्षण स्मरणशक्ति ही ! पांचसहा वर्षांपूर्वीं झालेल्या भेटींतील लहानसहान गोष्टी इतक्या बिनचूकपणानें लक्षांत ठेवणें, हें लोकमान्यांशिवाय दुसऱ्यास शक्य नाहीं शिवाय या गोष्टी म्हणजे कांहीं महत्वाच्या बाबीहि नव्हत. पण घडलेली गोष्ट म्हणजे लोकमान्यांच्या मेंदूमध्यें अगदीं ब्लॉक होऊन बसे, असें दिसतें असो, याप्रमाणें त्यांचें भाषण झाल्यानंतर पंजाबी लोकांचा निरोप लोकमान्यास पोंचवण्याचें काम मजकडे होतें म्हणून तें काम याच वेळेस केलें. त्यांत विशेष, महत्वाची बाब म्हणजे "लोकमान्यांनीं पंजाबांत एकदां दौरा करावा" ही होय त्यावर लोकमान्य म्हणाले "मी केव्हां तरी तिकडे येणार आहे, पण मला हिंदी भाषेचा थोडासा अभ्यास करून तिकडे यावयाचें आहे !"

हिंदी भाषेचा अभ्यास करून हिंदीमध्यें आपले विचार व्याख्यानाच्या रूपानें सांगतां यावे ही इच्छा या वेळीं लोकमान्यांनीं प्रगट केली व हें साध्य होण्यासाठीं एक हिंदी जाणणारा मनुष्य सहा महिने बरोबर ठेऊन त्याच्याशीं केवळ हिंदीच बोलून हिंदी भाषा ते शिकणार होते व त्यानंतर मग पंजाबचा दौरा ते करणार

बाबू—काय हो, लोकमान्य ! प मालवीयाचें आभारप्रदर्शक भाषण कसें काय झालें ?

लोकमान्य—अहो पाल्बाबू ! मी कांहीं वक्ता नाहीं, तुम्ही आहा नावाजलेले वक्ते ! ! तेव्हां वक्तृत्वाबद्दलची परीक्षा तुम्हींच करू शकाल ती मला कशी करता येईल ?

बाबू—तुम्ही वक्ते नसाल, पण तुमच्या पाठीमागें असा कांहीं 'जोर' आहे कीं, त्यायोगानें तुम्हाला नुसतें लोकापुढें उभे केलें, तरी तुमचें काम होऊं शकतें, तें दोन दोन तास घसा फोडफोडून आमच्याकडून होऊं शकत नाहीं ! काय तुमच्याजवळ अशी जादू आहे, कांहीं समजत नाहीं !

अशा प्रकारें बाल पालाचें चागलें तासभर भाषण होत होतें. विषय निरनिराळे निघाले होते, पण एवढ्याशा वेळामध्यें पाल्बाबूंनीं लोकमान्यांच्या मागें असलेल्या विलक्षण जोराचा उल्लेख अनेक वेळा केला, ही गोष्ट विशेष सांगावयाची आहे. लोकमान्याचें "लोकमान्यत्व" याच पाठीमागें असणाऱ्या विलक्षण जोरामध्यें आहे, हे येथें स्पष्ट होत आहे

(५) कॉंग्रेसच्या पूर्वीच दोनचार दिवस मी अमृतसरला पोंचलों व श्रीस्वामी श्रद्धानदजींच्या आश्रमामध्येंच राहिलों या वेळीं श्री स्वामी श्रद्धानदजींच्या देखरेखीखालीं कॉंग्रेसच्या तयारीचें सर्व काम चाललेलें होतें, कारण स्वागतसभेचे अध्यक्ष श्री श्रद्धानंदच होते संन्याशानें राष्ट्रीय सभेचें काम आपल्या शिरावर घेऊन इतक्या उत्साहानें पार पाडल्याचें हें राष्ट्रीय सभेच्या इतिहासामध्यें पहिलेंच उदाहरण होय

एक संन्यासी स्वागतसभेचे अध्यक्ष, राष्ट्रीय सभेपूर्वीं सरकारानें केलेले पजाबातील अत्याचार, नवीन झालेल्या राज्यशासनव्यवस्थेंतील सुधारणा, लोकमान्यांची स्टेट सेक्रेटरीला गेलेली तार, राजकीय कैदी आयत्या वेळीं सरकारनें सोडल्यामुळें त्यांचें चहूकडे होत असलेलें अपूर्व स्वागत इत्यादि अनेक महत्वाच्या बाबी एकसमयावच्छेदेंकरून घडून आल्यामुळें अमृतसरची कॉंग्रेस म्हणजे क्रांतिकारक कॉंग्रेस होती यात शंका नाहीं, व याच कारणाला ! ठिकाठिकाणचे नेते व इतर जनसुद्धा अमृतसरला कांहीं दिवस आधीं येऊन पोंचले होते !

या सगळ्या गर्दीमध्यें पावसाचीही गर्दी तयार होतीच अशा कॉंग्रेसला पर्जन्यराजाची स्वारी न आली असती, तर जनतेच्या अंतःकरणाची परीक्षाच झाली नसती पाऊस पडून जेव्हां कॉंग्रेसच्या मडपामध्यें व तबूमध्यें गुडघाभर पाणी झालें, तेव्हां अमृतसरच्या उदार रहिवाशांनीं आपलीं राहतीं घरें राष्ट्रीय सभेच्या प्रतिनिधींसाठीं व पाहुण्यासाठीं मोकळीं केलीं हलवायांनीं आपल्या पुरि कचोरीचे दर पाऊणपट केले या वेळीं कित्येकांनीं असें बोलून दाखविलें कीं,

नव्हती ! वरील प्रकारचें बोलणें चाललें असतांना एक पंजाबी गृहस्थ मजकडे वळून म्हणाला—

" क्यों पंडितजी ! अब आपके तिलक महाराज सहकारितावादी बनगये, और कांग्रेसमें श्रीयुत दास बाबू उनका विरोध करेंगे ! समझे ! "

मी म्हटलें—" लालाजी ! वह लोकमान्य तिलक हैं और दुसरे कोई नहीं हैं, जो प्रारंभसे इस समयतक सब नेताओंसे दस कदम हमेशा आगे रहे हैं, और मुझे पूर्ण उमेद है, कि इस समय भी वह कभी पीछे हटनेवाले नहीं हैं ! "

सगळ्या प्रांतांच्या कॅंपामध्यें असाच प्रकारची भवतिनभवति चाललेली होती. इकडे एक एक पुढारी येत होते व त्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें लहान मोठीं थाटाचीं स्वागतें होत होतीं ! स्वगतासाठीं स्टेशनवर व रस्त्यांवर जेथें जेथें माणसें जमत तेथें तेथें विषय हाच होता.

या वेळीं टिळकांचें राजकारणपटुत्व हिंदुस्थानच्या सर्व नेत्यांच्या नजरेस पूर्णपणानें आलें व त्यांच्या बुद्धीची छाप सर्वांवर या वेळीं बसली.

वास्तविक पाहिलें असतां हें एक आश्चर्यच आहे कीं, दासबाबूसारख्या बड्या बॅरिस्टरच्या लक्षांतही "प्रतियोगी सहकारितेचा" आशय येऊ नये! पुष्कळ लोक प्रतियोगी सहकारिता म्हणजे शुद्ध सहकारिताच आहे, असें समजले व "प्रतियोगी" शब्दांतील मेख कोणाच्या लक्षांत आली नाहीं. प्रतियोगी सहकारिता ही शब्दयोजना लोकमान्यांच्या राजकीय बुद्धिचातुर्याची उत्तम साक्ष देत आहे यांत शंका नाहीं.

(६) इच्छाशक्तीचा किंवा मनःशक्तीचा परिणाम शरीरावर होतो व त्यामुळें शीत उष्ण आदि द्वंद्वहि शरीरावर परिणाम करू शकत नाहींत, असें मानसशास्त्राचें मत आहे. ही गोष्ट लोकमान्यांसबंधानें मीं प्रत्यक्ष पाहिली.

अमृतसर व लखनौच्या कॉंग्रेसच्या वेळीं किती थंडी होती व सर्व लोक ओव्हरकोट घालूनहि कसे कुडकुडत असत, हें पुष्कळांस माहीत आहे. पण अशा कडक थंडीमध्येंहि केव्हां केव्हां लोकमान्य नुसता पांढरा सफेत सदरा घालून उघड्या पायांनीं राहत्या बंगल्याच्या गच्चीवरुन इकडेतिकडे फिरत असलेले मीं पाहिलें आहे. या वेळीं कॉंग्रेसच्या ठरावासंबधानें किंवा दुसऱ्या कोणत्या तरी राजकीय विचारानीं लोकमान्यांचें डोकें इतकें भरलेलें असावें कीं त्या योगानें त्यांस बाहेरील सर्दीचें भानहि होत नव्हतें! मनाचा ओघ एका बाजूला पूर्णपणें वाहत असला म्हणजे शरीराच्या स्थितीची त्यास कल्पनाहि होत नसे. असें यावरुन उघड होतें.

परंतु ही कॉंग्रेसची थंडी पुढें लोकमान्यांस बाधली असेंहि विद्वेकाचें मत आहे त्यावेळीं मनःशक्तीमुळें त्यांस थंडीचें भान झालें नाहीं खरें, पण शरीरावर त्याचा परिणाम अनिष्ट झाला असें विद्वेकाचें म्हणणें आहे. कारण लोकमान्य हे पुढें बरेच आजारी झाले होते हें खरें!

---

## वामनशास्त्री किंजवडेकर

[ प्रसिद्ध मीमांसापंडित, संस्कृत विषयाचे प्रोफेसर, न्यू पूना कॉलेज, पुणें. ]

(१) श्रीमंत नामदार दादासाहेब खापर्डे यांनीं पहिल्यानदा लोकमान्यांचा परिचय ग्रंथलेखनाच्या निमित्तानें करून दिला. संस्कारमीमांसा हा आमचा पहिला ग्रंथ तयार होत असतांना लोकमान्यांच्या संग्रहीं असलेल्या ग्रंथसंग्रहालयाचा उपयोग करावा म्हणून त्यांच्या वाड्यांत दोनतीन वर्षें राहण्याचा योग आला.

लोकमान्यांचा सबंध दिवस राजकारणाच्या विचारांत जात असल्यामुळें धार्मिक चर्चा करण्याचा प्रसंग रात्रीवरच अवलंबून असे. आठवड्यांतून दोनचार दिवस तरी रात्रीं नऊ वाजल्यापासून एकदोन वाजेपर्यंत चर्चा होई. चर्चेला वगळले नाहींत असे दिवस वर्षांतून शंभरएक जात असावेत. संस्कारासंबंधीं बोलतांना दृष्टादृष्ट संस्कारफलांविषयीं ते नेहमीं चर्चा करीत असत. त्यांत कांहीं संस्कारांचीं दृष्टफलें ते सांगत असत, तीं सहज विनोदादाखल सांगत असत. जसें, नामकरण हा संस्कार हांक मारल्यानंतर 'ओ' म्हणण्याकरितां आहे, चौल हा संस्कार नसता तर झाड जसें वेलींनीं वांधिलें जातें तसा मनुष्य सबंध केसांनीं व्याप्त झाला असता, इत्यादि. या संस्कारांच्या पद्धति आपल्याच वैदिक समाजांत आहेत असें नव्हे तर त्या आमच्या समजुतीप्रमाणें अत्यंत नास्तिक असलेल्या दुसऱ्या देशांत कांहीं कांहीं प्रमाणानें प्रचलित आहेत. पाश्चात्य ग्रंथांवरून झालेला विचार ते सांगत असत कीं, शरीर, मन, बुद्धि हीं सर्व देशांत थोड्याबहुत प्रमाणांत संस्कृत केलीं जातात; त्यांत वैदिक समाजांत मन व बुद्धि हीं संस्कृत करण्याकडे जितकें लक्ष पुरविलें जातें तितकें इतर कोणत्याहि समाजांत पुरविलें जात नाहीं. इतर देशांत म्हणजे अवैदिक समाजांत स्थूल शरीर संस्कृत करण्याकडे लक्ष जास्त दिलें जातें. तथापि त्यांत सुद्धां एखादा सूक्ष्म बुद्धीचा मनुष्य संस्कारांविषयीं विचार करूं लागला म्हणजे आमच्या अदृष्टफल म्हणून सांगितलेल्या संस्कारावर येऊन पोंचतो, असें म्हणून त्यांनीं लगेच आपल्या ग्रंथसंग्रहालयांतून ऑगस्टस कॉंट (Augustus Comte) याचें पुस्तक काढून त्यानें सुद्धां सांगितलेल्या संस्कारांत अदृष्टफलाच्या संस्कारावद्दल बराच वेळ चर्चा केली. या दिवशीं रात्रीचे दोनतीन वाजले होते. तरी पुनः दुसऱ्या दिवशीं सकाळीं उठल्याबरोबर हाच विषय घेऊन बसले होते. त्यांत विशेष चर्चेचा संस्कार म्हणजे त्यानें (Augustus Comte) सांगितलेल्या संस्कारांपैकीं सपिंडीकरण संस्कार हा होय. हा सर्व प्रकार सांगून ते असें म्हणाले कीं, ज्या संस्कारांविषयीं सूत्रकालाच्या पेक्षांपासून आतांपर्यंत आपल्या वैदिक समाजांत भवति-न-भवति झाली आहे तो संस्कार पाश्चात्य देशांतील अत्यंत नास्तिक म्हणविणाऱ्या तत्त्ववेत्यानें अत्यंत

आवश्यक संस्कारांपैकीं म्हणून ग्रथित केला आहे. असेच त्यानें आणखीहि काहीं संस्कार सांगितले आहेत. म्हणून त्यांनीं त्याच्या संस्काराची यादी वाचून दाखविली होती. ते संस्कार येणेंप्रमाणें —

(1) Presentation (2) Initiation (3) Admission (4) Destination (5) Marriage (6) Maturity (7) Retirement (8) Transformation (9) Incorporation यांतील Incorporation म्हणजे सपिंडीकरण हा संस्कार होय हा अदृष्टफलक असला तरी परपरेनें दृष्टफल संस्कारावर त्याचा परिणाम होतो असे त्याचें मत त्यांनीं प्रतिपादिलें होतें अनेक रंगाच्या संस्कारांना जसें एक चित्र उत्तम कारागीर प्रेक्षणीय करून दाखवितो तसें शरीर, मन व बुद्धि हीं अनेक संस्कारांनीं संस्कृत करून प्राणिमात्राचें अभिष्टसाधन करून देण्याकरितां आश्वलायनप्रभृति सूत्रकारांनीं संस्कार वेदोदधि मंथन करून आपल्या श्रौत व गृह्यसूत्रांत एकाग्निसाध्य व अग्नित्रयसाध्य संस्कार सूचित केले आहेत हे सूत्रकारांनीं सांगितलेले संस्कार नातरीयक आहेत असें समजल्यानंतर पुढच्या ग्रंथकारांनीं यांत काहीं संस्काराची भर घातली हे संस्कार काहीं एका विशिष्ट समाजांत येण्याकरितां असावेत असें ते म्हणत असत. त्याला ते हल्लींची उपमाहि देत असत. कोणत्या तरी एका क्लबांत सामील होणें असल्यास त्या क्लबाचे नियम पाळून त्या क्लबाचा आवण असें म्हणावें लागतें हाहि एक संस्काराचा उपयोग आहे असें म्हटल्यास अन्यथोक्ति होणार नाहीं. अग्नित्रयसाध्य संस्कारहि उत्तरध्रुवाकडे आपले लोक असल्यामुळें तिकडे अत्यंत आवश्यक होते सभ्य व आवसथ्य ह्या दोन अग्नींवरून त्यांनीं ही कल्पना केली होती सभ्य म्हणजे सभा बसण्याच्या जागीं ठेवलेला अग्नि व आवसथ्य म्हणजे भोजन गृहांत असलेला अग्नि यांत सभ्य व आवसथ्य हे वैदिक लोकांचे लौकिक अग्नि असून वैदिक लोक त्यांची शतावधि स्तुति करीत असत व याशिवाय गार्हपत्य, दक्षिणाग्नि व आहवनीयाग्नि हे तीन अग्नि धार्मिक संस्काराचे असून त्यांत होम-हवनादि करीत असत अशी श्रौत व गृह्य संस्काराची व्यवस्था त्याच्या बोलण्यात

श्री. अण्णासाहेब पटवर्धनांशीं बोलतांना असें ठरलें गेलें आहे कीं, मीमांसकांच्या वेळीं आर्य व अनार्य असा जो विचार त्यांनीं आपल्या शास्त्रांत दाखविला आहे तो यापुढें वैदिक व अवैदिक अशा मार्गांत असावा. तेव्हां मी माझ्या हिंदूंच्या लक्षणांत आर्य अनार्य, वैदिक अवैदिक या सर्वांचा समावेश ज्यांत होईल अशीच शब्दयोजना 'हिंदुः सनातनः' या शब्दांत केली आहे. हे सर्व गृह्यसंस्कार सर्वांनीं आश्वलायन सूत्राप्रमाणें करावेत. सर्व शाखांचीं सूत्रें एकत्र करून कांहीं कर्मे जास्त असेल त्यांची गुणोपसंहार न्यायानें एकवाक्यता करून संस्कारानुष्ठान करावें." व तसा ग्रंथ करण्याचें त्यांच्या मनांत बरेंच घोळत होतें; परंतु त्यांच्या विद्वत्तेच्या आवडीचा विषय म्हणजे वैदिक ज्ञानावर ग्रंथ लिहिणें हा होता.

(२) एकदां त्यांनीं ब्रह्मदेशांत असतांना गीतारहस्य लिहिण्याच्या वेळीं ब्रह्मसूत्रभाष्यावर विचारण्यासारख्या थोड्याशा कारिका केल्या होत्या, त्या त्यांनीं सांगितल्यानंतर त्यांना आम्ही असें विचारलें कीं, असे बरेच आपले विषय अपुरे होऊन पडले आहेत. त्यावर ते म्हणाले की, "परिस्थिति राजकारणांत मन वेधून घेत आहे व ज्ञानाची हौस ज्ञानांत ओढून नेत आहे; त्यांत जिचा जास्त जोर तिकडे मला जाणें प्राप्त आहे. तथापि केव्हां केव्हां ज्ञानाची हौस ही परिस्थितीलाहि मागें टाकते याचें चिन्ह हें आहे कीं, माझे ग्रंथांना आरंभ होणें. दुसरा फायदा म्हणजे मी दाक्षिणात्य असल्यामुळें 'आरंभशूराः खलु दाक्षिणात्याः' हें वचन सार्थकीं लागलें तरी कांहीं हें थोडे नव्हे असें ते विनोदानें म्हणत असत.

(३) सांख्य व न्याय इत्यादि दर्शनांपेक्षां पूर्वमीमांसाशास्त्रावर त्यांचें प्रेम जास्त होतें. त्याचें कारण ते असें सांगत असत कीं, "कायद्याच्या अभ्यासापासून तों आजपर्यंत व पुढेंहि जनता व सरकार यांच्याशीं व्यावहारिक अडचणी समक्ष पुढें मांडतांना या शास्त्राचा उपयोग मला विशेष झाला. त्या वेळीं इतर दर्शनांपेक्षां या शास्त्रांत व्यावहारिक अडचणी (कायद्याच्या) दूर करण्याचा भाग बराच आहे असें दिसून आलें. त्या शास्त्रांतील अयर्थ-न्यायावर माझें प्रेम फार आहे. ज्या युक्तीनें कायद्यांत हायकोर्टाला सुधारणा करावी लागली ती याच शास्त्राच्या आधारें होय. वेदांवर कोणत्याहि रीतीनें विचार करून लिहिणारांना या शास्त्राकडे दुर्लक्ष करून चालणार नाहीं असें माझें निश्चित मत आहे. 'आर्क्टिक होम' व 'ओरायन' हे दोनहि ग्रंथ लिहितांना त्या शास्त्राचा वाचनिकांपेक्षां आर्थिक उपयोग बराच झालेला आहे व त्या शास्त्रानें ठरविलेल्या अर्थ लावण्याच्या पद्धतीप्रमाणेंच वरील दोनहि ग्रंथ लिहिले आहेत. या वैदिक वाङ्मयांत ज्या वेळोवेळीं अडचणी (ग्रंथ लावण्याविषयीं) भासतात त्या निवारण करतांना निबंध ग्रंथकार याच शास्त्राचा आधार घेतात. जरी वेदांतील मंत्रभागाचा अर्थ करण्याच्या प्रसंगीं या शास्त्राचा फारसा उपयोग भासत नसला तरी, 'ब्राह्मण' ग्रंथ लावण्याच्या प्रसंगीं या शास्त्रावांचून एक वाक्यहि लागण्याचा संभव नाहीं अशी माझी खात्री

'गीतारहस्य' लिहिताना झाली आहे. अनेक ग्रंथांचीं प्रमाणें एकाच विषयात अहमहमिकेनें आलीं असता त्यांचें बलाबल ठरविण्याविषयीं या शास्त्रात ६ नियम दिले आहेत. तेच नियम कोणत्याहि भाषेच्या विस्तीर्ण व प्रामाणिक वाङ्मयाचा विचार करिताना सर्व ठिकाणीं थोड्याबहुत प्रमाणानें अमलात आणतात. पूर्वमीमांसेचीं सूत्रें हीं सूत्रासारखीं नसून तीं वाक्यार्थप्रतिपादन व्याकरणादि करण्याच्या उपयोगाचीं असल्यामुळें, सूत्राच्या अक्षरार्थाकडे विशेष लक्ष न देता त्या सूत्राचीं जीं विषयवाक्यें मंत्रब्राह्मणादि ग्रंथादिकाचीं असतील त्यांच्या अनुरोधानेंच सूत्राचा अर्थ करावा लागतो. व्यवस्थितपणानें वाङ्मयाची अर्थ लावण्याची पद्धति जर कोणी माडली असेल तर ती या शास्त्रानेंच होय. मनु, याज्ञवल्क्यप्रभृतींनीं धार्मिक व राजकीय व्यवहाराची योग्य दिशा दाखविण्याकरिता जे नियम बांधले ते या शास्त्राच्या आधारेंच होय. पाणिनीय व व काणाद हीं दोनहि शास्त्रें या शास्त्राला उपकारक असल्याचेंच एका अभियुक्तोक्तींत म्हटलं आहे. ती उक्ति अशी—"पाणिनीय च काणाद सर्वशास्त्रोपकारकम्.' शिवाय धर्मशास्त्रात या शास्त्राचाच आधार घेऊन निरनिराळे निर्णयसिंधुप्रभृति निबंधग्रंथ निर्माण झाले आहेत. ज्योतिष, धर्माचार व वैद्यशास्त्र हीं तीनहि थोडीबहुत वेळोवेळीं समाजाच्या उपयोगी पडतील अशींच होणारीं आहेत. धर्मशास्त्रात आपस्तंबीं सांगितलेल्या धर्माची निवडानिवड करून तें शक्य तितकें आचरणात ठेवणें हें शंकराचार्यप्रभृति या व शास्त्राच्या आधारें करू शकले. अत्यंत निग्रहानें व केवळ बुद्धीच्या जोरावर वादविवाद करणारे असे जे योगाचार सौत्रांतिक, माध्यमिक, चार्वाकप्रभृति लोक त्यांच्याशीं वाद करून वैदिक धर्माचें पुनरुज्जीवन करण्याकरिता कुमारिलभट्ट व शंकराचार्यप्रभृतींना जर अत्यंत उपयोगी व शत्रूला अभेद्य असें काहीं उपयोगी पडलें असल तर तें मीमांसाशास्त्रच होय. या मीमांसाशास्त्राच्याच आधारें निरनिराळे वेदांतशास्त्रावर ग्रंथ लिहिणारे पुरुष निर्माण होऊन गेले. द्वैत, विशिष्टाद्वैत, शुद्धाद्वैत, भागवतधर्म, पांचरात्रागमन ग्रंथ व अद्वैत हे सर्व ग्रंथ व हीं सर्व मतें या शास्त्रानें निर्माण केलीं आहेत असें म्हटल्यास अतिशयोक्ति होईल असें वाटत नाहीं. त्या शास्त्राचा आग्रह वर्णाश्रम धर्म हे अधिकारानुसार ज्यानें त्यानें अवश्य पाळले पाहिजेत असा आहे व तो वेदांतशास्त्राशीं विसंगत नसल्यामुळें 'व्यवहारे भट्टनय' अशी म्हण सगळ्या वेदांत्याच्या तोंडीं बसली. या शास्त्राचींच पुष्कळ उदाहरणं देऊन आपलें मत स्थापित केलेले असे ग्रंथ द्वैत, विशिष्टाद्वैतादि होत. एतावता हें शास्त्र राजकीय व धार्मिक व्यवहार यांच्या उपयोगी पडणारें असल्यामुळें प्रत्येकानें हं सगळ नाहीं तर नाहीं, परंतु निदान तें थोडेंस तरी परिचित करून घेणें हें अत्यंत आवश्यक आहे. कायद्याचें नियमन सूत्ररूपानें करण्याची पद्धति जशी आपल्या इकडे आहे तशी पाश्चात्य देशात पूर्वी लॅटिन भाषेमध्यें होती. आज चालू असलेला इंग्रजी

कायदा (प्रिन्सिपल्स ऑफ लॉ) हा सगळा लॅटिन भाषेत सूत्ररूपानें असलेल्या कायद्यावरून घेतला आहे. आज जो 'हिंदु लॉ' म्हणून प्रचलित आहे तो व्यवस्थित स्वरूपाचा नसून केवळ आपला व्यवहारात आपआपसांत तात्कालिक म्हणून स्वीकारलेल्या त्या रूढी दृढमूल मानण्यात येतात त्यावर तो बसविला आहे त्याप्रमाणेच सरकारचे निकाल देण्यात येतात 'हिंदु लॉ' म्हणून शिकविताना व शिकतानासुद्धा त्यांना पूर्वमीमांसाशास्त्राचा गंधहि नाहीं अशा पाश्चात्य विद्वानांनीं 'हिंदु लॉ'वर लिहिलेले ग्रंथ व मनुस्मृत्यादि ग्रंथांचीं केलेलीं भाषांतरें शिकविण्याचा प्रसंग येतो त्यामुळें बऱ्याच वेळा हिंदु–लॉच्या विरुद्धहि गोष्टी समजात येऊ शकतात या सर्व अडचणी दूर होण्यास पूर्वमीमांसेच्या सूत्रांत जीं विषयवाक्यें वेदांतील घेतलीं आहेत त्या स्थानीं स्मृतींतील वाक्यें दाखवून त्यांच्यावर अधिकरणरचना करून निराळा ग्रंथ तयार करावा, व तो लॉ चा अभ्यास करणाराच्या शिक्षणांत असावा तसें झाल्यास त्याचा उपयोग व विद्यार्थ्यांच्या ज्ञानाची वाढ त्यानीनें होईल "

त्यांची पूर्वमीमांसेंतील इतर भागापेक्षा तर्कपादावर फार आसक्ति असे व त्यातील पाद पुन पुन ते वाचीत असत व त्या तर्कपादाप्रमाणच दृष्टींच्या पद्धतीनें तर्कपादावर टीका लिहिण्याचा त्यांचा विचार होता, व त्यातील भट्ट कुमारिल यांची विषय मांडण्याची पद्धति त्यांना अतिशय प्रिय वाटत होती

खंडदेवांनीं पूर्वमीमांसेवर लिहिलेल्या ग्रंथापेक्षा मिश्रांनीं लिहिलेल्या ग्रंथावर त्यांचा आदर फार असे पूर्वमीमांसेंतील शबरस्वामीकृत तर्कपादावर त्यांचा विस्तर फार असून त्या तर्कपादाचीं त्यांनीं बरींच पारायणें केलीं होतीं व तर्कपद्धतीला अत्यंत अनुकूल असा तो ग्रंथ आहे असें त्यांना वाटत असे इतर मीमांसेंतील महत्त्वाचा काहीं काहीं भाग त्यांच्या परिशीलनांत होता एतावता पूर्वमीमांसाशास्त्र हें त्यांच्या विशेष आवडीचें होतें असें त्या वेळीं निदर्शनास आलें असो तेवढ्या वरून मी असें समजतों कीं, कुमारिलभट्टानें बुद्धाशीं वाद करून जो वेदाच्या अपौरुषेयत्वाचा विषय पुढें मांडला व सिद्ध केला तोच ज्योति शास्त्राच्या आधारें पुनें कीं नवें या भाषेंत लोकमान्यांनीं मांडला व वेद हे सर्वांत जुने ठरविले हें कुमारीलभट्टाइतकेंच महत्त्वाचें काम झालें आहे कुमारिलभट्टावरसुद्धा बुद्धाशीं वाद करण्याचा प्रसंग पाली भाषेंतच आला होता तसा यांनाहि वेदाचें प्राचीनत्व परकीय भाषेंतच सिद्ध करण्याचा प्रसंग आला यांत काहीं नवल नाहीं 'आर्क्टिक होम' व 'ओरायन' हे दोनहि ग्रंथ लिहून वैदिक लोकांस त्यांनीं आपलें ऋणी करून ठेविलें आहे असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं इतर कोणताहि सिद्धांत सिद्ध करण्याकरिता ते ग्रंथ लिहिले असले तरी त्या ग्रंथांत वेद अति प्राचीन आहेत हा पूर्वमीमांसाप्रणीत सिद्धांत निर्विवाद सिद्ध झाला आहे. या एकाच उदाहरणावरून त्यांचें पूर्वमीमांसेवरील प्रेम किती होतें हें व्यक्त होण्यास

पुरेसें आहे. गृह्यसूत्रांची एकवाक्यता करून मीमांसेच्या आधारें संस्कारांचें स्वरूप सार्वत्रिक निश्चित करण्याचाहि त्यांचा विचार होता कोठें लॉच्या दृष्टीनें तर कोठें आचारदृष्टीनें पूर्वमीमांसाशास्त्र सार्वकालिक कसें आहे हें जनतेस समजावून देण्याचा प्रयत्न करावा, असें ते निरंतर म्हणत असत, व त्या शास्त्रातील चर्चा करण्याचा प्रसंग त्यांनीं केव्हांहि टाळला नाहीं विषोडी येथें झालेला वाद त्यांनीं याच शास्त्राच्या आधारें पुढें मांडला होता ते विनोदानें बोलतानासुद्धां पूर्व मीमांसापद्धतीप्रमाणें बोलत व विनोदपूर्वक मुद्यानाहि त्या शास्त्रपद्धतीप्रमाणें प्रश्न करीत असो, त्यांची पूर्वमीमांसाशास्त्राविषयीं मतें सूत्ररूपानें अशीं होतीं—

१ पूर्वमीमांसा 'लॉ' च्या उपयोगी पडणारी आहे

२ धार्मिक आचारांत वेळोवेळीं बोलणें झाल्यास अगर त्यांत फरक करणें झाल्यास तो या शास्त्राच्या आधारेंच करता येईल.

३ मनुस्मृत्यादि ग्रंथांतील वाद समजण्यास हें शास्त्र अत्यंत उपयोगी आहे

४ वेदांतील कोणतेंहि अधिकरण या शास्त्रज्ञानाशिवाय यथार्थ कळणें शक्य नाहीं, म्हणून हें शास्त्र त्या शास्त्राला अत्यंत उपयुक्त आहे.

---

## हरी गणेश फाटक

[लोकमान्यांचे भक्त, अप्रगट रीतीनें अखंड सार्वजनिक कार्यकर्ते, महात्मा गांधींच्या प्रेमांतील पुण्याचे एक असहयोगी ]

(१) सुरतेच्या राष्ट्रीय सभेस यवतमाळतर्फे एक प्रतिनिधि या नात्यानें मी हजर होतों लो. टिळक व राष्ट्रीय पक्षाची मंडळी प्रतिनिधींकरिता उभारलेल्या कँपांत न उतरतां गांवांत एकदोन वाडे पाहून त्या ठिकाणीं उतरली होती डॉ. बाबासाहेब परांजपे, कै. दामराव देशपांडे व यवतमाळचे आम्ही दोघेतिघेजण प्रतिनिधींकरितां उभारलेल्या मध्यप्रान्त कँपामध्यें उतरलों होतों हा कँप जवळ जवळ रिकामाच होता आमचेपासून थोड्या अंतरावर मद्रास कँप पडला होता. राष्ट्रीय सभा भरण्याचे पूर्वी एक दिवस लो टिळक आपल्या कांहीं स्नेह्यांसह-वर्तमान मद्रास कँपमधील पुढारी मंडळींशीं संभाषण करण्याकरितां म्हणून आले. कलकत्ता येथें पास झालेल्या ठरावांत कांहीं फेरबदल होणार आहे अशी त्यांना बातमी लागली असल्यामुळें हे फरकार जेथेंकरून टाळता येतील व मूळ ठरावाच्या मागें कॉंग्रेसचा पाय खेंचला जाणार नाहीं अशाविषयीं त्यांची जोरानें खटपट चालू होती ही खटपट करीत असतानाच मद्रास कँपमधील कोण कोण पुढारी

मडळी आपल्या प्रयत्नास अनुकूल आहेत हें पाहण्याच्या इराद्यानें ते मद्रास कँपला भेट देण्याला आले होते. कँपमध्यें शिरताच थोड्याच वेळानें मद्रास इलाख्यातील प्रसिद्ध वर्तमानपत्रकार व राजकीय पुढारी के. जी. सुब्रह्मण्यम् अय्यर याची व लोकमान्याची गाठ पडली मि अय्यर व लो. टिळक बोलत बोलत थोड्याच अतरावर असलेल्या एका निवाऱ्याकरिता उभारिलेल्या छावणीजवळ आले. या ठिकाणीं मि. अय्यर व लो. टिळक यांचें बरेंच वेळ खाजगी सभाषण चालू होतें.

मि. अय्यर हे त्या वेळी महारोगानें फुललेले होते. पण लोकमान्य तोडाशीं तोंड नेऊन अनेक वेळा कुजबुजत, कित्येक वेळा कानगोष्टी करीत केव्हा केव्हा मि. अय्यर हे लोकमान्याचे कानाशीं लागत असा प्रकार चालू होता. हा सर्व प्रकार पाहून जवळ असलेलीं माणसें थोडीं कचरलीं, पण आपण एका स्पर्शजन्य अशा भयकर व्याधीनें ग्रस्त झालेल्या एका गृहस्थाशीं बोलत आहोंत हें लोकमान्याचे ध्यानींहि आहे असें दिसलें नाहीं. एकाद्या कामाचा लोकमान्यानीं ध्यास घेतला म्हणजे त्यामध्य ते किती गर्क होऊन जात हें यावरून उघड होतें.

(२) सुरतेरा राष्ट्रीय सभा मोडल्यावर राष्ट्रीय सभेच्या मडपाभावतीं प्रतिनिधींची व इतर लोकाची फार मोठी विकार गर्दी जमली होती राष्ट्रीय सभेच्या मडपातून नेमस्त पुढारी अगोदरच निघून गेले होते मडपात लो. टिळक व त्याना इजा पोचू नये म्हणून पाचपचवीस व हाड-नागपुराकडील जवान मडळी प्लॅटफॉर्मवर पाहरा राहिली होती. नाहीं म्हणावयास दे लाला लजपतराय हे लोकमान्यापासून काहीं अतरावर एका खुर्चीवर बसले होते बाहेर जमलेल्या गर्दीतून लोकमान्याना मध्यप्रात कँपकडे नेण्यासाठीं राष्ट्रीय पक्षाच्या स्वयसेवकानीं हातात हात घालून राष्ट्रीय सभेच्या मडपापासून तहत मध्यप्रात कँपपर्यंत दुतर्फा उभे राहून रस्ता केला होता रस्ता निर्वेध आहे अशी खात्री झाल्यावर राष्ट्रीय सभेच्या मडपातून लो. टिळकाना घेऊन काहीं प्रतिनिधी मध्यप्रात कँपकडे जाण्यास निघाले लो. टिळक थोडें अतर चालून गेले नाहींत तोंच एका सुरती गृहस्थानें त्याचे अगावर शेणगोळ फेंकण्याकरिता हात उचलला हा गृहस्थ आता लोकमान्याच्या अगावर गोळा टाकणार इतक्यात के. नारायण शिवराम बरवे ह्या प्रसिद्ध गोभक्तानें झटदिशीं ह्या माणसाचा हात धरून लोकमान्याचे अगावर व सुरतकराचे अगावर शेणाचे शिंतोडे उडू दिले नाहींत.

(३) मध्यप्रात वऱ्हाड या कँपात आल्यावर त्या ठिकाणीं के. शिवोपत पारपुर, श्री. देशपांडे व इतर काहीं राष्ट्रीय पक्षाचे गृहस्थ गुंडाचे चढगे मस्तकावर बसून जखमी होऊन विवळत पडलेले त्याचे दृष्टीस पडले. प्रथम त्याचा समाचार घेऊन लोकमान्यानीं त्याच्याशीं चार दोन गोष्टी केल्या. नतर श्री दादासाहेब खापर्डे याची व लोकमान्याची गाठ तेथ पडली. लोकमान्याना पाहून दादासाहेब म्हणाले, "काय बळवतराव, तुम्हास काहीं इजा वगैरे झाली नाहींना!" यावर

लोकमान्य म्हणाले " मला काहीं एक इजा झाली नाहीं मी असा कागावा पुष्कळ पाहिला आहे." लोकमान्यांचे हे शब्द ऐकून मी फार आश्चर्यचकित झालों राष्ट्रीय सभा मोडली, तिचें काम बंद झालें व अनेक वर्षांची ही पवित्र संस्था उधळून गेली हा सव कागाराच काय ! असा मला प्रश्न पडला पण त्याच वेळीं मोर्ले मिंटो सुधारणा जिनत झाल्या या नवीन सुधारणांचें माप नवीन उत्पन्न झालेला राष्ट्रीय पक्ष कॉंग्रेसमध्यें कमजोर केल्याशिवाय आपल्या पदरात पूर्णपणें पडणार नाहीं, अशी त्या वेळच्या मोठमोठ्या नेमस्तांग्रणींची समजूत असल्यामुळे सुरतेस कॉंग्रेस मोडली तरी बेहत्तर पण राष्ट्रीय पक्षाचा हट्ट चालू द्यावयाचा नाहीं असा त्या वेळच्या नेमस्तांचा निर्धार झालेला होता व याकरिता राष्ट्रीय सभा बरखास्त करण्याचं त्यांनीं ढोंग केलं असावं असं वाटून लोकमान्य टिळक मी असे कागावे पुष्कळ पाहिले आहेत' असं उद्गारले असावेत असं दिसतं

(४) सुरतेचा राष्ट्रीय सभा मोडल्यावर आपल्या उत्साहाचा व आपल्या या सव समारंभाचा मोड करणार गृहस्थ हा टिळक आहेत अशी समजूत होऊन सुरती लोक त्यांजवर दातओठ खाऊन जळफळत होते लो टिळकांनीं त्या वेळस जितक्या शिव्या खाल्या, जितकी दूषण सोसलीं व जेवढा अपमान सहन केला तितका अपमान त्यांच्यापूर्वी कधींहि व त्यानंतर कधींहि सव आयुष्यात झाला नसेल राष्ट्रीय सभेच्या आवारातून सुरत शहरातील आपल्या कॅंपकडे लो टिळक एका वगीतून जात असताना त्यांना लोकांनी धिक्कार धिक्कार असा शब्द करून त्यांचा मोठा अपमान केला खवळलेल्या ह्या जनसमूहातून लोकमान्य सुरत शहरात सुरक्षितपण कसें पोहोचतील याचीहि मोठी चिंता टिळकांच्या अनेक अनुयायास वाटत होती प्रभूच्या कृपेन त सुरत शहरात सुखरूप पोहोंचले यानंतर काहीं दिवसानीं लोकमान्य सुरत शहर सोडून मुंबईस परत जाण्यास निघण्यापूर्वी त्यांस एक वृद्ध गृहस्थ खासगी रीतीनें भेटावयास गेले भेटींत या गृहस्थानीं लोकमान्यास अशी विनंति केली कीं 'मला कळतं कीं, काहीं सुरती लोकानीं राष्ट्रीय सभा मोडल्या बद्दल आपल्या मनात डाव धरून आपण मुंबईस जाण्यासाठीं सुरत स्टेशनकडे जात असताना आपणावर हल्ला करावा व आपणास चांगला सरपूस चोप द्यावा असा बेत केला आहे आपल्या सारख्या विद्वान् लोकनायकाचा असा उपमर्द होणं मोठं लाजिरवाणं आहे याकरितां मी आपणास सरकारी पोलिसांची मदत देऊन स्टेशनपर्यंत सुरक्षित पोहोचविण्याची व्यवस्था करतों हे ऐकून लो टिळकांनीं या गृहस्थाच्या सहानुभूतीबद्दल त्यांचे आभार मानून त्यांस कळविलं कीं माझ्या देशबांधवांच्या हातानें सुरत स्टेशनकडे जात असताना सरपूस मार खाऊन मी घायाळ होऊन पडलो तरी चालेल, पण मला सरकारच्या शिपायाची मदत घेऊन सुरतच्या स्टेशनवर जावयाचें नाहीं "

(५) यवतमाळास लोकमान्य प्रथमतः आले, त्या वेळीं ते कै. अण्णासाहेब बापट याचे घरीं उतरले होते. अण्णासाहेब बापट हे लोकमान्याचे फार जुनेपुराणे मित्र. लो. टिळक डेक्कन कॉलेजमध्यें असताना अण्णासाहेब बापट हे त्याचे सहाध्यायी होते. त्यावेळीं यवतमाळास कॅप्टन मोडवी हे डेप्युटी कमिशनरचें काम चालवीत असत. कॅ. मोडवी यानीं लोकमान्याच्या स्वागताची एवढी जय्यत तयारी चाललेली पाहून अण्णासाहेब बापट यास प्रश्न केला कीं, "टिळक यवतमाळास का म्हणून येत आहेत? जणू काय यवतमाळ हा आपला खास जहागिरीचा मुलूख आहे, व या जहागिरींत टिळक पाय ठेवणार! अण्णासाहेब बापट यानीं कॅप्टनसाहेबास रोखठोक जबाव दिला कीं, टिळक हे माझे फार दिवसाचे मित्र आहेत व मी त्यास यवतमाळास बोलावून त्याचें स्वागत करण्याचें ठरविलें आहे.' साहेब लोकात नेहमीं बसणारे उठणारे अण्णासाहेब बापट अशा रीतीनें फिरलेले पाहून कॅप्टनसाहेब आश्चर्यचकित झाले. लोकमान्याच्या या भेटींत अण्णासाहेब बापट यानीं लोकमान्यास मोठी मेजवानी दिली. या मेजवानीस तेथील बहुतक प्रमुख वकील, दोटसावकार व प्रतिष्ठित नागरिक हजर होते. एवढेंच नव्हे तर काहीं वडे वडे सरकारी अधिकारीहि हजर होते. त्या वेळच्या यवतमाळची सुधारकीपणाबद्दल मोठी ख्याति असे व लोकमान्याचे मेजवानीचे प्रसगीं तेथील सर्व सुधारक मडळी सपत्नीक हजर होती. एका मोठ्या हालनात हा मेजवानीचा प्रसग साजरा करण्यात आला. मधोमध लोकमान्याचें पान व आसपास मोठमोठे सुधारक जेवावयास बसलेले असा हा अपूर्व योग होता. सुधारक मडळी शर्ट घालून, स्वच्छ धोतर नेसून पानावर बसली होती लोकमान्य मात्र पिंवळा कद नेसून, गध लावून भोजन करीत होते. या प्रसगावरून आपली जुनी परपरा रक्षण करण्यासबधीं लोकमान्याचा किती आग्रह होता हें सहज कळून येईल.

(६) अण्णासाहेब बापट याचे घरीं लोकमान्य असताना एका गृहस्थानें त्याना सहज प्रश्न विचारला कीं, "माझे एक मित्र मुबई विश्वविद्यालयाचे पदवीधर आहेत गणित विषय घेऊन बी. ए च्या परीक्षेंत ते दुसऱ्या वर्गांत पास झाले आहेत. ज्योतिषशास्त्राचा त्यानीं चागला अभ्यास केलेला आहे व आपल्या हातून काहीं देशसेवा व्हावी अशी त्याना प्रबल इच्छा आहे. सर्व्हट्स ऑफ इंडिया सोसायटीमध्यें सभासद होऊन जावें अशी त्याची इच्छा आहे तर या बाबतींत आपण काय सल्ला देता?" यावर लोकमान्य म्हणाले, "माझी एक सर्व्हट्स ऑफ इडिया सोसायटी आहे या सोसायटीच राजवाडेकर, केळकर, लिमये व मी स्वत असे चौघे सभासद आहोंत. माझ्या या सोसायटीकरिता मला तरुण माणसें पाहिजे आहेत. पण हीं माणसें आपआपल्या वेळीं कॉलेजात परीक्षेत पहिल्या वर्गांत पहिलीं आलेलीं अशीं असावींत." यावरून लोकमान्याच्या

मनात सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटीसारखी देशकार्यास वाहून घेणारी, राष्ट्रीय पक्षाची, अत्यंत बुद्धिमान् लोकांची अशी एकादी सोसायटी असावी असें त्यावेळीं वाटत होतें असें दिसतें.

---

## रामचंद्र वासुदेव दाते

[ कवि, पुण्यातील श्रीगणपत्युत्सवातील मेळ्यांची पदें करणारे, पुणें ]

(१) १९०६ सालीं गायकवाड वाड्यात श्रीगणपत्युत्सवात एके दिवशीं रात्रीं श्रीगजाननापुढें मेळ्याची हजेरी चालू होती लोकमान्यांची स्वारी अंगात एक सद्रा व डोक्यावर एक साधी टोपी ठेवून समोर बसलेली होती. श्रोत्यांची मारे गर्दी उडून गेली होती. अगदीं रेंचारेंच झालेली होती भोरकरांचा मेळा उभा राहिला त्यात काय व्यंग पडलें कळत नाहीं एकाएकी श्रोत्यांकडून हु हाहु शला सुरुवात झाली एवढ्यानेंच थांबलें नाहीं तर कोणी एकानें दोन दगडहि मेळ्यातील मंडळीवर फेंकले पण चमत्कार असा कीं धारीच्या दृष्टीप्रमाणें लोकमान्यांच्या दृष्टीच्या टापूत ती व्यक्ती येऊन या प्रचंड लोकसमुदायातील त्या दगड फेंकणाराचा हात लोकमान्यांनीं अचानक जाऊन एकदम जाऊन धरला. तेव्हा तो गोंधळून जाऊन त्यानें तो अपराध कबूल केला ! टाळ्यांचा कडकडाट झाला. त्यानें क्षमा मागितली व क्षमाशील लोकमान्यांनीं त्यास सोडून दिलें !

(२) १९०८ मधील पुण्यातील पिकेटिंगच्या चळवळींत एके दिवशीं शनवार पेठेच्या गुत्त्यापुढें मी पिकेटिंग करीत होतों स्वयंसेवक ओळखण्याची खूण म्हणून स्वयंसेवकाच्या दंडास काळें फडकें बांधलेलें असे. माझें पिकेटिंगचें काम चालू असता, रोज सायंकाळीं सर्व गुत्त्यांची तपासणी करण्याचा लोकमान्यांचा परिपाठ असे. त्याप्रमाणें ते गाडींतून तेथें येतात तों एका दारूड्याच्या पाया पडून तू गुत्त्यात जाऊ नकोस असें हात जोडून मी त्यास विनवीत असता त्यानें एकदम फाड्कन माझ्या कानशिलात मारलेली त्यांनीं पाहिली चटकन् एकदम गाडींतून उतरून स्वतःच्या मुलाप्रमाणें त्यांनीं मला जवळ घेऊन माझ्या अंगावरून हात फिरवून ते मला म्हणाले, 'अरे, हें हासंच व्हावयाचें आपल्या भावास दुर्वर्तनापासून निवृत्त करीत असता येईल तें संकट सोसणें हें आपणा ब्राह्मणांचें व तुम्हा तरुणांचें कर्तव्यकर्मच आहे आणि म्हणूनच तुम्हा तरुणांवर आमची भिस्त आहे सर्व दृष्टींनीं अनिष्ट अशा परकीय राजसत्तेत स्वजनांचें मन निरुपायास्तव कित्येक वेळा निव्वळ गोडीगुलाबीनेंच वळवावें लागतें. पण लक्षात ठेवा कीं, दारूचा एक गुत्ता बंद केल्यानें त्यास स्वर्गाचें दार खुलें होत असतें '!

---

## लक्ष्मण बळवंत भोपटकर

[ एम् ए एलएल् बी , हायकोर्ट वकील, उपाध्यक्ष पुणें सार्वजनिक सभा, महाराष्ट्रांतील स्वराज्यपक्षाचे एक पुढारी, आमदार पुणें शहर म्युनिसिपलिटीचे एक सभासद ]

(१) राष्ट्रीय बाबतींत निरनिराळ्या धर्मांच्या, पथाच्या व परपरेच्या लोकानीं एकजूट व एकजीव होणें आवश्यक असल तरी इतर बाबतींत त्यानीं आपलें विशिष्ट व सोडून देण्याची जरुरी नाहीं इतकच नव्हे तर तसें करणें इष्टहि नाहीं, असें लोकमान्याचें निश्चित मत होत १९०६।१९०७ सालची ती गोष्ट असावी " पूना यग क्रिकेटियस क्लब " व 'डेक्कन जिमखाना" ह्या दोन्हीहि सस्था मोडून त्याची एक सर्वधर्मीय व सर्वपथीय ( Cosmopolitan ) अशी खेळाडू सस्था बनविण्यात यावी, अशी त्या वेळेस एक चळवळ चाललेली होती या चळवळीच पुरस्कर्ते विशेषत रा रा बळवंत भाजेकर हे होते " पूना यग क्रिकेटियस ' या सस्थेच्या चालकानीं लोकमान्याचा सल्ला या बाबतींत विचारण्याचें ठरविल्यावरून, श्रीमत सरदार बाळासाहेब विंचूरकर याच्या वाड्याच्या तिसऱ्या मजल्यावर बैठक भरविण्यात आली होती या बैठकीस कै भाऊसाहेब विंचूरकर, कै सत्याराहेब आगाशे, ना काळे इत्यादि वीसपचवीस मडळी हजर होती त्या वेळी लोकमान्यानीं रा बळवंत भाजेकर याच्या सर्व मुद्याचें खडन करून आपलें असें स्पष्ट मत सागितलें कीं, "पूना यग क्रिकेटियर्स" ही हिंदु समाजाची म्हणून स्वतत्र सस्था ठेवण्यात यावी, मात्र तिच्या चालकानीं तिचें जिमखाना या व्यापक स्वरूपात रूपातर करावें कै भाऊसाहेब विंचूरकर याना उद्देशून लोकमान्य म्हणाले "भाऊसाहेब, तुम्हाला कोणी कितीहि गळ घातली तरी तुम्ही आपली सस्था मोडून टाकू नका पारशी, मुसलमान व युरोपियन याच्या मात्र अमल्या स्वतत्र सस्था असल्यान, आणि हिंदूची मात्र तशी नसावी, असें काय मोठें हिंदूनीं पाप केलें आहे ? पुणें शहरात खेळाच्या बाबतीत निदान एक तरी अशी सस्था असू द्या का ज्यास हिंदु लोकाना हक्कानें इतर लोकाना ना म्हणता येईल " लोकमान्याच्या उपदेशाप्रमाणें ' पूना यग क्रिकेटियर्स क्लब" या सस्थचें रूपातर "पी वाय सी हिंदु जिमखाना" या सस्थेंत करण्यात आलेलें असून ही सस्था फक्त हिंदु लोकाकरिताच चालविण्यात येत आहे

(२) अगदी नाइ ल असल तरच एखादी निराळी सस्था स्थापन करावयाची नाहीं तर आहेत त्याच सस्था हस्तगत करून घेऊन त्याच्या द्वारें आपल्या मताचा व धारणाचा प्रसार करावयाचा अशा प्रकारें लोकमान्याच्या मनाचा विशेष कल असे यास अनुसरूनच पूर्वी त्यानीं पुणें सार्वजनिक सभा आपल्या ताब्यात

घेतली व पुढें राष्ट्रीय सभा काबीज केली. आपला सहा वर्षांचा तुरुंगवास संपवून लोकमान्य मंडालेहून परत आल्यानंतर राष्ट्रीय सभेत पुन: आपल्या पक्षाचा प्रवेश करून घेण्याबद्दल त्यांच्या मनानें घेतलें, व त्यासंबधानें आपल्या अनुयायांशीं विचारविनिमय करण्यासाठीं त्यांनीं नागपूर ते धारवाडपर्यंतच्या सर्व ठळक ठळक राष्ट्रीयांची सभा बोलाविली होती. त्या सभेंत या प्रश्नाबद्दल बरीच भवति न भवति होऊन अखेरीस बहुमतानें राष्ट्रीय सभेंत घुसण्याचें ठरलें, व बेळगावास प्रांतिक परिषद भरविण्याचेंहि निश्चित करण्यांत आलें. या परिषदेंत जरी दुसरे अनेक ठराव पसार करण्यांत आले, तथापि सर्वांचें लक्ष राष्ट्रीय सभेत पुन: शिरकाव करून घेण्याबद्दलच्या ठरावाकडेच वेधून गेलेलें होतें. लोकमान्यांच्या या धोरणासंबधानें बरेच राष्ट्रीय नाखुष झालेले होते. वरील ठराव परिषदेपुढें मांडण्याची वेळ आलेली असतांना नाखूष झालेल्या राष्ट्रीयांचा घोळका मंडपा बाहेर उभा होता, व त्याच पुढारी कै. अप्पाराव वैद्य यांनीं लोकमान्यांना बाहेर बोलावून घेतलें, व सांगितलें कीं, राष्ट्रीय सभेत जाण्याबद्दलचा ठराव परिषदेपुढें मांडण्यांत येऊं नये. मांडल्यास त्यास विरोध करण्यांत येईल, व जगाच्या दृष्टीनें ही कांहीं चांगलीशी गोष्ट होणार नाहीं. ही विचारसरणी प्रति पादन करणारांमध्यें लोकमान्यांच्या अनुयायांपैकीं पुष्कळशी ठळक मंडळी होती. लोकमान्यांनीं त्यांची समजूत घालण्याचा आपल्याकडून शक्य तितका प्रयत्न केला परंतु तो व्यर्थ गेलासा पाहिल्यावर ते आवेशानें म्हणाले, 'निराळी राष्ट्रीय सभा अस्तित्वांत आणून सरता सुभा स्थापन करण्याचें तुमचें धोरण साफ चुकीचें आहे. इसता कशाला ? आहे त्याच राष्ट्रीय सभेंत घुसून ती काबीज करा व आपल्या कार्याला लागा. याउपरहि जर तुम्हांस ठरावाला विरोध करावयाचाच असेल, तर बेलाशक करा. परिषदेला तो ठराव योग्य वाटल्यास ती त्याचा स्वीकार करील, नाहीं तर तो फेंकून देईल." इतकें बोलून ते मंडपांत निघून गेले. लोकमान्यांचें हें ठाम मत पाहून नाखुषांचा विरोध जागच्या जागीं मावळला, व वादग्रस्त ठराव बिन बोभाट परिषदेनें मान्य केला.

(३) लोकमान्य सामाजिक सुधारणेविरुद्ध होते, यांच्यासारखी चुकीची दुसरी कोणतीहि कल्पना नसेल. ते आपल्या वैयक्तिक संसारांत योग्य अशा सामाजिक सुधारणांचा अवलंब करीत असत, हें सर्वश्रुतच आहे. तसेंच, अस्पृश्यतानिवारणा संबधानेंहि त्यांची पूर्ण सहानुभूति असे, व त्याबद्दल त्यांनीं आपलें मत अनेकदां जाहीर केलेलें होतें. अस्पृश्यता निवारणाबद्दलच्या एका जाहीर पत्रकावर त्यांनीं सही करण्याचें नाकारल्यावरून त्यांच्याविरुद्ध बराच गिल्ला केल्याचें लोकांना स्मरत असेलच. यासंबधानें त्यांना एकदां मुद्दाम विचारल्यावरुन त्यांनीं असा खुलासा केला कीं, सही मागण्यापूर्वी त्यांना जें जाहिरपत्रक दाखविण्यांत आलें होतें त्यांत आणि सही मागण्याच्या वेळच्या जाहीर पत्रकांत फारच तफावत

होती व तिजमुळें या प्रश्नाबद्दल एकाग्रतेनें चळवळ करण्याची जबाबदारी सही करणारावर पडत होती. अर्थात्, राजकीय चळवळीला बाध येईल अशा रीतीनें सामाजिक चळवळ करण्याची जोखीम घेण्याची त्याची इच्छा व परंपरा नसल्या कारणानें त्यांनीं सही करण्याचें नाकारलें. ते म्हणाले, "हें पहा, सर्वच चळवळी जोखमीनें करण्याचा मक्ता मीं उचलला आहे कीं काय ? त्या एकट्या माणसाला करता येणें शक्य तरी आहे ? सामाजिक चळवळी करणारानीं त्या कराव्यात, त्यास मी यथाशक्ति हातभार लावीन. मी राजकीय चळवळी करतों, त्यांनीं मला यथाशक्ति साहाय्य करावें सर्वच चळवळी एकटा करू लागल्यास त्या व्यवस्थितपणें पार पडणार नाहींत, व त्याच्यापासून विशेष कार्यनिष्पत्तीहि होणार नाहीं."

(४) "पुणें सार्वजनिक सभा" या संस्थेबद्दल लोकमान्यांना विशेष आदर व अभिमान वाटत असे या संस्थेनें प्रचलित चळवळींपैकीं लुळ्या स्वरूपाच्या व तात्पुरत्या महत्त्वाच्या चळवळींत सहसा पडू नये, असा त्याचा साधारण कटाक्ष असे. या संस्थेनें ठराविक राजकारणाचीं दळणें दळीत बसण्यापेक्षा आपल्या परंपरेला अनुसरून इतर संस्थांना राजकारणाचे नवीन धडे शिकवावेत असें त्यांचें नेहमींचें म्हणणें असे हिंदुस्थानचे स्टेट सेक्रेटरी मि मॉंटेग्यू येथें आले असताना, इतर संस्थाप्रमाणें सार्वजनिक सभेनेंहि त्याच्याकडे हिंदुस्थानच्या स्थितीसंबधानें एक मेमोरियल (विनंति अर्ज) पाठविण्याचें ठरविलें. साहजिकपणें त्याचा मसुदा करण्याचें काम सभेच्या चिटणिसाकडे सोंपविण्यात आलें. सदर मेमोरियलचा मसुदा कोणत्या धर्तीवर तयार करण्यात यावा याविषयीं लोकमान्यांचा सल्ला घेण्यासाठीं सभेचे चिटणीस त्यांच्याकडे गेले असताना त्यांनीं त्यांना असें स्पष्टपणें सांगितलें कीं ब्रिटिश सरकारानें आपल्या वचनाचा वेळोवेळीं कसा भंग केला आहे याचा पाढा वाचण्यापेक्षां लोकांनीं आता यापुढें काय करूं पाहिजे, यावर विशेष भर देण्यात आला पाहिजे सार्वजनिक सभेचें मेमोरियल ल्हानसंच असावें, पण त्यात पुढील दहा वर्षांत होणाऱ्या चळवळींचें स्पष्ट निदर्शन झालें पाहिजे सार्वजनिक सभेची दृष्टि भूतकालापेक्षा भविष्यकालावरच जास्त असली पाहिजे पुढील चळवळीची आगाऊ सूचना जर सार्वजनिक सभेस देता येत नसेल तर मेमोरियल न धाडलेलें बरें लोकमान्यांच्या या सल्ल्याप्रमाणें मसुदा तयार करण्यात येऊन तो त्यांच्याकडे सादर करण्यात आला, व त्यात त्यांनीं योग्य त्या दुरुस्त्या करून एक सुटसुटीत मेमोरियल मॉंटेग्यू साहेबाकडे पाठविण्यात आलें.

(५) लोकमान्यांच्या उद्दिष्ट कार्यामध्यें जो जो कोणी मग तो थोर असो वा थोर असो-त्यांना हातभार लावीत असेल, त्याचा गौरव ते त्याच्या योग्यतेपेक्षाहि अधिक करण्यास चुकत नसत रक्त व्या घटनेचा कार्याच्या पूर्ततेवर त्यांची दृष्टि नेहमीं खिळलेली असे यामुळेंच, त्यांच्या कार्याच्या आड येणारावर-मग

त्याचे जिव्हाळ्याचे लोकही का असेनात—कठोर प्रहार करण्यासहि ते कमी करीत नसत. लोकमान्यांच्या स्वभावाचा हा विशेष अवलोकन करण्याची सुसंधि मला अनायासेंच एकदा प्राप्त झाली. एकदा मी काहीं कामासाठीं केसरी ऑफिसात गेलों असताना तीनचार मडळी बाहेरच्या दालनात बसली होती व लोकमान्य येरझारा घालीत त्यांच्याशीं बोलत होते बोलण्याचा विषय मिसेस बेंझंट व त्यांची चळवळ हा होता. बोलण्याच्या भरात एकजण सहज विनोदानें 'अलीकडे बिझांटबाईची फारच स्तुति करण्यात येत आहे' असें म्हणाल्यावर लोकमान्य त्याला उद्देशून म्हणाले 'माझ्या कार्यात मला सहाय्य करणाऱ्या बिझांटबाईची स्तुति मी करीत राहीन, इतकच काय तर एखाद्या चोरासोरालासुद्धा मी डोक्यावर घेऊन नाचेन पण बाई जर का उद्या माझ्या कार्याविरुद्ध येऊ लागल्या, तर मी त्यांच्यावर तडाखेहि उडवू लागेन मी बाईंची स्तुति करीत नाहीं, तर मी माझ्या कार्याची महति गात आहे'

---

## महादेव धोंडो विद्वांस

[ एम ए, लोकमान्यांचे भाचे रा धोंडोपत विद्वांस यांचे चिरंजीव, पुणें ]

माझी माहिती अर्थात् ऐकीव पण विश्वसनीय, पण ती मला मनोरंजक वाटली म्हणून देत आहें

(१) लोकमान्य टिळक मंडालेस तुरुगात असताना केसरीचे म्यानेजर रा धोंडोपत विद्वांस हे त्यास सहा-सहा महिन्यांनी भेटावयास जात असत मुलाखतींत खाजगी विषयाशिवाय इतर विषयावर बोलण्याची मनाई असे व खासगी विषयावरहि जेल सुपरिटेन्डन्ट यांचे समोर ते पास करतील तीं प्रश्नोत्तरें व्हावयाचीं प्रेस ॲक्टाखालीं केसरचा जामीन घेतला गेल्यावर पहिल्याच भेटींत जमाखर्चाचा तक्ता सादर करावयाचा प्रसग आला त्याप्रमाणें जमाखर्चामध्यें पाच हजार रुपये सरकारकडे केसरीचे जामिनकीबद्दल भरले असा उल्लेख होता. जेल सुपरिटेन्डन्ट यानीं त्याला हरकत घेतली. शेवटीं ही रक्कम जमाखर्चात दाखविणें अवश्य असल्यामुळें कोणा मित्राकडे अनामत ठेवावी अशी भेटावयास गेलेले गृहस्थ व जेल सुपरिटेन्डन्ट यानीं तोड काढली दुसरे दिवशीं जेल सुपरिटेन्डन्ट यांचे समोर रा धोंडोपत यानीं लोकमान्यांची भेट घेतली जमाखर्चाचा तक्ता वाचता वाचता 'पाच हजार रुपये रा. वासुदेवराव जोशी यांचेकडे अनामत ठेव' असें वाचताच लोकमान्य धोंडोपतांचे चेहऱ्याकडे निरखून पाहू लागले व म्हणाले

'काय रे, तुजजवळ पैसे जास्त झाले आहेत वाटतें!' चोंडोपंतांना भरी गोष्ट बोलता येईना. त्यांनीं उत्तर दिलें 'तुम्हां काय वाटेल तें समजा.' लोकमान्य हसून म्हणाले 'मी बरोबर समजलों. मागूं काय तरी गोष्ट आहे ती!' चोंडोपंतांना काय, या विषयावर जितकें जास्त बोलणें होईल तितकें दुःखच होतें. मध्येंच केव्हां तरी सूचक उत्तर त्यांना देण्याची संधि मिळाली असती, म्हणून त्यांनीं लोकमान्यांस त्यांचा काय तर्क आहे तो बोलून दाखविण्याचा आग्रह चालू केला. यात चोंडोपंत स्पष्ट शब्दांनीं लोकमान्यांना माहिती सांगत नसल्यामुळें त्यांना वदींहि करतां येईना. शेवटीं सुपरिंटेंडेंटहि विचारा द्विधापरांच्या जाळ्यांत सांपडला. त्यालाहि वाटलें कीं, सांगावें तर बरें, टिळक बरोबर कयास बांधतात कीं नाहीं तें. टिळकांचे सोडून सांय तेंच बाहेर आल्यास बाहेरून कोणीहि बातमी सांगितली नसल्याकारणानें जेलचे नियमाचें उल्लंघन होण्याचा दोष येत नव्हता म्हणून तोहि 'सांगा, सांगा' म्हणून टिळकांना आग्रह करूं लागला. मी जर बरोबर सांगितलें तर माझा कयास बरोबर आहे असें सांगणार असाल तर सांगतों, अशी लोकमान्यांनीं अट घातली व त्या अटीत एक वेळ जेलच्या नियमाचें अतिक्रमण झालें तरी हरकत नाहीं असें ठरवून जेल सुपरिन्टेंडेन्ट यानें तसें कबूल केलें. लोकमान्यांनीं एका क्षणाचाहि विचार न करतां सांगितलें कीं, 'सरकारनें २० हजारांचा जामीन घेतला आहे केसरीकडून.' लोकमान्यांचा तर्क यथाप्रमाणें बरोबर ठरतांच सगळ्यांनीं हसून तो बरोबर आहे, असें जेल नियमाचें अतिक्रमण न करतांच सुचविलें.

(२) लोकमान्य मंडालेस तुरुंगांत असतां त्यांचेजवळ वासुदेव कुलकर्णी रा. कलेढोण, सातारा, हा कैदी सरकारनें स्वयंपाकी म्हणून ठेविला होता. त्याची अठ्ठावीस वर्षांची कैद संपताच तो परत यावयास निघाला. 'आपलेविषयीं परत गेल्यावर आपले मंडळींस काय सांगूं' असें त्यानें विचारतांच 'येथील सर्व व्यवस्था कशी काय आहे, तें सांग' असें लोकमान्यांनीं सांगितलें. 'पण माझ्याविषयीं खात्रीपूर्वक होऊन मंडळी माझ्यावर विश्वास कसा ठेवणार!' असा त्यानें प्रश्न विचारतांच लोकमान्यांनीं आपला एक पडलेला दांत खूण म्हणून त्याचेजवळ दिला व म्हणाले, 'हा दांत त्यांचेजवळ दे म्हणजे तुझ्याविषयीं खात्री पटेल व तुलाहि तो जेलचे हद्दींत न सांपडतां नेतां येईल.' दांत पाठवून त्या मनुष्याची खात्री पटविण्याचा व आपण आतां वृद्ध झालों, जेलमधून जिवंत बाहेर पडतों कीं नाहीं, वगैरे अनेक हेतु व भावना व्यक्त करण्याचा लोकमान्यांचा हेतु नव्हता असें कोण म्हणेल?

(३) लोकमान्यांचे दिवसाकरितां लाला लजपतराय आले तेव्हां त्यांनीं एक गोष्ट सांगितली. लाहोरास काँग्रेस असतां लोकमान्य त्यांचेकडे उतरले होते. एक दिवस रात्रीं दहा वाजेपर्यंत जेवणाची वाट पहावयास लागून टिळक निरनिराळे

प्रांताचे कँपामध्यें त्या त्या प्रांतातील मंडळींशीं वादविवाद करून आपली बाजू समजावून देण्याकरितां गेले. दहा वाजून गेले तरी टिळक परत आले नाहींत तेव्हां ते बाहेर कोठें जेवले असें समजून स्वयंपाक्याकडील मंडळीनें जेऊन घेतलें मात्र डाळरोटी टिळकांकरितां झांकून ठेविली बारा वाजतां स्वारी परत आली व ती निवालेली डाळरोटी खाऊन कोणी आपल्याकरितां थांबलें नाहीं याचा राग न मानतां झोंपीं गेली

(४) रवीन्द्रनाथ टागोर, बंगालचे कविसम्राट, यांनीं लोकमान्याविषयीं एक गोष्ट सांगून पुण्याचे लोकमान्यांचे निकटवर्ती लोकांस आश्चर्यचकित केलें. रवीन्द्रनाथांनीं सांगितलें कीं " लोकमान्यांनीं माझ्याकडे पन्नास हजाराचा चेक पाठवून अमेरिकेंत जाऊन, हिंदुस्थानाविषयीं स्वत चे समजुतीप्रमाणें जें कांहीं करतां येईल तें करा असें मला सांगितलें " राष्ट्रकार्यांत ज्याला जें शक्य असेल तें त्याचेकडून करून घेण्याचा ग्राहक गुण रवीन्द्रनाथास यांत दिसून आला. याविषयीं चौकशी करतां अशी माहिती मिळाली कीं, लोकमान्य विलायतेस जाण्याकरितां मुंबईस गेले असतां, आपण त्याप्रमाणें विलायतेंत चळवळ करणार त्याच वेळीं जर अमेरिकेंतहि कोणी चळवळ केली तर बरें असें समजून बरोबर असलेल्या पुण्यांतील एका व्यक्तीला बरोबर चेक व पत्ता देऊन रवाना केलें. त्यानें रवीन्द्रनाथाची खासगी भेट घेऊन तो त्यांचे स्वाधीन केला. रवीन्द्रांना जातां आलें नाहीं हा भाग निराळा पण रवीन्द्र जर गेले असते तर ते स्वतंत्रपणें जावे व एकाद्या राजकीय चळवळीचा पुरस्कार करून ते गेले असा समज न व्हावा, हाच गुप्तपणा राखण्याचा लोकमान्यांचा हेतु असावा हें उघड आहे.

(५) १९०८ सालीं शिक्षेच्या दिवशीं आतां आपल्याला कडक शिक्षा होणार तर त्या प्रसंगीं कोणतांहि मनाच्या दुबळेपणाचा प्रसंग हायकोर्टांत होऊं नये व शिक्षा मोठ्या बाणेदारपणानें स्वीकारावी हा लोकमान्यांचा हेतु होता. रा. धोंडोपंत यास त्यांनीं 'तू तेथें रडशील, तू आज हजर राहूं नकोस' असें परोपरीनें सांगितलें. पण धोंडोपंताचा निश्चय ढळत नाहीं असें पाहिल्यावर, 'मी कांहीं झालें तरी रडणार नाहीं' असें वचन घेऊन, त्या दिवशीं हायकोर्टांत हजर राहण्याची परवानगी लोकमान्यांनीं दिली.

(६) हायकोर्टांत टॉवरमध्यें लोकमान्यांना ठेविलें होतें. त्यांनीं एका कारकुनास खोलींत बैठकीकरितां सतरंजी आणण्याकरितां सांगितलें. दुसरे दिवशीं तो आल्यावर त्यास विचारतां 'सरकारी रीतीनें बैठकीची व्यवस्था होणार आहे; सबब मीं व्यवस्था केली नाहीं' असें त्यानें म्हणताच 'तू आताचे आतां सतरंजी घेऊन ये, सरकारचे पाहुणचारावर माझी राहण्याची इच्छा नाहीं. सांगितलें काम करावें आपली अक्कल लढवू नये, असें रागानें बोलले.

(७) जगन्नाथमहाराजांचें दत्तविधान झाल्यावर बाळामहाराजांस दत्तक घेण्याचा प्रतिपक्षानें घाट घातला. तेव्हां छत्रपति शाहूमहाराज यास सर्व परिस्थिति नीट समजावून देण्याकरितां टिळक कोल्हापुरास गेले. परिस्थिति नीट समजल्यावर महाराज दरबार दुसऱ्या दत्त विधानाला मान्यता देणार नाहीं असा टिळकांचा समज होता. त्याप्रमाणें टिळक भेटावयास गेले असतां तोंड देखलें " आपले आमच्यावर इतके उपकार आहेत कीं, आंगचे कातड्याचे जोडे करून आपले पायांत घातले तरी ते फिटणार नाहींत " असें टिळकांना बोलण्यांत अडकवून त्याच घटकेस बाळामहाराजांचें दत्तविधान महाराजांनीं उरकून घेतलें. इतःपर ही व्यक्ति विश्वसनीय नाहीं असें मनाशीं ठरवून त्याच दिवशीं लो. टिळक परत फिरले.

(८) पुण्यातील एक विद्वान् प्रोफेसर दिवसा १२–१२॥ वाजतां गीतारहस्यावर बोलण्याकरितां नेमल्या वेळीं आले. टिळकांचें स्नान व जेवण कांहीं कारणानें झालें नव्हते. त्या विद्वानास तिष्ठत ठेवण्यापेक्षा दोन–अडीच वाजेपर्यंत त्याच्याशीं संभाषण करून ते गेल्यावर मगच त्यांनीं भोजन केलें.

(९) लोकमान्य कधीं नाटकें कादंबऱ्या वाचीत नसत, तरी त्यांना light literature ची जरूर नसे असें नाहीं. त्याकरितां त्यांनीं महाभारताची योजना केली होती. महाभारत फक्त शोधक बुद्धीनें अभ्यास करण्याकरिताच ते वाचीत असें नसून वाङ्मयाची त्यांची तहान भागविण्याचाहि त्यांचा हेतु असे, असें ते बोलत.

(१०) ज्याप्रमाणें राजकीय बाबतींत त्यांनीं पुढाकार घेतला त्याचप्रमाणें त्यांचीं सर्वां मतें असतां सामाजिक सुधारणेंतहि पुढाकार का घेतला नाहीं असा प्रश्न विचारला असतां ते म्हणाले, " राजकीय बाबतींत आम्हाला बहुमताचा जोर पाहिजे असल्याकारणानें सामाजिक बाबतींत बहुमताप्रमाणें चालणें भाग होतें. तसें केलें नसतें तर राजकीय कार्य करता आलें नसतें. ही व्यावहारिक नड आहे. सरकारचे विरुद्ध ज्याप्रमाणें आम्हाला लोकांच्या मदतीची अपेक्षा त्याचप्रमाणें सुधारकांना समाजाविरुद्ध सरकारचे मदतीची जरूर म्हणून ते राजकारणांत मवाळ होतात. "

(११) तीर्थविधि झाल्याशिवाय दत्तक घेतां येत नाहीं हा आजपर्यंत चालत आलेला निकाल फिरवून वपन न केलेल्या विधवेलाहि दत्तक घेता येतो असा नवा निकाल न्या. रानडे यानीं हायकोर्टांत दिलेला वाचताच ' अरे, ही सर्व स्वतःचे बाबतींत पुढची तरतूद दिसते, ' असें टिळक उद्गारले व कर्मधर्मसंयोगानें हें भाकीतहि पुढें खरें ठरलें.

## गजानन नारायण कानिटकर

[ बी. ए., लोकमान्यांचे स्नेही, कै. नारायण बापूजी कानिटकर यांचे चिरंजीव, चिंचवड स्वावलंबनपाठशाळेचे संस्थापक, असहयोगी, पुणें. ]

(१) सन १८९७ सालची गोष्ट. लोकमान्यावर राजद्रोहाचा खटला होऊन ते जामिनावर मोकळे होते. त्याच सुमारास माझे वडील कै. ती. नारायण बापूजी कानिटकर हे महामारीचा रोग होऊन एकाएकीं अवघ्या बारा तासात कालवश झाले ते लोकमान्यांचे जिवलग स्नेही व चहाते. लोकमान्यांचाहि त्यांचेवर मोठा लोभ. साहजिकच और्ध्वदेहिकाचे वेळीं लोकमान्य हजर होते. प्रेतयात्रेची तयारी चालू होती. बाहेरच्या बाजूस गॅलरींत कठड्याला टेंकून लोकमान्य उभे होते. शेजारीं इतर काहीं मडळी उभीं होतीं. बोलता बोलता सहज खटल्याचा विषय निघाला. लोकमान्य हसत हसत म्हणाले "पाहिरे बोवानो! नानासाहेब तर आम्हाला सोडून एकाएकीं निघून गेले, आम्हीहि सरकाराचा पाहुणचार घ्यावयाला लवकरच जाणार! एखादे वेळीं काय होईल काय नाहीं याचा नियम नाहीं वेळ आहे प्रसग आहे, कदाचित् जीवतपणीं आम्ही तुम्हाला दिसणारहि नाहीं. नीट पाहून घ्या आम्हाला!" हे उद्गार ऐकून भोंवतालचे लोक आश्चर्यानें थक्कच झाले. मृत्यु पुरवला पण सरकारी तुरुंगरूपी यमयातना नकोत, ही कारागृहवासाबद्दलची त्या वेळची भावना! त्याबद्दल हा गृहस्थ इतक्या बेफिकिरीनें बोलत आहे! धन्य त्याची! असे उद्गार प्रत्येकानें मनामध्यें काढले असल्यास नवल नाहीं. मोठ्यांचें सर्वच अघटित!

(२) दुसरा प्रसग १९१७ मधला. लोकमान्यांचें चिंचवड-स्वावलंबन-राष्ट्रीय पाठशाळेवर अत्यत प्रेम! कारण काय तर खेडेगावची सघटना हें तिचें अतिम ध्येय! मुंबईस दाजीसाहेब खरे यांचे बंगल्यावर त्यांच्या भेटीस गेलों असता ते मला म्हणाले, "मला यापुढें खेडेगावांचेकडे लक्ष पुरवल्याखेरीज गत्यतर दिसत नाहीं. ख्रिस्ती मिशनरी ज्याप्रमाणें आपल्या धर्मासाठीं अहोरात्र अटोकाट मेहनत करतात त्याप्रमाणें आपल्या देशबांधवांच्या उद्धारासाठीं खेडे-गावात रात्रदिवस झटून कार्य करणारीं तरुण माणसें मला पाहिजे आहेत. यासाठींच आम्ही 'समर्थ विद्यालय' काढलें होतें. तुम्ही तेंच कार्य करावें अशी माझी इच्छा आहे. तुम्हाला माझी पूर्ण सहानुभूति आहे."

(३) १९१८ च्या प्रारंभीं सर जगदीश चंद्र बोस यासह सस्थेस भेट देण्याबद्दल बमनजीशेट याना विनति करण्यासाठीं मी मुंबईस गेलों होतों. शेटजींसारखा रात्रदिवस सपत्तींत लोळणारा लक्ष्मीचा पुत्र आमच्यासारख्या य कश्चित् माणसाशीं नुसता धडपणीं बोलेल कीं नाहीं ही आम्हाला शका!

कारण मजजवळ नाहीं कलेक्टरसाहेबांची शिफारस किंवा गव्हर्नरसाहेबांची चिट्टी ! तरीहि कसा तरी मनाचा धडा करून गेलों. शेटजींनीं आम्हाला इतक्या प्रेमानें वागविलें कीं, जणुं काय त्यांची आमची १०।२० वर्षांची जुनी ओळख ! आम्ही मनांतल्या मनांत आश्चर्यानें चूरच होऊन गेलों. हा काय प्रकार आहे तेंच कळेना. पुढें याचा उलगडा झाला. याचें सर्व श्रेय लोकमान्यांस आहे असें मला समजलें, संस्थेची आठवण ठेवून त्यांनीं तिजबद्दल विनंति केली होती. व्यवहाराचे दृष्टीनें संस्थेशीं प्रत्यक्ष कांहींएक संबंध नसतां केवळ तिचें ध्येय पसंत म्हणून तिजविषयीं एवढा आपलेपणा बाळगून या एहस्थानें तिच्या कार्यास हातभार लावला. 'धन्य त्या महात्म्याची' अशी आमची भावना झाल्यास आश्चर्य तें काय ?

(४) पुढें तर त्यांनीं वेळ नसतां, वेळांत वेळ काढून, दोन वेळां संस्थेस भेट दिली व आम्हास श्री. मनमोहनदास रामजी, श्री. जमनादास द्वारकादास वगैरे मंडळींकडे स्वतःचे खर्चानें घेऊन जाऊन आमचे तर्फे त्यांचेजवळ मदतीची याचना केली ! लोकमान्यांनींच अशा तऱ्हेनें आमच्या संस्थेच्या आर्थिक भरभराटीचा पाया घातला म्हणून संस्थेतील शिक्षक व विद्यार्थी यांस रात्रीं आरतीचे वेळीं 'जय जय बाल टिळक धन्या ! जय जय धन्य लोकमान्या ॥' असा त्यांच्या नांवानें गजर केल्याशिवाय चैन पडत नाहीं.

---

## प्रभाकर वासुदेव बापट

[ बी. ए. लोकमान्यांचे स्नेही कै. वासुदेवराव बापट ( बडोदा-बापट ) यांचे चिरंजीव, पुणें. ]

(१) माझे वडील वारले, तेव्हां दादा माझ्या मातुल मंडळींना म्हणाले, "तुम्ही प्रभाकराची काळजी करूं नका. रावसाहेब जिवंत आहेत व बळवंतराव वारले असें तुम्ही समजा, व अशा तऱ्हेनेंच मी त्याश वागवीन;" व खरोखरच दादांनीं मला वडिलांची उणीव कधींहि भासूं दिली नाहीं. पुढें सुद्धां माझी संभाळणारी बाई जाण्याचा धाक घालीत असतां त्यांनीं "मी असेपर्यंत प्रभाकर कोणावरच अवलंबून नाहीं. मी त्याचें सर्व करीन. तिला वाटलें तर खुशाल जाऊं दे," असें उत्तर दिलें.

(२) मी दादांकडे एकदां एका ठिकाणीं जेवावयाला जाण्याबद्दल विचारण्याकरितां गेलों होतों. मुद्दाम विचारावयास जाण्याचें कारण, बोलावणें एक, हिंदुस्थानांत कमी दर्जाच्या मानलेल्या माणसाकडून आलें होतें व माझ्या घरची

मडळी दादाच्या समतीशिवाय मला काहीं करू देईनात मी दादाना सर्व इकीकत सागितल्यावर त्यानीं मला माझी इच्छा विचारली मी जाण्याची इच्छा दाखविल्यावर ते म्हणाले, "तरी सुद्धा तू जाऊ नकोस तुझ्या घरच्या मडळींची अडचण नसती तर मी तुला जा म्हणून सागितलें असतें मला जाण्याला हरकत दिसत नाहीं, परतु उद्या समाजाचा तुझ्यावर रोष झाला तर त्याची जबाबदारी सासण्यास तू समर्थ आहेस का? मी आज आहें अन् उद्या नाहीं तेव्हा वयात आल्यावर तू योग्य वाटेल तें कर व मी त्याला अनुमति देईन"

(३) दादा समाजसुधारणला प्रतिकूल नव्हते पण ते स्वत कोणत्याहि चळवळींत भाग घेत नसत ते नेहमीं म्हणत "मीं राजकीय कार्याला स्वत ला वाहून घेतलें आहे व त्यातच मी माझा शक्तिसर्वस्व खर्च करीन मी समाजसुधारणची चळवळ करू लागलों तर चित्त व शक्ति द्विधा होऊन माझे हातून एकहि कार्य धोड्या अशानें सुद्धा पूर्ण होणार नाहीं" ह्यासबधींच पुढील प्रसग घडला *एकदा पुण्यातील एक पुढारी त्यांच्याकडे काहीं सामाजिक व शिक्षणविषयक* चळवळीकरिता आले होत त्यानीं दादाना आपली कल्पना समजावून सागि तल्यावर त्याला त्यानीं अनुकूलता दर्शविली व प्रोत्साहन दिले त्या गृहस्थानीं प्रसिद्धिपत्रकावर सही मागितल्यावर त्यानीं ती देण्याचें नाकारलें, तेव्हा त गृहस्थ रागावून गले ते गेल्यावर दादा घरात येऊन म्हणतात "मी सही केली कीं तें कार्य करण्यास मी बाधला गलों व मग मला त्याच्या मागें लागलें पाहिजे मला सध्या तसें करण्यास वेळ नाहीं" दादानीं कोणतेंह कार्य हातीं घेतलें कीं त्यात त किती मन पूर्वक पडत याची ज्याना थोडी कल्पना आहे *त्याना वरील गोष्टीचें* मर्म कळेल ते गृहस्थ रागावण्याचें कारण तरी हेंच हात

(४) एकदा एक गृहस्थ दादाना भेटावयाला आले असता त्यानीं पुण्या जवळील एका प्रसिद्ध सामाजिक सस्थेमध्यें झालेला काहीं घोटाळा व तेथ घडलेल्या काहीं वाईट गोष्टी सागून ' तुम्ही याबद्दल केसरीमधून खरमरीत टीका का करीत नाहीं?' म्हणून विचारलें दादा म्हणाले, "माझा केसरी वाटेल त्यावर टीका करण्याकरिता नाहीं त्या सस्थेच्या चालकास मी ओळखतों ते फार चागले गृहस्थ आहेत व ती सस्था आज पुष्कळ चागलें काम करीत आहे सस्थेमध्यें पुष्कळ माणसें मिळवावीं लागतात व तीं सर्व सारखाच मिळतात असें नाहीं काहीं *बरेवाईट प्रकारहि घडतात* परतु त्यावर पाघरूण घातलें पाहिजे नाहीं तर सस्थेसबधीं वाईट ग्रह उत्पन्न होऊन तिच्या हातून काहींच कार्य घडणार नाहीं सस्था उभारण्यास किती व कसे कष्ट पडतात ह्याचा मला अनुभव आहे"

(५) एकदा मीं बोलता बोलता त्याना विचारलें, तुम्ही इग्लडहून आल्यावर प्रायश्चित्त का घेतलें? त्या वेळेला ते म्हणाले "मला विलायतेला जाणें म्हणजे

पाप वाटते म्हणून मीं प्रायश्चित्त घेतलें असें नाहीं. समुद्रगमनावर हिंदुधर्मशास्त्रानें प्रायश्चित्त घ्यावें, म्हणून सांगितलें आहे.म्हणून ज्याप्रमाणें आपण हिंदुधर्माचे इतर सस्कार पाळतों त्याप्रमाणें ही आज्ञाहि पाळली. हिंदुधर्मानें इतर धर्मांप्रमाणें कांहीं आचार सांगितले आहेत व नुकसान नसेल तर ते पाळले पाहिजेत. संस्कार किंवा प्रायश्चित्त यांनीं आपल्या हिंदुत्वाची जाणीव मनात उत्पन्न होते. "

(६) दादाकडे पुष्कळ लोक मदत मागावयाला येत व त्यांना ते योग्यता पाहून मदत करीत. त्यांच्याकडे ओळखीचे व ओळख नसलेले पुष्कळच पाहुणे येत व त्यांची सर्व व्यवस्था गायकवाडवाड्यात होई. हे लोक पुष्कळ वेळां दादांशीं बोलून त्यांचा वेळ घेत. दादाचे स्नेही गायकवाडवाड्यास विनोदानें अन्नछत्रहि म्हणत. पैसा ही एक शक्ति आहे व तिचा इतक्या निःस्वार्थतेनें उपयोग करणारा विरळा.

(७) मी गेलों कीं, दादा बहुतेक नेहमीं मला माझें वजन विचारीत व केलें नसल्यास करावयाला सांगत. व्यायाम करण्याबद्दल तर त्याचा नेहमीं उपदेश. एकदां सकाळीं मी डोक्याला मफलर बांधून गेलों होतों. मला पाहिल्याबरोबर दादा एकदम म्हणतात "हें रे काय सोंग ? अरे, अंगांत कणखरपणा पाहिजे. मी लहानपणीं उन्हाळ्यांत गरम कपडे घाली व हिंवाळ्यात उघडा बसण्याचा प्रयत्न करीत असे "

(८) माझ्या परीक्षेचा निकाल नुकताच लागला होता. अदाजापेक्षां मार्क कमी मिळाले होते. दादांकडे गेल्यावर त्यांनीं त्याबद्दल विचारलें. मी कारणें सांगितल्याबद्दल दादा रागावून म्हणाले, "सबबी सांगूं नकोस, चक्क फजिती झाली म्हण. अडचणी, सकटे हीं यावयाचींच व तीं आलीं असतांना त्यांतून मार्ग काढून यश मिळविणें यालाच पुरुषार्थ म्हणतात. इतरांना अडचणी आल्या नाहींत असें तुला वाटतें ? "

(९) दादा बाह्यतः पाहणाराला कठोर वाटत व त्यांचेजवळ हृदयाच्या ओलाव्यापेक्षा बुद्धीचें तीक्ष्णत्व जास्त आहे असें वाटे. त्यांच्या पहिल्या भेटीच्या वेळीं त्यांच्याविषयीं आदरयुक्त भीतीच उत्पन्न होई. पुष्कळांनीं मला असाच स्वतःचा अनुभव सांगितला आहे. त्यांना वादविवाद करतांना प्रतिपक्षाची बिलकुल दया न करिता त्याला फजित करण्याचा दांडगा प्रयत्न पाहून हाच ग्रह चळावे पण जास्त परिचय झाल्यावर हृदयाची स्निग्धताहि त्यांच्याजवळ बरीच आहे अशी माझी खात्री पटली. ते आमच्याशीं अति प्रेमानें वागत व त्यांच्याकडे केव्हांहि जाण्यास आम्हांला मुभा असे. पुष्कळ वेळां मुलें खालीं जेवत असतां ते खालीं येऊन स्वतः आमचा परामर्ष घेत व दिवसातल्या एकाद्या गोष्टीबद्दल विनोदपूर्ण बोलत. त्यांना येडेवाकडे प्रश्न विचारण्यास आम्हास मुभा असे व ते

आमच्या बारीक गोष्टींकडे सुद्धा लक्ष पुरवीत. आम्ही आमच्या हाताचीं नखें काढलीं आहेत कीं नाहीं हें सुद्धा ते बघत व नसल्यास रागें भरत. आमच्या पुष्कळ ल्हान लहान इच्छा त्यांनीं मन घालून पुरवल्या

(१०) त्यांचा स्वभाव प्रेमळ असे. माझे वडील वारल्यावर, पांच सहा महिने जरूर नसतांना, मला परिस्थितींत एकदम बदल वाटू नये म्हणून, त्यांनीं जुनीं नोकरमाणस तशीं उगाच ठेवलीं होतीं, तसेंच उन्हाच्या, तीन वाजता, ते निजले होते म्हणून त्यांची वाट पहात मी बाहेर उभा होतों ते बाहेर आल्यावर मी तेथें बसलेला पाहून मला "आत का आला नाहींस" म्हणून विचारलें. मी साहजिक 'तुम्ही निजला होता, झोपमोड होईल' असें म्हणत आहे तोच "त्यात काय झालें? ही काहीं रात्रींची झोप नव्हे, असें पुन करू नकोस मला वाईट वाटेल" असें म्हणाले राजकारणाच्या 'चकमकींच्या' आखाड्यात उतरल्यावर त्याना पुष्कळांचीं मनें दुखवावीं लागलीं व प्रतिपक्षाशीं वागताना त्यांनीं कठोर व तीक्ष्ण वृत्ति धारण केली, परंतु खाजगी व्यवहारात ते दुसऱ्याच्या मनोभावना लक्षात घेत असें माझ्या व इतरांच्या अनुभवास आलें आहे. ते एकदा म्हणाले, "मी राजकारणात पडलों नसतों तर मला कधींच दुसऱ्याचें मन दुखविण्याचा प्रसग आला नसता मला त्याबद्दल नेहमीं वाईट वाटतें. मी अजातशत्रूच झालों असतों"

(११) दादा खुर्चीवर बसले होते मी शेजारीं इकडे तिकडे हिंडत होतों इतक्यात दादा म्हणाले, "रावसाहेब वारले दाजीसाहेब वारले माझे सर्व मित्र गेले. मी एकटाच राहिलों माझीही वेळ जवळ आली आहे" हें बोलताना त्याचा कण्ठ गहिंवरून आला होता. एवढ्या मोठ्या माणसाला दु ख करिताना पाहून मलाहि कसेंसेंच झालें

(१२) पुन्हा एकदा बोलताना म्हणाले, "मी दोन दोन तास एक एक विषय करतों एक विषय करून कंटाळल्यावर दुसरा विषयाची आलटापालट ही मला विश्रान्तीसारखी होते" राजकारणात थकलेल्या मनाला विश्रान्ति म्हणून ते तत्त्वज्ञानाचा विचार करीत

(१३) दादा स्वत च्या कपड्याच्या बाबतींत अति निष्काळजी असत त्याची व्यवस्था त्यांच्या घरची मडळी, विशेषत घोंडापंत भिडाण, ठेवीत एकदा ल्गाच्या पानसुपारीला जावयाला निघाले तों कपडे सापडेनात, जुनेच कपडे घालून जाऊ लागले तेव्हा घोंडोपंत धावत आले व त्यांनीं जुन कपडे काढून नवे चढवले तेव्हा दादा म्हणतात, "मला हें कपड्याचें जमत नाहीं कोणतेहि कपडे असले म्हणून काय झालें?"

(१४) सोलापूरच्या Conference ची तयारी चालू होती दादांना धमकी-वजा पत्रें येत होतीं मी भेटावयाला गेलों तेव्हा दादा म्हणाले, "हीं पाहिलींस

मला पत्रें येत आहेत. मी जाऊ का नको?" मी म्हटलें, 'नको.' ते म्हणाले, "बेट्या, अशा धमक्याना मी भ्यायला लागलों तर माझ्या हातून महत्त्वाचें काहींच काम होणार नाहीं, व मला घरातच बसावें लागेल. कारण कोणत्याहि कामात शत्रु उत्पन्न व्हावयाचेच." पुढें ते बोलणार इतक्यात दुसरे कोणी आले त्यामुळें बोलणें तसेंच राहिलें.

(१५) मी एकदा गेलों असता दादानीं एकदम Matric च्या प्रश्नपत्रिकेंत आलेला श्लोक म्हणण्यास सागितला. मला येईना, त्यावरोबर त्यानीं आपल्या मेळच्या म्हणून दाखवला व म्हणाले, "संस्कृतचें पाठान्तर पाहिजे." निराळ्या वेळीं पुनः हाच विषय निघून ते म्हणाले, "मराठी भाषेवर प्रभुत्व येण्यास संस्कृत पाठान्तराचा पुष्कळ उपयोग होतो. वृत्तपत्राच्या संपादकाना तर त्याची फार जरूरी आहे. विषयप्रतिपादनात किंवा समारोप करताना त्याचा फार उपयोग होतो." त्याना कित्ती तरी सुभाषितें पाठ येत व साध्या बोलण्यात देखील ते प्रसगीं त्याचा उपयोग करीत व संभाषणाचा ओघ एकदम मजेदार रीतीनें बदलीत.

(१६) दादाच्याजवळ शिकण्याचा सुप्रसग मला थोडाच वेळ लाभला. त्याना अतिशय काम असल्यामुळें ठराविक वेळीं काहीं तरी व्यत्यय येई. पाणिनीच्या व्याकरणाची पद्धति ते समजावून सागत होते. त्यानीं कित्ती तरी निरनिराळीं उदाहरणें देऊन ती समजावून सागितली. विषय शिकवितांना ते विषयाच्या मुळाशीं जात व तें तत्त्व उलगडून सागत त्यामुळें एकदम सर्व विषयावर प्रकाश पडून स्वतंत्र विचार करण्याची दिशा कळून येऊन तशी प्रवृत्ति उत्पन्न होई.

(१७) दादाचें मन कोणत्याहि विषयावर विचार करताना फार एकाग्र होई व मग त्याना भान रहात नसे. शेवटीं केसरी ऑफिसचें मशीन आणलें होतें. त्या वेळीं ते मशीनशिवाय दुसऱ्या गोष्टीच बोलत नसत व सर्व वेळ त्यासंबधीं विचार करीत. तसेंच एकदा History of Self government in Canada हें पुस्तक त्यानीं सध्याकाळीं वाचावयाला सुरुवात केली व कित्ती वेळ तरी जेवण वगैरे काहीं न करता रात्रीं वाचीत होते पाहेर रात्रीं ११॥ वाजे तरी घॉटोमत तिष्ठत उभे होते!

## सदाशिव गोपाळ गोगटे

*[ 'ज्ञानप्रकाश'चे एक माजी उपसंपादक व लोकमान्यांचे चहाते, पुणें. ]*

(१) लोकमान्य १९१४ सालीं मंडालेहून परत आल्यावर त्याच्यापुढें पुष्कळ दिवस मनाला त्रास देणारा काँग्रेसच्या फुटीचा विषय मांडण्याचा मीं निश्चय केला. लोकमान्यांच्या विरोधी पक्षाशीं १९१४ पूर्वी माझा संबंध होता. (अजूनहि अगदींच अल्पांशानें का होईना, आहे) यामुळें माझें म्हणणें लोकमान्य शांतपणें ऐकून घेऊन चर्चा करण्यास तयार होतील कीं नाहीं याविषयीं शंका वाटत होती. परंतु समाधानाची गोष्ट ही कीं, प्रत्यक्ष भेटीअंतीं माझी शंका सर्वस्वी निराधार ठरली. गायकवाडवाड्यातील त्यांच्या बैठकीच्या जागीं कोणतीहि आडफाटा न येता माझा प्रवेश तर झालाच. नमस्कारचमत्कार झाल्यावर मनांत योजलेल्या विषयाचा उपक्रम मीं केला. तो असा, काँग्रेस अगदीं निर्माल्यवत् होऊन राहिली आहे ही गोष्ट आपल्या निदर्शनास आलीच असेल. काँग्रेसची ही मुमूर्षावस्था आपणास पाहवते काय? त्या संस्थेचें अवतारकार्य संपलें अशी आपली समजूत आहे काय? वगैरे माझें बोलणें संपल्यावर लोकमान्य म्हणाले, "तुमचें म्हणणें मला मान्य आहे. यंदा नाहीं तर पुढील सालीं कलकत्यास काँग्रेस भरेल तेव्हा काँग्रेसमध्य शिरावयाचें कार्य आम्ही साधून घेऊ. गांवसभा वगैरे स्थापण्याची तुमची कल्पना ठीक आहे, पण आणखी पंचवीस वर्षे चालू धोरणानेंच काँग्रेस चालविली पाहिजे असें मेथाजींचें मत आहे उठावाची चळवळ केल्यास सरकार जोराचा विरोध करील असें त्यांना भय वाटतें. मेथाजींच्या पक्षाचें धोरण सरकारला काडीइतका विरोध न करता जी चालविता येईल ती चळवळ चालवावयाचें आहे. त्यांचा पक्ष सरकारला जाचक वाटणारी कोणतीहि चळवळ करावयास तयार नसतो. साधी मद्यपानप्रतिबंधाची गोष्ट घ्या. ह्यांत तर कांहीं राजकारणाचा भाग नाहींना? पण असल्या प्रकारची देखील सरकारला अप्रिय वाटणारी चळवळ त्या पक्षाचे लोक करीत आहेत काय? मेथा पक्षाच्या धोरणाची उभारणी Line of least resistance च्या तत्वावर आहे!" येणेंप्रमाणें भाषण झाल्यावर लोकमान्य थोडेसे थांबले. मुख्य मुद्दा म्हणजे काँग्रेसमधील दुही मोडण्याचा मुद्दा, त्यांच्याकडून स्पष्टपणें कबूल करून घेण्याच्या निश्चयानें मी त्यांच्याकडे गेलों होतों. त्यांच्या भाषणांतील शेवटच्या उद्गारावरून गाडी रूळ सोडून कांहींशी साइडिंगवर चालल्याचा मला भास झाला. मला तें मुळींच नको होतें, म्हणून मी चटकन् म्हटलें, 'हा प्रश्न स्वभावभेदाचा आहे त्याबद्दल कुरकुर करण्यांत फारसें हशील नाहीं. काँग्रेसचें काम अधिकारसूत्रें हातीं असणाऱ्या पक्षाच्या हातून जोमानें होत नाहीं, म्हणूनच तर राष्ट्रीय पक्षानें काँग्रेसमध्य शिरलें पाहिजे अशा आग्रह धरण्यास मी आलों आहें.

स्वर्दे घडवून आणण्याचें आपण कबूल केलें म्हणजे आपल्या आजच्या भेटीचें सार्थक झालें असें मला वाटेल.' लोकमान्यांनीं जरूर तें आश्वासन दिलें व हें प्रकरण संपलें

(२) लोकमान्य स्वर्गवासी होण्यापूर्वी सुमारें तीन महिने आधीं सिंहगडावर त्यांची व माझी गांठ पडली. त्या प्रसंगीं इकडच्या तिकडच्या गप्पा होता होता मॅंटेग्यूसाहेब व सुधारलेली कौन्सिलें यासंबंधीं बोलणें निघालें मॅंटेग्यू साहेबांचे सुधारणाबद्दल आभार मानण्याच्या ठरावाला लोकमान्यांनीं काँग्रेसमध्यें प्रथम विरोध केला होता त्या विरोधास अनुलक्षून मीं लोकमान्यांना विचारलें, मॅंटेग्यू-साहेब मनाचे थोर गृहस्थ असून सुधारणाचा कायदा घडवून आणण्याचे कामीं त्यांनीं शक्य ते प्रयत्न केले, ही गोष्ट आपणास मान्य नाहीं काय? यावर लोकमान्य म्हणाले–'मॅंटेग्यूसाहेबांच्या मनाचा थोरपणा व त्यांचे सुधारणा विषयक प्रयत्न यांची मला योग्य जाणीव आहे आभाराच्या ठरावाला मी जो प्रथम विरोध केला त्याचें कारण निराळें होतें. सुधारणा समाधानकारक आहेत, अशा आशयाचा दुसरा ठराव काँग्रेसपुढें होता. तो अर्थातच मला मान्य नव्हता. सुधारणा असमाधानकारक आहेत असा ठराव करण्यास दुसरा पक्ष तयार झाला म्हणजे आभाराच्या ठरावाचा विरोध मागें घ्यावयाचा असें मी मनाशीं ठरविलें होतें. माझ्याच म्हणण्याप्रमाणें शेवटीं घडून आलें, शिवाय या प्रश्नाकडे पाहण्याची दुसरी एक दृष्टि आहे मॅंटेग्यूसाहेब थोर असतील, त्यांनीं शिकस्तीचे प्रयत्न केले असतील, पण त्यांच्या थोरपणाचें व प्रयत्नाचें फळ म्हणून आमच्या पदरांत काय पडलें हें पाहिलें पाहिजे योग्य तितकी खबरदारी घेऊन अगदीं माफक शब्दांत आम्ही आभार न मानले तर आमच्या बोलण्याचा विपर्यास होऊन आम्हाला भरपूर सुधारणा मिळाल्या आहेत असें जगाला भासविण्याचा प्रयत्न आमच्या हितशत्रूंकडून केला जाईल हें विसरून चालावयाचें नाहीं"
वरील उत्तरांत लोकमान्यांचें विलक्षण दूरदर्शित्व दिसून आलें व त्यामुळें मला फार आनंद झाला आभाराच्या ठरावास प्रथम करण्यांत आलेला विरोध मला फार विचित्र वाटत होता पण तो अत्यंत सद्धेतुप्रेरित होता अशी माझी खात्री झाली

(३) वरील चर्चेनंतर कौन्सिलनिवडणुकीसंबधानें बोलणें सुरू झालें व ब्राह्मण आणि ब्राह्मणेतर यामधील चुरशीमुळें कौन्सिलांत नालायकांची भरती होण्याचें भय आहे असें मीं प्रतिपादिलें त्यावर लोकमान्य म्हणाले, "याबद्दल मला तितकेंसें भय वाटत नाहीं प्रतिगामी ब्राह्मणेतरांविरुद्ध आम्ही पुरोगामी ब्राह्मणेतर उभे करूं. लायक ब्राह्मणेतर न मिळाले तरी चालेल. कौन्सिलांत जोरकस विरोधी पक्ष उत्पन्न करण्यास त्या पक्षांतील सारेच लोक शहाणे असण्याची काहीं गरज नाहीं. चार दोन धोरणी व कर्त्या पुढाऱ्याच्या धोरणास

सदैव पाठिंबा देणारे लोक असले म्हणजे झालें " प्रत्येकजण स्वत च्याच शहाणपणाचें स्वतन्त्रपणें प्रदर्शन करू लागला म्हणजे काय प्रकार होतो याचा अनुभव सध्या आहे. गेल्या तीन वर्षांतील कायदेकौन्सिलाच्या कामाचें बरबर निरीक्षण करणारास लोकमान्याचें वरील विवेचन किती अर्थपूर्ण होतें हें सहज ध्यानात येण्यासारखें आहे.

(४) १९०७ सालीं लोकमान्याचें नाइकाच्या गणपतीपुढें व्याख्यान झालें प्रसिद्ध समाजसुधारक जातिभेदाच्या अनिष्टतेसबधानें ज्या प्रकारें बोलेल त्याच प्रकारें लोकमान्य बोलले या विषयासबधानें लोकमान्य इतक्या स्पष्टपणें बोलतील अशी माझी मुळींच कल्पना नव्हती यामुळें त्या वेळचें त्याचें भाषण माझ्या चागलेंच ध्यानात राहिले आहे त्या भाषणाचा सविस्तर रिपोर्ट मी त्या वेळीं ज्ञानप्रकाशात दिला व त्या भाषणाने अगदीं मन पूर्वक अभिनदन करणारें एक स्फुटहि मीं ज्ञानप्रकाशात लिहिलें त्या वेळीं हयात असलेल्या ' सुधारक ' पत्रातहि लोकमान्याचें त्या भाषणाबद्दल अभिनदन करणारा लेख आला वरील भाषणातील मुद्याचें वाक्य पुढील आशयाचें होत—" ब्राम्हणादि चार वर्ण हे एकाच विराट पुरुषाचीं चार अगें आहेत ही गोष्ट सर्वांस मान्य आहे असें असूनहि पायाचा विटाळ डोक्यास होतो असें मानणें असमजसपणाचें आहे या बाबतींतील लोकाच्या वेड्या समजुती नाहींशा केल्या पाहिजेत लोकाना या गोष्टी समजावून देणें धर्मगुरूच कर्तव्य आहे तें त्यानीं बजाविल्यास, उच्चनीचपणाच्या कल्पनाच्या पायीं माजणारे बखेडे मिटतील धर्मगुरु हें कर्तव्य न बजावतील किंवा उलट कृति करू लागतील, तर त्याना प्रसगीं बाजूस सारून समाजान लोकाच्या समजुतींत जरूर तो फरक घडवून आणला पाहिजे " हे उद्गार कट्टया समाजसुधारकास शोभण्यासारखे नाहींत असें कोण म्हणेल !

(५) भाषणातील टिपणें घेऊन मी ज्ञानप्रकाशात आलों व या वेळच मुख्य सपादक रा नटेशराव द्रविड याना मी त्या अपूर्व वाटणाऱ्या भाषणातील मजकूर सागितला त्या भाषणाबद्दल त्याना आश्चर्य व कौतुक वाटलें, पण सामाजिक प्रश्नाबद्दल लोकमान्य इतक्या खुल्या दिलानें बोलतील हें शक्य वाटेना भाषणाचे माझे रिपोर्ट नेहमीं यथार्थ असत हें त्याना ठाऊक होतें, म्हणून मी काहीं तरी सागत आहे, असेंहि त्याना म्हणवेना अशा स्थितींत नटेशराव म्हणाले—"तुम्ही भोळे आहात तुम्हाला पुणेकराचे पाचपेच अद्याप माहीत नाहीत टिळकानीं सुधारकी भाषण करताना अगलट होऊ लागलेंच तर निसटून जाण्यासारख्या अनेक पळवाटा ठेवल्या असतील व त्या तुमच्या सरळ नजरेला दिसल्या नसतील." हे उद्गार ऐकून मीं म्हटलें—" मी जी हकीकत सागितली ती सागोवागी नसून स्वत च्या कानानीं ऐकलेली आहे स्वत ऐकलेल्या गोष्टींवर विश्वास ठेवू नका असें आपण मला सागत असाल तर तें मला मान्य होणें नाहीं " असें मी

निक्षून बोलल्यावर नटेशराव म्हणाले, ठीक आहे. भाषणाचा समग्र रिपोर्ट जसाचा तसा द्या व तुम्ही आपल्या समजुतीप्रमाणें अभिनंदनपर स्फुटहि लिहा.

(६) मीं लोकमान्यांच्या भाषणाचा विपर्यास केला अशी कित्येकांनीं मजवर टीका केली. विपर्यास काय केला म्हणून समक्ष विचारतां त्यांनीं उडवाउडवीचीं कांहीं तरी उत्तरें देऊन वेळ मारून नेली. खुद्द लोकमान्यांचें भाषण वरील प्रसंगा-नंतर त्यांच्या स्वतःच्याच वाड्यांत झालें. त्या भाषणांत त्यांनीं ज्ञानप्रकाशांत व सुधारकांत नाइकांच्या गणपतीपुढें झालेल्या व्याख्यानासंबंधानें आलेल्या अभि-नंदनपर स्फुटांचा उल्लेख केला. भाषणाच्या रिपोर्टांत किंवा स्फुट लेखांत कांहीं विपर्यस्त मजकूर आहे असा एकहि शब्द त्यांनीं तोंडावाटे काढिला नाहीं. तसें करणें कदाचित् शक्यहि नव्हतें; कारण ह्या भाषणाच्या वेळींहि मी अगदीं लोकमान्यांच्या जवळच रिपोर्ट घेण्यास बसलों होतों. विपर्यासाचा आरोप केला असता तर तेथल्या तेथेंच जाब देण्याची माझी तयारी होती. अशा स्थितींत लोकमान्यांनीं अशी कांहीं खुबीदार शब्दयोजना अभिनंदनपर स्फुटांचा उल्लेख करतांना केली व अशा कांहीं विशिष्ट स्वरांत ते बोलले कीं, अभिनंदन करणारे दोघेहि लेखक बावळट आहेत अशी, तसा प्रकारचा एकहि स्पष्ट शब्द न बोलतां श्रोत्यांची समजूत व्हावी !

---

## त्र्यंबक हरि आवटे

[ आर्यभूषण छापखान्यांत केसरी निघत असतांना तेथें काम केलेले पहिले कंपॉझिटर, मालक इंदिरा प्रेस, सार्वजनिक सभेचे एक सभासद व वारकरी पंथाचे एक मराठे पुढारी, पुणें.]

(१) कै. गणपतराव सोहोनी यांनीं आर्यभूषण व केसरी संस्थांचें मॅनेजरचें काम सोडल्यावर कै. हरि नारायण गोखले हे मॅनेजरचें काम करूं लागले. तेव्हां या संस्थांशीं लो. टिळक, कै. वासुदेव बाळकृष्ण केळकर आणि कै. हरि नारायण गोखले या तिघांचा कांहीं विशेष हक्कानें मालकी संबंध होता. लो. टिळक व केळकर हे केसरी व मराठा पत्र चालविण्यांत त्या काळीं इतकी मेहनत घेत असत कीं, केसरी छापून निघाला कीं, पार्सलाचे कागद स्वतः मोडण्यापर्यंत काळजी घेत असत. पुढें कांहीं कालानें आर्यभूषण छापखान्याची मालकी कै. केळकर व गोखले यांजकडे आली व केसरी मराठ्याची मालकी लो. टिळकांकडे आली. असें जरी झालें होतें, तरी केसरी व मराठ्याकरितांच आर्यभूषण छापखाना असल्यामुळें

लो. टिळकांनीं केसरी व मराठा त्याच छापखान्यात छापण्याचें कायम केलें. लो. टिळक व केळकर याना कामगाराची परीक्षा चागली असे. त्याच्याजवळ त्या वेळीं आर्यभूषणमध्यें इमानी, मर्यादशील, निर्व्यसनी व कारखान्याचे अभिमानी कामगार असत. त्या वेळीं मी तेथें कंपॉझिटरचें काम करीत असता मला असें वाटलें कीं, खरोखर असे इमानी कामगार एकत्र होऊन केवळ कामगाराचें काम करण्याचें इमान, व भांडवलवाल्याचा कामगारावर विश्वास हेंच उभयताचे भांडवल घेऊन "कामगार लोकाच्या मालकीचा कारखाना" उभारल्यास देशात इमान आणि विश्वास वाढून देशाचा फायदा होईल. अशा आशयाचे ज्ञानप्रकाशात दोन लेख लिहिले, व तसा एखादा छापखाना हलक्या प्रमाणावर उभारण्याचा प्रयत्न केला. त्या वेळच्या कारखान्याचे सर्व हेड कंपॉझिटराचें साह्य घेऊन, अकरा मडळीचा कारखाना उभारण्याचें एक भागीपत्र रजिष्टर करून भांडवल उभारून, छापखान्याचें सामान खरेदी करण्यास मुंबईस निघून गेलों. मुंबई प्रथमच दृष्टीस पडल्यामुळें तेथील त्या वेळच्या स्थितीचें एक पत्र ज्ञानप्रकाशात मीं छापिलें, हें कै. ह. ना. गोखले याच्या लक्षात ज्ञानप्रकाश वाचीत असता आलें. मी पुण्यातील सर्व छापखान्याचे हेड् कंपॉझिटर्स जमवून त्याच्या भागीचा कारखाना काढण्याचा उपक्रम करीत आहे यावद्दल, मी आर्यभूषणमध्यें नोकरी करीत असल्यामुळें कै. गोखले यास माझ्याविषयीं विषाद उत्पन्न झाला. त्यानीं मला कारखान्यातून ऑफिसात बोलाविलें, व कै. केळकर व लो. टिळक याच्या समक्ष कै. गोखले यानीं मला मॅनेजर या नात्यानें चापलें परतु टिळक व कै. केळकर यानीं माझा उद्योग स्तुत्य आहे, अशा होतकरूस साह्य मिळाल्यास कारखान्याची कामगार बढती करतील, करिता अशा मनुष्यास उत्तेजन द्यावें, असें कै. गोखले यास सागितलें. त्यावरून कै. गोखले याचा मजवरील राग शात झाला.

(२) आर्यभूषण छापखान्यात कै. सहदेवराव पिंपळे टाईप पचमेकर या पोक्त अनुभवशीर इमानी कामगारास ठेवून त्यास वेळोवेळीं टाईपसबधीं व फौंडरीसबधीं माहिती देऊन लो. टिळकांनीं आर्यभूषणाची फौंडरी चागली नावारूपास आणली. हें कार्य आर्यभूषणच्या भरभराटीस कारणीभूत झालें. एकदरीत आर्यभूषण छापखान्याशीं त्याचा प्रथमपासूनच विशेष सबध होता, परतु पुढें पुढें त्याचा हितसबध तुटला असताहि केवळ आर्यभूषण छापखान्याच्या अभिमानानें आर्य भूषणचीं अनेक कामीं त्यानीं सुधारणा केली. कांहीं कालानें कै. केळकर याचाहि आर्यभूषणशीं असलेला सबध तुटला. शेवटीं कै. ह. ना. गोखले याच्याकडे मालकी आली. कांहीं काळ लो. टिळक याचा केसरी व मराठा हरी नारायण गोखले यानीं आपल्या आर्यभूषण छापखान्यात छापला. परतु ज्या कालीं केसरीच्या भावी उदयाची वेळ आली, त्या कालीं प्लेगचें घनघोर युद्ध, गणेश खिंडींत गव्हर्नरच्या बंगल्यावर महाराणी व्हिक्टोरिया याचा ज्युबिली समारम, प्लेग-

अधिकारी रँड–आयर्स्ट याचा जनतेच्या तळतळाटानें झालेला खून, त्यामुळें पुण्याच्या श्रीमंत लोकांच्या घराची व छापखान्याची सरकारी पल्टणीचा चोहों-कडून गराडा घालून घेतलेली झडती, यावर केसरीची लेखणी! यामुळें आर्य-भूषणचे मॅनेजर असलेले, परंतु पुढें मालक बनलेले कै. गोखले याची त्या वेळीं गाळण उडाली. तिचा परिणाम लो. टिळकाच्या केसरीवर झाला तो असा कीं, कै गोखले हे लो. टिळकाचा केसरी व मराठा आपल्या आर्य-भूषण छापखान्यात छापण्याचे एकाएकीं नाकबूल झाले. ज्या अन्नावर आर्यभूषण वाढला त्या अन्नास आर्यभूषणनें केवळ त्या वेळच्या आकाडताडवी सरकारच्या चळवळीला भिऊन झोकून दिलें केसरी व मराठा छापण्यास पुण्यास जागा नाहीं केसरी व मराठा तर जन्मल्यापासून कधींहि अवेळीं बाहेर पडला नाहीं तेव्हा आता काय करावें? लो टिळक याचें केसरी अभिमानी छापखान्याचे कामगार यास, रा. रा घोंडो वासुदेव विद्वास केसरी म्यानेजर यांच्या हस्तें निरोप कीं, काय वाटेल तें करा, परंतु केसरी व मराठा वेळेवर बाहेर पाडा!! या वेळीं रा. रा घोंडोपंत विद्वास यानीं जी मेहेनत घेतली, त्याचें वर्णन करणें अशक्य आहे. त्यानीं मराठ्याची व्यवस्था इंदिरा छापखान्यात लावली. केसरीचीहि व्यवस्था तेथेंच लावण्यात आली असती, परंतु तेथील मशीन लहान असल्यामुळें केसरी रविवारातील फडक्याचे वाड्यात असलेल्या विठ्ठल प्रेसात छापण्यास दिला त्याहि वाड्यास रात्रीं आग लागली. मग केसरीची घाबरू, अर्थात् घोंडोपत विद्वास व केसरीकामगार याची स्थिति कशी झाली असेल याची वाचकानींच कल्पना करावी इतकी बिकट स्थिति प्राप्त झाली तरी केसरी–कामगारानीं मंगळवारीं केसरी काढलाच!

---

## दामोदर विश्वनाथ गोखले

[ बी ए एलएल् बी, चिटणीस, टिळक स्वराज्य संघ, संपादक, 'मराठा' पुणें, म्युनिसिपालिटीचे एक सभासद, पुणें सार्वजनिक सभेचे चिटणीस ]

चरित्रें व आठवणी याचें क्षेत्र व यांच्या मर्यादा अगदीं निरनिराळ्या आहेत एखाद्या महनीय विभूतीच्या चरित्राची इमारत निरनिराळ्या ठळक व भव्य अशा मजबूत पायावर उठवली जाते आठवणी म्हणजे अशा या इमारतींतील केवळ सांध जोडणारा असा चारित्र्याचा भाग आहे. हा भागहि अर्थात् महत्वाचा असतो. अनेक कारणानीं चरित्रात विराजित राहिलेले सांधे या आठवणींनीं साधले जातात.

आठवणींचें हें मर्यादित क्षेत्र लक्षात घेऊनच पुढील काहीं थोड्या आठवणी लिहिल्या आहेत.

(१) मी कोल्हापूर येथील प्रायव्हेट इंग्लिश हायस्कूलमध्यें शिकत असताना १९००—०१ या सालीं टिळक कोल्हापुरास आले होते व त्या वेळीं त्यांनीं आमच्या शाळेला भेट दिली होती. शाळेतर्फे पानसुपारी झाल्यावर विद्यार्थ्यांना चार उपदेशपर गोष्टी सांगताना त्यांनीं पुढील अर्थाचा तेजस्वी उपदेश केला. ते म्हणाले कीं, " विद्यार्थीदशेंतून निघाल्यानंतर तुम्ही कोणताहि पेशा पत्करला अगर कोणत्याहि परिस्थितींत असला तरी राष्ट्राकरिता स्वतःच्या बौद्धिक व सांपत्तिक सामर्थ्याचा थोडाबहुत तरी विनियोग करा. उत्तम गोष्ट म्हणजे तुम्हांपैकीं उत्तम मुलांनीं राष्ट्रकार्यांत उडी घेतली पाहिजे. सैन्यांतील अत्यंत धाडसी शिपायानें रणांगणाच्या अग्रमार्गीच चमकलें पाहिजे." या उपदेशाचा ऐकणाऱ्या विद्यार्थ्यांवर काय परिणाम झाला असेल याची कल्पनाच केली पाहिजे. विद्यार्थ्यांतर्फे आभार मानण्याचें काम माझ्याकडे होतें. त्याच्या सांगण्याला होकार देण्यापलीकडे *अधिक आभार मानणें शक्य झालें नाहीं.*

(२) १९०५ सालची गोष्ट. ताई महाराजाच्या खटल्याच्या निमित्तानें टिळक पुनः कोल्हापुरास आले होते. त्या वेळीं त्यांचें चौफाळ्याच्या माळावर जाहीर व्याख्यान झालें होतें. व्याख्यानांत कोल्हापुरास स्वराज्य आहे वगैरे गोष्टी सांगितल्यावर *ब्रिटिश मुलुखातील राज्यव्यवस्थेशीं त्यांनीं तुलना केली व ते म्हणाले* " लोकांचें हित हेंच राजाचें हित असलें पाहिजे, लोकांचें हित पायाखालीं तुडवाल तो राजाहि नव्हे व जे तसें तुडवू देतील ती प्रजाहि नव्हे. लोकहिताच्या कामीं कोणीहि आड येता उपयोगी नाहीं. आडवें आलें म्हणजे कापून काढावें लागतें." लोकमान्यांच्या राजकीय तत्त्वाचा सपाईसोटा सर्वत्र कसा फिरत होता याचें हें एक उदाहरण आहे.

(३) १९०८ सालीं पुण्यास दारूच्या दुकानावरील पिकेटिंग अगदीं भरांत होतें. माझे स्नेही रा. श्री. द. नागपूरकर, रा. बा. गद्रे, ग. वि. गोखले, वि. रा. काटदरे या मंडळींनीं मंगळवार पेठेचा गुत्ता सभाळला होता. टिळक गुत्त्याची तपासणी करीत करीत तेथें आले, त्या वेळीं मी तेथें होतों. स्वयंसेवकांना उत्तेजनपर दोन शब्द सांगून त्यांनीं आश्वासन दिलें कीं, " सर्व अडचणींत मी *तुम्हांला मदत करीन." कर्मधर्मसंयोग असा कीं, त्याच गुत्त्यावरील एका स्वयं-*सेवकास फरासखान्यांत नेण्यांत आलें. सायंकाळीं टिळक तांबडतोब फरासखान्यांत गेले व स्वयंसेवकाला सोडवून आणण्याची त्यांनीं खटपट केली. या खटपटीमध्यें एका लहानशा शिपायानें पोलीसी अरेरावीनें टिळकांचा अपमान केला टिळकांना अपमान झोंबला, पण त्यांनीं तो निमूटपणें गिळला हें मीं पाहिलें. स्वयंसेवकाला

घेऊन वाड्यांत परत आल्यावर वरील गोष्टीची चर्चा चालली असताना टिळक म्हणाले कीं, " अंगीकृत कार्यांत यश मिळविणें हेंच जरूरीचें असतें, असल्या प्रसगीं अपमानाचे तडाखे सोसण्यातच भूषण आहे." अत्यंत मानी अशी टिळकांची ख्याति आहे. परंतु राष्ट्रदेवतेच्या पायीं हें मानधनसुद्धा त्यांनीं अर्पण केलें होतें. अत्यंत मोलाची गोष्ट सर्वांत घालणें याचेंच नाव स्वार्थत्याग !

(४) टिळक मंडालेहून १९१४ सालीं सुटून परत आले त्यावेळीं बेळगावास गंगाधरराव देशपांडे यांचेवर खटला चालू होता. मी त्यांत गुंतलों होतों. एक दिवस सुटी मिळताच मी लोकमान्यांना भेटण्यासाठीं पुण्यास आलों. दरम्यान त्यांनीं देशांतील राजकीय परिस्थिती समजावून घेतली होती. गंगाधररावांच्या खटल्याची हकीगत विचारून घेतल्यावर राजकारणाचा विषय निघाला. जवळ नेहेमींची मंडळी होती. नवीन धोरणासंबधीं बोलताना ते म्हणाले कीं, " आता पूर्वीचे पक्षभेद मोडून टाकले पाहिजेत पक्षाची नवी गल्लत करून यापुढें नवा डाव मांडणेंच जरूर आहे. मुसलमानांचा पक्ष, बेझंट बाईंचे अनुयायी व आपला राष्ट्रीयपक्ष यांची एक गट्टी करून सरकारशीं केवळ स्वराज्याच्याच बाबतींत भांडण भांडणें श्रेयस्कर आहे. असें केलें तरच यशप्राप्ति होईल." चौदा साला नंतरच्या लोकमान्यांच्या राजकीय धोरणाचें बीज त्यांच्या वरील दूरदर्शी वाक्यांत आहे. पुढचा व्यूह त्यांनीं याच तत्त्वावर उभारला हें सांगणें नकोच !

(५) राष्ट्रीय सभेंत शिरण्यासंबधीं मवाळ पक्षाच्या पुढाऱ्यांशीं झालेला वाद सुप्रसिद्धच आहे. १९१५ च्या प्रारंभींच समेट अशक्य ठरल्यामुळें लो. टिळकांनीं आपल्या पक्षाची स्वतंत्र संघटना करण्याचें योजिलें व पुणें येथें महाराष्ट्र प्रांतिक परिषद बॅ. बॅप्टिस्टा यांचे अध्यक्षतेखालीं भरविली. परिषदेच्या प्रारंभीं स्वागतपर पद्यें म्हणावीत असा बूट निघाला. प. विष्णु दिगंबर पलूसकर व ह. भ. प. डॉ. पटवर्धन हे पद्यें म्हणणार होते. या दोघांनीं पद्यासंबधीं आपल्या गायन शास्त्राच्या कल्पना सांगितल्यावर लोकमान्य म्हणाले कीं, ' या परिषदेच्या प्रारंभीं म्हटलीं जाणारीं पद्यें मला रडवीं नको आहेत. पद्यें अशीं असावींत कीं, तीं ऐकताच ऐकणाऱ्याच्या मनांत उत्साह संचारून आपण कांहीं तरी मोठें कार्य करण्यास उद्युक्त झालों आहोंत अशी भावना आपोआप उत्पन्न व्हावी. युद्धाच्या प्रारंभीं ज्याप्रमाणें वीरश्रीयुक्त असें रणगीत म्हटलें जातें, तद्वत याहि प्रसगीं तसल्या जातीचीं पदें म्हणावींत. इमधारी झगडणें ही एक ल्ढाईच आहे ही गोष्ट दृष्टिआड करता येत नाहीं. '

(६) महाराष्ट्र प्रांतिक परिषदेचें अधिवेशन आटोपल्यावर आपल्या पक्षाचें संघटन करण्याकरिता सर्व प्रांतभर, राष्ट्रीय पक्षाच्या सभांचें जाळें पसरण्याचा त्यांनीं उद्योग आरंभिला. एके वेळीं या कार्याच्या उपयुक्ततेसंबधानें लोकमान्य

म्हणाले कीं, "मुलाना शाळेंत घालून ज्याप्रमाणें इयत्तावार शिक्षण द्यावें लागतें तद्वतच सार्वजनिक कामें करण्याचे धडे आस्ते आस्ते लोकाना द्यावे लागतात फरक इतकाच कीं, शाळेंत मास्तर धडे देतात, येथ आपले आपणच शिकावे लागतात. लोकाना कांहींना कांहीं कार्यांत गुतवून ठेवणें हीच यशाची किल्ली आहे. पाणी जमिनीवर सांडण्याबरोबर तें जशी आपोआप वाट काढतें त्याप्रमाणें प्रत्यक्ष कामात पडल्यावर पुढील मार्ग व धोरण हीं आपोआप सुचू लागतात काम करीत राहणें एवढेंच आपलें कर्तव्य आहे" ठिकठिकाणीं लोकाना गुतवून त्याना कार्यप्रवण करण्याचा लोकमान्याचा उद्योग केवढा होता हें वरील त्याच्या सूत्रावरून समजून येईल.

(७) स्वराज्यसघ सस्थापन करण्याचा उद्योग लोकमान्यानीं कसा सुरू केला ही एक मौजेची हकीगत आहे. राष्ट्रीय सभेची बैठक १९१५ सालीं मुबईस भरली मुबईच्या स्थानिक राष्ट्रीय पक्षाच्या अनुयायापैकीं कांहींना सदर सभेस जाण्याचा मोह आवरेना त्यापैकीं कांहींनीं लोकमान्याना कळविलें कीं, राष्ट्रीय सभेस प्रतिनिधी म्हणून आम्ही जात नाहीं तथापि प्रेक्षक म्हणून आम्ही सभेस हजर राहू इच्छितों अशा अर्थाचें पत्र दोन माणसाकडून का होईना आलेलें पाहून राष्ट्रीय पक्षाची एकादी स्वतत्र सस्था राष्ट्रीय सभेच्या तोलाची असल्याशिवाय पुढें पाऊल टाकणें इष्ट नाहीं असें त्यानीं ठरविलें व तावडतोब राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनाच्या दिवसातच पुण्यास राष्ट्रीय पक्षाच्या पुढाऱ्याची स्वराज्य सघ स्थापन करण्याचा विचार करण्याकरिता परिषद भरविण्याचें त्यानीं ठरविलें. वेळ तर अगदीं थोडा होता. त्याच दिवशीं सायकाळीं त्याच्या सहीनें जवळजवळ दोनशें राष्ट्रीय पक्षातील पुढाऱ्याना पुण्यास येण्यासबधीं तारेनें निमत्रणें गेलीं. दुसरें दिवशीं पत्रेंहि रवाना झालीं राष्ट्रीय सभेच्या दिवसातच मुबई, महाराष्ट्र, कर्नाटक, वऱ्हाड, नागपूर, मद्रास येथील चारपाचशें ठळक माणसें पुण्यास जमा झालीं व या खासगी सभेचें रूपातर राष्ट्रीय पक्षाच्या परिषदेंत झालें. ना दादासाहेब खापर्डे याच्या अध्यक्षतेखालीं स्वराज्यसघ स्थापन करण्याची योजना करण्यासाठीं एक कमिटी नेमण्यात झाली या कमिटीच्या रिपोर्टावरच पुढें बेळगावास स्वराज्यसघ स्थापन झाला, ही गोष्ट प्रसिद्ध आहे ही परिषद मात्र त्या काळच्या राष्ट्रीय सभेच्या तोलाची नसली तरी तितकी महत्त्वाची मात्र झाली एकाद्या लहानशा बिंदूपासून कार्याचा सिंधु कसा उत्पन्न करावा ही कला लोकमान्याना

असावा एवढाच लोकमान्यांचा आग्रह होता व राष्ट्रीय सभेनें हा अधिकार सदर संस्थाना दिला. अर्थात् त्या बाबतींतील वाद संपला व लोकमान्यांनीं राष्ट्रीय सभेंत शिरण्याचें ठरविलें. कोणतीहि गोष्ट आपण मनाशीं ठरविली तरी एकदम अमलांत न आणतां आपल्या पक्षाच्या सर्व लोकांचें मत घेण्याचा त्यांचा परिपाठ होता. या परिपाठाप्रमाणें त्यांनीं फेब्रुवारी १९१६ सालीं पुनः एकवार आपल्या पक्षांतील सर्व प्रमुख गृहस्थांना पुण्यास बोलाविलें व सर्वांची खात्री करून देऊन त्यांनीं राष्ट्रीय सभेंत शिरण्यास त्यांची संमति घेतली. कांहीं चारदोन मंडळींना सदर कल्पना पसंत पडली नाहीं, पण पुढें अनुभवातीं लोकमान्यांचाच डाव बरोबर होता, अशी समयनिवृत्ति झाली. सात-आठ महिन्यांच्या अवधींत लोकमान्यांनीं तीन-चार वेळां आपल्या पक्षांतील प्रमुख लोकांना बोलावून त्यांचा सल्ला त्यांनीं घेतला. आपला कार्यक्रम लोकांना पटवून मग सर्वांना बरोबर घेऊन पुढें पाऊल टाकावयाचें अशी लोकमान्यांची रीत असे व त्यांतच त्यांच्या यशाची गुरुकिल्ली आहे.

(९) बेळगांवास मुंबई प्रांतिक परिषदेची बैठक १९१६ च्या एप्रिल अखेर झाली. राष्ट्रीय सभेंत शिरण्याचा ठराव अर्थात् पसार झाला. तेथें असलेल्या सर्व मंडळींच्या शंकांचा परिहार त्यांनीं केला. सदर बाबतींत खासगी चर्चा चालली असतांना लोकमान्य म्हणाले कीं "क्रीडबीडचे भुजगावणें आतां लक्षांत घेतां उपयोगी नाहीं. आम्ही मंडळी पूर्वीं क्रीडवर सह्या करीत नव्हतों व आतां करणार असले आखेर हे यावपाचेस कार्याच्या दृष्टीनें पुष्कळ वेळां आपले डावपेंच बदलावे लागतात. राष्ट्रीय सभेंत आपण शिरून त्या द्वारें राष्ट्राचीं स्वराज्याच्या ध्येयाकडे एक दोन पावलें अधिक पडतील व तीं आपल्या प्रयत्नानें पडतील तर तुम्हीं पूर्वीं सह्या केल्या नाहींत व आतां करतां या गोष्टीकडे कोणीहि लक्ष देणार नाहीं. भविष्यकाळानें भूतकाळ पुसला जातो. कार्याची महति अत्यंत आहे, साधनें क्षुद्र होत." लोकमान्यांना त्या वेळीं सदर बाबतींत ज्यांनीं कडून विरोध केला त्यापैकीं बहुतेकांनीं लोकमान्य बरोबर होते व आपण चूक होतों अशी कबुली दिली आहे!

(१०) स्वराज्यसंघाची संस्थापना मे १९१६ च्या मारमीं झाली. त्याच वेळीं बेळगांवास लोकमान्यांनीं सदर विषयावर एक खणखणीत व्याख्यान दिलें व मेअखेर अहमदनगरास दोन व्याख्यानें दिलीं. संघाच्या संस्थापनेपासून संघाची संघटना वाढविण्याकरितां त्यांनीं अतोनात श्रम केले, व दुसऱ्या कोणालाहि कामाशिवाय स्वस्थ बसू दिलें नाहीं. त्यांच्या चळवळीच्या धूमधडाक्याची आंच नोकरशाहीस लागल्यामुळेंच वरील तीन व्याख्यानांबद्दलच त्यांच्यावर जामीनकीचा खटला भरला गेला. लोकमान्यांच्या कामाचा धडाका केवढा दांडगा होता याची कल्पना वरील गोष्टीवरून येण्यासारखी आहे.

## दत्तात्रय व्यंकटेश बेळवी

[ बी. ए. एलएल्. बी. हायकोर्ट वकील, टिळक स्वराज्यसंघ-स्मारकाचे एक ट्रस्टी, खासदार, बेळगांव. ]

(१) टिळक-स्वराज्य-संघाची स्थापना बेळगांव मुक्कामीं सन १९१६ सालांत एप्रिल अखेरीस झाली ही गोष्ट मशहूर आहे. या संघाची स्थापना झाल्यानंतर लो. टिळकांची बेळगांव जिल्ह्यांत चिकोडी, अथणी, निपाणी वगैरे ठिकाणीं बरींच व्याख्यानें व पानसुपारीच्या निमित्तानें खासगी संभाषणें झालीं. त्या प्रत्येक जाहीर व्याख्यानांत आणि प्रत्येक खासगी संभाषणांत लो. टिळक स्वराज्य मागण्याकरितां शेवटीं लोकांना आग्रहानें सांगत असत. या विषयासंबंधानें एक मोठी गमतीची गोष्ट सन १९१७ सालीं चिकोडीस बेळगांव जिल्हापरिषद भरली होती त्यावेळीं घडून आली. ती गोष्ट थोडक्यांत अशी आहे. सुमारें ६०।७५ वर्षांपूर्वी बेळगांव जिल्ह्यांत एक साधु पुरुष होऊन गेला. तो साधु आपल्याकडे जे कोणी स्त्री अगर पुरुष भाविकपणानें येऊन आपली अडचण सांगत त्यांना एकच तोटगा सांगत असे. एकाद्या कर्जबाजारी मनुष्यानें येऊन आपणांस कर्जांतून लौकर मुक्त व्हावें असा आशीर्वाद मिळावा अशी विनंति केली; किंवा एकाद्या इसमानें येऊन आपल्या घरीं चोरी होऊन आपला सर्व माल गेला तो परत मिळावा असा आशीर्वाद द्यावा अशी विनंति केली, किंवा एकाद्या इसमानें आपल्यास द्रव्यप्राप्ति व्हावी किंवा आपल्या धंद्यांत आपली भरभराट व्हावी असा आशीर्वाद मिळावा म्हणून विनंति केली, अगर एकाद्या रोग्यानें साधुमहाराजांकडे येऊन आपला रोग नाहींसा व्हावा आणि आपण धुष्ट व्हावें अशी विनंति केली; किंवा एकाद्या अपुत्रवती बाईनें येऊन आपणास पुत्रलाभ व्हावा अशी प्रार्थना केली, तर या सर्व लोकांचें समाधान करण्याची त्या साधुपुरुषाची एकच ठराविक रीति होती. साधुमहाराजांनीं आपल्याजवळ एका भांड्यांत बरेंचसें विंच्वाचें तेल ठेवलेलें होतें, व प्रत्येक भक्ताच्या तळहातावर तो त्या तेलानें एक फुली आपल्या हातानें काढीत असे. या फुलींत अजब जादु भरली आहे आणि या फुलीमुळें आपलें इष्टकार्य खात्रीनें होईल असा त्या साधुमहाराजांकडे येणाऱ्या प्रत्येक स्त्रीपुरुषांचा समज असे. कानडी भाषेंत विंच्वाला "केळ" म्हणतात आणि विंच्वाचें तेल वापरलें म्हणून साधुमहाराज यांना कर्नाटकांतील बहुजनसमाज "केरप्पा" (विंच्वाचें तेल वापरणारे बुवा) असें म्हणत असत. चिकोडी मुक्कामीं मी व माझे मित्र दे. भ. गंगाधरराव देशपांडे या उभयतांनीं लो. टिळकांच्या संबंधानें खासगी रीतीनें बोलत असतांना आम्हीं नामदार दादासाहेब करंदीकर यांना विनोदानें ही गोष्ट सांगितली, आणि त्या दिवसापासून लोकमान्यांना आम्हीं सांकेतिक रीतीनें खासगी भाषणांत 'केरप्पा' असें म्हणावें असें ठरविलें. पुढें चिकोडीहून

निपाणीस लो. टिळक, ना करदीकर, दे. भ. गंगाधरराव व स्वतः मी एका मोटारींतून रात्रींच्या वेळीं जात असतांना ना. करदीकर यांनीं लोकमान्यांना ही गोष्ट सांगितली आणि तुम्हांला आम्ही 'बेरप्पा' म्हणणार असें सांगितलें. त्या वेळीं लोकमान्यांना मोठा आनंद झाला आणि ते मोठ्यानें हसले व म्हणाले, "उपमा अगदीं यथार्थ आहे. त्या साधूच्या बिऱ्याच्या पुलीप्रमाणें माझ्या स्वराज्यानेंहि देशाचीं सर्व दुःखें नष्ट जातील" यानंतर निपाणी मुक्कामीं त्याचें सार्वजनिक व्याख्यान झालें व तेथील जैन लोकांच्या वस्तींत पानसुपारीचे वेळीं निपाणींतील व्यापारी मंडळींना उद्देशून १०।१५ मिनिटें भाषण झालें. पुढें सन १९२० सालीं संकेश्वर मुक्कामीं लो टिळकांचीं एकदोन सार्वजनिक व्याख्यानें आणि चार-पांच खासगी संभाषणें झालीं या वेळीं प्रत्येक ठिकाणीं मी लोकमान्यांबरोबर हजर होतों व्याख्यान किंवा संभाषण पुरें झाल्याबरोबर लोकमान्य मजकडे पाहत असत आणि मला जवळ बोलावून हळूच माझे कानांत "का, बरोबर पुली उठली कीं नाहीं?" असें यत्न विचारीत असत या ल्हानशा गोष्टीवरुन लोकमान्यांना विनोद आवडत असे हें स्पष्ट होतें

(२) सन १९१७ सालांत चिकोडी मुक्कामीं भरविण्यांत आलेली बेळगांव जिल्हा परिषद संपल्यानंतर एके दिवशीं रात्रौ सुमारें १० वाजतां लो टिळक आपल्या मित्र-मंडळीबरोबर निपाणीस जाण्याकरितां निघाले ती रात्र काळोखाची होती, आणि रात्रहि बरीच झाली होती. तथापि चिकोडी सोडल्यानंतर वाटेंत लोकमान्यांना ठिकठिकाणीं रस्त्यावरच त्या त्या गांवच्या शेतकरी लोकांनीं आपल्या साध्या रीतीनें पानसुपारी करावी असें ठरवून वाटत सडकेच्या बाजूला १०।२० शेतकरी आणि १०।२० मुलें एक कांबळें पसरुन आपणाजवळ एका ताम्हनांत आरती, थोडासा गूळ, व १०।१२ विड्याचीं पानें आणि कांहीं सुपाऱ्या इतकी सामुग्री तयार ठेवून वाट पाहत बसलेले दिसले मोटार जवळ आल्याबरोबर त्या शेतकरी लोकांनीं 'टिळकमहाराजकी जय' अशी गर्जना केली. तेव्हां त्या प्रत्येक ठिकाणीं लोकमान्यांनीं आपली मोटार उभी करून खालीं उतरून त्या गरीब लोकांचा पाहुणचार घतला आणि त्यांना चार उपदेशाच्या गोष्टी सांगून दुसऱ्या दिवशीं निपाणीस व्याख्यानाकरितां येण्यास सांगून पुढें निपाणीस गेले. केवढाहि गरीब मनुष्य असला तरी त्याचें मन मोडावयाचें नाहीं, हें लोकमान्यांचें ब्रीद प्रसिद्धच आहे.

(३) सन १९२० सालीं मार्च महिन्यांत बेळगांव जिल्हा परिषद संकेश्वर मुक्कामीं भरविण्यांत आली होती त्या परिषदेकरितां लोकमान्यांची स्वारी पुण्याहून संकेश्वरास सकाळीं दहाचे सुमारास आली, तेव्हां संकेश्वर येथें जमलेल्या हजारों लोकांनीं घोड्याचे गाडींतून त्यांची मिरवणूक काढली. त्या मिरवणुकीचें काम

दुपारीं सुमारें एक वाजता संपलें. त्या वेळीं फार फार होतें व लोकमान्यांचें स्नान वगैरे व्हावयाचें होतें. तथापि आपलें बिऱ्हाडाजवळ मिरवणूक येताच लोकमान्य आपले बिऱ्हाडीं न जाता, तसाच उन्हांत श्रीजगद्गुरूंच्या मठांत जाऊन श्रीगुरुमहाराजापुढें पूजाद्रव्य व नारळ ठेवून त्यांनीं गुरुमहाराजांना साष्टांग नमस्कार घातला आणि त्यांच्याजवळ सुमारें पधरा मिनिटें बसून त्यांना कुशलप्रश्न विचारून आणि त्यांची परवानगी घेऊन आपल्या बिऱ्हाडीं गेले. तसेंच परिषदेचें काम दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं संपताच पुन: हुकेरीरोड स्टेशनावर जाण्यापूर्वी गाडीची वेळ होत आली होती असें असताहि परिषदेच्या मंडपापासून सुमारें दोन मैल अंतरावर असलेल्या श्रीजगद्गुरूंच्या मठांत जाऊन त्यांना प्रणिपात करून त्यांचा निरोप घेतला. त्यावेळीं श्रीमत्जगद्गुरुमहाराजांनीं लोकमान्यांना एक जरीकांठी शालजोडी आणि प्रसाद अर्पण करून मोठ्या प्रेमानें त्यांना निरोप दिला. कसलीहि घाई असली तरी लोकमान्यांना आपल्या पूर्वाचार चालींचा आणि शिष्टसंप्रदायाचा विसर पडत नसे

(४) सन १९२० सालीं एप्रिल महिन्यांत सोलापूर मुक्कामीं मुंबई प्रांतिक परिषद भरली होती. त्या वेळीं लोकमान्यांची स्वारी होमरूल लीगच्या चळवळी-संबंधानें सिंध प्रांतांत दौऱ्यावर गेली होती. सिंध प्रांतांतून थेट सोलापुरापर्यंत सारखा प्रवास करून परिषदेच्या पहिल्या दिवशीं लोकमान्य सोलापुरास आग गाडीनें आले तीन चार दिवस सारखा प्रवास केल्यामुळें ते साहजिकच अगदीं थकून गेले होते. तथापि सोलापूर स्टेशनवर आगगाडींतून उतरल्याबरोबर तेथें जमलेल्या हजारों लोकांनीं त्यांचें स्वागत करून त्यांना स्टेशनवर वेटिंग रूममध्यें नेऊन बसविलं तेथें हारतुरे, पानसुपारी वगैरे झाल्यानंतर जमलेल्या मंडळींपैकीं एका गृहस्थानें त्यांना असें सांगितलें कीं, नामदार परांजपे, ना. कामत, रा गोविंदराव गाडगीळ बॅरिस्टर, रा कोठारी वगैरे मवाळ लोक आपण येथें येण्यापूर्वीच येऊन कॉंग्रेस पक्षाच्या कौन्सिलच्या उमेदवारांना मतें न देता तीं मवाळ उमेदवारानाच द्यावीं म्हणून लोकांचीं मनें वळविण्याकरितां येथें दररोज जाहीर व्याख्यानें देत आहेत. हा मजकूर ऐकून लोकमान्यांनीं आपल्या अस्तन्या वर सारून त्या गृहस्थास जोरानें असें सांगितलें कीं, "बरें, असें काय? आज सायंकाळीं माझें व्याख्यान ठेवा." त्याप्रमाणें त्या दिवशीं व दुसरे दिवशीं लोकमान्यांचीं जाहीर व्याख्यानें झालीं व्याख्यानास अतिशय गर्दी नेहमीप्रमाणें होतीच या दोन व्याख्यानामुळं मवाळांनीं केलेली खटपट फुकट गेली आणि सोलापुरास जमलेला बहुजनसमाज लोकमान्य टिळकांचे पक्षास वळला पुढें परिषदेंत आयत्या वेळीं पदरची फी भरून मवाळांनीं जे हजारो प्रतिनिधि आणले होते त्यांनीं सुद्धां लोकमान्यांचे बाजूनेंच आपलीं मतें दिल्यामुळें, मवाळ मुद्द्याचा पराभव झाला, हें मशहूर आहे सार्वजनिक कामांत लोकमान्यांना

आपल्या शरीरसुखाची पर्वा वाटत नव्हती आणि शरीरास थकवा आला असला तरी त्याच्या मनास केव्हांहि थकवा येत नसे. सार्वजनिक काम करण्यास त्यांना नेहमीं हुरूप येत असे.

---

## सदाशिव लक्ष्मण सोमण

[ बी ए एल्‌एल्‌ बी , लोकमान्यांचे शिष्य, मागी 'काळ' पत्राचे कांहीं काळ संपादक, राष्ट्रीय शाळेचे मुख्याध्यापक—बेळगाव. ]

(१) मी पुणें येथील न्यू इंग्लिश स्कूलमध्यें ६ व्या इयत्तेंत शिकत होतों. इ. स. १८९० सालीं लोकमान्य कॉलेजमध्यें दोन्ही वर्गांवर व शाळेंतील ७ व्या इयत्तेच्या वारी तुकड्यांना शिकवीत. एक दिवस माझ्या वर्गाचे गणिताचे शिक्षक आजारी असल्यामुळें ते शाळेस आले नव्हते, व त्यांचा तास घेण्यास लोकमान्यांची स्वारी आली. युक्लीडच्या भूमितीच्या ४ थ्या पुस्तकांतील ३ रा सिद्धांत घ्यावयाचा होता. लोकमान्यांनीं प्रारंभींच त्रिकोणादि आकृतीभोंवतीं वर्तुळ काढतांना आकृतीच्या बाजूंच्या मध्यापासून बाजूवर काढलेले लंब एकाच बिंदूत मिळतात व त्या बिंदूपासून कोनबिंदूपर्यंत काढलेल्या रेषा सर्व एकसारख्या असल्यामुळें तो मध्यबिंदु व कोनबिंदूपर्यंतची रेषा त्रिज्या धरून इष्ट वर्तुळ कसें काढावें व कोणत्याहि आकृतींत वर्तुळ काढावयाचें असल्यास कोन दुभागणाऱ्या रेषांच्या मिलन बिंदूपासून निरनिराळ्या बाजूवर काढलेले लंब सारखे असल्यामुळें तो बिंदु केंद्र समजून लंब ही त्रिज्या समजून इष्ट वर्तुळ कसें काढावें हें सामान्यतः सांगून ठसले दोन्ही सिद्धांत आमच्याकडूनच वर्गांत त्याच एक तासांत करून घेतले. या प्रसंगीं लोकमान्य खुर्चीवर एकदा जे बसले होते ते तसेच बसून होते. फळ्यावर आकृति काढतांना, नांवें देतांना त्यांनीं एकदासुद्धां फळ्याकडे वळून पाहिलें नाहीं व कोणीहि कोन बाजू वगैरेंचीं नांवें चुकून घेतलीं असतां तावडतोब दुरुस्ति करीत.

(२) १८९१–९२ सालीं पुण्यांतील शनिवार पेठेंतील सागलीकराच्या वाड्यांत पचहौदमिशनमध्यें जाऊन चहा घेतल्याबद्दल लोकमान्यादिकांवर बहिष्कार टाकण्यासंबंधीं श्री. जगद्गुरु शंकेश्वर मठ यांनीं नेमलेल्या प्रतिनिधींसमोर चौकशीचें काम चालू होतें. त्या वेळीं पुण्यांतील पक्ष म्हणजे सुधारक किंवा बाटगळ व दुर्धारक किंवा पुराणमताभिमानी. सामान्य जनतेचा ओढा व त्याबरोबरच आम्हां विद्यार्थ्यांचा ओढा या दुसऱ्या पक्षाकडे; पण या वेळींहि या चहाच्या प्रकरणांत

सामान्य जनतेपैकीं अर्ध्या पाऊण भागाचा ओढा व विद्यार्थ्यांपैकीं सर्वांचाच ओढा टिळकपक्षाकडे असे. विशेषतः संमति बिलाच्या वादाच्या वेळीं लोकमान्यांनीं जी खळवळ उडवून दिली, तेव्हांपासून सामान्य जनतेचीं विशेषतः तरुणांचीं व विद्यार्थ्यांचीं मतें टिळकांच्या मतानुसारच असत. असो; एक दिवस श्रीमंत बाळासाहेब नातू–लोकमान्यांचे प्रतिपक्षी–हे वादी होण्यास नालायक आहेत; कारण ते देशद्रोह करून मिळविलेलें अन्नहि खात आहेत असा आक्षेप लोकमान्यांनीं उघडपणें घेतला. त्या वेळीं श्री. नातूंच्या सुधारपक्षीय कट्टरांनीं खालीं माना घातल्या व वरीचशी मंडळी संतापानें चिडून गेली. उलट सामान्य जनतेच्या विशेषतः विद्यार्थ्यांच्या घोळक्यानें टाळ्या वाजून लोकमान्यांचें जणूं काय अभिनंदनच केलें.

(३) १९०५ सालीं बेळगांवचे श्रीयुत गंगाधर बाळकृष्ण देशपांडे यांजबरोबर मीहि लोकमान्यांच्या दर्शनासाठीं बेळगांवाहून आलों होतों. कांहीं तरी काम करीत राहावें ही श्री. गंगाधररावजींची इच्छा; ती लोकमान्यांना कळवून काय काम करावें, तें कसें करावें वगैरे प्रश्न त्यांनीं लोकमान्यांना अत्यंत आदरानें विचारिले. लोकमान्यांनीं त्यांना कोण, कोठील, घरची स्थिति वगैरेंबद्दल विचारून नानाप्रकारचीं कामें करणें किती अवश्य आहे, त्याला माणसेंच मिळण्याची अडचण कशी पडते वगैरे सांगितलें. त्याच वेळीं पुण्यांतील दुसऱ्या म्हणजे कै. गोखले यांच्या पक्षाचें आपल्या मतें कोठें चुकतें तेंहि सांगून नामदार गोखले यांनाहि अवश्य भेटा व त्यांनाहि यासंबंधानें विचारा असें त्यांनीं सांगितलें. त्याप्रमाणें श्रीयुत गंगाधरराव कै. गोखले यांच्याकडे गेले होते; मीहि त्यांच्याबरोबर होतोंच. लोकमान्यांच्या या भेटीनंतर परत गेल्यापासूनच श्रीयुत गंगाधररावांच्या राष्ट्रसेवेस या स्वरूपानें प्रारंभ झाला.

(४) १९०६।७ सालीं श्री. गंगाधरराव यांचे वडील यांस खालील हकीगत कळली. ते आज हयात नाहींत म्हणून ती हकीकत मी देत आहे. श्री. गंगाधरराव यांच्या वडिलांस हे एकच पुत्र. आमचे चिरंजीव नवीन चळवळींत पडले आहेत, बोलतांना भडकून जातात, कदाचित् थोड्याच दिवसांत त्यांना तुरुंग पहावा लागेल असें वाटून त्यांना लोकमान्यांच्या कडून कांहीं सांगावें म्हणून एकदां लोकमान्यांना मुद्दाम भेटून त्यांनीं आपल्या चिरंजिवास कांहीं तरी उपदेश करावा अशी विनंति केली. त्यांना लोकमान्यांनीं विचारलें "लोकांमध्यें मिसळून ही चळवळ करावयास पाहिजे असें वाटतें कीं नाहीं ?" चळवळ करणें अवश्य आहे अशी कबुली घेतल्यावर लोकमान्य म्हणाले, "तर मग या कामाला तुमच्या चिरंजिवापेक्षां अधिक योग्य कोण आहे बरें ? घरीं उत्पन्न आहे, तुरुंगांत गेला तरी पाठीमागें कुटुंबपोषणाची काळजी नाहीं, वाणी चांगली आहे, बुद्धिमत्ता आहे, उत्साह आहे, स्फूर्ति आहे; अशा स्थितींत त्यांनीं असलीं कामें करूं नयेत तर कोणीं करावींत ?" श्री. गंगाधररावांचे वडील परत आले तेव्हां

त्यांनीं श्री गंगाधररावांना सांगितलें "या मार्गांत शिरणारानें नीट विचार करून पुढील सर्व परिणाम लक्षांत घेऊन मग शिरावें व एकदा हा मार्ग स्वीकारल्यावर एक पाऊलहि माघार घ्यावयाची नाहीं, हा लोकमान्यांचा बाणा अखंड चालवावा. असें करावयाचें असेल तर यांत पड, मला आनंद आहे" लोकमान्यांचें सांगणें आपल्यास पूर्णपणे पटल्याचेंहि त्यांनीं सांगितलें व मरेपर्यंत श्री गंगाधरराव यांना त्याच पूर्ण प्रोत्साहन होतें व १९०९।१० सालीं श्री. गंगाधरराव यांना सरकारनें वाटेल त्या मार्गानें अराजकाच्या दावणींत गाठून तुरुंगांत पाठविण्याचे प्रयत्न जारीनें चालू असतांहि त्यांच्या वडिलांनीं न डगमगतां त्याला तोंड दिलें, तेंहि लोकमान्यांच्या या भाषणामुळें होय असें ते सांगत

(५) सुरतेच्या कॉंग्रेसच्या वेळीं बेळगांवाहून सुमारें ४०–४२ प्रतिनिधि गेले होते. मीहि गेलों होतों राष्ट्रीय पक्षाच्या कन्व्हेन्शनच्या सभा रोज एकदोन वेळां होत असत कॉंग्रेसच्या बैठकीपूर्वीच्या शेवटच्या सभेंत कॉंग्रेसच्या अध्यक्षाबद्दलच्या सूचनेस उपसूचना आणावी असें ठरलें त्यानंतर तें काम कोणीं करावें याबद्दल अर्धवट अपापसांत या कन्व्हेन्शनच्या भरसभेतच चर्चा चालू झाली त्यावेळीं लोकमान्यांनीं असें ठासून सांगितल्याचें मला अजून चांगलें स्मरतें कीं, तें काम आपल्याकडेच सोंपवावें दुसऱ्याच्या हातून तितक्या नेटानें तें काम होणार नाहीं असा त्यांच्या बोलण्याचा स्पष्ट झोंक होता पुढें कॉंग्रेसच्या बैठकींत ही उपसूचना आणण्यासाठीं ते इतक्या जल्दीनें व्यासपीठावर चालून गेले कीं, तें पाहून एखाद्या चलाख तरुणास सुद्धां त्यांच्या त्या चपळपणाचा हेवाच वाटावा ! इतक्या गडबडींत पुढील प्रसंग काय ओढवणार याची पूर्ण जाणीव त्यांच्या दूर दृष्टीस असल्यामुळें ते बसल्या जागींच आपली लहू काठी ठेवून तसेच रिकाम्या हातानें व्यासपीठावर गेले पुढें मला येथून हातानीं उचलून नेईपर्यंत मी माझें भाषण ऐकविणार असें जाहीर करतांना लोकमान्यांचा उजवा हात डाव्या कॉपराच्या आतील बाजूस व डावा उजव्याच्या आतील बाजूस होता ती त्यांची धैर्याची मूर्ति पाहतांच हें काम खरोखरच दुसऱ्याच्या हातून निभलें नसतें अशी त्यांनीं मला तरी तत्क्षणीं पटली.

(६) सुरतची कॉंग्रेस मोडतांच त्या दिवशीं तिसरे प्रहरीं पुनः राष्ट्रीय पक्षाची सभा भरली होती त्या वेळीं पुढें काय करावें यासंबधानें विचार चालू असतांना लोकमान्यांचें भाषण झालें ते इतक्या शांतपणें बोलत होते कीं, नेमस्त पक्षाचे सर्व लोक व राष्ट्रीय पक्षांतीलहि कांहीं लोक कॉंग्रेस मोडल्याचें पाप ज्या लोकमान्यांच्या माथीं मारून गहजब करीत होते तेच हे लोकमान्य कीं काय अशी भूल क्षणभर सर्वांच्या मनाला पडली असावी मी तरी आश्चर्यचकित झालों. पुढें मजप्रमाणेंच आश्चर्यस्तिमित झालेले कांहीं लोक मला भेटले व शेवटीं दूरदृष्टी बुद्धिमान् मनुष्य भावी परिणाम समग्र जाणूनच आजचें कार्य करीत असतो,

त्यामुळें भावी परिणाम कितीहि विलक्षण असले तरी ते घडून आल्याबद्दल त्याला आश्चर्यहि वाटत नाहीं, तो चकितहि होत नाहीं किंवा गांगरूनहि जात नाहीं, ही गोष्ट आम्हास प्रतीत झाली.

(७) १९१४।१५ सालीं सहा वर्षे तुरुंगांत काढून लोकमान्य परत आले. त्यावेळीं मी बेळगांवात होतों श्री गंगाधररावांच्या एका स्नेह्याच्या आतावर एक खुनाचा खटला पोलिसांनीं घातला होता त्यात श्री गंगाधरराव प्रथम वकील होते. पुढें पोलिसांनीं त्यांना आरोपी केलें व मॅजिस्ट्रेटनीं त्यांना सेशन कमिट केलें होतें सेशनांत खटला सुरू होताच श्री. गंगाधररावांवरील आरोप काढून घेण्यात आला आरोपी श्रा. गंगाधरराव यांची मदत वकील म्हणून अगर इतर कोणत्याहि प्रकारें मिळूं नये हा पोलिसांचा हेतु स्पष्ट होता, हें सर्व लोकमान्य सुटून पुण्यास येताच त्यांना समजलें हें समजताच म्हणजे सुटून आल्यावर ४।५ तासांच्या आतच लोकमान्यांकडून श्री गंगाधररावांना या खटल्यासंबधानें तार आली. ती वाचून लोकमान्यांनीं ज्याला एकदां आपला म्हटलें त्याच्याबद्दल ते किती काळजी वाहत असतात हें बेळगांवच्या श्री गंगाधररावांच्या सर्व स्नेह्यांच्या व शिष्यांच्या पूर्ण प्रत्ययास आलें.

(८) १९१६ सालीं आपल्या पक्षाचें एक दैनिक काढावें असें श्री रामभाऊ मंडलीक वगैरे मंडळींनीं योजून आपली योजना लोकमान्यांच्यापुढें मांडावी असें ठरविलें. मजसंबधानें आपलेपणा वाटत असल्यामुळें श्री रामभाऊ यांनीं मलाहि त्यासाठीं पुण्यास हजर राहण्याबद्दल आमंत्रण केलें. त्याप्रमाणें मी आलों. लोकमान्यांनीं दिवसभर आपसांत वाटाघाट करून, यांत काम करण्यास कोणकोण तयार आहेत त्याची शहानिशा करून, संध्याकाळीं व रात्रीं या कामीं आपला उपदेश सांगितला त्याचा मथितार्थ संक्षेपानें मी खालीं देत आहे.

(१) एक वर्षपर्यंत काहीं मिळणार नाहीं असें समजून काम करणारीं माणसें असावीत.

(२) एक तरी लेखक असा असावा कीं तो दररोजच्या बैठकीस १२ रकानें मजकूर लिहून टाकील

(३) हातीं घतलेल्या कामासंबधानें चांगली चिकाटी असली पाहिजे

(४) कोणत्याहि गोष्टीसंबधानें अगर व्यक्तीसंबधानें टीका करावयाची असेल तेव्हां आपण जीं विधानें करतों त्यासंबधानें पुराव्याचें भरपूर माप आपल्याजवळ बाळगून नंतर टीका करण्याच्या भानगडींत पडावें

(५) आपण केलेलें विधान परत घेण्याचा प्रसंग येऊं नये

(६) आपल्या पत्रासंबधानें पडेल तें काम करण्याची तयारी मनाची व शरीराची असली पाहिजे

या प्रसंगीं त्यांनीं स्वानुभवाचे अनेक प्रसंग सांगितले चिमणी हा "टेबल लँप" व वळकटी हें "टेबल" अशा साहित्यावर किती तरी दिवस आपण काढल्याचें त्यांनीं वर्णन केलें. कोल्हापूर प्रकरणीं सर्वे अमुमुक्त्सानीच्या खटल्याच्या वेळीं आपल्या हातीं पुराव्यास उपयोगी पडण्याजोगीं बड्या बड्या लोकांचीं पत्रें असून, त्या लोकांच्या धासरटपणामुळें, त्यांना वाचविण्यासाठीं आपण तीं हजर न करिता शिक्षा सोसण्याचें कसें पत्करलें हेंहि त्यांनीं सांगितलें. मद्रास येथें १९१४ सालीं भरावयाच्या काँग्रेसमध्यें आपल्याला व आपल्या पक्षाला येण्याची मोकळीक ठेवण्यासंबंधीं नामदार गोखले यांनीं त्या सभेचे अध्यक्ष श्री. भूपेंद्रनाथ बसू यांच्याकडे जें पत्र पाठविलें होतें, तें प्रथम एक पाठवून तें श्रीयुत बसूकडून परत आल्यावर त्या ऐवजीं दुसरें किंचित नरमाईचें पत्र कसें पाठविलें व या दोन्ही पत्राच्या नकला आपल्या हातीं कशा आल्या व ही शेवटची गोष्ट नामदार-साहेबांना माहीत नसल्यामुळें ते कसे पेंचांत पडले ही गोष्टहि त्यांनीं सांगितली. "सर व ग्रासर" हा लेख लिहितांना आपल्याकडे सामुग्री कोणकोणती होती हीहि हकीकत त्यांनीं सांगितली.

भावी संपादक व मालक मंडळीस अशा प्रकार परत मनोरंजक उपदेशामृत पाजून त्यांनीं थाकण्ठ तृप्त केलें. पण पुढें तें दैनिक त्या वेळीं बाहेर आलें नाहीं.

(९) १९१५।१६ सालीं कॉंग्रेसमध्यें आपण मिळेल त्या मार्गानें शिरकाव करून घ्यावा व नंतर कॉंग्रेसच काबीज करावी असें लोकमान्यांचें मत, पण लोकमान्यांची पद्धति अशी कीं, अशा नवीन उपक्रमाला स्वपक्षीयांची संमति मिळवून तो उपक्रम करावा. त्याप्रमाणे त्यांनीं वऱ्हाड, महाराष्ट्र व कर्नाटक यांतील स्वपक्षीयांना पुण्यास येण्याबद्दल निमंत्रण केलें त्याच्या आज्ञेस अनुसरून बरीच मंडळी वाड्यांत जमली होती. सर्वांची लोकमान्यांसंबंधानें अपूर्व भक्ति काहीं भक्त लोकमान्यांचें मत तीच आज्ञा समजून त्याप्रमाणें वागणारे खरे काहींना त्या बाबतींत नेमस्त पक्षाकडून केला जाणारा लोकमान्यांचा उपमर्द असह्य वाटत असल्यामुळें अशा अपमानास्पद स्वत ला नव्हे तर लोकमान्यांना अपमानास्पद-असलेल्या शर्तीवर काँग्रेसमध्यें प्रवेश करण्याची त्यांची इच्छा नव्हती बरीच चर्चा झाल्यावर लोकमान्यांनीं आपलें मत पुन एकवार सकारण व स्पष्ट सांगून टाकलें। व "आतां पुढें चर्चा करून काय ठरवावयाचें तें ठरवा, व मला कळवा, म्हणजे मग तदनुसार पुढें काय करावयाचें तें ठरवूं" असें सांगून आपल्या आतील खोलींत निघून गेले. पुढें त्यांचें मतच सर्वांना ग्राह्य झालें हें वेगळें. पण जर अमान्य होऊन काँग्रेसपासून अलग रहावयाचें असेंच त्याच्या पक्षीयांनीं ठरविलें असतें तरी त्यांनीं काहीं नवीन कार्यक्रम आखून देऊन तो नेटानें सुरू केला असता. मला या प्रसंगानें त्यांच्या लोकसत्तापक्षीयत्वाची प्रतीति पटली. ते खरे Democrat आहेत ही खात्री मनाला पटली.

आपलासा करून टाकलें याच त्याच्या प्रेमाच्या जोरावर श्री सौ अवंतिकाबाई गोखले याना त्याच्याकडे घेऊन जाण्याचें मी न कचरता कबूल केलें एकदा ज्याला आपला म्हटलें त्याच्या अगदीं क्षुद्र अशा कामाबद्दलहि विचारपूस करून त्याला अशा कामीं प्रोत्साहन द्यावें व कार्योन्मुख करावें हा नेत्याचा मोठा गुण, मत्प्रमाणेंच त्याच्या अनेक अनुयायाच्याहि अनुभवास वळोवेळीं आल्याचें मला माहीत आहे

(१३) याच वर्षी तेथें हिंदी भाषा राष्ट्रभाषा करण्यासबंधानें एक समेलन झालें. त्या समेलनाचे अध्यक्ष लोकमान्य होते पण त्याचें भाषण इग्रजींत झाल महात्मा गांधींनीं त्या सभेंत भाषण करताना अशा टीका केली कीं, त्या सभेंत जमलेल्या पुष्कळाना, इग्रजी अवगत नसल्यामुळें, लोकमान्याच्या भाषणातील विचारामृताला मुकावें लागलें यानतर दोनच दिवसानीं झालेल्या एका जाहीर सभेंत लोकमान्यानीं १५।२० मिनिटेंपर्यंत हिंदींत एक भाषण केलें तें हिंदी भाषच्या दृष्टीनें उत्कृष्ट नसलें तरी लोकमान्याचे विचार जनतेला नीट समजतील अस साधें व स्पष्ट होतें

(१४) गेली लढाई चालू असता १९१८ सालीं लॉर्ड विलिंग्डन यानीं लोकाच्या पुढाऱ्याना एका सभेंत विचारविनिमयास बोलाविलें होत त्या टिळकानाहि आमंत्रण होतें व त्या सभेंतून ते त्यासाठीं उठून आल्याचेंहि सर्वांना माहीत असेल त्या सभेच्या पूर्वदिवशीं सरदारगृहातील आपल्या बिऱ्हाडीं लोकमान्यानीं काहीं मडळींना बोलावून दुसरे दिवशी काय करावयाचं तें अगोदर ठरविण्याचें योजिलें महात्मा गाधींनाहि लोकमान्यानीं बोलाविलें होतें दुसरे दिवशींच्या सभेंत त्यानीं काहीं तरी बोलावें अशी लोकमान्याची इच्छा महात्मा गांधींनीं लोकमान्याना "तुमचे मार्ग Devilish दुष्टपणाचे आहेत" वगैरे पुष्कळ कठोर वाक्प्रहार केले लोकमान्यानींहि त्याना "आमचीं बोटें या कामीं जितकीं जळलीं आहेत त्याच्या शताश जर तुमचीं जळलीं असतीं तर तुम्ही आमच्यापुढें चाळीस हात उडी माराल अशी माझी खात्री आहे " वगैरे गोष्टी तितक्याच स्पष्टपणें पण मृदु शब्दानीं सागून सरतेशेवटीं दुसऱ्या दिवशींच्या सभेंत काहीं तरी बोलावयाचें वचन म गाधींकडून मिळविल्य सर्व मडळी परत जाताना लोकमान्य फक्त म गाधींनाच लिफ्टपर्यंत पोचवावयास गेले होते व मोठा भाऊ लहान भावाच्या पाठीवर प्रमानें हात फिरवून पाठ थोपटतो त्याप्रमाणें ते महात्मा गाधींच्या पाठीवरून हात फिरवून पाठ थोपटीत त्याच्याशीं काहीं बोलत होते आपल्यास तोंडावर शिव्या देणाऱ्याशीं इतक्या प्रेमानं व मृदुपणानें बोलणाऱ्या लोकमान्याच्या मनाचा मोठेपणा अन्यत्र कोठें सापडणार ?

---

## बाळकृष्ण गणेश खापर्डे

[ बी. ए. बी. एल्. हायकोर्ट वकील, कै. बाबामहाराज ( लोकमान्याचे परम स्नेही ) याचे चिरंजीव, आमदार व उमरावतीचे स्वराज्यपक्षाचे पुढारी. ]

(१) १९०२ साली पुण्यास डेक्कन कॉलेजमध्ये अभ्यास करीत असताना मला फोटोग्राफीचा बराच नाद होता. प्रसिद्ध व्यक्तींचे फोटो स्वतः घेऊन ते जवळ ठेवण्याची अर्थात् फार हौस होती; व फार प्रसिद्ध व फार जवळचा प्रसिद्ध पुरुष म्हणजे लोकमान्य टिळक, म्हणून मी फोटो घेण्याची त्यांची आगाऊ परवानगी मिळवून एके दिवशी ठरल्याप्रमाणें कॅमेरा वगैरे साहित्य घेऊन त्यांच्या वाड्यांत दाखल झालों. पाहुण्याच्यासाठीं पाणी तापविण्याकरिता बंबात स्वतः धरून लाकडाच्या ढलप्या टाकण्याचा लोकमान्यांचा उद्योग चालू होता! तो सोडून ते बाहेर आले, व आगरवाला पगडी तेथेंच आणवून ती चढवून फोटो घेण्याकरिता जवळच भिंतीजवळ खुर्ची ठेविली होती, तीवर बसले. पण त्यांच्या अत्यंत चळवळ्या स्वभावामुळें त्यांचा फोटो घेणें किती कठिण काम होतें तें त्या दिवशीं माझ्या प्रत्ययास आलें! मागच्या पडद्यास व पुढच्या गालिच्यास रजा देणें भागच पडलें! एकदा त्यास खुर्चीवर सरळ बसवून पाय, हात, मान, जागच्या जागीं करून कॅमेऱ्यापर्यंत परत यावें व पुनः त्यांच्याकडे पहावें तों नेमके कसे तरी वाकडे बसलेले! अखेर "अहो, कवाईत शिकविता कीं फोटो घेता" असें जेव्हा ते आपल्या नेहमींच्या खड्या स्वरात म्हणाले, तेव्हा मलाच ओशाळल्यासारखें झालें, व असेल तसें असो, निघेल तसाच फोटो घ्यावयाचा, असा निर्धार करून एकामागून एक सहा काचा घेतल्या! तरी शेवटीं मनास समाधान वाटलें नाहीं पण इतक्या काचा घेण्याचें कारण असें कीं, प्रत्येक वेळीं लेन्स उघडलें कीं, हटकून ते हलत! व "आपण हललात" असें मी त्यास म्हटलें असता तें ते कबूल करीत नसत! एके दिवशीं लहान मुलाप्रमाणें हट्ट करून त्यास विनचाळेच्या 'स्टूडिओ' मध्यें घेऊन गेलों व पूर्वीच्या अनुभवानें शहाणा बनून $\frac{1}{5}$ सेकंदात त्यांचा स्वहस्तें फोटो घेतला. तो फोटो मात्र अत्युत्तम असा आहे. ज्यांनीं ज्यांनीं तो पाहिला आहे त्यांनीं सर्वांनीं हें त्यांचें अत्युत्तम छायाचित्र असल्याचें कबूल केलें आहे. ह्या फोटोच्या एका प्रतीवर लोकमान्यांची स्वतःची सही असावी असें मला वाटलें. म्हणून त्यांचेकडे एक प्रत नोकराचे हातीं पाठविली. फोटोवर सही मागितली आहे, असें सांगण्याऐवजीं नोकरानें फक्त "आपली सही पाहिजे" एवढेंच माझ्या तर्फे लोकमान्यास जाऊन सांगितलें! आणि ज्याला आपलें म्हटलें त्याच्यावर त्या महापुरुषाचाहि विश्वास असा कीं, मला काय पाहिजे हें न कळल्यामुळें, त्यांनीं एका कोऱ्या कागदावरच सही करून माझ्याकडे तो पाठवून दिला!! तो कागद मजकडे जेव्हा चाकरानें

आणला तेव्हा मला धन्य वाटलें! एवढ्या मोठ्या मनुष्यानें कोऱ्या कागदावर सही पाठवावी, यात त्याच्या अंतःकरणाचा जो सरळपणा, निर्भयपणा, उदारपणा व मोकळेपणा दिसतो तो, मला वाटतें, दुसरीकडे सापडणार नाहीं. हा कागद मीं पुष्कळ दिवस जपून ठेविला होता, परंतु काहीं विशिष्ट परिस्थितींत, तो सरकारच्या हातीं जाऊं नये म्हणून तो मला जाळून टाकावा लागला.

(२) श्रीमंत सरदार श्रीं बाबामहाराज ह्यांच्या सर्वांत धाकट्या कन्येच्या विवाहाकरिता मी व लोकमान्य असे कोल्हापूर नजीक मल्कापूर गावीं गेलों होतों. या प्रसंगीं त्यांचा व माझा सतत १५–२० दिवस अहोरात्र सहवास होता. एके दिवशीं जेवीत असताना अनेक विषयावर चर्चा होता होता वर्तमानपत्रासंबंधीं गोष्टी निघाल्या व "तुम्ही एक वर्तमानपत्र का काढीत नाहीं" असा लोकमान्यांनीं मला प्रश्न केला. मी ह्या अनपेक्षित प्रश्नामुळें फार घुचकळ्यात पडलों व म्हणालों, " मला ही कल्पना मुळींच सुचली नव्हती, आणि वर्तमानपत्र *मला चालविता येईल असें मला वाटत नाहीं कारण लिहिण्याची मुळींच सवय* नाहीं " तेव्हा लोकमान्य म्हणाले, " आम्हीं केसरी हातीं घेतला तेव्हा पूर्वी काय लिहिण्याची सवय होती?" हें ऐकून मला थोडेंसें हसू आलें, व मी म्हणालों " दादा, आपली गोष्ट कोणीकडे व आमची कोणाकडे! आपली बरोबरी दुसरा कोण करील! आपल्या केसरीनें मराठी भाषेस नवीन वळण लाविलें " ह्यावर लोकमान्यांनीं दिलेलें उत्तर मला अत्यंत महत्त्वाचें वाटतें. ते म्हणाले, " लोक म्हणतात माझी लिहिण्याची स्टाइल फार जोरदार आहे, आणि माझी भाषा कडक असते, पण त्यातलें खरें असें आहे कीं, ' स्टाईल ' काहीं आणावी लागत नाहीं, व आणून येत नाहीं आपलें जें असेल तें खरें खरोखर अंतःकरणास पीळ पडला म्हणजे भाषा शिकावी लागत नाहीं अंतःकरणाला चटका लागतो कीं नाहीं, एवढाच खरा प्रश्न आहे मी असें लिहितों, कारण मला तसें वाटतें मी काहीं कोठें शिकलों नाहीं. मनाला आतून वाटलें पाहिजे, आणि त्यावाचून जिणें व्यर्थ वाटलें पाहिजे, मग त्यासाठीं मनुष्य सर्व सोडतो " यावर त्यांनीं एक सुंदर संस्कृत सुभाषितही त्या वेळीं म्हणून दाखविलें तें काहीं दिवस माझ्या स्मरणात होतें पण आता विसरलों. लोकमान्यांचें हें बोलणें माझ्या मनावर इतकें ठसलें कीं, तें मी यावज्जन्म विसरणार नाहीं 'करावयास पाहिजे, पण आमच्याच्यानें होत नाहीं, हा आमचा दुबळेपणा असला म्हणून ध्येय कसें वाईट ठरतें?' अशा प्रकारचा कोटिक्रम मीं जेव्हा जेव्हा ऐकला आणि लोकमान्यांच्या निधनापासून पुढें ऐकला, तेव्हा तेव्हा लोकमान्यांच्या ह्या उक्तीचें स्मरण झाल्यावाचून राहिलें नाहीं

(३) लोकमान्यांनीं वऱ्हाड व मध्यप्रांतातून जो दौरा केला त्या वेळीं मी त्यांचेबरोबर असल्यामुळें त्यातील चित्ताकर्षक भाग देतों. वऱ्हाडात दौरा चालू

असतां रात्रीचा (११ नंतरचा) झोंपेचा काळ व दोनप्रहरचे विश्रांतीचे दोनतीन तास एवढा वेळ खेरीज करून बाकीचा सर्व वेळ मोटारमध्यें अथवा व्याख्यान-पीठावर गेला असल्यामुळें व दोन्ही ठिकाणीं सतत बरोबर असण्याचें मला सद्भाग्य लाभल्यामुळें या प्रवासांत माझ्या दृष्टीसमोरून ज्या गोष्टी गेल्या त्या इतरांस कळणें शक्य नव्हतें. 'रस्त्याच्या एके बाजूस धुळींत बसून मी तुझी, आतुरतेनें वाट पहात आहें. तुझ्या कनकमय रथाचा यशोध्वज फडकतांना अद्याप मला दिसत नाहीं, असें श्री. कविमुकुटमणी रवींद्रनाथांनीं लिहिलें आहे, त्याचें मला स्मरण होत असे.'

दर्शन चालूं असतानांच त्या गर्दीतून "लक्ष्म्या" (वऱ्हाडांत शेतकरी व कामकरी वर्ग स्त्रीस "लक्ष्मी" म्हणतात) येत असत. मोठ्या भावानें त्या प्रेमपुरस्सर तुपाच्या दिव्यानें ओंवाळीत. 'लोकमान्य टिळक महाराज की जय' अशी गर्जना झाली म्हणजे मोटार चालू होत असे. एखाद्या खेड्यात मोटार जर सूर्यास्तानंतर पोंचली तर तेथील लोकांनीं रस्त्याच्या जवळच एक दोन गवतांचे ढीग करून ठेविलेले असत आणि मोटार आल्याबरोबर ते पेटवीत आणि त्या उजेडांत हा सर्व समारंभ चालत असे. लो. टिळक म्हणालेः—"मला लोकांचीं अंतःकरणें पाहिजेत; पैसे नकोत." असे ते वारंवार म्हणत आणि 'आमच्या गांवीं चला, आम्ही अमुक रक्कम देतों' असें निरनिराळ्या गांवचे लोक म्हणत तेव्हां "मी पैशाकरितां फिरत नाहीं; मी पैशाचा भुकेला नाहीं', असा ते रोकडा जबाब देत.

(४) लो. टिळक म्हणालेः—"एक तास व्याख्यानानंतर मला एक तास झोंप घ्यावी लागते. एरव्हीं मागत नाहीं. देहांत सामर्थ्य आहे म्हणून बोलत नाहीं. एवढें बोलायचें म्हणून उठतों आणि बोलतों, नतर 'एक्झॉशन' येतें. 'धुईल' (इच्छादाक्ती) वर सटलें चालवलें आहे." या लोकमान्यांच्या बोलांची किंतीदां तरी साक्ष पटली. शेवटीं 'वीस हजार लोक जमला आहे' या वाक्यानें मोहनी पडली. लोकमान्य लोकांची कधींहि निराश होऊं देणार नाहींत अशी पक्की खात्री होती. "मी जेव्हां गीतारहस्यांतला अठ्ठेचाळिस Emotional chapter लिहिला तेव्हां काय तो Emotion वांचून लिहिला!" असें ते म्हणाले.

(५) नांदुऱ्याच्या नदीवर फारच मौजेचा प्रकार घडून आला. नदीवर एका चांभारानें लोकमान्यांच्या मोटारीस अडविलें व लोकमान्यांच्या पवित्र चरणस्पर्शानें पुनीत होतांना तो गृहस्थ सद्‌गदित कंठानें व आनंदानें लोकमान्यांस म्हणालाः—"महाराज, आपलें मागें स्वराज्यावर जें व्याख्यान झालें तें ऐकून मनावर विलक्षण परिणाम झाला व तेव्हांपासून आपल्या कार्याला मदत म्हणून हे दोन रु.

कनवटीचे काढून लोकमान्याच्या हातीं देवों ) आपल्याच हातीं यावें असें माझ्या मनात होतें. पण मला गरिबाला आपलें दर्शन कसें होणार ? शेवटीं आज मला कळल कीं, आपली स्वारी या रस्त्यानें जाणार आहे. म्हणून मीं 'दोनपार' पासून येथें आपली वाट पहात बसला आह. आपलें दर्शन झाल्यामुळें मला किती आनंद झाला आहे म्हणून सांगू ?"

(६) मूर्तिजापूर येथें ११ वाजण्याच्या सुमारास लोकमान्याना लोकांनीं गोरक्षणासंबंधीं चार शब्द बोलावें अशी विनंति केल्यावरून त्यांनीं आपल्या भाषणास सुरवात केली व उन्हामध्य तापत असलेल्या श्रोतृसमूहाकडे सप्रेम पाहून लोकमान्य म्हणाले —" पण आता हें नवें गोरक्षण निघालें आहे मुक्या जनावराच्या ऐवजीं चालत्या बोलत्या तीस कोटी जनावरांचेंच रक्षण कस करता येईल ही काळजी येऊन पडली आहे आता मुक्या जनावराचें रक्षण करणार का लाकाचें रक्षण करणार ? हा तुमच्यापुढें प्रश्न आहे. लोकाचे हक्क बुडाले व लोक मुके बनले. अशा दुबळ्या जनतला सोडविणें हें काय गोरक्षण नव्हे ? आम्ही आज हिंदुस्थान देशात ३० कोटी गाई बनलों आहों श्रीशिवाजी महाराजाची 'गोब्राम्हण प्रतिपालक' म्हणून ख्याती आहे. पण विचार करा कीं, त्यांनीं काय गोशाळा स्थापन केल्या होत्या कीं, ब्राम्हणभोजनें सुरू केली होतीं ? यापैकीं काणतीहि गोष्ट न करिताहि शिवाजी महाराजास 'गोब्राम्हणप्रतिपालक' असें म्हणतात, यातील मर्म काय ? देशाची उन्नति करणें यासारखें दुसरें कोणतेंहि गोरक्षण नाहीं हें त्यातील मर्म होय देशमाता ही मोठी कामधेनु होय या कामधेनूला चारा घालण्याचा अधिकार आपल्या हातीं घ्या. ही कामधेनु प्रसन्न होईल तर तुम्हालाच काय, पण तुमच्या पुढच्या अनेक पिढ्याना दूध देऊन पुष्ट करील. या कामधेनूला विसरू नका हेंच मी तुमच्याजवळ पदर पसरून मागत आहें."

असा प्रोग्रॅम होता. आणि प्रोग्रॅम तसूभरसुद्धां चुकूं द्यावयाचा नाहीं, असा लोकमान्यांचा निश्चय होता! पुसदहून कारंजा म्हणजे सरासरी १२५ मैल अंतर जावयाचें होतें, व लोकमान्यांच्या तब्येतीस हें कसें काय मानवेल याची आम्हां सर्वांसच चिंता होती पुसदहून आम्ही ठरल्यावेळीं रवाना तर झालों; पण बसतांना लोकमान्य मोटारमध्यें माझ्या जागीं बसले, म्हणून निघण्याच्या त्या बेसुमार धांदलींत मी गुपचुप त्यांच्या जागीं बसलों. व पुढें जागा बदलूं असें मी मनाशीं ठरविलें. लोकमान्यांच्या एका पायास लहानशी जखम झाली होती व त्यांस मधुमेहाचा विकार असल्यामुळें त्या जखमेची अत्यंत चिंता करावी लागे. नमस्कारांच्या प्रलयांत तो पाय जेणेंकरून बचावेल अशा जागीं, मोटार हाकलणाराच्या बरोबर मागें त्यांची नेहमींची बसावयाची जागा असे पुसदहून निघाल्यावर कांहींना कांहीं बोलणें काढून प्रवासाचा वेळ कमी कंटाळवाणा कसा होईल, याची मी खटपट करीत होतों. शेवटीं पाणी घालण्याकरितां मोटार, मध्यें एका जागीं उभी झाली. तेव्हां " आपण ह्या जागीं बसा, मी पलीकडे बसतों, " असें मी लोकमान्यांस सुचविलें. पण " मी बरा आहे, आतां हलत नाहीं, " असें ते म्हणाले. येथें नमस्कारांचा तोबा उडण्याचाहि संभव नव्हता; कारण वाटेंत कोठें तरीच पाण्याकरितां म्हणून आम्ही उभे राहिलों होतों; तेव्हां मीहि जास्त बोललों नाहीं. त्यांच्या नेहमींच्या वृत्तींत कांहीं तरी बदल झाला आहे असें वाटण्यासही कारण दिसलें नाहीं; परंतु पुढें आम्ही एका गांवाजवळ गेलों, तेव्हां मी त्यांस पूर्वीप्रमाणेंच म्हटलें. पण त्यांनीं तिकडे दुर्लक्ष केलें, व नमस्कारांचा लोंढा दुसऱ्या पायावरूनच वाहून गेला. ह्या धांदलींत चुकून अधिक दुखापत झाल्यास कसें होईल ह्याची मला चिंता वाटत होती, म्हणून कांहीं वेळानें पुढेंच खेडें लागण्यापूर्वी थोडा वेळ मोटार मुद्दाम उभी केली तें त्यांच्या लक्षांत आलें. व जागा बदलण्याविषयीं मी जेव्हां पुन्हां म्हटलें तेव्हां ते चिडले. सकाळीं पुसद येथें उन्हांतच दीड तास व्याख्यान दिलें होतें; पोटांत कांहीं नाहीं; प्रवासाची दगदग; व त्यांत माझी पिरपिर! ह्यानें ते बरेच त्रासले असावेत व आतांपर्यंतचा मनःसंयमन त्यांस बराच जाणवला असावा. त्यांच्या मोठ्या आवाजांत बरेच चिडून ते म्हणाले, " मी नाहीं सरकत, मी कोठें बसावयाचें तें तुम्ही कां ठरवितां? मी येथेंच बसणार आहे." ह्या अनपेक्षित प्रकार पाहून मी थोडा चरच झालों. " आपल्या पायास गर्दीत अधिक इजा होऊं नये म्हणून मी म्हणतों, " वगैरे मी माझ्यापरी बेताबातानें हळूंच सर्व सांगून पाहिलें. पण त्यामुळें त्याच जागीं बसण्याचा त्यांचा निश्चय मात्र अधिक ठाम ठरला! जागेच्या दृष्टीनें पाहिलें असतां क्षुल्लक परंतु त्यांच्या जखमेच्या दृष्टीनें पाहिलें असतां कांहीं महत्वाच्या, अशा ह्या गोष्टीसंबधानें लोकमान्यांनीं असा कां हट्ट केला, हें मला समजलें नाहीं. थोड्या वेळानें मी स्वस्थ बसलों असें पाहून ते आपण होऊन मला म्हणाले, " लोक कांहीं वेडे नसतात. त्यांना समजावून

सांगितलें म्हणजे ते ऐकतात " आणि हा आपल्या बोलण्याचें प्रत्यंतर मला आणून देण्याचा त्यांनीं निश्चय केला. पुढल्या एका खेड्यांत आम्ही दर्शनास गेलों तेथें नेहमींप्रमाणें दर्शनाची गर्दी अर्थात् होतीच. कसेंबसें करून लोकमान्यांच्या देहास कोठें तरी हात लावून वंदन केल्याखेरीज खरें पुण्य पदरांत पडत नाहीं अशी जणूं आबालवृद्धांची समजूत! नाइलाज झाला म्हणजे कित्येक लोक त्यांच्या आंगरख्याच्या पदरासच हात लावून वंदन करीत व कित्येक तर मोटारीस कोठें लागेल तेथें हात लावून समाधान करून घेत! लोक फार, वेळ थोडा आणि दर्शनाचा प्रकार हा असा! त्यामुळें कमालीचा त्रास होत असे. आम्ही जेव्हां ह्या खेड्यास येऊन पोहोंचलों व मोटार उभी राहून भोंवतीं लोकांचा गराडा पडला, तेव्हां लोकमान्यांनीं त्या लोकास समजावून सांगण्यास सुरुवात केली. "मला मधुमेह आहे. हा रोग फार वाईट आहे. तो जखम लवकर बरी होत नाहीं, व पाडली तर फार वाईट परिणाम होतो. तेव्हां माझ्या पायाला जखम असल्यामुळें पायाला हात लावूं नका. त्यानें कदाचित् अधिक इजा होईल," असें त्यांनीं लोकांस सांगितलें. सर्वांनीं तें भाविकपणें ऐकून घेतलें व त्यांतून एका पोक्त गृहस्थानें विचारलें, "जखम कोठें आहे?" तेव्हां लोकमान्यांनीं पाय वर करून जखम कोठें होती ती दाखविली. तेव्हां अत्यंत कळवळ्यानें "अरे, अरे!" असे उद्गार काढून त्या गृहस्थानें तोच पाय तसाच हातांत धरून ठेविला व इतर सर्वांनीं त्याच पायाचें गर्दी करून दर्शन घेतलें!! मी पहातच होतों. मोटार चालू झाल्यावर मीं शेवटीं असें सुचविलें कीं, 'आग्रा न सोडण्याचा व पायहि न पचावण्याचा लोकमान्यांचा तसाच आग्रह असल्यास हरकत नाहीं, पण दर्शनाचे वेळीं लोकमान्यांचे पाय जेथें असतात

" लोकमान्यांची प्रकृति अस्वस्थ आहे " असें कोणी तरी सांगावें, व लोकमान्यांनीं न बोलतां मुकाट्यानें यावें असें ठरलें. आम्ही मंडपांत जाऊन पोहोंचलों, तों सर्व तयारी झाली. हातपाय धुवून लोकमान्यांनीं थोडा चहा घेतला व त्यास थोडी हुषारी वाटली. सभेस १५ ते २० हजार लोक जमलेले पाहून त्यास फार समाधान वाटलें. त्यास थोडी हुषारी वाटत आहे व आनंद झालेला आहे हें त्याच्या चेहऱ्यावरून दिसू लागलें. चहा संपल्यावर मी भोंवतालच्या मंडळींस म्हणालों, "व्याख्यानाची काहीं दादांना तसदी देऊं नका. एवढ्या मोठ्या समाजाचा विरस होईल. परंतु प्रकृतीपुढे इलाज नाहीं " तेव्हां खाडिलकर म्हणाले, " सुरुवात मी करितों, मागाहून वाटल्यास चार शब्द बोलतील, नाहीं तर राहिलें " तेव्हां, सभेंत शेवटपर्यंत नुसतें बसावयाचें व शरीर वाटल्यास २–४ मिनिटें बोलावयाचें, असें लोकमान्यास मोठ्या कष्टानें मंजूर झालें. कारवारची सभा फार मोठी, अत्यंत शोभिवंत व फारच सुंदर दिसतांची. हें सर्व थाट व ही गिरत पाहून लोकमान्यास फार आनंद वाटला, व फार चांगलें समाधान वाटलें. खाडिलकरांनीं व्याख्यानाला सुरुवात केली, पण व्याख्यान अवघ्या २५ मिनिटांत किंवा अर्ध्या तासात संपविलें, व शेवटीं " आतां लोकमान्य तुम्हांस उपदेश करतील " असें सांगून ते खालीं बसले. मंडपांत न येणारे, सभेस बसण्यास नाराज असलेले व शेवटीं ३-४ मिनिटें बोलण्यास त्यानें तयार झालेले लोकमान्य बोलावयास उठले, तेव्हां टाळ्यांचा गजर सारखा किती तरी वेळ चालला होता! त्या दिवशीं लोकमान्यांची मुद्रा जितकी गंभीर व करारी दिसली तितकी मी ती आजन्म कधीं पाहिली नाहीं. लोकमान्य ५५ मिनिटें बोलले! व १५–२० हजार श्रोते इतके स्तब्ध होते कीं, त्यांच्या श्वासोच्छ्वासाचा देखील आवाज त्यांना ऐकूं यावा! त्या दिवशींच्या इतकें लोकमान्यांचें सरस व्याख्यान कधींहि कोणीं ऐकलें नसेल. व व्याख्यानानंतरची त्यांची उल्हसित वृत्ति ज्या कोणी पाहिली, त्यास त्या दिवशीं त्या महापुरुषास सर्व दिवसभर इतके कष्ट झाले होते हें खरेंसुद्धां वाटणें कठीण होतें. कालांतरानें या प्रसंगाची मी लोकमान्य यांना ओघाओघानें सहज दोनतीन वेळां आठवण दिली. तेव्हां ते एकदां मन मोकळें करून म्हणाले, " अहो, एवढें सर्व श्रम लोकांशीं बोलण्याकरितां १५–२० हजार लोक जमावयाचे, आणि आपण बोलावयाचें नाहीं, याला अर्थ काय! लोक माझें व्याख्यान ऐकावयाला टपले, त्यांनी मीच नाहीं बोलावयाचें! लोकांची निराशा करावयाची आणि आपण बसली आशा धरावयाची!"

(१०) लोकमान्यांच्या कर्नाटकच्या दौऱ्यांत कारवार मुक्कामी असतां श्रीमंत बापसाहेब भट्ट यांच्या वाड्यांत त्यांची राजेशाही थाटाची व्यवस्था ठेवण्यांत आली होती. मखमलीच्या गाद्या, जरीचे कपाशी, गालिच्यांचीं बिछाइत व चांदी

साज वेळेवर रुचिकर भोजन असा थाट होता. लोकमान्याच्या बरोबरची मंडळी सारखा प्रवास पडल्यानें कंटाळलेलीच होती. तेव्हां पुढचे ' प्रोग्रॅम ' सर्व एक एक दिवस लांबवून येथेंच एक दिवस मुक्काम वाढवावा अशी मंडळींनीं बैठकींत सूचना केली! ती बहुतेकांस मानवली, पण ही सूचना लोकमान्याच्यापुढें कोणी ठेवावी? हा प्रश्न पडला शेवटीं त्याचा पत्कर मीं घेतला, व ओघाओघानें लोकमान्याच्या जवळ ही गोष्ट काढली. तेव्हां ते हसत म्हणाले, "तुम्ही सुखाला इतक्या लवकर माळलांत! का मिष्टान्नाला सोकावलात! ' प्रोग्रॅम ' बदलल्यामुळें तुमच्या एक दिवसाच्या आरामाकरितां हजारों लोकांस हेलपाटे आणि कष्ट पडतील त्याची वाट काय! ' प्रोग्रॅम ' बदलायचा नाहीं." केवळ त्याच्या प्रकृतीकरितां ही सूचना होती असें माझ्याकडून मीं सांगितलें, पण ते म्हणाले, "अहो, इग्रजाची परोपकाराची भाषा माझ्या उत्तम परिचयाची आहे." याचा परिणाम एवढाच झाला कीं, "नेमल्या वेळीं निघण्याचा आमचा बेत कायम आहे" असें दोनदां तिनदां त्यांनीं यजमानास स्वतःच बोलावून आगून बजावलें व नेमल्या वेळीं सर्वांस खाद्यावर पडदा घालून मार्गस्थ व्हावें लागलें!

(११) याच दौऱ्यांत अकोट मुक्कामीं व्याख्यान देत असताना लोकमान्यांस बोलतां बोलतां "ब्युरॉक्रसी" ह्या शब्दाला बरोबर तोलाचा "नोकरशाही" हा शब्द सुचला. बरींच वर्षें ते 'ब्युरॉक्रसी'ला योग्य मराठी शब्द शोधीत होते. त्या दिवशीं गगनात मावेना असा आनंद त्यांना वाटला, व जो भेटे त्यास तो शब्द ते समजावून सांगत असत, व प्रवासाच्या श्रमानें त्यांस कष्ट झाले असताहि त्या दिवशीं रात्रीं त्या आनंदात ते बराच वेळपर्यंत जागले

(१२) लोकमान्य उत्थापन घेऊन विलायतेस जाण्याकरितां सीलोनला गेले तेव्हां सीलोनला मी बरोबर होतों आम्ही रेल्वेच्या एकाच डब्यात होतों व पहाटें ४ वाजण्याच्या सुमारास कोठेंसें एका स्टेशनावर आम्हाला उतरावयाचें होतें, आणि नेमका त्याच वेळीं जाग कशी येईल, ह्याची आम्ही आपसात चर्चा करीत होतों एवढ्यात लोकमान्य म्हणाले, "अहो, असं काय करितां? कोठें तरी स्टेशनवर गाडी उभी राहणार आहे ना? 'टिळक महाराज कीं जय' होईलच कीं नाहीं? जाग न येऊन जाते कोठें?" डब्यातील सर्वजण हसले व ते स्वतःहि मोकळ्या मनानें हसले. अगदीं तिऱ्हाइत मनुष्यासंबंधानें बोलावें त्याप्रमाणें से एकादे वेळ स्वतःविषयीं अत्यंत निरभिमान वृत्तीनें ? मतीदाखल बोलत असत, व अशापैकींच हाहि एक सुंदर प्रसंग होता.

(१३) १९०६ सालीं लोकमान्य सिंहगडावर उन्हाळ्यात राहावयास गेले होते, व आम्हीहि सर्वजण एक निराळा बंगला घेऊन तेथेंच होतों. सकाळ

सध्याकाळ लोकमान्यांच्या बंगल्यावर एकदा जाऊन यावयाचेंच असा माझा क्रम असे. एके दिवशीं मी व तीर्थरूप दादासाहेब असे दोघेहि अगदीं सकाळींच त्यांच्या येथें गेलों तों एका समोरच्या खोलींत टेबलाजवळ ते चहा पीत होते, व टेबलावर एक साधारण जाडीची हस्तलिखित वही ठेवली होती. तिच्याकडे मधून मधून ते पाहत असत. आम्ही बसल्यावर सहज म्हणून ती वही मीं उचलून घेतली व पाहूं लागलों. माझ्याकडे पाहून लोकमान्यांस बरीच करमणूक वाटली असावी. थोड्या वेळानें मोठ्यानें ओरडून ते म्हणाले "कसें काय आहे ? तुम्हाला पटतें कीं नाहीं ! " मीं ती वही खालीं ठेवली व 'पटतें कीं नाहीं तें काय सांगणार ? ' मीं सरळ उत्तर दिलें, "समजतच नाहीं, तें पटावयाचें काय ? " तेव्हां ते तीर्थरूप दादासाहेबांकडे वळून म्हणाले, "मी हा वेदांग ज्योतिषावर लहानसा निबंध लिहिला आहे. " नंतर त्यांनीं आम्हांस जवळ जवळ त्यासबंधीं एक तासभर माहिती सांगितली. पूर्वी यासबंधीं कोणीं ग्रंथ लिहिले, त्यांपैकीं एक श्लोक काहीं केल्या कोणाला लागत नसे व आपण तो कसा लाविला, त्यानें पूर्व ग्रंथाचा संबंध कसा लागतो व अर्थ कसा सुसंगत होतो वगैरे रितीं तरी ते सांगत होते. तें सर्व येथें अप्रस्तुत आहे शेवटीं ते म्हणाले, "या विषयावर माझा हा निबंध शेवटचा आहे. मी ह्या विषयावरचे सर्व ग्रंथ पाहून त्याचा सर्वांचा विचार करून, माझ्या समजाप्रमाणें त्याचें कसें जुळतें तें ठरवून, हा लिहिला आहे. मी तो प्रसिद्ध करणार होतों. परंतु राहिलें झालें. " "ग्रंथ जरूर व लवकर प्रसिद्ध करावा, " असें मीं म्हटलें, तेव्हां ते मला म्हणाले, "माझा सिद्धांत कोणी "ॲंटिसिपेट " करील अगर माझ्या पद्धतीनें कोणी अर्थ लावील असें मला वाटत नाहीं. यासबंधीं आणखी कोणी काहीं लिहितो काय त मला पाहणें आहे. ' मी म्हणालों, "असें कोणी ना कोणी लिहिणारच. आपला ग्रंथ तेवढ्याकरिता का थांबवावा ? " त्यावर ते म्हणाले, "अहो, आपल्या मरणापूर्वींच पदावयाचें. मी कांहीं एवढ्यात मरत नाहीं मरणापूर्वी प्रसिद्ध करितों, त्यात आहे काय ? आतां पुस्तक लिहून ठापलेंच आहे. कोण काय अधिक लिहितो एवढेंच बघत बसावयाचें आणि नीटस् ठेवावयाच्या. तेवढ्यापुरतें कमीजास्त केलें म्हणजे झालें. तुम्ही काळजी करू नका. मी मरण्यापूर्वी हें प्रसिद्ध करितों. " लोकमान्यांचा आत्मविश्वास फार जबर हें खरें; परंतु या कामीं त्यांचें धोरण फसलें असें खेदानें म्हणावें लागतें.

(१४) लोकमान्यांच्या टेबलावर मला एके दिवशीं एक लहानशी सुबक ग्रायलोफिक पेन दिसली. तीवर इंग्रजींत "TILAK" अशी सोनेरी अक्षरें कोरलेलीं होतीं. ती पेन हातीं घेऊन इकडून तिकडून परतून मी तिच्याकडे मोठ्या कौतुकानें व थोड्या अभिलाषानें पाहत होतों. इतक्यात लोकमान्य आतल्या खोलींतून बाहेर टेबलाजवळ आले, व माझ्या हातीं पेन पाहून मला

म्हणाले, "मी काहीं यानें लिहीत नाहीं तुम्हाला हवी तर घेऊन जा" मी एवढ्याचीच वाट पहात होतों! 'आंधळा मागतो एक डोळा व देव देतो दोन" कोण नको म्हणेल? तेव्हा मी म्हणालों, "तसें काहीं नाहीं पण अनायासें यावर आपलें नाव आहे" यावर लोकमान्य मध्यें म्हणाले, "अहो असे लबाड आहेत हे लोक! 'मॅन्युफॅक्चर' न नाव घातलेलें आहे तें माझ्या नावानें खप अधिक होईल म्हणून नाव घातलें आहे हें त्यानें! त्याचा माझा काहीं लोभ नाहीं" हें ऐकून मलाहि गमत वाटली मला वाटलें होतें कोणी तरी मुद्दाम नाव घालून ही पेन त्यास नजर केली असावी, आणि त्यास त्याची वस्तु म्हणून जो त्या पेनचा प्रथम लोभ वाटला होता, तो गेला व साधारण बाजारात मिळणारी वस्तु आहे असें कळलें तेव्हा त्या पेनविषयीं थोडा अनादरहि वाटू लागला तेव्हा मी सहज म्हणालों, "ही पेन बाजारात विकावयाला आहे का?" तेव्हा लोकमान्य म्हणाले, 'नाहीं मातें नाव घालून 'मेकर नें ही पेन माझ्याकडे पाठविली आणि यावत एक पत्र पाठविलें कीं, तुमचें नाव घालून आम्हीं ही पेन तयार केली आहे, तेव्हा तुमच्या नावासुद्धा ती बाजारात विकावयाला तुमची हरकत नसेलच तेव्हा परवानगीदाखल एक पत्र यावें! पण मीं त्यास साफ लिहून पाठविलं कीं, माझ्या नावावर परदशी माल खपविण्याची माझी इच्छा नाहीं व तुम्हीं माझें नाव घालू नये नावासुद्धा अशी पेन बाजारात मिळत नाहीं" इतकें बोलून त्यांनीं ती माझ्या हातून घेतली आणि माझ्याकडे पाहत म्हणाले, "इंग्रजी कंपनी आहे ही!" त्यांच्या ह्या वाक्यात मला फार मोठी खोंच आहे असं वाटलं "ज्यांनीं आमरण माझा द्वेष केला, व मला कधीं बरें पाहिलें नाहीं, त्यांना माझ्या नावानं पैसे मिळविण्याची लाज वाटत नाहीं," असा त्याचा अर्थ होता मी ह्यावर गप्प बसलों

लोकमान्यहि ह्यावर थोडा वेळ अगदीं गप्प राहिले, व त्यांच्या सवयीप्रमाणें खोलींत येरझारा सुरू झाल्या त्यांच्या मनश्चक्षुपुढून त्या दीड-दोन मिनिटात किती तरी गतकालाचीं व स्वत च्या तुरुंगवासाचीं चित्रें गेलीं असतील, व किती तरी त्यांच्या आठवणी जाग्या झाल्या असतील! दिव्याच्या (हण्डीच्या) शात प्रकाशात रात्रीं सरासरी ११ वाजता स्वत च्या बैठकींत त्या दिवशींचे लोकमान्य येरझारा घालताना आज डोळ्यासमोर प्रत्यक्ष दिसल्यासारखे वाटतात त्याचा आत्मा हें जग सोडून गेला पण तो हिंदुस्थान सोडून गेला हें अद्यापि खरं वाटत नाहीं असो थोड्या वेळानें त्यांनीं आपण होऊन बोलण्यास सुरुवात केली त्याचे विचार त्यासच दु सह झाले असावे मला त्यांना त्या स्टायलोपेनची सर्व माहिती समजून सांगण्यास सुरुवात केली शाई कशी घालावयाची, कोठे घालावयाची, ती का व कशी उतरते, हवेचा दाब वरच्या एका छिद्रामुळें कसा कमी पडतो वगैरे गोष्टी जवळ जवळ पाऊण तास ते मला सागत होते! त्यांनीं ती सर्व

पेन मला उकलून दाखविली. त्यानंतर आपण जें जें तोंडानें सांगितलें तें तें सप्रमाण व सप्रयोग सिद्ध करून दाखविण्याचें त्यांनीं ठरविलें. मी नको नको म्हटलें, पण ऐकतो कोण ? "आपण सकाळीं लिहून पाहू" असें मी म्हणालों. "पण शाईची बाटली सापडली नाहींच तर तसेंच करू" हें त्यावर उत्तर आलें ! व शाईचा सर्व घरभर शोध चालला ! लोकमान्य शाई शोधीत हिंडत असताना आपण उगाच उभें राहणें बरें दिसत नाहीं, म्हणून मीहि त्यांच्या मागोमाग घरभर हिंडलों. शेवटीं शाईची बाटली छापखान्यात आहे असें त्यास स्मरण झालें, तितक्या रात्रीं यशवंतरावास जागें केलें, छापखाना उघडून ती शाई आणविली आणि विधिपूर्वक ती त्या पेनमध्यें घालून सशास्त्र ती पेन बंद केली, आणि ही इतकी शास्त्रोक्त "Scientific" पेन कसें सुंदर लिहिते, हें सप्रयोग दाखविण्यास सुरवात झाली ! पण शाई उतरेना ! पेन लिहीचना. आता काय करावें ! इतकें होईपर्यंत १२॥–१ वाजावयाला आला. पेन चांगली आहे अशी मीं पुष्कळदा दहा–पाच वेळा कबुली दिली. पण पेन लिहीचना, तेथें कबुलीचा काय उपयोग ? उद्योग सर्व स्वतः चालला होता. शेवटीं बराच प्रयत्न केल्यावर त्यांनीं स्वतःच असा निर्णय केला कीं, शास्त्रात लेखणींत कोठेंहि दोष नाहीं, आणि 'वेशटली' लिहिण्याचा हट्ट धरून शाई उतरो या न उतरो, पण कागदावरून ती पेन सारखी जर फिरवीत ठेविली, तर तास अर्ध्या तासानें ती आपोआप लिहू लागेल आणि आयत आश्चर्याची गोष्ट अशी कीं, लोकमान्य मला म्हणाले, "तुम्ही उद्या कोल्हापुराहून जाऊन या ( मी कोल्हापुरास जाणार होतों ) तोंपर्यंत तास अर्धा तास लिहून लिहून मी ही पेन तुमच्याकरिता चालू करून ठेवितों ! !"

ही गोष्ट माझ्या मनात इतकी बसली कीं, मी आजन्म ती विसरणार नाहीं. कोणतीहि गोष्ट तडीस लावून निकालात काढीपर्यंत दीर्घोद्योग करण्याचा त्यांच्या ठायीं जो करारी बाणा असे, आणि परोपकाराकरिता कोठवरहि झीज सोसण्याची त्यांची जी सदा निस्सीम तत्परता असे, ती जगाच्या आखाड्यात झुंजत असताना आणि साध्या घरगुती कामात सारखीच दिसे. केवळ मित्रकार्य म्हणून स्वतःचे हजारों रुपये खर्च करून मित्राच्या दत्तक मुलाचे प्रिव्ही कौंसिलपर्यंत भांडण्यात आणि दुसऱ्याकरिता प्रेमास्तव तुटक्या लेखणीस लिहावयास लावण्याकरिता तास अर्धा तास कोऱ्या कागदावर शाईवाचून घिरटक्या घोटीत बसण्यात मला महापुरुषास शोभेसें एकाच परोपकारी व बाणेदार वृत्तीचें चित्र दिसतें.

(१५) लोकमान्याच्या स्वागतासाठीं काढलेली मिरवणूक म्हणजे त्यांच्यावर आणि त्यांच्या अगदीं जवळच्या मंडळींवर हप्त्याहप्त्यानें ओढणारें एक प्राणसंकट वाटत असे. एका मिरवणुकीपासून परत आलें, म्हणजे दुसऱ्या मिरवणुकीपर्यंत भिवाविषयीं निश्चिंतजी राहण्यास हरकत नव्हती. मध्यप्रांतामध्यें दौऱ्याच्या वेळीं एका मुक्कामीं ऐन ११ वाजता दुपारीं मिरवणुकीचें सुख भोगीत असता लोकमान्यांच्या

शेजारीं उभें राहून त्याच्यावर येणारी धक्क्याची परंपरा अडवून धरून कानानें लोकांचीं बोलणीं, तोंडानें धूळ व अगान धक्के खात असतां कोणी तरी माझ्या हातीं एक तारेचें पिवळ पाकीट दिलें "टिळक" एवढेंच पाकिटावर लिहिलें होतें तेव्हां तें मीं लोकमान्यांजवळ दिलें. त्यांनीं तें उघडून वाचलें त्याच्या शांत वृत्तींत रतिभरही फरक झाला नाहीं त्यांनीं तें पाकीट परत मला दिलें, व विनोदाच्या स्वरानें म्हणाले, "वाचा, तुम्हाला आहेर आला आहे इंग्लंडातून" आणि एवढें बोलून त्यांनीं आपलें नेहमींप्रमाणें भोंवतालच्या लोकांशीं बोलणें चालू केलें. त्या गर्दींत ते काय म्हणाले ह्याचा नाटसा अर्थ उमगला नाहीं मी पाकीट तसेंच खिशांत ठेविलें व मुक्कामावर जाऊन वाचून पाहिलें त्यांत ६०,००० रुपये (साठ हजार) तावडतोब पाठवाव, असा इंग्लंडमधून सॉलिसिटर्सचा संदेश आला होता! त्या वेळीं लोकमान्यांच्या जवळ नगद द्रव्य नव्हतें हें मला माहीत होतें व अशा परिस्थितींत एवढी मागणी आली असतांना इतकें मन शांत ठेवणें मला कमालीच्या धैर्याचें काम वाटलें

(१६) त्यांची हीच वृत्ति मीं आणखी एकदा पाहिली लोकमान्य डेप्युटेशन घेऊन इंग्लंडला जाण्याकरितां सीलोनमध्ये गेले होते हें सर्वांस विदित आहे. सीलोनमधून बोटीवर चढून जाण्यास पासपोर्ट मिळत नाहीं असें जेव्हां आकस्मिक कळलें, तेव्हां आमच्या बिऱ्हाडीं फार मोठी खळबळ उडाली जो तो कसें झालें म्हणून नवल करू लागला व सगळीकडे गोंधळ उडाला लोकमान्यांच्या खोलींत जाऊन ते काय म्हणतात तें पहावें असें सहज माझ्या मनांत आलें, व मी त्यांच्या खोलींत गेलों, अत्यंत शांत वृत्तीनें ते एका खुर्चीवर बसले होते अगदीं साध्या गोष्टीसंबंधानें आपण बोलतों तसे ते [illegible] आलेल्या परवान्यासंबंधीं

बुद्धिमत्तेची पुनः एकदां पुरी साक्ष पटल्यावांचून राहत नाहीं. पण हें पुस्तक लिहिण्यास त्यांस वेळच झाला नाहीं, ही देशाच्या अत्यंत दुर्दैवाची गोष्ट होय. तसेंच गणितशास्त्रांतील ' इक्वेशन ' च्या ' थियरी ' संबंधानेंहि मीं कांहीं नवीन विचार केला आहे ' असेंहि ते म्हणत असत. पण दुर्दैवानें तेंहि त्यांचें पुस्तक लिहून झालें नाहीं.

---

## वाग्भट नारायण देशपांडे

[ बी. ए. एलूएल्. बी. वकील, लिबरल पक्षाचे एक अधिकारी, सातारा ]

(१) लो. टिळकांची राष्ट्रीय कार्यांत झालेली तन्मयता, आणि राष्ट्रकार्यांत चित्त एकदां गुंतलें असतां त्यापुढें शारीरिक दुःखाची आणि वेदनांची होणारी विस्मृति यांबद्दल पुष्कळ गोष्टी सांगतात पण याचें प्रत्यक्ष उदाहरण कलकत्त्यास १९१७ च्या डिसेंबरांत मला पहावयास मिळालें. त्या प्रसंगाचा त्या वेळीं माझ्या मनावर इतका परिणाम झाला कीं, त्याचें स्मरण होतांच तो सर्व प्रसंग माझ्या डोळ्यापुढें अजून जसाचा तसा उभा राहतो आणि टिळकांची त्या वेळची अर्धी हंसरी आणि अर्धी गंभीर चर्या, व त्यांचा तो आवाज, अगदीं काल पाहिल्या आणि ऐकल्याप्रमाणें वाटतो.

१९१७ च्या काँग्रेससाठीं कलकत्त्यास गेलों असतां, वासंतोळ रस्त्यावरील खुद्द लोकमान्यांच्या कँपांत त्यांच्या सहवासांत ५–६ दिवस राहण्याचा योग सुदैवानें मला मिळाला होता. त्यावेळीं लोकमान्यांच्या पायाच्या नडगीस कांहीं दुखापत होऊन, त्यांना मधुमेहाचा विकार असल्यामुळें त्याचें काळपुळींत रूपांतर होतें कीं काय अशी त्यांच्या देही मंडळींस आणि डाक्तरांस भीति वाटत होती. जखमेंत रोज बराच पू होऊन घोट्यापासून गुडघ्यापर्यंत पाय़ बराच सुजला होता; त्याच्या वेदना दिवसभर तर होत असतीलच पण रोज सकाळीं पाय धुवून मलमपट्टी करतेवेळेस, जखम दाबून आंतून पू काढतांना तर फारच वेदना होत. सर्वांची सकाळीं तोंड धुण्याची, स्नानाची, चहापाण्याची सोय वर गचीवर असल्यामुळें आम्हास हें सर्व सहाजिकच पहावयास सापडलें. वास्तविक म्हटलें तर टिळकांना पायामुळें काठीशिवाय उभें राहण्यास व साफ चालण्यासहि त्रास पडत असे. पण त्यामुळें त्यांच्या काँग्रेससंबंधींच्या कामांत, आणि इतर उद्योगांत अंतर पडलें नाहीं. हिंदुस्थानचे त्यावेळचे स्टेट सेक्रेटरी मि. मॉंटेग्यु यांचा मुक्काम त्या वेळीं हिंदुस्थानांत असून नवीन सुधारणांची वाटाघाट चालली असल्यामुळें, डॉ. ॲनी बेझंट

यांच्या अध्यक्षतेखालची ती काँग्रेसची बैठक विशेष महत्त्वाची होती. अशा वेळीं लो. टिळकांसारख्या लोकनायकावर किती जबाबदारी असेल, आणि त्यांना किती काम एकसारखें पडत असेल, हें काय सांगावयास पाहिजे? सकाळीं काँग्रेसच्या इतर पुढाऱ्यांच्या भेटी आणि खल, दुपारीं काँग्रेस, संध्याकाळीं इतर सभा आणि रात्रीं सब्जेक्ट्स कमिटी, असा कामाचा सारखा धडाका चाललेला असे. पाय रोज खूप दुखत असतां इतकें काम व धांवाधांव होते तरी कशी याचें मला राहून राहून नवल वाटे. पुढें एके दिवशीं संध्याकाळीं वीडन स्क्वेअरमध्यें खुद्द लोकमान्यांचेंच मोठें जाहीर व्याख्यान झालें; त्या दिवशीं तर मला विशेषच आश्चर्य वाटलें. कारण त्या दिवशीं सकाळीं जखम पाटणी असून वेदनाहि जास्ती झाल्या होत्या. दुसरे दिवशीं सकाळीं लोकमान्य गच्चीवर नित्याप्रमाणें आले. त्यावेळीं आम्ही सर्व मंडळी तेथें चहा घेत बसलों होतों. पायाची पट्टी सोडून जखम धुण्यास लागले त्यावेळीं आम्ही सर्वजण साहजिकच जिज्ञासेनें जवळ गेलों; आणि पाहतों तों पायाची सूज कालच्यापेक्षांहि थोडी अधिक आणि वेदनाहि अधिक. तेव्हां मात्र आश्चर्यानें मला राहवेना! आणि मीं म्हटलें "पायाची एवढी जखम आणि वेदना असतां आपल्याला एवढी दगदग होते तरी कशी!"

मलमपट्टी करणारा माणूस यावेळीं जखमेंतून दाबून पू काढीत होता; आणि त्यामुळें एकादी कळ असह्य झाली म्हणजे टिळक तोंडानें नुसता 'चू' असा अवाज मात्र काढीत; पण माझे हे शब्द ऐकून त्यांनी माझ्याकडे वळून पाहिलें; आणि माझ्यावर क्षणमात्र आपली दृष्टि रोंखून हसून ते म्हणाले,

"My young man, it is the mind, and not the body which works!"

(२) न्या. मू. रानडे आणि लो. टिळक यांच्या संबंधाची पुढील गोष्ट मीं कांहीं वर्षांपूर्वी प्रथम प. वा. हरिभाऊ आपटे यांच्या तोंडून ऐकिली, व त्यानंतर रानड्यांच्या सहवासांत असलेल्या दोघां गृहस्थांकडून पुनः ऐकिली. त्याला आतां बरेच दिवस झाले असल्यामुळें ती आतां इतक्या बारकाईनें लक्षांत नाहीं. तथापि थोडीबहुत लक्षात आहे तशी येथें देतों. न्या मू. रानडे आणि त्यांचे अनुयायी यांनीं सार्वजनिक सभेशीं असलेला आपला संबंध तोडून नवी डेक्कन सभा काढली त्या वेळीं टिळकांनीं केसरींत रानड्यांच्या विरुद्ध 'म्हातारचळ का पोरखेळ' म्हणून एक अतिशय तीक्ष्ण लेख लिहिला रानड्यांसारख्या सन्मान्य आणि सच्च्या देशभक्तावर व पुढाऱ्यावर टिळकांनीं इतका वाईट आणि विषारी लेख लिहिण्यांत चूक केली असें टिळकांच्या अनुयायापैकीं पुष्कळ समंजस लोकांस वाटलें; तेव्हां खुद्द रानड्यांच्या स्नेह्यांस आणि अनुयायांस तर त्यामुळें किती उद्वेग आणि संताप आला असेल हें सांगावयास नकोच. पण आपली मित्रमंडळी

त्या लेखामुळें इतकी सतापली तरी रानड्याची चित्तवृत्ति मुळींच डगमगली नाहीं. पुढें त्याच्या काहीं मित्रमडळींनीं त्याना सागितलें कीं, या लेखाबद्दल टिळकावर अब्रुनुकसानीची फिर्याद केली पाहिजे. पण रानड्यानीं या सूचनेकडे अल्पसुद्धा लक्ष दिलें नाहीं, इतकेंच नाहीं तर मडळींत बसून याबद्दल कोणी विषय काढून "फिर्याद लावाच हो एकदा" असा आग्रह केला, म्हणजे यानीं "तुम्ही वेडे आहा, तुम्हास काहीं समजत नाहीं" असें हसून म्हणून मोडून काढावें. पण रानड्याची स्थितप्रज्ञता त्याच्या अनुयायापैकीं ज्या कित्येकात नव्हती, त्याना रानड्याची ही सहनशील दृष्टि कशी पटावी ? तेव्हा त्यानीं विचार केला कीं, आपलें काहीं याच्यावर वजन पडत नाहीं, तेव्हा ज्याचें याच्यावर वजन आहे, आणि ज्याच्या म्हणण्याचा हे काहीं थोडा विचार तरी करतील अशा एकाद्या मित्राकडून याच्याजवळ ही गोष्ट काढवावी. म्हणून त्यानीं रानड्याच्या एका मोठ्या वजनदार आणि आदरणीय अशा स्नेह्याकडून त्याना पत्र लिहविलें कीं, 'टिळक आपल्या उलट पक्षाच्या पुढान्यावर हवे तसे लेख लिहून विनाकारण मतभेद माजवून कार्यांत विघ्न मात्र आणतात, तर त्याना याबद्दल एकदा चागली अद्दल घडविली पाहिजे आपल्याविरुद्ध त्यानीं हवे तसे निरर्गल आरोप केले आहेत तेव्हा ही सधि हातची जाऊ देऊ नये स्वत चे हिताकरिता जरी नाहीं, तरी समाजाचे हितासाठीं तरी टिळकाना याचें प्रायश्चित्त भोगावयास लावलेंच पाहिजे. तरी टिळकावर अब्रुनुकसानीची फिर्याद करावी कीं काय याचा विचार आपण अवश्य करावा"

या पत्रास त्या मू रानड्यानीं पुढील आशयाचें उत्तर दिलें "टिळका विरुद्ध फिर्याद करण्याच्या बाबतींत पहिला विचार असा आहे कीं, टिळकानी माझ्याविरुद्ध लेख लिहून माझ्यात आणि आपल्या पक्षात जे दोष काढले ते दोष आमच्यात नाहींत अशी प्रथम आपणास खात्री असली पाहिजे माझ्या कार्याची दिशा मीं स्वत जरी पूर्ण विचार करून ठरविली असली आणि ती तुमच्या व आमच्या दृष्टीला जरी योग्य वाटली तरी ती सगर्दी निर्दोष आहे अशी मी ग्वाही देऊ शकणार नाहीं टिळकाची देशभक्ति आणि स्वार्थत्याग निर्विवाद आहे त्याची बुद्धिमत्ता आणि विद्वत्ता माझ्यापेक्षा रतिभरहि कमी नाहीं तेव्हा अशा मनुष्याला माझ्यात आणि आपल्या पक्षात जर काहीं दोष दिसत असतील तर, ते तसे नाहींत, टिळक चुकत असून मीच काय तो शहाणा, असें म्हणण्याचे धाडस माझ्या हातून होणार नाहीं टिळकाच्या लेखाचा योग्य उपयोग असा कीं, आपण आत्मनिरीक्षण करून खरोखरीच आपल्यात असे दोष आहेत कीं काय हें पाहिलें पाहिजे, आणि ते तसे असतील तर घालविण्याचा प्रयत्न केला पाहिजे असें झाले तर टिळकानीं आपल्यावर अपकार करण्याऐवजीं उपकारच केला असें होईल. दुसरें असें कीं,

टिळक आपल्यातलेच असून ते आपल्या मार्गानें देशसेवा करीत आहेत. अशा माणसावर त्याच्या हातून एकादे वेळेस चूक झाली म्हणून आपण फिर्याद करणें योग्य होईल काय ? शिवाय समाजातली दोन शिकलेली शहाणी, पुढारी म्हटली जाणारी, आणि एकाच कार्यासाठीं झटणारी माणसे जर अशा रीतीनें आपापसात भांडून कोर्टात जाऊ लागली तर सरकार आपली काय किंमत करील ? आपापसातले मतभेद जर आपण असे कोर्टात नेऊं लागलों तर आपल्या शब्दास सरकारात आणि लोकातहि काहींच किंमत उरणार नाहीं. ज्याना आपापसात एकी राखता येत नाहीं त्याच्या हातून देशात एकी कसली होणार ? या सर्व गोष्टींचा विचार करता टिळकावर फिर्याद करण्याची कल्पना मला मुळींच पटत नाहीं. "

याप्रमाणें नुसतें लिहूनच न्या. मू. रानडे राहिले नाहींत. टिळकाच्या आणि आपल्यात तीव्र मतभेद असताहि त्याच्याबद्दल स्वत स वाटत असलेला आदर प्रत्यक्ष कृतीनें दाखविण्याची संधी लवकरच आली ती अशी कीं, ग्रॅज्युएटातर्फे युनिव्हर्सिटीच्या फेलोची निवडणूक होत असते, त्यासाठीं उमेदवार म्हणून टिळकांचें नाव स्वतः रानड्यानीं होऊन सुचविलें आणि त्यामुळे पुष्कळास कसें आश्चर्य वाटलें ही गोष्ट प्रसिद्ध आहे.

---

## नारायण जगन्नाथ दातार

[ केसरीचे एजंट, मुंबई ]

(१) कै. प्रो. ढेकणे व लोकमान्य हे दोघे गणित विषय घेऊन एम. ए. चे परीक्षेकरिता मुबईस आले. तेव्हा ते गिरगावात दामुलजीचे वाडींत कै. बापूसाहेब आठल्ये, हायकोर्ट वकील, याचे बगल्यात उतरले होते. त्या वेळीं (सुमारें १८८४) केसरी एजटचें ऑफिस ह्याच वाडींत होतें व तेव्हा त्याची आमची प्रथम ओळख झाली. प्रो. ढेकणे हे काहीं दिवस लोकमान्याचे शिष्य होते. त्या वर्षीच्या परीक्षेत शिष्य पास व गुरु नापास झाला. तेव्हा त्याचें कारण त्या वेळच्या परीक्षकाचा खुनशीपणाच असावा असें पुष्कळाना वाटलें. कारण कॉलेजातील गणिताचे प्रोफेसर हेच त्यावेळीं परीक्षक असत आणि त्याचें व लोकमान्याचें सूत कधींच जुळत नसे.

(२) कै. आगरकर व टिळक यामध्यें सुधारक व केसरी यातून एका बाबतींत कडाक्याचा वादविवाद चालला असता सुधारक वाचला म्हणजे आगरकर

लिहितात तें बरोबर व केसरी वाचला म्हणजे टिळक लिहितात तें बरोबर असें वाटे म्हणून उभयताच्या एका स्नेह्यानें टिळकास विचारलें कीं, यात खरा प्रकार काय आहे? तेव्हा टिळक यानीं सांगितलें कीं, निव्वळ सत्य काय तें दोघाराहि ठाऊक आहे परंतु दोघानीं दोन पक्ष घतल्यामुळे दोघाचेहि लेख वाचून त्यापासून वाचणाराचे मनावर शवटीं जो ग्रह होईल तेंच खर असे समजावें

(३) केसरी एजटाच दुपारी कादवाडींत खत्र्याचे चाळींत आल्यावर तेथ टिळक प्रथम आले तेव्हा त्यास फार आनद झाला कारण त्याच चाळींत, त्याच खोलींत ते व नामदार उपासनी व आणखी काहीं त्याचे सहाध्यायी एल्एल् बी च अभ्यासाकरिता काही दिवस राहिल्ले होते

(४) कै नामदार खरे व लोकमान्य याची बाळपणची मैत्री अखेरपर्यंत टिकली व दोघाचे राजकीय मतात पुढ थोडा फरक पडला तरी मैत्री कायम होती. ते एकमेकास शेवटपयत अर, तुरे पण मोठ्या प्रेमानें संबोधीत असत त्याऱ्यामध्ये शिष्टाचार नव्हता व एकमेकाकडे गेले असता पाहुण्याप्रमाणें न वागता घरच्या माणसाप्रमाण आपल्या सायी करून घ्याव्या असें जणू काय दोघाचें ठरलें असल्यामुळें अपमानाचा किंवा रुसण्यारागावण्याचा प्रसग कधींच कोणावर आला नाहीं टिळक मुंबईस आलें असता प्रथम पुष्कळ वर्षें नामदार खर याचेकडच उतरत व हा सहसतच खर यास अखेरपर्यंत नडणार, म्हणज सरकार त्यास हायकोर्ट जज्ज नेमणार नाहीं असा टिळक यानीं स्पष्ट सांगितलेलें होतें, तरी पण ती जागा मिळल अशी खरे यास आशा आहे अस जेव्हा टिळकास वाटलें तेव्हा त्यानीं आपण होऊन मुंबईस असता काहीं दिवस सरदारगृहात उतरण्यास सुरुवात केली खरे याची या बाबतींत निराशा झाल्यानतर ते खरे याच्या बगल्यावर पुन उतरू लागले, पण होमरूलच्या चळवळीपासून मुंबईस असताना त्याच्या भटीस येणाऱ्या लोकाची सख्या फार वाढली व खर याचा बगला गावाबाहेर एकीकडे असल्यामुळे खरे याच्या कामास त्रास होऊ नये व लोकासहि भटण्यास सोयीच व्हाव, म्हणून ते सरदारगृहात पुन उतरू लागले. सरदारगृहाचे मालकही सरकारचे रोषाची पर्वा न करता स्वखुशीनें त्याची उस्तवार बरदास्त ठवीत

(५) सहा वर्षांचा तुरुगवास भोगून आल्यानतर वृद्धपणा व त्यात मधुमेहाचे विकाराची भर पडून थोडाच अशक्तपणा आल्यामुळे प्रवासात ते आपल्याबरोबर एक मनुष्य नेहमीं ठेवू लागले, तोंपर्यंत त्याचें बाडाग्याचें काम व त्याचें तिकीट काढून त्यास परत गाडींत बसवून देण्याचे काम आमचेकडे असे त्याचे बरोबर मुंबईत कामानिमित्त फिरताना वाटेंत घरगुती व राजकीय गोष्टींसबधानें ते नेहमीं बोलत असत

(६) गेल्या मुंबईच्या राष्ट्रीय सभेच्या वेळीं 'बेझटयाईशीं सामना करून सरशी करण्याकरिता दासयाजूची मदत मिळाली म्हणून आज निभावलें' असें

सबजेक्ट कमिटीची सभा आटपून परत आल्याबरोबर त्यांनी सांगितलें, व अमृत सरच्या कॉंग्रेसच वेळीं महात्मा गांधींचीं मतें मोडून काढून रिफॉर्म्सच्या बाबतींतला ठराव पास करून घेण्यास रात्र १८ तास प्रमाणें चार दिवस काम केलें म्हणून प्रकृतींत दिसणारा थकवा आलेला आहे, असे परत मुंबईस आल्यावर त्यांनीं सांगितलें कलकत्ता कॉंग्रेसचे अध्यक्ष त्यास करून तेथें त्याच्या पक्षाचा पाडाव करण्याचा डाव ओळखून अध्यक्षपद नको अशी त्यांनीं मुंबईहून तार दिली होती व दुर्दैवानें त्या कॉंग्रेसपूर्वी त्याचा अंत झाला

(७) महात्मा गांधींचीं मतें चांगलीं आहेत कीं वाईट आहेत असें म्हणता येणार नाहीं पण मनुष्यस्वभावाचा व जगाचे रहाटीचा विचार करता तीं चालू राजकारणात अव्यवहार्य सबब निरुपयोगी आहेत असें त्यांचें ठाम मत होतें शत्रूशीं किंवा इंग्रजांशीं मैत्री करा व त्याच्या मानसिक स्वास्थ्याचा भंग करू नका, हा वेदांत ठीक आहे, पण मूल नें रडून आईनें झोपमोड केली नाहीं तर प्रत्यक्ष आईहि सबंध रात्रीत मुलास पाजणार नाहीं तर दाईची ती काय कथा असें ते म्हणत असत. कर न देणें हीच खरी असहकारिता, पण कर न दिला म्हणजे जवळची आवडती चीजवस्त सरकारचे नोकर जबरदस्तीने नेऊ लागतील त्या वेळीं स्वस्थ बसून व शांत राहून तें पहात बस म्हणणें सोपें आहे, पण तसें घडणें अशक्य आहे असें त्यांचें मत होतें व ते त्यांना महात्माजींस कळविलेंहि होतें

(८) लढाईच्या वेळीं सैन्यभरती व पैसे जमा करण्याकरिता मुंबईचे टाऊन हॉलात गव्हर्नरसाहेबांचे अध्यक्षतेखालीं जी मोठी सभा झाली व जीमधून लोकमान्य उठून गेले त्या सभेच्या दिवशीं दुपारीं सरदारगृहात प्रत्यक्ष पाहिलेली एक गोष्ट सांगतों लोकमान्य त्या सभेंत काय भाषण करणार ते त्यांनीं सरकारास आगाऊ कळविलें होतें त्यासंबधीं महात्माजींचा विचार घेण्यास त्यास सरदारगृहात बोलाविलें महात्माजी सरदारगृहात आल्यावर असें म्हणाले कीं, "सभेंत कांहीं विरुद्ध भाषण करणार नाहीं असे गव्हर्नरसाहेबास आताच वचन देऊन मी आलों आहे " त्या वेळीं लोकमान्यांनीं त्यास सांगितलं कीं, "वचन दिलें आहे तर सरकारचे विरुद्ध बोलू नका व आमचे बाजूनेंहि बोलू नका पण सभेस जरूर या व स्वस्थ बसून रहा, व तुमच्या मुग्धपणाचा जो काय फायदा आम्हास घेता येईल तो आम्ही घेऊ " त्या वेळीं शेट बमनजी, विठ्ठलभाई पटेल, जमनादास द्वारकादास वगैरे बरीच मंडळी तेथें होती सर्व मंडळींनीं परोपरीनें महात्माजींस सभेस येण्यास सांगितलें पण ते कांहीं सभेस गेले नाहींत !!

(१०) सध्याच्या हिंदुस्थानच्या राजकीय स्थितीविषयीं व उन्नतीविषयीं निरनिराळ्या पक्षांतील हिंदी लोकांचीं मतें एकच असावयाचीं तीं निराळीं असणें शक्य नाहीं त्यांच्यात फरक दिसतो तो तीं मतें उघड बाहेर दाखविण्याचें धैर्य

कमीजास्त असतें त्यामुळें दिसतो हिंदुस्थानातील राजकीय चळवळीचा गेल्या ४० वर्षांचा इतिहास पाहिल्यास आजची जहाल समजलेलीं मतें ७।८ वर्षांनीं मवाळास मान्य होतात जहालानीं कष्ट सोसून रस्ता साफ केल्यावर मवाळ त्यावरून जातात व त्यापासून होणारे फायदे घेतात पण असें हें चालावयाचेंच असें लोकमान्य समजत होते व त्याबद्दल त्यास वैषम्य वाटत नस. सरकारची आपलेवर मर्जी आहे असें मवाळ समजतात त्याबद्दल मात्र त्यास खेद वाटे. कारण "Scratch a moderate and you will find an Extremist and ' The so called moderate is one, who is willing to wound but afraid to strike असें सरकारचें मत असून वेळ आली म्हणजे दोघाचीहि किंमत सरकार सारखीच करतें असें लोकमान्य म्हणत.

(१०) हिंदु मुसल्मानात ऐक्य घडवून आणण्याकरिता हल्लीं कॉंग्रेसमधील व दोही जातींचे पुढाऱ्याच्या सभा भरतात तेव्हा त्याबद्दलचें लोकमान्याचे मताची वारवार आठवण होतें " हिंदू व मुसल्मान या दोघात जर सलोखा व ऐक्य राहावयाचें असल तर दोन जाती एकमेकाचा प्रतिकार करण्यास समर्थ आहेत अशी त्याची समजूत होणें अगदीं अवश्य आहे हिंदू व मुसल्मान जातींच पुढारी लोक एकत्र करून त्याच्या सह्याचे जाहीरनामे प्रसिद्ध करण्यात काहींएक अर्थ नाहीं" असं लोकमान्य म्हणत

(११) "सध्या मिळाला तेवढाच लाभ समजून पुढील उद्योगास लागलें पाहिजे" असें ता २६।४।१८९२ चे केसरींत लोकमान्यानीं लिहिलेलें आहे व त्याचप्रमाणें शेवटपर्यंत त्यानीं राजकीय चळवळ सुरू ठेविली होती इंग्रज सरकार "कावेबाज व शहाणें" असल्यामुळे त्याच्याकडून सहा महिन्यात किंवा एक वर्षात स्वराज्य मिळविण्याची कल्पना त्यानीं कधींच केली नाहीं दोन मोटारी खरेदी करून सर्व मुंबई इलाखाभर स्वत फिरून १९२१ सालच्या कौन्सिल-निवडणुकीत त्याच्या पक्षातील लोकानीं लोकनियुक्त सभासदाच्या कौन्सिलातील सर्व जागा भरून टाकावयाच्या व एकहि मवाळ निवडून येणार नाहीं, अशी खबरदारी ते घेणार होते निवडून आलेल्या लोकातूनच दोन मिनिस्टर नेमावयाचे असल्यामुळें शिक्षण, जगल, अबकारी, स्थानिक स्वराज्य वगैरे सारखी लोकाच्या प्रत्यक्ष सुखसोयींचीं सोंपीव खातीं आपल्या पक्षाच्या लोकाच्या हातात आलीं म्हणजे लोकास पुष्कळसें सुख होईल व तें जर मिनिस्टरास करून देता आलें नाहीं तर सुधारणाचा पोकळपणा आपोआपच सिद्ध होऊन त्या भरीव करण्याबद्दलची मागणी जास्त जोरानें करता येईल असें त्याचें मत होतें

(१२) लोकमान्यास ६० वर्षें झालीं, त्या ज्युबिलीसमारभाचे दिवशींच १४४ कलमाखालीं त्यास भाषणबंदीची नोटीस लागली तेव्हा "नवें वर्ष नवें सकट"

असे शब्द उच्चारून ते म्हणाले कीं, "मजास जशी रोज आखाड्यात मेहनत केल्याशिवाय बरें वाटत नाहीं, तसें ताईमहाराजाची केस नुकतीच संपल्यामुळें आमच्या मेंदूस पुरेसें काम नव्हतें तें पुरविण्याची काळजी सरकार घेतें म्हणूनच बरें."

(१३) लोकमान्य मुंबईंत १९०४-०५ सालांत कांहीं महिने स्वतंत्र बिऱ्हाड करून राहिले असतां रा XXXX हे त्यास भेटण्यास आले होते. ते नुकतेच एम्. ए. झाले होते. तेव्हां पुढें काय करणार ? असें लोकमान्यांनीं त्यास विचारिलें. तेव्हां 'सर्व्हंटस् ऑफ इंडिया सोसायटींत जाणार' असें त्यांनीं सांगितलें. सोसायटींत राहून काय काम करण्याचें मनात योजिलें आहे, असें पुढें विचारिलें. तेव्हां 'गोखले सांगतील तें काम करणार' असें उत्तर येताच "एकूण तुम्ही सांगकामे होणार" असें म्हणून पुढें आणखी विचारण्याचें त्यांनीं सोडून दिलें.

(१४) त्यांच्या एका जिवलग स्नेह्याचा मुलगा चांगला शिकलेला असून बापाचा धंदा पुढें चालवीत नाहीं किंवा दुसरें कांहीं एक काम करीत नाहीं, हें पाहून ते म्हणत कीं, "व्याजातून मुलाचा दरमहाचा खर्च भागेल एवढी मोठी शिल्लक त्याच्या स्नेह्यानें मुलाकरितां ठेवली, ही मोठी चूक केली, म्हणून मुलगा रिकामा राहून काळ काढतो."

(१५) लोकमान्यांच्या दुसऱ्या एका स्नेह्याच्या मुलाचें वरिष्ठांशीं न जुळल्यामुळें वरचेवर त्याची चाकरी सुटे व दुसरी मिळेपर्यंत काळजींत रहावें लागे. तेव्हां त्यास ते एकदा म्हणाले कीं, चाकरी ती चाकरी असें समजून केली तर वरचे-वर सुटणार नाहीं चाकरीचा अर्धा पगार वरिष्ठांचें बोलणें सोसण्याबद्दल व अर्धा पगार कामाबद्दल असं समजलें पाहिजे

(१६) बाळपणची जेव्हांपासूनची लोकमान्यांस आठवण होती, तेव्हांपासून शेवटपर्यंत त्यांनीं कधीं डोक्यास, डोळ्यांस किंवा आंगास तेल लावून घेतलें नाहीं किंवा स्वतः लावलें नाहीं व कधींहि हातपाय व आंग चेपून घेतलें नाहीं, असें त्यांच्या शेवटच्या आजारांत त्यांनीं सांगितलें

(१७) वकिलाचें काम लोकांस वाटतें तसें सोपें नसून तें नीट साधत नाहीं, याचें कारण एकदा त्यांनीं सांगितलें तें असें कीं, इतर धंद्यांत फक्त शिकावें लागतें, पण वकिलास शिकून तें पुनः लागलेंच विसरावें कसें, हेंहि शिकावें लागतें. ज्याची पुढें कधीं जरूर लागावयाची नाहीं, अशा गोष्टी त्वकर विसर-ण्याची कला ज्यास साधली तोच वकील आपल्या धंद्यांत पुढें येतो

(१८) चिरोलकेसला अदाजापेक्षा फारच जास्त खर्च येणार असें समजलें तेव्हां लाख दीड लाख रुपये कर्जाऊ देईल असा व्याजबट्टयाचा धंदा करणारा

कोणी दक्षिणी सावकार मिळाला तर पहा, असें लोकमान्यांनीं आम्हास सांगितलें व तपास करतां तसा एक सावकार त्यास कळविला, तेव्हां त्यास समाधान वाटलें. त्या वेळीं मुंबईचे बरेच भाटे व पारशी लक्षाधीश त्यांचे चांगले परिचयाचे होते व त्यांपैकीं कोणीतरी त्यांना कर्जाऊ पैसे देता परंतु त्यांजकडे मागावयाचे नाहीं, व त्यांनीं दिले तरी ते घ्यावयाचें नाहींत, असें त्यांनीं ठरविलेलें होतें कारण सावकाराच्या मिंढेपणा किंवा अडवणुकीमुळें त्यांच्या राजकीय मतस्वातंत्र्यावर मुळींच दाब येतां कामा नये अशी त्यांची इच्छा होती. विचार करून ठेवलेल्या विषयावर तीन नवीनच पुस्तकें लिहून हें कर्ज सहज फेडूं अशी त्यांना खात्री होती पुढें पर्सफंड काढून त्यांतून त्या केसचा खर्च लोकांनीं दिल्यामुळें पुस्तकाचा घेतलेला विचार त्यांच्या डोक्यांतच राहिला.

---

## नीलकंठ महादेव फेळकर

[ बहुश्रुत विद्यार्थी, फर्ग्युसन कॉलेज, पुणें. ]

मी ऐकलेल्या कांहीं विश्वसनीय आख्यायिका खालीं देत आहें.

(१) ताईमहाराज–केस चालू होण्याचे सुमारास पुण्यास एक सबजज्ज पेन्शन घेण्याच्या तयारींत होते. त्यांची, एका वर्गांत शिकल्यामुळें, विष्णुशास्त्री चिपळूणकर यांची चांगली मैत्री असून, सामाजिक सुधारणेसंबंधीं पुराणमतानुवाद करण्यामुळें 'ज्ञानप्रकाश' व टिळक यांचा संबंध होता. हे सबजज्ज निःस्पृहपणाबद्दल चांगले नांवाजलेले होते. त्यामुळें लो. टिळक व प्रतिवादीचे मुंबईचे वकील (पुढें नामदार) महादेवराव चौबळ या दोघांचीहि इच्छा त्यांजपुढें केस चालावी अशी होती तसा अर्जहि दोघांनीं केला होता दोन्ही पक्षांतील मंडळी सबजज्ज यांच्या परिचयाची होती. परंतु वय त्यांचीच कित्येक वर्षें भरून गेल्यामुळें त्यास आणखी मुदत सरकारानें दिली नसती या गोष्टीची जाणीव असल्यामुळें केस अर्धवट ऐकून पुढें ती नवीन येणाऱ्या माणसाचे हातीं देण्यापेक्षां ती सगळीच केस त्यांनीं पुढें ढकलली. यानंतर थोडेच दिवसांनीं टिळक सदर सबजज्ज यांचे दारावरून जात असतां त्यांस हांका मारून पेन्शनर न्यायाधीशांनीं त्यांची चौकशी केली. टिळक प्रथम तो खटला स्वतःच चालवणार होते व कांहीं कागदपत्र त्यांचे हातांत होते हें पाहून सबजज्ज मित्रांनीं तुम्हीं केस स्वतः चालवावयाचा बेत का केला ? असें विचारलें. "वकील फार पैसे मागतात, दाजीसाहेब मुंबईहून अथवा दादासाहेब करंदीकर यांस साताऱ्याहून आणण्यास

फार पैसे पडतील " असें त्यांनीं उत्तर दिलें. "पुण्यास या दोन दादांच्या तोडीचे वकील मिळणार नाहींत का?" असें विचारतांच "मित्र जितक्या काळजीनें केस चालवील तशी इतर वकील कसें चालवतील? इतर वकील नीट केस वाचीत देखील नाहींत," असें टिळकांनीं उत्तर दिलें. आणि पुढें सबजज्ज मंडळीसहि दोष दिला कीं, ते वकिलांची हलगर्जीपणाबद्दल हजेरी घेत नाहींत. यावर ते मित्र म्हणाले "का? हल्लीं केसरी लिहिण्यास न्यायाधीशाची अरेरावी हा एक विषय कमी आहेसें आपणास वाटतें काय?" पुढें टिळकास स्वतः केस चालविण्याचे विचारापासून त्यांनीं परावृत्त केलें. टिळकांची जबानी हा केस मधील महत्त्वाचा भाग असल्यामुळें त्यांनीं स्वत:चे तोंडानें स्वत:च्या माहितीची फशीहि तरफदारी केली तरी मनुष्यस्वभावानुसार त्याचा परिणाम न्यायाधीशाचे मनावर कमीच होईल; व साक्षीदार म्हणूनच टिळकांनीं पुरावा देणें जास्त परिणामकारक होईल, असें सांगून सदर सबजज्ज मित्रांनीं दाजीसाहेब खरे यांचे हातांत केस देवविली. त्यांत टिळकांस यशहि आलें.

सदर सबजज्ज नाशीक येथें मदत-जज्ज असतां डिस्ट्रिक्ट जज्ज रिव्हॅन्स म्हणून होते. रँडसाहेबाचा नुकताच खून झाला होता. साहेब आणि मदत-जज्ज यांचें सहज बोलणें निघालें. साहेब म्हणाले "पुण्यास लवकरच बंड होणार आहे असें ऐकतों." मदत जज्जः— कोण बंड करणार? "टिळक" असें साहेबांनीं उत्तर दिलें. मदतजज्ज हसून विचारतात, "मग आपण लवकरच आपल्या शाळा व कॉलेजें बंद करून युनिव्हर्सिटी बंद केलीत तर बरें होईल!"

'कॉलेज व बंड याचा काय संबंध?' असें साहेबांनीं विचारलें. 'टिळक बी. ए. एल्एल्. बी. आहेत. त्यांना जर वासुदेव बळवंताइतकें देखील कळत नसेल तर कॉलेजांत ते शिकले तरी कशाला? अहो, मुन्याफान्यांनीं साहेबास कापून टाकू असें टिळकांस वाटत असेल असें मला वाटत नाहीं. बरें, असें वाटण्याइतका जर तो खुळा असेल तर, वेड्याचें भय साम्राज्यास वाटण्याचेंहि कारण नाहीं. बाकी हें खरें कीं, पोलिसखातें मात्र टिळकांची प्रख्याति करण्यास टपलेलें आहे असें दिसतें. त्यांच्या नावाचा फुकट बाऊ करून जे टिळक मुंबई इलाख्यांतील लोकांस ठाऊक झाले नसते त्यांचें नांव सर्व हिंदुस्थानास कळलें.' असें मदत जजांनीं उत्तर दिलें.

(२) आर्यभूषण छापखान्याबद्दल काहीं ठरावांत बाधे पडून टिळक, भानू वगैरे मंडळींची एक केस उपरिनिर्दिष्ट सबजज्ज यांजपुढें आली. येथील सुप्रसिद्ध वकील गोपाळराव पटवर्धन टिळकांची उलट तपासणी करूं लागले. सुरुवाती-नंतर थोड्या वेळानें सबजज्ज यांनीं गोपाळराव पटवर्धन यांस विचारलें "गोपाळराव! तुमचा व टिळक यांचा खासगी स्नेह आहे. वादी व प्रतिवादी हे सगळे लोक चांगले एका बैठकींतील मित्र आहेत. टिळकांची उलट तपासणी

करून त्याच्या अर्गी खोटेपणा लावण्यात तुम्हास यश येईल काय? दुसरें असें कीं, आम्ही कायद्यातील बारकाया पाहून काहीं तरी निवाडा करणार त्यापेक्षा, टिळकास कायद्याचें उत्तम ज्ञान आहे, तुम्ही आपापसात या केसचा निकाल अधिक समाधानकारक लावू शकाल असें आपणास वाटत नाहीं काय?"

सबजज्जाचा रोख पाहून दोनहि पक्षानीं आपापसात बसून केस तोडली. दोघाच्या मतें जी तक्रार उपस्थित झाली होती, तेवढ्या किरकोळ बाबतींत कोर्टानें निवाडा दिला केस चालवण्याचें प्रयोजन पडलें नाहीं

(३) रा. व वासुदेव बापूजी कानिटकर याची सर्व मडळी, टिळक वगैरे जूनचे सुमारास सिंहगडावर रहात होते. टिळक नुकतेच रायगडावर शिवजयंति उत्सवाकरिता जाऊन आले होते तेथें व्याख्यानात 'शिवाजी हा परमेश्वरी अवतार होता' असें टिळक म्हणाले होते व त्नप्रकाशात व्याख्यानाचा आलेला रिपोर्ट व टीका वाचून माधवरावाचे आजे वासुदेव वापूजी कानिटकर (लायब्ररी, रेमार्केट वगैरे इमारतींचा प्लॅन करणारे प्रख्यात इंजिनियर) यानीं टिळकास विचारलें, "शिवाजीस अवतार म्हटलेलें सुशिक्षितास कसें पटावें?" "जीवात्मा आणि परमात्मा यात आपला धर्म फार फरक मानीत नाहीं करणी करून नराचा नारायण होतो, हा आपल्या धर्माचा सिद्धात आहे," असें टिळकानीं उत्तर दिलें हा टिळकाचा अभिप्रेत अर्थ होता असें जाणणारा ज्ञानी श्रोता तेथील समाजात एक तरी होता किंवा नाहीं याबद्दल शका याहून वासुदेवराव कानिटकर व सगळें कुटुंब हसू लागलें टिळकाचे तोंडावरहि स्मित दिसू लागलें

(४) प्रो माधवराव कानिटकराचे एक मित्र रा पटवर्धन हे टिळकाचे तैनातींत शेवटच्या दुखण्याचे वेळीं अगदीं मृत्यूचे आदले दिवसापर्यंत होते शेवटीं दुखण्यास उतार पडणार असें वाटून पटवर्धन काहींकामानिमित्त बनारसला कानिटकराकडे निघाले आगगाडींत दुसरे दिवशीं लोकमान्याच्या निधनाची वार्ता त्यास वर्तमानपत्राद्वारें वाचावयास मिळाली त्याचे मनास विलक्षण चटका लागून राहिला की, इतके दिवस मुद्दाम राहून ऐन शेवटच्या प्रसगीं आपण परगावीं चाला यासबधीं बोलताना टिळकाच्या आज ० वर्णन त्यानीं कानिटकर मडळीस करून सागता॥ टिळकाचे आजारात देखील राजकारणात मन कसें गुतून राहिलें होतें त्याचें वर्णन केलें टिळकाचे तेव्हाचे उद्गार त्यानीं वारवार उच्चारले 'Let me feel better, I will send × × × beyond × × ×' वरील उद्गारात, आत्मविश्वास आणि एकनिष्ठ राजकारणीपणा हे गुण दिसत असून वाक्यात ध्वनित होणारा बाणा ध्यानात घेण्याजोगा आहे.

---

## यादव माधव काळे

[बी ए बी एल् वकील, वाङ्मयसेवक, स्वराज्य पक्षाचे पुढारी, म प्रा कौन्सिलचे सभासद व वऱ्हाडच्या इतिहासाचे कर्ते, बुलढाणा, वऱ्हाड ]

(१) माझ्या स्वत च्या टिळकासबंधी आठवणी विशेष अशा काही नाहीत. माझा लोकमान्यांशी सबध आला तो खास सन्हेचा असा फारसा आला नाही तरी त्यांच्याशी त्याचा विशेष सबध होता अशा काही मित्राकडून खालील माहिती काढून पाठविली आहे त्यापैकी आकाल्याचे रा व दत्तोपत भागवत यानी पुढील माहिती सागितली आहे टिळकाचा कॉलेजातील अनियमितपणा प्रसिद्धच आहे ना उपासनी व टिळक याच्या खोल्या शेजारी शेजारी असत व दोन खोल्या सोडून दत्तोपंताची खोली असे रात्री दहा वाजेपर्यंत टिळकानी याच्या खोलीत जा, त्याच्या खोलीत जा, याप्रमाणे करून वेळ घालवावा व नतर रात्री आकरावारावाजेपासून वाचनास सुरुवात करावी त्याची वाचण्याची रीत अथरुणावर पडल्या पडल्या असे त्या वेळेपर्यंत इतर सर्व विद्यार्थी निजलेले असत त्यामुळे वेळ शात असल्यामुळे एकाग्रता होई व ते तासचे तास वाचीत पडत याप्रमाणे रात्री फार वेळ जागरण झाल्यामुळ सकाळी अर्थातच उठण्यास उशीर होत असे

(२) याच्या उलट प्रकार वामनराव आपटे याचा ते अत्यत व्यवस्थित, त्याचे वेळापत्रक बाधलेले सस्कृत व गणित या दोन विषयावर त्याचा विशेष अभ्यास टिळकाचे गणित विषयावर प्रभुत्व सर्वश्रुत असे व एखादा गणिताचा बिकट प्रश्न आला की टिळक त्याच्यामागे लागून त्याचा पिच्छा पुरवीत व तो प्रश्न सुटल्याशिवाय त्याना चैन पडत नसे, मग दुसरा अभ्यास बुडला तरी पर्वा नाही उलटपक्षी आपट्याचा काल बाधलेला गणिताचा कठीण प्रश्न लौकर न सुटला तर वेलातिक्रमण न करता त्यानी तो सोडून देऊन टिळकाच्या आगावर टाकून द्यावा त्याना पक्की खात्री की, टिळक त्याचा पिच्छा पुरवून तो सोडविल्याशिवाय राहणार नाहीत मग आयताच त्याचा आपणास फायदा मिळेल टिळकानी तो सोडविला की, आपट्यानी तो समजून घ्यावा व नोट बुकावर टिपून ठेवावा.

(३) टिळकाचे दुसरे सहाध्यायी आगरकर याचा तिसराच प्रकार सापत्तिक गरिबी व मानीपणा याचा अतिरेक त्याच ठिकाणी असे आपला एकच सदरा पण चोरून रोज धुवून वाळवून नेहमी स्वच्छ ठेवून ते राहात एवढा त्याचा नियमितपणा व व्यवस्थितपणा होता त्याचे मामा दत्तोपत भागवत व ते वयाने सारखेच व त्याचे शिक्षणक्रमापर्यंत सर्व आयुष्य एकत्रच गेले तेहि साधारण गरीब स्थितीतच तेव्हा आगरकराचा गरिबीशी अखेरपर्यंत मूर्तिमत झगडा, पण

त्यामुळें ते कोणास हार जात नसत. पुढील काळाची त्याची एक गोष्ट अशी आहे कीं, एकदा ते गोखल्याच्या बरोबर क्यापातून टांग्यात बसून घरीं आले व टांग्याभाडें गोखल्यानीं दिलें. आगरकरानीं गुपचूप टांगेवाल्यास भाडें विचारलें व गोखल्याच्या टेबलावर निम्मे भाडें ठेवून ते निघून गेले. त्याच्या पेटीच्या एका खणात १५ रु. कायमचे ठेवलेले होते. मल्ल्या वेळीं मेल्यास और्ध्वदेहिका करिता दुसऱ्याकडून मागण्याची वेळ पाठीमागच्या माणसास न यावी, एवढी त्याची बारकाई !

(४) टिळकाचे बरोबरच्या मडळींत चागले बुद्धिमान् विद्यार्थी असत. परतु त्याच्यावर छाप पडेल असे विद्वान् प्रोफेसर मात्र अगदीं कमी. ऑक्सेनहॅम प्रिन्सिपाल असताना लार्किन म्हणून एक आय. सी. एस् प्रोफेसर होते. त्याना दुसरीकडे कोठें जागा रिकामी नव्हती म्हणून की काय प्रोफेसरच्या जागेवर नेमलें कारण आय. सी. एस. ला येत नाहीं असें कांहींच नाहीं हे गृहीत साधारणच होते पण विशेष महत्वाची गोष्ट सस्कृत विषयाचे प्रोफेसर पीटरसन याची. साहेबाचें सस्कृताचें ज्ञान घेताचें व इकडे मडळींत टिळक, आपटे याचे-सारखे जाडे सस्कृतज्ञ. दोघटीं मडळीनें सप केला व पीटरसनचे क्लासात जायचें नाहीं असें ठरविलें. सर्व क्लास रिकामा पाहताना पीटरसन रागावले. प्रि. ऑक्सेनहॅम विद्यार्थ्यांचे वसतिगृहात प्रत्येक खोलींत गेले दारें आतून बद. विद्यार्थी मोठ्या प्रयासानें दारें उघडीत व सागत कीं, पीटरसनपेक्षा आम्हालाच सस्कृत जास्त येतें, मग क्लासात जाऊन काय करावयाचें !

या सपामुळें पुष्कळशा मडळीस शिक्षा म्हणून फॉर्म दिला नाहीं, पण त्यामुळें उपद्रव दुप्पट झाला मागें अडकून राहिलेली मडळी व खालून वर आलेली मडळी याची एकच गर्दी झाली व त्यातहि हुशार विद्यार्थ्यांची सख्या वाढून त्याचें बळ दुणावलें व प्रोफेसराची जास्तच फजीती होऊ लागली

प्रि ऑक्सेनहॅमची सुद्धा तऱ्हा अशी होती कीं, कोणी काहीं अवघड शका विचारली कीं, आपलें अज्ञान झाकून ठेवण्याकरिता त्या ' वार्ष्यास प्रश्न विचारून फजीत करावें. पण टिळक, आगरकर, आपटे वगैरे मडळी खमग ! त्यानीं आपसात ठरवून प्रोफेसरसाहेबानीं प्रश्नाचें उत्तर देण्याची टाळाटाळ केली कीं, प्रत्येकानें तोच प्रश्न विचारून प्रोफेसराची फजीती करावी. तेव्हा प्रोफेसर साहेबानीं ती रीत सोडली

(५) टिळकाच्या एकदर मतावरून त्यावेळीं अशी समजूत होती कीं, ते ईश्वरवादी ( Deist ) तरी होते कीं नाहीं याची वानवा ! पुढ टिळक आको त्यास आले असता दत्तोपताच घरीं उतरले, तेव्हा त्यानीं पाहिलें कीं, माविक लोक त्याची पूजा व आरती करीत व एरव्हीं हा प्रकार कधीं न सोसणारे टिळक

हा प्रकार चालू देत तेव्हा त्यांनीं टिळकांस विचारलें कीं, ' तुम्ही हें कसें चालू देता ? ' टिळकांनीं हासून उत्तर दिलें कीं " हा प्रकार मला अगदीं आवडत नाहीं, पण लोक ऐकत नाहींत शिवाय मला यांत एकच समाधान आहे, तें कीं, या नोकरशाहीनें माझा विनाकारण फार छळ केला, तेव्हा ही माझी लोकप्रियता पाहून त्यांचे अगाचा तिळपापड होतो त्यातच मला आनंद वाटतो "

(६) याच वेळेची टिळकांच्या साधेपणाची गोष्ट दत्तोपंत सांगतात ती अशी कीं, ते व टिळक याच वेळीं बरेच वर्षांनीं प्रथम भेटले व त्यांचेच घरीं उतरले तेव्हा प्रथम घरीं येताच कुशल प्रश्न वगैरे विचारावयाचे, पण स्वतःचा काहींच विचार न करिता सर्व तद्री देशाकडे लावलेल्या टिळकांना कुशल प्रश्न वगैरे काहीं सुचले नाहींत तर प्रथम त्यांनीं दत्तोपंताना सांगितलें कीं, " ब्युरॉक्रसीला योग्य समानार्थक शब्द नोकरशाही हा प्रथम आज मला सापडला व आकोटास भाषण करतांना तो अगदीं अकल्पित व स्वाभाविक रीतीनें माझे तोंडातून निघाला " प्राचीन सूत्रकारांना एक काना किंवा मात्रा कमी झाली कीं पुत्र जन्माच्या आनंदाप्रमाणें आनंद होत असे, अशी जी आख्यायिका आहे तिची आठवण या वेळीं झाली

(७) भाषा सुटसुटीत, स्वाभाविक व जोरदार कशी करावी याबद्दलचा टिळक व त्याचे स्नेही यांचा प्रयत्न फार जुना सार्वजनिक आयुष्याच्या आरंभीं व वर्तमानपत्रातून भाषा जोरदार यावी म्हणून चिपळूणकर, आगरकर, टिळक वगैरे मंडळी त्यांच्या बैठकीच्या अड्ड्यात नेहमीं वादविवाद करीत व हा शब्द चांगला, का तो चांगला याचा खल करीत त्यांची प्रथमची बैठक मोरोबा दादांच्या वाड्यात असे जुने, अकृत्रिम, स्वाभाविक, व साधे पण जोरदार शब्द ध्यानात यावेत म्हणून विष्णुशास्त्री चिपळूणकर हे तर गोंधळी लोकांचे गोंधळास न चोलावता जात व लक्षपूर्वक पोवाडे व लावण्या यांची भाषा ऐकत

## वासुदेव गोविंद आपटे

[ बी ए, वाङ्मयसेवक, संपादक ' आनंद, ' प्रोफेसर टिळक महाविद्यालय, पुणें. ]

(१) मी सन १८९४ सालीं प्रथम पुण्यास राहण्यास आलों, तेव्हां मी लोकमान्याचा एक श्रद्धाशील भक्त होतों. संमति बिलावरच्या वादविवादाच्या वेळीं व त्यानंतर पंडिता रमाबाईच्या शारदासदनाच्या खऱ्या स्वरूपाच्या आविष्करणाच्या संबंधांत केसरीनें जी कामगिरी बजाविली होती तिचा माझ्या मनावर फार परिणाम झाला होता, आणि यद्यपि केसरीची विचारसरणी व त्या पत्राचें धोरण हीं मला सर्वस्वीं मान्य नव्हतीं, तथापि लो. टिळकांची खऱ्या देशहिताविषयींची कळकळ, त्यांचा जळजळीत देशाभिमान, अलौकिक बुद्धिमत्ता आणि जोरदार लेखनपद्धति यांचा प्रभाव माझ्या मनावर अतिशय पडला होता. पुढें पुण्यास आल्यावर माझे परम स्नेही कै. हरि नारायण आपटे यांच्या निकट सहवासांत कित्येक महिने राहिल्यावर आणि सुधारक पक्षाच्या अध्वर्यूंशीं विचारविनिमय केल्यानंतर माझ्या मनांतल्या आदराला यत्किंचितूहि ओहोट लागली नव्हती. पण सार्वजनिक सभेंत जेव्हा तुंबळ रणसंग्राम सुरू झाला, आणि त्या संग्रामाचे वेळीं लोकमान्यांनीं आपल्या पक्षाच्या हातीं त्या सभेचीं सूत्रें यावीं म्हणून ज्या युक्त्यांचा अवलंब केला, त्याच्या प्रत्यक्ष दर्शनानें लोकमान्याविषयीं माझें मत बदललें आणि तत्काळ त्या सभेच्या बैठकीच्या वेळीं मी लोकमान्यांचा पक्ष सोडून गोखले पक्षाला जाऊन मिळालों. इतकेंच नाहीं, तर त्या सभेवरून 'केसरीशीं' 'ज्ञानप्रकाशांत' झालेला तडाजगी सामना करण्यांत मीं पुढाकार घेतला होता, ही गोष्ट त्या वेळच्या माहितगार माणसास अवगत आहेच. वादविवादाच्या भरांत शिव्याशापाचाहि मग उभय पक्षाकडून कित्येक वेळा झाला होता. तथापि लोकमान्यांच्या मनाच्या औदार्याची साक्ष म्हणून एक गोष्ट येथें सांगावीशी

## बळवंत गणेश खापर्डे

[ काव्यभूषण, ' उदय ' पत्राचे संपादक, अमरावती. ]

(१) राष्ट्रीय पक्षानें काँग्रेसमध्यें शिरून ती पुनः काबीज करण्याचा ठराव प्रख्यात बेळगांव परिषदेच्या वेळीं झाला, त्यावेळची म्हणजे १९१६ सालची ही गोष्ट आहे. बेळगांवला जाण्याकरितां लोकमान्य, लोकमान्यांचे चिरंजीव श्री. रामभाऊ; आमचे वडील ती. दादासाहेब व मी असे आम्ही चौघेच S. M. R. च्या एका फर्स्ट क्लासच्या किंवा सेकंड क्लासच्या डब्यांत बसलेले होतों. लोकमान्य प्रवासाला निघाले म्हणजे दर स्टेशनवर लोकांनीं फळफळावळ, फराळाचे इतर कांहीं पदार्थ, चहा अथवा दूध, सुपारी, हारतुरे व इतर अनेक नजराणे आणावयाचेच. लोकमान्यांनीं त्यांतील थोडें तरी दूध अगर चहा प्यावा, व आपल्या फराळाच्या पदार्थांपैकीं कांहीं तरी थोडें खावें म्हणून त्यांस आग्रह करावा, हा हिंदुस्थानांतील कोणत्याही भागांतील लोकांचा नित्याचा-क्रम असे. पण लोकमान्यांनीं असें खावयाचें किंवा प्यावयाचें तरी किती ? अशानें त्यांची प्रकृति तरी कशी बरी राहिली असती ? पण इतक्या प्रेमभावानें व आस्थेनें आणिलेले पदार्थ व लोकांनीं केलेला आग्रह, नाकारावयाचा तरी कसा ? ही लोकमान्यांना नेहमीं अडचण पडत असे व त्यांस फार त्रास होत असे. आम्ही पुण्याच गाडींत बसल्यावर लोकमान्यांना ह्या भावी प्रसंगाची आठवण झाली. डब्यांत समोर उभे असलेल्या मला व रामभाऊंना उद्देशून लोकमान्य म्हणाले, " आज लोकांनीं किती चहा किंवा दूध आणलें तरी हरकत नाहीं. मी ह्यावेळीं बरोबर एक पिशवी घेतली आहे. मी त्यांना सांगत जाईन कीं, ह्या पिशवींत तुम्हां खुशाल लागेल तितका तुमचा चहा किंवा तुमचें दूध टाका, म्हणजे मला तें पावलें. तेव्हां जवळच्या एका मित्रानें घाईघाईनें व जिज्ञासेनें लोकमान्यांना विचारलें, ' दादा कोठें आहे ती पिशवी ? ' लोकमान्यांनीं हंसत, " ही बघ ! " म्हणून उत्तर दिलें, व आपला उजवा हात पुढें करून रामभाऊंच्या पोटावर बोट ठेवलें !

रात्रीं गोष्टींच्या ओघात बराच वेळपर्यंत बोलत बसले होते लोकमान्य, ती दादासाहेब व मी असे आम्ही तिघेच तेथें होतों लोकमान्य मन मोकळें करून बोलत होते बोलता बोलता दत्तकावर व त्यागाच्या कठिणपणावर विषय आला. ह्यासंबंधीं आपल्या माहितीची अनेक उदाहरणें सांगून शेवटीं लोकमान्य म्हणाले, " रावसाहेब XXX एवढे समजूतदार असून, व एवढे सार्वजनिक काम करणारे असून, त्याना मुद्दा अखेरीला काहीं राहवलें नाहीं त्यानीं दत्तक घेतला ! इस्टेट काहीं सत्कार्याला देऊन टाकली नाहीं आम्ही त्याना म्हणत होतों, पण तें काहीं झालें नाहीं " किंचित् थांबून लोकमान्य पुढें म्हणाले, " जग हें असें ( इतकें स्वार्थी ) आहे, व ह्या जगाकरिता आपण आपलें सर्वस्व सोडून देऊन आत्म यज्ञ करावयाचा ! पण तो कर्तव्य म्हणून केला पाहिजे, व करावयाचा ! एवढेंच काय तें ! "

---

## श्रीपाद कृष्ण कोल्हटकर

[ बी ए एलएल बी वकाल वाङ्मयसेवक, विनोदी लेखक, प्रसिद्ध नाटककार, सांगलीच्या ज्योतिषसंमेलनाचे अध्यक्ष, जामगाव, वऱ्हाड ]

(१) 'केसरी' पत्र निघालें तेव्हा मी प्राथमिक शाळेंत शिकत होतों त्या पत्रानें आरंभींच अत्यंत लोकप्रियता संपादल्याचें व त्याजवर वाचकांच्या उड्या पडत असल्याचें मला अजून आठवतें यानतर आगरकरांचें ' डोंगरीच्या तुरुंगातील आमचे एकशें एक दिवस ' हें पुस्तक वाचण्यात येऊन त्याजबद्दल व टिळकाबद्दल मला अत्यंत आदरभाव वाटावयास लागला त्या प्रसंगीं ' टिळकामध्यें काहीं निराळेंच तेज आहे, ' असें एका प्रौढ गृहस्थाच्या तोंडून एकल्यामुळें मला त्याजबद्दल वाटणारा आदर आगरकराविषयीं आदरापेक्षा किंचित् अधिकच होता असें म्हटलें तरी चालेल

(२) यानतर सन १८९१ सालीं मी दक्षिण विद्यालयात शिकत असता लोकमान्यांच्या प्रथम दर्शनाचा योग आला ह्याच प्रसिद्ध इतिहाससशोधक रा' विश्वनाथ काशिनाथ राजवाडे हे त्या सुमारास एम् ए च्या परीक्षेचा अभ्यास करीत त्या विद्यालयाच्या वसतिगृहात काहीं महिने राहिले होते त्यानीं एके दिवशीं रात्रीं लोकमान्याना विद्यार्थ्यांपुढें स्वदेशीवर व्याख्यान देण्याकरिता

आणलें. पण त्यावेळीं कांहीं कारणामुळें तें व्याख्यान झालें नाहीं. त्यानतर मात्र लवकरच त्यांचें वेदकालावर मि. सेल्बी याच्या अध्यक्षतेखालीं व्याख्यान होण्याचा सुयोग आला. तें व्याख्यान १८९१ सालचे उन्हाळ्यात झालें असावें. व्याख्यान अर्थात्च उत्कृष्ट वठलें. त्याच विषयावर पुढें लोकमान्यांनीं 'Orion' नावाचें जें पुस्तक लिहिलें त्यांतील बहुतेक सर्व मुद्दे त्या व्याख्यानात आले होते. विषय माझ्या आवडीचा होताच; पण त्यापेक्षांहि लो. टिळकांबद्दल मला कुतूहल वाटत होतें. लहानपणापासून आपण ज्यांचें नाव ऐकत होतों ते टिळक हेच, ही भावना व्याख्यान चालू असता माझ्या मनात सारखी जागृत होती. पुढें त्याच सालचे नाताळांत राष्ट्रीय सभेच्या नागपूर येथील अधिवेशनाची गडबड चालू असता एका लहानशा मडपात एका धर्मपर व्याख्याचे प्रसगीं महादेव गोविंद रानड्याचें अध्यक्ष या नात्यानें झालेलें विस्मयकारक भाषण पहिल्यानेंच ऐकून किंवा त्यानतर बऱ्याच वर्षांनीं हिमालयाचें व ताजमहालचें प्रथम दर्शन घडून जें सानदाश्चर्य वाटलें, त्याशीं सदृश अशीच ही भावना होती. रानडे व टिळक यांची आपआपल्या विषयातील योग्यता हिमालय व ताजमहाल याच्या इतकीच होती यात शका नाहीं.

(३) लोकमान्याकडून माधवराव रानड्यास व आगरकरास अनेक प्रसगीं जो कडून विरोध झाला त्यामुळे माझें मन त्याजविषयीं काहींसें कलुषित झालें होतें. माधवरावाचा व त्याचा सामना प्रत्यक्ष पाहण्याचा योग मला नागपूर येथील सामाजिक परिषदेच्या प्रसगीं आला त्या सभेचें अध्यक्षस्थान श्री. गणेश श्रीकृष्ण खापर्डे याजकडे होतें त्याचें भाषण झाल्यावर लोकमान्यांनीं परिषदेवर लागोपाठ चारपाच आक्षेप घेतले, व त्याचें माधवराव रानड्यांनीं तेथल्या तेथें तावडतोब खडन केलें. लोकमान्यांनीं आक्षेप घ्यावा, त्याचें माधवरावांनीं खडन करावें, असा प्रकार सुमारें दहा मिनिटें चालला होता. त्यावेळीं माधवरावाची जी समयसूचकता व शात वृत्ति दिसून आली ती अवर्णनीय होती. पर्वतास मुळासकट उपटू पाहणारा खवळलेला समुद्र व त्याच्या पर्वतप्राय लाटांना दाद न देणारा पर्वत यामधील सामन्याचीच कल्पना त्या दोन थोर पुरुषाच्या झटापटीनें त्यावेळीं प्रत्येक श्रोत्यास सुचली असेल. अखेरीस माधवरावांनीं स्मितपूर्वक लोकमान्यास 'आणखी काहीं आक्षेप आहेत?' असा प्रश्न करून त्यावर लोकमान्यांनीं 'काहीं नाहीं' असें उत्तर दिलें; तेव्हा सर्व सभासदांनीं उभें राहून माधवरावाचा जयजयकारानें जो बहुमान केला त्याचें केव्हाहि विस्मरण पडणें शक्य नाहीं.

(४) यानतर १९०३ सालीं पुणें येथें माझे पुनर्विवाहित चुलते वामनराव कोल्हटकर याजकडे जो विवाहसमारंभ झाला, त्या प्रसगीं त्यांच्या निमंत्रणावरून

लोकमान्य विवाहाच्या दुसऱ्या दिवशीं पानसुपारीला आले होते. हें त्यांचें सौजन्य पाहून माझा त्यांजबद्दलचा आदर जागृत झाला.

(५) ह्या वेळपर्यंत लोकमान्यांशीं माझें प्रत्यक्ष भाषण होण्याचा योग आला नव्हता. तो योग येण्यास माझा 'भारतीय ज्योतिर्गणित' हा निबंध कारणीभूत झाला. तो लिहीत असतां मला एक गणितविषयक व एक ज्योतिषविषयक अशा दोन शंका आल्या होत्या, त्यांचें समाधान करून घेण्याकरितां मी आपले स्नेही श्री. न. चिं. केळकर यांच्यामार्फत लोकमान्यांकडे गेलों. आपण गणिताच्या शून्यलब्धि इत्यादि शाखांचा अभ्यास केला नसल्यामुळें पहिल्या शंकेचें समाधान आपणाकडून होण्यासारखें नाहीं असें त्यांनीं मला प्रांजलपणें सांगितलें. दुसऱ्या शंकेची निवृत्ति करण्यास गोलाध्यायाचें अध्ययन आवश्यक होतें. कै. वे. शा. स. खानापूरकर यांनीं त्या वेळीं गोलाध्यायाचें मराठी भाषांतर केलें असून त्याची हस्तलिखित प्रत मुंबई येथें लक्ष्मण गोपाळ ऊर्फ अप्पासाहेब देशमुख (डॉ. नानासाहेब देशमुखांचे बंधु) यांजजवळ आहे अशी माहिती टिळकांनीं मला दिली व खानापूरकर शास्त्रीबुवांस तारेनें बोलावून आणण्याची तत्परता दाखविली. 'मी मुंबईस देशमुखांची गांठ घेऊन ती हस्तलिखित प्रत पाहीन. आपण तसदी घेऊं नये.' असें मीं त्यांस सांगितलें तेव्हां त्यांनीं तो विचार रहित केला. या भेटींत लोकमान्यांची जी निरभिमानता दिसून आली तिचा माझ्या मनावर कायमचा ठसा उमटला.

(६) सन १९०८ सालीं लोकमान्यांचा व्याख्यानाचा दौरा निघाला होता त्यांत ते खामगांव मुक्कामीं आले. त्यांचें व्याख्यान एका मोठ्या पटांगणांत झालें. श्रोत्यांची संख्या चारपांच हजार तरी असावी. प्रास्ताविक भाषण करण्याचें काम मजकडे आलें होतें. 'देशाच्या प्रगतीस सामाजिक सुधारणेप्रमाणें राजकीय सुधारणेचीहि जरूर आहे. महाराष्ट्रांत दोन्ही सुधारणांच्या उगमस्थानीं कै. माधवराव रानडे होते. त्यांजकडून आगरकर यांस समाजसुधारणेच्या बाबतींत जशी प्रेरणा मिळाली, तशी लोकमान्यांस राजकीय सुधारणेच्या बाबतींत मिळाली.' अशा आशयाचें माझें भाषण झालें. लोकमान्यांनीं आपल्या भाषणास सुरवात 'देशास द्विविध सुधारणेची सारखीच जरूर आहे' या माझ्या विधानाच्या खंडनापासून केली. सांप्रत काळीं राजकीय सुधारणेची किती आवश्यकता आहे याचें प्रतिपादन करतांना त्यांनीं राज्यकर्त्यांचे दोष इतक्या सडेतोड रीतीनें सभेपुढें मांडिले कीं, त्यांच्या धैर्याचें कौतुकच वाटलें. 'राजा जर प्रजाद्रोह करीत असेल तर त्यास राजद्रोहाबद्दल कुरकुर करण्याचा कांहीं अधिकार नाहीं,' या मासल्याची जहाल वाक्यें त्यांच्या भाषणांत किती तरी होतीं. वऱ्हाडांतील अकोला वगैरे इतर ठिकाणींहि त्यांचीं अशींच जळजळीत भाषणें झालीं. त्या सालीं त्यांजवर जो राजद्रोहाचा खटला झाला त्याला निमित्त जरी दुसरें दाखविण्यांत आलें

असलें तरी हा व्याख्यानांचा दौराच त्यांस मुख्यत्वेंकरून भोंवला असावा असा तर्क आहे.

(७) सहा वर्षांची शिक्षेची मुदत पुरी झाल्यावर इंग्लंडच्या प्रवासाची पूर्वतयारी करण्याकरितां त्यांनीं पुनः १९१८ सालीं वऱ्हाडांत दौरा काढला. त्या दौऱ्यांत ते फेब्रुवारी महिन्यांत खामगांव मुक्कामीं आले असतां मी त्यांस भेटावयास गेलों. त्यापूर्वी नुकताच माझा उपर्युक्त निबंध प्रसिद्ध झाला असून मीं त्याची प्रत त्यांजकडे आदरपूर्वक पाठविली होती. पण त्यांजकडून तिची पोंच न आल्यामुळें ' ती आपणांस पोंचलीना ? ' असा मीं त्यांस प्रश्न केला. त्यांनीं होकारार्थी उत्तर देऊन "तुम्हांस आपला धंदा सभाळून हीं इतर कामें उरकतात कशीं ?" असें मला विचारलें. मी त्यांस म्हटलें, ' हा प्रश्न दुसऱ्या कोणी केला असता तर तें शोभलें असतें, पण तो आपणच केल्यामुळें स्वतःच्या निष्क्रियतेची जाणीव मात्र तीव्रतेनें मला वाटावयास लागते. ' यानंतर त्यांच्या अत्यंत विद्वत्ताप्रचुर सुंदर गीतारहस्य या ग्रंथांत मला जे विचार अभिनव वाटले त्यांचा मीं निर्देश केला. लोकमान्य गुद्धप्रिय असताहि त्यांनीं तें पुस्तक लिहितांना जी निर्विकारवृत्ति ठेविलेली दिसते, ती निःसंशय आश्चर्यकारक आहे व ती गोष्टहि मीं त्यांजपाशीं बोलून दाखविली. त्यावें या खेपेचेंहि व्याख्यान जळजळीत व परिणामकारक झालें.

(८) लोकमान्यांच्या या सर्व प्रसंगापेक्षा अधिक दीर्घ व निकटचा सहवास मला सन १९२० साली सांगलीच्या ज्योतिषसंमेलनानें घडवून आणला. वास्तविक पाहता ज्योतिषसंमेलन हें सांगलीकरांनीं लोकमान्यांच्या आगमनाकरितां एक निमित्त शोधून काढलें होतें. ते आले नसते तर संमेलन कोणत्या कोंपऱ्यांत भरलें आहे, याची त्याना वर्दी तरी लागली असती कीं नाहीं याचा संशयच आहे. ते आल्यामुळें संमेलनास राष्ट्रीय सभेच्या बैठकीचें महत्त्व येऊन त्याचा विस्तृत मंडप प्रेक्षकांनीं गजबजून सोडिला. मिरवणुकीचे प्रसंगीं लोकमान्यांचें दर्शन घेण्यासाठीं व त्यांच्या पायास स्पर्श करण्यासाठीं ग्रामस्थांत विलक्षण

सबंध मिरवणुकीभर तीं दोन प्रहसनें माझ्या डोक्यांत घोळत होतीं. माझी अडचणीची स्थिति मी मधून मधून लोकमान्यांच्या नजरेस आणीत होतों व तेहि त्या स्थितीपासून उद्भवणाऱ्या हास्यरसाचा आस्वाद घेत होते. स्वत चें दर्शन प्रेक्षकांना स्पष्टपणें घडावें म्हणून लोकमान्यांना त्यांच्या विनंतीवरून अनेकदा रथांत उभें रहावें लागलें. त्या वेळीं लोकमान्यांची प्रकृति मधुमेहाच्या विकारामुळें अत्यंत क्षीण झालेली असल्यामुळें उभें राहतांना त्यांचे पाय लटलट कांपत, पण लोकाग्रहापुढें त्याचा उपाय चालण्यासारखा नव्हता आमच्या गळ्यांत हार पडण्याचा वेग इतका शीघ्र होता कीं, प्रत्येक दहा पंधरा मिनिटांच्या अंतरानें आम्हास आपल्या गळ्यांतील हारांचा भार जवळ बसलेल्या अतूकाकांवर टाकावा लागे. अजपर्यंत पुष्पमालेच्या ओझ्यानें मृत झाली ही गोष्ट आजपर्यंत कविकल्पना वाटत होती पण आजच्या अनुभवावरून ती खरी असावीशी वाटत आहे असें मीं लोकमान्यास म्हटलें मिरवणूक हलवायाच्या मोहोल्यांतून जात असतां आम्हांवर साखरफुटाण्यांची वृष्टि झाली, पण ती आम्हास फारशी मधुर वाटली नाहीं. साखरफुटाणा झाला तरी तोंडांत शिरला तरच गोड वाटायचा, नाहीं तर तोंड फोडून टाकायचा. त्या वृष्टीचा आम्हास शिरें नमवूनच स्वीकार करावा लागला. मध्यंतरीं मिरच्यांचा बाजार लागला. त्यांतून मिरवणूक जातांना मिरच्या उधळून व त्यांचे कण नाकातोंडांत जाऊन तिच्यांत सामील झालेल्या सर्वांचे जीव घाबरे झाले फुलांच्या सुवासास सोकावलेल्या नाकास व साखरफुटाण्यास चटावलेल्या घशास त कण झोंबू लागल्यामुळें ती आपला असंतोष शिंकाच्या व ठसक्याच्या रूपानें व्यक्त करू लागली. जे लोक मिरवणुकीबरोबर चालत होते त्यास पाय लवकर लवकर उचलून त्या यातनांतून आपली सोडवणूक करून घेणं कठिण नव्हतें. पण मोटारींतून मिरवणारास मंद गतीनें जाणें भाग असल्यामुळें त्यांची अवस्था खरोखरीच अनुकंपनीय झाली. लोकमान्य १९०८ सालीं खामगांवास आले असतां त्यांची जी मिरवणूक निघाली होती तिच्यांत मीं पादचारी या नात्यानें भाग घेतला होता पण त्यांच्याबरोबर मिरवण्याचा हा माझा पहिलाच प्रसंग होता मिरविणें व मिरवणें यांजमध्यें, स्वातंत्र्य व पारतंत्र्य यांच्या मध्याइतकेंच, अंतर असतें असा मला या खेपेस अनुभव आला.

सध्याकाळीं संमेलनाच्या सर्व पाहुण्यांनीं श्री. जोगांच्या बंगल्यावर भेटण्याचें ठरलें होतें. त्याप्रमाणें तेथें इतरांबरोबर लोकमान्य व श्री. न्य. बा. केतकर हेहि आले. त्यांजमध्यें पुणें येथील संमेलनाचे प्रसंगीं ज्या अटीवर अयनांशाच्या प्रश्नावर सल्ला घेण्यांत आल्या होत्या तिच्या संबधानें जरा झटापट झाली. श्री. केतकर बरेच क्षुब्ध झाल्यासारखे दिसले, पण लोकमान्य त्यास शांतपणें उत्तर देत होते. दुसऱ्या दिवशीं दुपारीं तीन वाजतां संमेलनास प्रारंभ झाला.

समेल्नास स्वागतमळाच्या विनतीवरून श्रीमच्छंकराचार्य ( डॉ. कुर्तकोटी ) आले होते. अध्यक्षस्थानाच्या डाव्या बाजूस श्रींकरिता एक भारी किंमतीची खुर्ची मुद्दाम राखून ठेविली होती, तिच्यावर ते विराजमान झाले

अध्यक्षाची निवड होण्यापूर्वी लोकमान्य व मी त्या खुर्चीच्या डाव्या बाजूस असलेल्या एका कोचावर बसलों होतों. तेथून अध्यक्षाच्या खुर्चीपर्यंत कोणत्या मार्गानें जावयाचें हा प्रश्न मला पडला श्रींच्या खुर्चीच्या मागून जावें तर ग्राम्य दिसेल, त्याच्या समोरील टेबलापुढून जावें तर त्याचा उपमर्द होईल व त्या टेबला मागून जावें तर त्यास वेढून जावें लागेल, अशा अडचणींत मी पडलों त्या अडचणींतून सोडवणूक करून घेण्याचा एक मार्ग मीं मनात योजून ठेविला, पण त्या बाबतींत लोकमान्याचा सल्ला काय पडतो हें पाहण्याकरिता मीं त्यास आपली अडचण कळविली तिच्या निवारणार्थ त्यानीं जो मार्ग सुचविला तो मीं योजिलेल्या मार्गाशीं तंतोतंत जुळला. अध्यक्षस्थानाकरिता माझी निवड होताच मी श्रींच्या पायास वंदन करून त्याचा आशीर्वाद मागितला व त्यानीं तो दिल्यावर मी त्याच्या व टेबलाच्या मधूनच आपली खुर्ची गाठली

समेलन ता. १५, १६ व १७ फेब्रुवारी असें तीन दिवस चाललें होतें पण लोकमान्याच्या सांगली येथील कार्यक्रमात पानसुपारीचे व मानपत्राचे समारंभ वगैरेंची इतकी गर्दी होती कीं, त्यास समेलनास तीनचार वेळाच कायतें येता आलें ता १६ रोजीं पंचागशोधनाच्या बाबतींत धर्मशास्त्रास किती महत्त्व द्यावयाचें या प्रश्नाची चर्चा चालली असता लोकमान्य म्हणाले, "ज्योतिर्गणित हें शास्त्र अनुभवसिद्ध आहे ग्रहाच्या गतिस्थितीबद्दल जे नियम हजारों वर्षांच्या सूक्ष्म अवलोकनानें ठरविले आहेत त्याशीं धर्मशास्त्राचे नियम जर विसंगत असतील तर उत्तरोक्त नियमाच्या अनुरोधानें पूर्वोक्त नियम बदलण्यापेक्षा पूर्वोक्त नियमाच्या धोरणानें उत्तरोक्त नियम बदलणेंच श्रेयस्कर आहे. धर्मशास्त्राचे नियम तत्कालीन ज्योतिषशास्त्राच्या साह्यानें तयार करण्यात आलें त्या ज्योतिषशास्त्रावरून निघणारीं अनुमानें सांप्रतच्या पूर्णावस्थेस पोंचलेल्या ज्योतिषशास्त्राच्या दृष्टीनें चुकीचीं ठरतील तर त्या अनुमानात व धर्मशास्त्राच्या नियमात जरूर तो फरक करण्याला आपली तयारी पाहिजे." यावर वे शा स घोंडशास्त्री म्हणाले, "मग यापेक्षा आम्हाच किरिस्ताव होण्यालाच का सांगत नाहीं ?"

समेलनाच्या एका दिवशीं रात्रीं समेलनाच्या मंडपाच्या जवळील एका विस्तीर्ण पटांगणात लोकमान्याचें श्रींच्या अध्यक्षत्वाखालीं गीतेवर व्याख्यान झालें. श्रींची अध्यक्षस्थानीं योजना करण्याचा ठराव पुढें आला तेंव्हा लोकमान्यानीं " शंकराचार्य ज्या सभेंत हजर असतात, त्या सभेचे ते अध्यक्ष असतातच त्याची अध्यक्षस्थानीं नेमणूक करणें जरूर नसून उलट अप्रशस्त असतें." असें सांगितलें. नंतर त्याचें व्याख्यान झालें. दात पडल्यामुळें त्यावेळीं

सभाषणात त्याचें बोलणें काहींसें अस्पष्ट होत असे, पण जाहीर व्याख्यानात तें स्पष्ट व खणखणीत होई, तसें या प्रसंगीहि झालें. त्याच्या भाषणानंतर श्रींचें भाषण झालें तें चालू असताच जो एक विलक्षण प्रकार घडला त्यामुळें लोकमान्यांचें स्वभाववैशिष्ट्य विशेष उठावानें दिसून आलें. तो प्रकार असा श्रोत्याच्या रांगापैकीं मागील काहीं रांगा एकदम उठल्या व काहीं गडबड न करता ओघ्याकडे धूम पळत सुटल्या. त्याच्या पावलामुळें जी धूळ उडाली ती धुरासारखी दिसू लागली. लागलीच मंडपास आग लागली अशी ओरड सुरू झाली. पण ती पुढें निराधार ठरली. श्रोत्यांचें पळणें चालू होतेंच. त्यांचें पाहून पुढील रांगातील श्रोतेहि ओढ्याकडे पळत सुटले मी ओघ्यावर बसलों होतों. श्रो याच्या विलक्षण कृत्याचा उमज आम्हापैकीं एकासहि पडेना हे हजारों लोक ओढ्यावर डोकीं आपटून कपाळमोक्ष करून घेणार कीं काय? बरें, असा कपाळमोक्ष करून घेण्याचें कारण तरी काय! याजवर कोणी हिंस पशू तर सोडले नाहींत! मागाहून कोणी गोळीबार केला म्हणावें, तर चोहोंकडे सामसूम आहे. अशा विचाराचें काहूर प्रत्येकाच्या चित्तात उठलें. पटांगणातील श्रोते पळत पळत ओढ्याजवळ आले तेव्हा ओघ्यावरील मंडळीहि उठली व चोहोंकडे एकच गोंधळ सुरू झाला. श्री. छापखाने यानीं स्थिरस्थावर करण्याचा बराच प्रयत्न केला, पण त्यास बराच वेळ पावेतों यश आलें नाहीं. श्रोत्यांपैकीं बरेचजण घरोघर निघून गेले. बाकीच्या श्रोत्याना श्री. छापखान्यांनीं 'तुमचा धि कार असो, आपले सन्मान्य पाहुणे येथें बसले असता तुम्ही पळून जाणें लाजिरवाणें आहे. आपल्या गावची अब्रू बचावावयाची असेल तर येथेंच बसून रहा.' असें आरडून परापरीनें सांगितलें. अखेरीस अर्ध्या घाऊण तासानें सभेंत पुन्हा शांतता झाली. या प्रकाराच्या मुळाशीं गावातील विरुद्धपक्षीय मंडळी असली पाहिजे, असा श्री छापखान्यास संशय आला होता. पण आगीच्या हुलीप्रमाणें तोहि निराधार ठरला चौकशीअतीं असें बाहेर आलें कीं, एका मुसल्मान श्रोत्यास आपल्या कपड्यात साप असल्याचा भास झाल्यावरून त्यानें 'साप! साप!' अशी ओरड केली व तिचें पर्यवसान श्रोत्याच्या पळापळींत झालें.

श्रींप्रमाणें लोकमान्यहि आपल्या स्थानावर बसून राहिले होते त्यांनीं घडलेल्या प्रकारानंतर जें भाषण केलं तें अत्यंत समयोचित व हृदयस्पर्शी झालें. ते म्हणाले, "आजच्या माझ्या व्याख्यानाचा विषय कर्मयोग हा होता. परिणामाकडे लक्ष न देता स्वत चें कर्तव्य केलें पाहिजे हें माझ्या उपदेशाचें सार होतें. पण त्याचा श्रोत्यावर मुळींच परिणाम झालेला दिसत नाहीं. तुम्ही सख्येनें इतके लोक असता य कश्चित् सर्पाची हूल उठताच जीव बचावण्याकरिता वाट मिळेल तिकडे पळत सुटलांत. तुम्हासारखे सामान्य लोक मोहामुळें रज्जूलाच सर्प मानितात. तो मोह घालविण्याकरिताच वेदान्ताचा अवतार आहे, वेदान्ताचें तत्त्व ज्याच्या

मनावर बिंबलें आहे त्याच्या ठायीं इतका आत्मविश्वास उत्पन्न होतो कीं, तो रागीनाच रज्जूप्रमाणें पिरगळून टाकितो. तसा आत्मविश्वास व पराक्रम तुम्हां-मध्यें उत्पन्न झाला पाहिजे.'

इतकें सांगून लोकमान्य इंग्लंड देशांतील अनुकरणीय शिस्तीकडे वळले. त्या देशांत राजमार्गानें जाणारे लोक कवायतीतल्याप्रमाणें शिस्तीनें एकामागून एक चालतात. तिकीट ऑफिसजवळ असलेले लोक एकामागें एक उभे राहून आपली पाळी येण्याची वाट पहात असतात. कोणत्याहि ठिकाणीं पाहिलें तरी गडबड, गोंधळ, गैरशिस्तपणा यांचा गधहि दिसत नाहीं. त्याच्या उलट प्रकार आपल्याकडे दिसून येतो. आजचा प्रकार हा बेशिस्तपणाचा एक मासलाच होता. आपण या बाबतींत इंग्रजांचें अवश्य अनुकरण केलें पाहिजे, असें त्यांच्या उपदेशाचें तात्पर्य होतें. त्यांच्या या प्रसंगींच्या व्याख्यानास याप्रमाणें एका आकस्मिक प्रकारामुळें वस्तुपाठाचें स्वरूप आलें.

शेवटच्या दिवशीं म्हणजे ता. १७ रोजीं लोकमान्य मंडपांत ११ वाजण्याचे सुमारास आले. त्यापूर्वी नुकतेंच सभासदांचें बहुमत विश्वापक्षास अनुकूल दिसून आलें होतें. ती गोष्ट मीं आनदानें लोकमान्यांस कळविली. त्यांना तें ऐकून विशेष समाधान झाल्याचें दिसलें नाहीं. तथापि ते सभेस उद्देशून म्हणाले, "आपणास पराच दूरचा मुक्काम गांठावयाचा आहे. आम्ही पुण्याच्या संमेलनांत २३ अय-नांश ठरविले तुम्ही त्याहून अर्धा अंश पीछेहाट केली, हें अंतिम साध्याच्या दृष्टीनें अभिनंदनीय आहे. अखेरची मजल गांठण्याला अशीं पांच दहा संमेलनें भरलीं पाहिजेत."

विजय झाल्याचें दिसून आलें. सभेनें अयनांशाचा महत्त्वाचा प्रश्न निकालात काढला हीच गोष्ट मला आनंद मानावयास पुरेशी होती. पण जेथें अर्ध्या अंशाची लहानशी पीछेहाट करण्याचे मार्गांत दुर्लंघ्य अडचणी उपस्थित झाल्या होत्या, तेथें ४॥ अंशाची पीछेहाट करण्याइतकें प्रगतिपरत्व दिसून यावें ही खरोखर अभिमान वाटण्यासारखी गोष्ट होती. लष्करी डावपेंचांत ज्याप्रमाणें पुष्कळदां यशस्वी पीछेहाटीवरच मोहिमेचें यश अवलंबून असतें, तसें पंचांगसुधारणेच्या बाबतींत अयनांशाच्या पीछेहाटीच्या प्रमाणावरूनच त्या सुधारणेची प्रगति ठरविण्यांत येत असते. सांगलीच्या संमेलनानें घडवून आणिलेली प्रगति क्रांतिकारक स्वरूपाची होती हें कोणीहि तज्ज्ञ कबूल करील.

सभेचा निर्णय जाहीर होतो न होतो सोंच लोकमान्यांची स्वारी मंडपात येऊन दाखल झाली व त्यांस मीं तो निर्णय कळविला. तो ऐकून त्यांना साहजिकच आश्चर्य वाटलें. पण त्यांना लवकरच पुण्यास जाण्याकरितां निघावयाचें असल्यानें त्यास त्यांनें खुलासेवार विचारण्यास किंवा ऐकण्यास वेळ नव्हता. संमेलनाचा समारोपहि मला थोडक्यातच आटपावा लागला. पहिल्या दोन संमेलनांचें अध्यक्षत्व अनुक्रमें धार्मिक व राजकीय क्षेत्रांतील धुरीणांकडे होतें, संमेलनाच्या अध्यक्षाची सामाजिक सुधारक म्हणून कीर्ति नसली तरी त्यानें आजपर्यंत सामाजिक सुधारणेची त्याच्या सामर्थ्याप्रमाणें मनोभावें सेवा केली आहे, याप्रमाणें पंचांगशोधनास देशांतील सर्व वर्गांची सहानुभूति आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. या संमेलनास जें अपूर्व यश आलें त्याचें सर्व श्रेय श्रींच्या आशीर्वादास व लोकमान्यांच्या लोकप्रियतेस आहे असें सांगून मला सांगलीच्या मुक्कामात त्या लोकप्रियतेचा जो अनुभव आला त्याचें मीं कांहींसें विस्तारानें वर्णन केलें. लोकमान्यांनीं स्वतः ज्या चरणास स्पर्श करण्याचा हक्क देण्यापूर्वीं या संमेलनानें मान्य केलेल्या अयनांशाच्या स्वीकाराची अट ठेविली तर त्या अयनांशाचा महाराष्ट्रांत प्रसार होण्यास उशीर लागणार नाहीं हें कांहींसें अत्युक्तिरूप वाटणारें पण बरेंच वस्तुस्थितिनिर्देशक वाक्य त्या वर्णनाच्या भरात मीं काढल्याचें मला आठवतें. समारोपानंतर श्रींचे व लोकमान्यांचे रीतसर आभार मानण्यात आले, पण अध्यक्षाचे आभार मानण्याचें राहून गेलें. हें पाहून लोकमान्य स्वतः उठले व त्यांनीं शिष्टाचारांत झालेली ती चूक सभेच्या नजरेस आणिली. अशा प्रसंगीं अध्यक्षाचे आभार मानण्याचा स्वतंत्र ठराव आणण्याचा शिरस्ता आहे असें सांगून त्यांनीं तो ठराव स्वतः च सभेपुढें मांडला व आगगाडींतील प्रवासांत माझ्या विनंती वरून मला सहाय्य करण्याचें त्यांनीं जें अभिवचन दिलें होतें तें याप्रमाणें अव्वल-पासून अखेरपर्यंत शब्दशः पाळून त्यांनीं माझ्या शिरावर कधींहि न फिटण्या सारखें उपकाराचें ओझें ठेवून दिलें. ज्यास एकदां आपला म्हणविलें त्यास पाठीशीं घालण्याचें लोकमान्यांचें व्रत या संमेलनांत माझ्या चांगलेंच प्रत्ययास आलें.

(९) त्यानंतर त्याच सालचे जून महिन्याचे आरंभीं मी पुणें मुक्कामीं असतां श्री. आगाशे, प्रो. नाईक, श्री. रा. वि. पटवर्धन, पंडित रघुनाथशास्त्री यांसह लोकमान्यांस भेटण्याकरितां त्यांच्या घरीं गेलों. त्या वेळींहि लोकमान्य माझ्याशीं अत्यंत मोकळेपणानें वागले. त्या वेळीं त्यांचें मन एका क्षोभजनक प्रकारानें बरेंच अस्वस्थ झालें होतें. त्याची हकीकत त्यांनीं मला सांगितली. नंतर करण ग्रंथाचा विषय निघाला. मुंबई येथील संमेलनापासून नवीन करणग्रंथ तयार करविण्यासंबधानें प्रत्येक संमेलनांत ठराव पास होत गेला होता. परंतु तसा ग्रंथ रचण्यास श्री. व्यं. बा. केतकर यांच्या इतका समर्थ एकहि महाराष्ट्रीय ज्योतिषी पुढें आलेला नसल्यामुळें व त्यांची २२ व १८॥ अयनांशास सारखीच प्रतिकूलता असल्यामुळें तो ठराव अजून अमलांत आलेला नव्हता. केतकरांनीं आपल्या ज्योतिर्गणित या विद्वन्मान्य ग्रंथांत चैत्र व रैवत या दोन्ही पक्षांस उपयोगी पडण्यासारखीं ग्रहसाधनाचीं कोष्टकें पृथक् पृथक् दिलीं होतीं. त्या ग्रंथाच्या रचनाकालीं त्यांचा रैवत पक्षाबद्दल विशेष पक्षपात होता. पण पुढें तो पक्ष सर्वमान्य होण्यासंबधानें त्यांची जसजशी निराशा होत गेली व चैत्र पक्षाचा प्रचार करण्यासंबधानें त्यांस जसजसें यश येत गेलें तसतसा तो पक्षपात कमी कमी होत जाऊन त्यांचें चित्रापक्षावरील प्रेम वाढत गेलें. त्यांना अशक्य वाटणारी गोष्ट सांगली संमेलनानें घडवून आणिली होती. परंतु त्यांचें रैवत पक्षावरील प्रेम मावळून चैत्र पक्षावरील प्रेम दृढमूळ झालें असल्यामुळें त्यांची नवीन करणग्रंथाच्या रचनेस अनुकूलता मिळण्यासारखी नव्हती, ही गोष्ट मला सांगली पर्यंच माहीत झाली होती. त्यांची प्रतिकूलता लोकमान्यांस या वेळीं तीव्रपणें जाणवत होती. ते मला म्हणाले, “केतकरच आम्हांस आपल्या ज्योतिर्गणिताच्या आधारें नवीन करणग्रंथ तयार करून देतील तर त्याकरितां ठेवण्यांत येणारें बक्षीस आम्ही त्यांसच देऊं.” केतकर आपला आग्रह सोडण्यास तयार नाहींत हें मीं लोकमान्यांस सांगितलें. परंतु केतकरांच्या प्रतिकूलतेमुळें उपस्थित झालेली अडचण दूर करण्याचा एक उपायहि मला माहीत होता व तोहि त्याबरोबर

ग्रंथ न आल्यास तो दसरीं याजकडून लिहून घ्यावा, अशी मीं सूचना केली ती लोकमान्यास पसंत पडली.

केसरीच्या पुढील अंकांतच जाहिरात प्रसिद्ध झाली. विख्यात ग्रंथ पाठविण्याकरिता एक महिन्याची मुदत दिली असून हजार रुपयांचें बक्षीस जाहीर केलें होतें. तें बक्षीस खुद्द लोकमान्य आपल्या पदरचें देणार होते. मुदतींत ग्रंथ येण्याची आशा नष्ट होतांच लोकमान्यांनीं श्री. दसरे यांजकडे करणग्रंथाचें काम सोंपविलें व त्यांना मदत करण्याकरितां वे. शा. स. मोघे व वाघोलीकर यांना नागपुरास रवाना केलें, पण करणग्रंथ पुरा होण्यापूर्वीच लोकमान्यांचें निधन होऊन रैवत पक्षाची कधींहि भरून न निघणारी हानि झाली. त्यांच्या इच्छेप्रमाणें करणग्रंथ तयार झाला, पण द्रव्याभावीं त्याचें अद्यून प्रकाशन झालें नाहीं. रैवत पक्षास लोकमान्यांच्या नावाचा पाठिंबा असल्यामुळें त्याची लोकप्रियता उत्तरोत्तर वाढत्या प्रमाणावर आहे. पण ते आज असते तर त्यांनीं यापूर्वीच आपल्या दीर्घोद्योगानें व चिकाटीनें त्यास बहुजनसमाजाची अनुकूलता मिळविली असती यांत संशय वाटत नाहीं. तो प्रश्न त्यांच्या सहाय्यास मुकला हें त्याचें दुर्दैव होय.

आठवणी देतांना थोडेंबहुत आत्मचरित्रकथनहि अपरिहार्य असतें. माझ्या आठवणींतहि आत्मचरित्राचा भाग बराच आलेला आहे. तो अनिच्छापूर्वक आलेला आहे हें सांगितलें, म्हणून त्याबद्दल क्षमायाचना करण्याचें कारण नाहीं.

---

## नरसिंह चिंतामण केळकर

[बी. ए. एल्‌एल. बी. संपादक केसरी, ट्रस्टी केसरी-मराठा संस्था, अध्यक्ष पुणें शहर म्युनिसिपालिटी, उपाध्यक्ष सार्वजनिक सभा व टिळक-स्वराज्यसंघ, टिळक-स्वराज्य-स्मारक ट्रस्टचे एक ट्रस्टी व चिटणीस, १९१९ मधील विलायततील काँग्रेस डेप्युटेशनचे एक सभासद, स्वराज्यपक्षाचे पुढारी, खासदार, पुणें]

(१) सन १८८६ पूर्वी टिळकांना मी फक्त एकदाच पाहिलें होतें. त्यांच्याशीं प्रत्यक्ष भाषणाचा प्रसंग मला १८९६ च्या फेब्रुआरी महिन्यांत प्रथम आला. या वेळीं ते सातार्‍यास कांहीं कामानिमित्त श्री. तात्यासाहेब मुतालीक याजकडे आले होते तेव्हां सातार्‍याचे कै. आबासाहेब कान्हेरे यांनीं त्यांना कण्हेरखेडें येथें (सातार्‍याहून ७ मैलांवर) आपल्या बागेंत मेजवानी दिली. सुमारें अर्धा अधिक

दिवस तेथे घालविण्याचा होता जेवण झाल्यावर करमणुकीकरिता दोन गोष्टींची योजना केली होती एक गायन व दुसरें संभाषण. गाण्याकरिता स्वदेशहितचिंतक नाटक मंडळींतील रा स्थळीत यास नेलें होतें व संभाषणाकरिता अल्पवयी सम वयस्क मंडळींनीं आपल्यातला प्रमुख म्हणून मला नेलें होतें मी त्यावेळीं वकीली करण्यास नुकताच प्रारंभ केला होता अर्थात् कोर्ट सोडून बाहेर एक दिवस घालविणें मला मुळींच अडचणीचें नव्हतें, व बरोबरीच्या मंडळांत मी अल्पवयी एलएल्. बी. परीक्षा पास झालेला असल्यामुळें मला सहजच ते थोडेसे मानीत. असो, जेवणखाण झाल्यावर प्रथम गवईबुवांनीं तंबोरा सोडला, पण टिळकांना गाण्याचा कंटाळा आहे, हें लवकरच निदर्शनास आलें व गाण्याची करमणूकीचा त्याजवर आमचा जुलूम होऊं नये म्हणून तावडतोब थांबविण्यात आली नंतर गप्पागोष्टी सुरू झाल्या त्यात मात्र ते आनंदानें व मोकळ्या मनानें भाग घेत, होते अनेक विषयावर सुमारें दोन-तीन तास संभाषण सुरू होतं तरुण सुशिक्षिताची गाठ पडल्यावर त्यांना त्याची शिकवण काय असे, याचा मला तेव्हाच प्रथम अनुभव आला पुण्याच्या कॉंग्रेससंबंधीं झालेल्या बखेड्यासंबंधीं वर्तमान-पत्रातील हकीगती वाचून सर्वसाधारणपणें या टिळकांशीं माझी सहानुभूति तर होतीच, पण कांहीं बाबतींत त्यांचें करणें बरोबर नव्हतें असे माझें मत होतें, व याविषयीं मीं त्यांना विचारलें असतां त्यांनीं मनमोकळेपणानें चर्चा करून आपली. कारणें सांगितलीं असें मला पक्कें स्मरतें असो, सायंकाळच्या सुमारास आम्ही घरोघर परत आलो या वेळीं आपल्यास कोणी असिस्टंट पाहिजे, वगैरे कांहीं गोष्टी त्यांच्या बोलण्यांत आल्या नव्हत्या, पण पुढें पधरा दिवसानीं सातारच वकील कै गोविंद रावजी रानडे यांचा व टिळकांची आकस्मिक रीतीनें आग गाडींत गाठ पडली त्यांच्या भाषणात, लॉ-क्लास शिकवून 'मराठा' वर्तमानपत्रात लिहील असा कोणी मनुष्य टिळकांना हवा, असे आलें रानडे यांनीं दुसरें दिवशीं तें मला सांगितलें, तुम्ही जाता का म्हणून विचारलें व मीहि होय म्हटलें कर्म धर्मसंयोगानें हेंच बोलणें फळास येऊन पुढें सुमारें दिवसाच आंत मीं पुण्यास टिळकांना भेटून त्यांना येऊन मिळण्याचें कबूल केलें, व मार्चच्या अखेरच्या आठवड्यांत पुण्यास येऊन दोन्ही कामें करण्यास सुरुवात केली तेव्हां मी जो पुण्यास आलो, तो अजून पुण्यासच आहे

(२) १८९८ सालीं टिळक व पुण्याचे आम्ही काहीं प्रतिनिधी मद्रास येथील राष्ट्रीय सभेस चाललों होतों निजाम सरकारची हद्द संपून मद्रास इलाख्याची हद्द ज्या स्टेशनावर सुरू होते तेथे टिळकांना पाहण्याकरिता कांहीं लोक आले होते त्यात दोन तीन तरुण मद्रासी पदवीधर होते त्यांनी टिळकांना अत्यंत लवून नमस्कार केला व त्यांच्या स्तुतीदाखल इतर अनेक गोष्टी बोलून झाल्यावर ते म्हणाले, 'आम्ही युनिव्हर्सिटीचे ग्रॅज्युएट आहों.' ते इतर गोष्टी बोलत

असता टिळक हू हू म्हणत होते व या मद्रासी तरुणांनीं आपण ग्रॅज्युएट आहों असे सांगितलें तरीहि त्यांनीं आपली उपेक्षेची वृत्ति कोणत्याहि प्रकारें बदलली नाहीं पण त्या मुलांपैकी एकजण फारच कविल्वण्या आदरबुद्धीने पुन पुन हात जोडून म्हणाला " Respected Sir, as your feet are now going to touch the land of my province the plague which has broken out there will, I am sure, now disappear by the grace of your feet ! " हे शब्द कानीं पडताच मान टिळकांनीं किंचित् कपाळाला आठी चढवून वर तुच्छतादर्शक चेहरा करून त्याजकडे पाहिलें, व औपचारिकरीत्या वरील स्तुतीच्या अहराला नाइलाजाने एकाद्या शब्दाची उलट देणगी ते देणार इतक्यात गाडी चालू झाली तों मद्रासी मुलें दृष्टीआड होताच टिळक मला व इतर आमच्या मंडळींना उद्देशून म्हणाले, " हाच तो फरक ! " परंतु उमज न पडल्यामुळें मी म्हणालो, ' म्हणजे काय ? ' तेव्हा टिळक म्हणाले " फरक म्हणजे महाराष्ट्रीय तरुण मुलें व मद्रासी तरुण मुलें यातील फरक तो असा कीं, एक तर महाराष्ट्रीय मुलगा दुसऱ्या कोणाला मी ग्रॅज्युएट आहे असें विनाकारण आपण होऊन सांगणार नाहीं. दुसरें असें कीं, महाराष्ट्रीय तरुण मुलाच्या मनात माझ्यासारख्याविषयीं आदरबुद्धि असली तरी तो असें ताड वगैरेंगाहून हात जोडजोडून आदरबुद्धीचें प्रदर्शन करणार नाहीं व सर्वात मुख्य गोष्ट ही कीं, त्याची कितीही मोठी झाली तरी ' तुमचे पाय महाराष्ट्रांतील भूमीला लागल्यानें तेथील प्लेग नाहीसा होईल '

मुद्दाम जात आहेत यावरून त्यांनी हेच टिळक असा मनाशीं तर्क केला व आपापसात खुणा करूं लागले. पण एकदम पुढें होऊन त्याच्यानं बोलवेना. अशा रीतीनें सुमार अर्धा फर्लांग चालल्यावर ते दोघे मजजवळ येऊन हळूच म्हणाले, "काहो दादा, टिळक महाराज म्हणतात ते यातच आहेत का ? ते कोणत ?" मग मी त्याना टिळकाकडे बोट दाखवून दिल्यावर ते थोड धिटाईनें पुढें गेले व त्यांनीं टिळकाचे पाय धरले. टिळकांच्या ध्यानात हा मजकूर कच्चाच आला, कारण दिवसभर लोकानीं येऊन पाय धरण्याचा प्रकार सुरूच होता. तेव्हा टिळकानीं त्याना सहज एक दोन प्रश्न केले, तेव्हा ते म्हणाले कीं 'आम्ही तुमच्याच मेळ्याला मुद्दाम सगमनरला चाललों होतों पण आम्ही माळ्या माण्याचे म्हणून मध्येच ही निवात गाठ पडली ' अशा रीतीनें बोलत चालत सर्व मडळी चालली असता अधार पडला म्हणून मोटारींत बसण्याकरिता टिळक परत फिरणार असें पाहून त्या दोघातील एकजण जीवाचा धडा करून प्रथम गुळमुळत पण स्पष्ट शब्दानीं टिळकाना म्हणाला, ' महाराज, आपली सेवा आमच्या हातून कसली होणार म्हणा पण आम्हाहि इमानी बेरड आहों. आपण एकादें मोठें काम हातीं घतलें तर आमची आठवण ठवा आम्हीहि पण आम्हाला होईल ती कामगिरी करून तुम्हाला दाखवूं ' असें बोलून आणखी एकवार टिळकाचे पाय धरून ते बिचारे बाजूला वळून निघून गेले तेव्हा टिळकाना एकाएकीच एक सुस्कारा टाकला व म्हणाले, ' गरीब बिचारे ! त्यांच्या मनातलें मोठें काम काय तें मी समजलों पण तें हल्लींच्या काळीं किती दुरापास्त झालें आहे हें त्याना आमच्याइतकें कळत नाहीं, पण याचा अर्थ हा कीं, परिणामीं काहीं होवो वा न होवो, आज कोणी पुढारी या राज्याविरुद्ध उघड बड करावयास निघाला तरी त्याला विश्वासू अनुयायी मिळणार नाहींतच असें नाहीं या बिचाऱ्याची आठवण मला आता जन्मभर राहील पण त्याना सागण्यासारखें काम आजच मजजवळ नाहीं याचें मात्र वाईट वाटते. "

(४) १९१७ किंवा १८ सालीं लो टिळक दिल्लीस चालले होते आगगाडी भरलेली होती पण स्टेशनावरूनहि टिळकाना पहाण्याकरिता पुष्कळ गर्दी जमे याच गाडींत सर बॅंजामिन रॉबर्टसन व त्यांचे मुशाळफर हेहि होते रॉबर्टसन यानीं टिळकाना समक्ष पाहिलें नव्हतें म्हणून टिळक याच गाडींत आहेत असें कळल्यावर त्याना टिळकाना पाहण्याची इच्छा सहजच अनावर झाली, व मधल्या एकदोन स्टेशनावर गाडी पुष्कळ वेळ थाबली तेथें टिळक कोणचे हें दाखविण्याकरिता मुशाळफराना घेऊन त्यांनीं टिळकांच्या डब्यावरून पण दुरून दोन तान फेऱ्या केल्या पुढें खुद्द दिल्ली ( मेन ) स्टेशनावर गर्दी इतकी झाली कीं, सर्व प्लॅटफॉर्मभर माणसाला माणूस ठेचून भरल्यामुळे डब्याचीं दारें उघडून उतारूना सामान बाहेर उतरून ठेवण्याला किंवा स्वत उतरून उभें राहण्याला

बरोबरच किती तरी वेळ जागाच होईना. युरोपियन उतारू तर रागावून सतापून ओरडून शिव्याहि देऊ लागले. रेल्वे अधिकारी शिव्या फुकू लागले व गोरे व काळे पोलीस गर्दीच्या अंगावर छड्याहि चालवू लागले, परंतु गर्दी काहीं केल्या हटेना. अशी कमींत कमी १० । १५ मिनिटें गेली व टिळक एकदाचे उतरून आपल्या मागच्या लटांबरासकट तिकिटें घेण्याच्या दरवाज्यापर्यंत पोंचल्यानंतर मग थोडी रीघ झाली. मी एका स्नेह्यास म्हणाला, ' इच्छाविरुद्ध मर्यादित जागत डांबून बसावयास लावणं, ही जर कैदेची व्याख्या म्हटली तर *आज टिळकांनीं इतक्या लहान मोठ्या साहेब लोकांना पाव तासाची साधी* कैद भोगावयास लावून आपण आजवर भोगलेल्या बंदिवासाचें उट्टें काढलें खरें ! ' घरीं गेल्यावर गर्दीची ही गोष्ट आम्ही विसरून गेलो. पण दिल्लींतील एका गृहस्थाला दुसऱ्या एका रात्रीं या गर्दीच्या चिंतेनें झोंप आला नसावी. तो गृहस्थ म्हणजे दिल्लीचा कमिशनर. टिळक दिल्लीहून परत निघण्याचे आदले दिवशीं या चीफ कमिशनर साहेबांनीं टिळकांना स्वदस्तुरचें पत्र लिहिलें. त्यात ते लिहितात, " आपण दिल्लीस्टेशनावर परवा उतरल्यावेळीं अतिशय गर्दी झोटली व प्रवासी लोकांना बराच वेळपर्यंत गाडींतून उतरणेंहि अशक्य झालें. ही गोष्ट अर्थात् आपल्या हातची नाहीं हें मला माहीत आहे, पण मला येवढीच विनंति करावयाची कीं, आपण परत जातेवेळीं दिल्ली मेन स्टेशनावर गाडींत न बसतां दिल्ली सदर स्टेशनावर गाडींत बसण्याची तसदी घ्याल तर फार उपकार होतील. आपणास हें पसत असल्याचें कळविल्यास तेथें आपली सर्व प्रकारें सोय होईल अशाविषयीं मी रेल्वे अधिकाऱ्याकडून आपली सर्व तजवीज करवीन. अशी अकल्पित विनंति केल्याबद्दल रागावणार नाहीं अशी आशा आहे " चिट्ठी वाचून टिळक म्हणाले, " मला काय दिल्ली मेन आणि दिल्ली सदर दोन्हीं सारखेंच. कोठें तरी गाडींत बसलं म्हणजे झालें " पण अधिकाऱ्यांना तें सारखेंच वाटलें नाहीं हें खास. टिळकांनीं सौजन्य दाखवलें असें वाटून त्यांनीं सर्व व्यवस्था दिल्ली सदर स्टेशनावर उत्तम ठेवली होती. शिवाय टिळकांना निरोप देण्यास आलेल्या गर्दीचें समाधान होइपर्यंत गाडी सोडण्यात आली नाहीं. त्या दिवसाच्या खात्यात दहाबारा मिनिटांचा उशीर टिळकांकरिता अशी नोंद रेल्वे कंपनीच्या बुकांत झाली असली पाहिजे.

---

## श्रीनिवास विश्वनाथ परांजपे.

[ लातूर जिनिंग फ्याक्टरीचे एक भागीदार, लोकमान्यांचे एक स्नेही, मोगलाई ]

गोरक्षण व टिळक—लोकमान्य व परांजपे यांनी लातूर येथें ' धि लातूर जिनिंग फॅक्टरी ' या नांवाचा चारखीचा जिनचा कारखाना रेल्वे स्टेशनपासून ८५ मैल दूर कापसाचा प्रांत पाहून सन १८९१ मध्यें स्थापन केला. त्या वेळेपासून मीं त्यांची सेवा केली आहे. कारखाना स्थापला गेला त्या वेळेस आपली एका गोष्टीचें बीजारोपण लोकमान्यांनीं करून ठेविलें ती गोष्ट म्हटली म्हणजे गोरक्षण फंड ही होय. कारखान्याचे एकंदर उत्पन्नापैकीं दर रुपयास पाव आण्याप्रमाणें ( दर पल्ल्यास दीड आण्याप्रमाणें ) त्यावेळेपासून गोरक्षणाकरितां धर्मादाय रकम बाजूस काढून गोरक्षणाकडे त्याचा उपयोग करण्यांत येत असे. यांत्व बीजारोपणाचा वाद होत जाऊन त्यास दृश्य असें फळ प्राप्त झालें. कारण शके १८२६ ज्येष्ठ शु॥ ६ या रोजीं या संस्थेस सार्वजनिक स्वरूप प्राप्त झालें. तेव्हांपासून या संस्थेची एखाद्या फोफावत जाणाऱ्या वृक्षाप्रमाणें, जास्त जास्त भरभराटच होत आहे. आजमितीस या संस्थेत जनावरें सुमारें २५० असून इमारत ७५ हजारांची झाली आहे. इमारतीस जागेची अडचण होती, पण लोकमान्य व परांजपे यांनीं आपले कारखान्याचे जमिनीपैकीं ३००×३०० फूट जागेचें संस्थेस बक्षीसपत्र सन १९१२ सालीं करून दिलें, व याच जागेवर हल्लींची इमारत आहे. याशिवाय आजमितीस गोरक्षणफंड सुमार २७ हजार शिल्लक आहे तो निराळाच ! लोकमान्यांनीं इकडील प्रांतांत प्रथमच गोरक्षण संस्थेचा पाया घातला, ही गोरक्षण संस्था आज इतक्या उत्तम रीतीनें चालत आहे कीं, अशाच प्रकारच्या इतर संस्थांना ही संस्था म्हणजे एक अनुकरणीय जिवंत उदाहरण आहे, यांत शंका नाहीं. ह्या संस्थेमुळें ह्या प्रांतात ४।५ गोरक्षण संस्था स्थापन झाल्या असून त्यांचीहि स्थिति समाधानकारक आहे. अशा रीतीनें लोकमान्यांनीं गोरक्षण कार्य केलेलें आहे.

करिता कां होईना परंतु जर येथील मंडळी पक्षभेद विसरून कार्याला हात घाल-तील तर हें हिंदुस्थानच्या इतर कोणत्याहि प्रांतापेक्षा येथ अधिक काम होईल." पण हें व्हावं कसें हाच प्रश्न होता. जेथ मतभेद नाहीं तेथ पक्षभेद विसरण्याला मागील पिढीतील माणसें तयार असत व त्याप्रमाणें बळवंतरावजी हे विरुद्ध समजल्या जाणाऱ्या पक्षांपैकीं वाटेल त्या माणसाबरोबर झटून काम करीत हा त्यांचा गुण हल्लींच्या स्थितींत अवश्य घेण्यासारखा नाहीं असें कोण म्हणेल ?

मद्यपाननिषेधाचा प्रश्न अशा तऱ्हेचा होता. त्याजबद्दल सर्व पक्षांत सारखीच आस्था होती. करितां पक्षभेद विसरून या प्रश्नाचे मागें एकजुटीनें लागल्यास त्यांत यश येईल असें कांहींजणांनीं बळवंतरावजींस सुचविलें व त्यांना ही गोष्ट तात्काळ पसंत पडली. सन १९०७ सालीं ह्याप्रमाणें एक मंडळ स्थापिलें व त्याची कार्यकारी मंडळी नेमिली. त्या मंडळाचे अध्यक्ष रा. गोपाळराव गोखले हे निवडले व कार्यकारी सभासदांत बळवंतराव टिळक होते. चिटणीस रा. नरसोपंत केळकर व प्रस्तुतचा लेखक असे असून इतर सभासदांत सर्व पक्षांचे व विचाराचे लोक होते, व विशेष हें कीं, या सभेत सर्वांनीं अत्यंत मनापासून एकमेकांशीं एक विचारानें व नेटानें पक्षभेद बाजूस ठेऊन काम केलें.

या सभेचे बळवंतराव व गोपाळराव गोखले असे दोघे आधारस्तंभ असून दोघांनींहि पक्षभेद बाजूस ठेऊन झटून वेळोवेळीं एकत्र काम केलें. हा योगायोग खरोखर अपूर्व होता, व ह्या अपूर्वतेंतच त्याचें यश साठविलेलें होतें. या मंडळानें जाहीर सभा, डेप्युटेशनें इत्यादि साधनांच्या योगानें मुंबई सरकारवर बराच शह बसविला होता, आणि माझें असें स्पष्ट मत आहे कीं, बळवंतराव व गोपाळराव गोखले या सर्वांनीं मिळून सहकार्य न केल्यानें जें काम होण्यास कित्येक वर्षें पुरलीं नसतीं तें काम थोडक्याच अवधींत पार पडलें, किंबहुना मुंबई इलाख्याची हल्लींची सरकारी खात्यांतील सुधारलेली स्थिति ही बहुतेक अर्थी त्या मंडळीच्या एक-जुटीच्या श्रमाचेंच बीज आहे

# अनंत वासुदेव ऊर्फ अतूकाका फडणीस.

[ सातारा येथील सरदार घराण्यापैकीं एक सुखवस्तु गृहस्थ व अखेरच्या दिवसांतील लोकमान्यांचे प्रायव्हेट सेक्रेटरी, पुणें ]

*

(१) मी सन १९२० मध्यें लोकमान्यांच्या बरोबर असतांना त्यांच्या झोंपेच्या संबधानें जी गोष्ट नजरेस आली ती अशी कीं रोजचे नित्याचे व आगंतुक नानातऱ्हेचे व्यवहार चालू असतांना अलीकडील त्यांच्या प्रकृतीच्या मानानें त्यास विश्रांतीहि अवश्य लागे बहुतेक दिवशीं थोडा वेळ, व रात्रीं ते झोंप घेत असत " आतां झोंप येत आहे, निजतों," असें म्हणून भोंवताली जमलेल्या समुदायांतून उठून ते बिछान्यावर जाऊन निजत त्या वेळीं त्यास झोंप २।३ मिनिटांत, बाहेर सभोंवतीं कितीहि गोंगाट असला तरी, लागत असे त्यांच्या बिछान्या शेजारीं २।३ मिनिटांनीं झोंप लागली काय हें पहावयास जावें तों यांचे घोरणें ऐकू येत असे शेवटच्या दुखण्यांत मात्र हा निद्राभंग झाला व दुखणें विकोपास जाण्यास तें एक मुख्य कारण होतें

(२) सिंध प्रांतांत तीन दिवस दौरा चालू असतां, त्या प्रांतांतील ज्या भागांत जावें जाणें त्यावेळीं शक्य नव्हतें त्या प्रांतांतील लोकांपडून त्यांजकडे डेप्युटेशनें, पत्रें व तारा रोज अतोनात येत शेवटीं शिकारपूरहून परत सोला पुराकडे येण्याचें नक्की ठरलें तेव्हां त्यापैकीं एका गांवच्या लोकांनीं अत्यंत मोड घातली परंतु त्या दिवशींचे गाडीने न निघाल्यास सोलापूर कॉन्फरन्सचे दिवशीं पोंचणें होत नाहीं, व ते लोक तर ऐकेनात, तेव्हां माठी पंचाईत आली आग गाडी ज्या गांवावरून जावयाची तेथील मंडळींनी आगगाडीपुढें पडून सत्याग्रह करावयाचा असा निश्चय ठरविला होता ही सर्व कुणकुण लोकमान्यांचे कानीं आली होती, तेव्हां सर्व संतोषानें निभावून त्या गांवचे स्टेशनवरून सुटका होण्याची कल्पना यांचे मनांत घोळू लागली त्यावेळीं आमचे नारायर स्वामी × × × हे ( सिंधी भाषा जाणणारे व त्या भाषेत उत्तम वक्तृत्व करणारे ) त्या डब्यांत असत त्यास दिल्लीपासून मुद्दाम लोकमान्यांनीं बरोबर घेतलें होतें त्यांजकडूनहि त्या लोकांचा समजूत घालण्याचा फार प्रयत्न केला शेवटीं गाडी सुरू होताच जी आमंत्रण करण्यास तेथील मंडळी आली त्यास आपल्या डब्यांत घेऊन, त्यांना आपले सोलापुरास न जाण्यानें काय काय होईल वगैरे सांगून व पुन्हा एकदां इकडे येऊन त्यांचे गांवीं यण्याचें आश्वासन देऊन त्यांचीं मनें वळविलीं थोड्या वेळांत तें स्टेशन आलें त्या ठिकाणीं हजारो लोक स्वागतार्थ जमले त्या लोकांनीं ठरविल्याप्रमाणें कांहीं आगगाडीचे इंजिनपुढें येऊन बसले. लोकमान्यांची मिरवणूक हत्तीवरून काढावयाची यासाठीं हत्ती सज्ज करून आणिला होता परंतु स्टेशन येतांच स्वतः गाडीखालीं उतरून, डेप्युटेशनमधून

आलेल्या गृहस्थांकडून योग्य प्रकारें जमलेल्या मंडळीस सांगवून व स्वतः दोन गोष्टी सांगून आणि प्लॅटफार्मवर थोडेसें दिंदीत व्याख्यान देऊन मोठ्या शिताफीनें तो सत्याग्रहाचा प्रसंग त्या जमलेल्या मंडळीस संतोषित ठेवून टाळला व कॉन्फरन्सचे दिवशीं सकाळीं थेट सोलापुरास येऊन पोहोंचले.

(३) लोकमान्यांना कोणी भीड घातली म्हणजे त्यांचे हातून ती त्याचा योग्यायोग्य विचार केल्याशिवाय मोडत नसे. त्याचा एक अनुभव आला तो असा:--सिंध प्रांतात जाण्यापूर्वी दिल्ली येथें ऑल इं. काँग्रेस कमिटी करून पुढ निघावयाचें; त्याप्रमाणें पुढें हैद्राबाद, कराची वगैरे ठिकाणीं केव्हां पोंहचावयाचें वगैरे नेहमींप्रमाणें तारा गेल्या होत्या. इतक्यांत दुपारीं भोजनाचे वेळीं दे. अर्जुनलाल शेटी हे कांहीं अजमीरचे गृहस्थास घेऊन लोकमान्यांस अजमीरास येण्याबद्दल आग्रह करूं लागले. लोकमान्यांनीं नाना प्रकारें शेटजींस " पुढील कार्यक्रम अगाऊ ठरवून तारा वगैरे सर्व झालें आहे, तिकडे लोक तिष्ठत बसतात तें माझें मनाला बरें वाटत नाहीं. तेव्हां या खेपेस आपण माफी करा " असें सांगून पाहिलें, परतु ते ऐकेनात. त्यानाव दरेलीनें उट्‌ देईनात. तेव्हां अशा प्रसंगीं त्यांनीं कांहीं तास उतरून तेथें व्याख्यान देईन असें कबूल केलें व त्याप्रमाणें अजमीरास उतरून शेटजींच्या इच्छेप्रमाणें केलें. सुमारें २५ हजार जनसमुदायापुढें व्याख्यान दिलें. याप्रमाणें

काँग्रेसचे मंडपातून निघण्यापूर्वी मला अगोदर बाबू मोतीलाल घोष याचेकडे जावयाचें आहे असें म्हणाले. तेथें उभयतांची गांठ पडताच एकमेकास अत्यानंद झाला व ते कडकडून भेटले. नंतर कांहीं सुखासमाधानाच्या उभयतांच्या गोष्टी झाल्या. ते एकमेकास बंधूप्रमाणें समजत व कलकत्त्याहून निघण्यापूर्वी त्यांनीं मुद्दाम मुंबईचे प्रसिद्ध फोटोग्राफर बीरकर याजकडून मोतीलाल बाबूंचे कुटुंबातील मंडळीबरोबर बसून फोटो काढविला यावरून मोतीलाल याचेवर त्यांचें कसें प्रेम होतें हें व्यक्त होतें.

(६) लोकमान्य आगगाडींतून प्रवास अलीकडे बहुतेक फर्स्ट क्लासनें करीत असत कित्येकानीं त्याना आपण या क्लासनें का प्रवास करिता हें विचारलें असता ते म्हणत कीं, " सेकंड क्लासपेक्षा या क्लासात बसल्यापासून निरर्थक प्रश्न उत्तराची उपाधि कमी होते व थोडी विश्रांति मिळते गाडांत बसल्याबरोबर ज्या रेल्वेनें प्रवास करीत त्याचें टाईमटेबल मागून घेत. वरचेवर जागपणी ज्या स्टेशनवर, गाडी उभी राहील तेथें ती गाडी वेळेवर आली किंवा नाहीं अगर उशीर झाला हें घड्याळ पाहून टाईम टबलशीं तपासून पहात असत गाडींत बहुतेक ते विश्रांति घेत कधीं कधीं झोंप न आली तरी ते पडून राहात. एखादे वेळीं

काढण्याचें त्यांनीं निश्चित केलें होतें. पुढें लोकमान्याची स्वारी ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीचे सभेसाठीं गेली त्यावेळीं तेथील पुढारी मंडळींनीं अजमासें ४ लाख चादणी चौकातून मिरवणूक काढून मागील उट्टें फेडून घेतलें. मिरवणुकी नंतर लोकमान्यानींहि अजमासें वीस हजार जनसमूहापुढें व्याख्यान देऊन मागीत शिल्लक बाकी पूर्ण केल्यामुळें लोकास फार संतोष वाटला.

---

## नारायण श्रीपाद राजहंस

[ बालगंधर्व, सुप्रसिद्ध नट, मालक गंधर्व नाटक मंडळी ]

(१) सुमारें २४–२५ वर्षांपूर्वीची गोष्ट. मी त्या वेळीं ११–१२ वर्षांचा असेन. माझे परमपूज्य मातामह कै. वे. शा. स. अप्पाशास्त्री वेलेकर हे पुराणिक म्हणून प. वा. बाबामहाराज यांच्या आश्रयाला असून, त्यांच्यावर त्यांची विशेष कृपादृष्टि होती यामुळें आम्हा शास्त्रीबुवांच्या नातवंडांचें महाराजांच्या वाड्यात जाणेंयेणें बरेंच असे. लोकमान्यांचा आणि बाबामहाराजांचा स्नेहसंबंध आणि घरोबा प्रसिद्धच आहे. वाड्यात त्यांची जा–ये नेहमींच असे. यामुळें 'हा अप्पाशास्त्रीबुवांच्या कृष्णाबाईचा मुलगा' म्हणून लोकमान्य मला ओळखीत होते मी या वेळीं पुण्यास शिकत असून गाण्याचा नाद मला फारच होता. वाड्यातील कारभारी रा. यशवंतराव कुळकर्णी हे माझे आप्त असून त्यांचाहि मजवर विशेष लोभ असे व आहे. या सर्व कारणामुळें, वाड्यातील मंडळीं मजकडून चिजा, पदें वगैरे नेहमीं म्हणवून घेत असत.

त्या वर्षी प्रथम दिवस असून लोकमान्य शहरातून बाहेर राहावयास गेले होते एके दिवशीं लोकमान्यांच्या निकटच्या स्नेही मंडळींच्या (किंवा केसरी ऑफिसच्या मंडळींच्या असेल) मनात माझें गाणें लोकमान्यांसमोर व्हावें असें आलें आणि लवकरच त्यांनीं तशा योगहि मुद्दाम जुळवून आणला. मला लोकमान्यांच्या 'बैंगला' नेण्यात आलें त्या वेळीं खूप थंडी पडली असून मी थंडीनें अगदीं गारठून गेलों होतों. माझा आवाजहि गारठला होता. हें पाहून लोकमान्यांनीं मुद्दाम शेकण्याची वगैरे व्यवस्था करविली. नंतर लोकमान्यांसमोर माझें गाणें झालें. त्या वेळीं ते तैंडुलीवर बसले नसून कोचीस इकडून तिकडे येरझारा घालीत होते. लोकमान्यांना गायनकलेची विशेष आवड नसताहि, माझें गाणें

ऐकून त्यांनीं मला फार उत्तेजन दिलें आणि माझी कौतुकानें व प्रेमानें विचारपूस केली. "तू येथें काय करीत असतोस?" या त्यांच्या प्रश्नाला, 'मी शाळेंत शिकतों व गाण्याचाहि अभ्यास करीत आहे," असें मी उत्तर देताच, "गायनाच्या व्यासंगावर भर देऊन तोच तू पुढें चालव." असा लोकमान्यांनीं त्या वेळीं मला उपदेश केला. त्याचा हा सल्ला अत्यंत दूरदर्शीपणाचा व योग्य होता असाच पुढें मला अनुभव आला. यानंतर थोड्याच दिवसांनीं 'केसरींत' 'बालगंधर्व' या नांवानें लोकमान्यांनीं माझा उल्लेख केल्याचें माझ्या ऐकिवांत आहे.

(२) यानंतर बऱ्याच वर्षांनीं किर्लोस्कर संगीत मंडळींत मी प्रविष्ट झाल्यावर, मिरज येथें मंडळींचा मुक्काम असतां, कांहीं कामानिमित्त लोकमान्य तेथें आले होते. भेटींत, जवळच्या मंडळींनीं माझा निर्देश करून 'हा कोण माहीत आहे का?' असें त्यांना विचारताच, लोकमान्यांनीं चटकन् "हा आपला बालगंधर्व!" असें उत्तर दिलें. लोकमान्यांच्या या उत्तरानें त्यांच्या प्रखर स्मरणशक्तीचा प्रत्यय पटून मी तर आश्चर्यानें अगदीं थक्कच झालों! लोकमान्यांच्या दिव्य व प्रासादिक वाणींतून निघालेल्या 'बालगंधर्व' ह्या आशीर्वाद पदवीदानानें माझें कल्याण होऊन मी कृतार्थ झालों अशी माझी समजूत आहे

---

## काशिनाथ नरसिंह केळकर

[वाङ्मय विशारद (टिळक महाराष्ट्र विद्यापीठ), पुणें]

मिरजेचे कै. वासुदेवशास्त्री खरे हे टिळकांचे सहशिक्षक व शंकरराव उर्फ भाऊसाहेब लवाटे हे टिळकांच्या वर्गांतील विद्यार्थी. या दोघांशीं संभाषण करण्याचा प्रसंग आला असतां जी तत्कालीन माहिती मिळाली ती मनोरंजक वाटल्यावरून एकत्र करून येथें देत आहें.

(१) न्यू इंग्लिश स्कूल काढण्यापूर्वी किंवा त्या वेळेसहि, न्यू स्कूलच्या चालकांच्या स्वतः बद्दल कल्पना अर्थातच निरपेक्ष होत्या. पण त्यांत अननुभवि स्वामी शाक असल्याकारणानें एक प्रकारची रम्यता असे स्वतःची किंवा स्वतःच्या संसाराची फोंजी फिकीर बाळगू नये, पैशाचा संग्रह तरी करून काय करावयाचा, वेगळें राहून प्रत्येकास खास खर्च पडतो, म्हणून संस्थेंतील कार्यकर्त्या मंडळींनीं सर्वांनीच एकत्र कुटुंब करून रहावें, अशा त्यांच्या त्यावेळीं कल्पना असत.

याप्रमाणें प्रथमत. आगरकर, नामजोशी, टिळक वगैरे ओंकारेश्वराचे जवळ तांबे याचे वाड्यात सहकुटुंब रहात. त्या वेळेस त्यांनीं सर्व बस्तान साऱ्या तीनचार खोल्यामध्येंच बसविलें होतें एका बाजूच्या हॉलमध्यें पुरुष मडळी बसत मध्यें जेवणाखाणाकरिता व उठण्याबसण्याकरिता माजघर व त्यापलीकडे बायकाची खोली. काहीं दिवस हा समाईक क्रम टिकला. पण असलें देवदूताचें चरित्र अनेक वर्षे चालणें अशक्य म्हणून अखेर हा क्रम मोडला ! याडक्या माडवलात एकत्र राहण्याचा हा प्रयोग याप्रमाणें फुकट गेल्यानतर, प्रत्येकानें आपलें जेवण-खाण दुसरीकडे करावें, पण सर्वांनीं न्यू स्कूलमध्यें निजावयास एकत्र यावें असें ठरलें.

शाळा उघडणार त्याच्या आदले दिवशीं, असें सागतात कीं, नामजोशी व टिळक यानीं स्वत आपल्या हातानें ती खोली सारविली रात्रीं दोघे तेथेंच फळ्यावर निजले, व सकाळीं उठल्यावर उपरण्यानें बाके वगैरे झटकून टाकून, दहा वाजता जेवणखाण करून पुन अकरा वाजता शाळा उघडण्याचे वेळेस हजर झाले !

न्यू स्कूल सुरू झालें, तेंव्हाच त्याला मोरोबादादाचा वाडा मिळाला होता. दुसऱ्या मजल्यावर शाळा उघडली. तेव्हा पाच, सहा व सात अशा तीन इयत्ता तीन प्रशस्त जागेंत बसविल्या होत्या. त्या दिवशीं शाळेंत नावें घालण्याची छावी एकोणीस किंवा तेवीस मुलासच झाली हें खरें, परतु शिकविणें कसें काय चालतें हें पाहण्याच्या उत्कठेनें हायस्कुलातून वगैरे आलेल्या शेंदोनशें मुलाचा घोळका जमलेला होता.

या पहिल्या एकोणीसातच के० हरिभाऊ आपटे व प्रो. वै. का. राजवाडे वगैरे मडळी होती

ज्या चालक मडळींनीं हें काम अगावर घेतलें त्याचा स्वार्थत्यागाबद्दल लौकिक चागला असल्यामुळें त्याच महिन्याचे अखेर शाळेंत ३५० मुलें झालीं. त्या वेळीं या शाळेचा मुख्य रोख हायस्कुलावर होता. सध्याचे प्रो राजवाडे हे त्या वेळीं हायस्कुलात स्कॉलर होते. त्याना धळधरून तितकी स्कॉलरशिप देऊन आपटे वगैरेनीं मुद्दाम न्यू स्कूलमध्यें ओढलें. दैराव्या तुधेहूब बरहुकूम उठण्या करिताच कीं काय, या वेळीं हायस्कूलांतील पट्टेवाला शिपाईहि नोकरी सोडून न्यू स्कुलात आला !

शाळा सुरू झाल्यानतर थोडक्याच दिवसानीं छापखाना व वर्तमानपत्रें काढण्याचा घाट निघाला. त्यांत नामजोशी याचाच पुढाकार होता त्याबद्दलचीं पुढील बेत ठरविण्याकरिता नामजोशी, टिळक, शाळेचा कारकून शिवराम व आणखी कोणी तरी एकदोन असामी रात्रीचें जेवण उरकून निजावयास शाळेंत येत व रात्रीचे दोन दोन वाजेपर्यंत बोलत बसत, आणि तेथेंच क्लासांतले फळे व त्यांवर घट्या पसरून उपरणीं पांघरून निजत. हा क्रम महिना-पधरा दिवस

चालला होता. एके दिवशीं टिळक व नामजोशी यांनीं शास्त्रीबुवा तेथें आले असता त्यांना ही कल्पना सांगितली, तेव्हां शास्त्रीबुवांनीं 'ठीक आहे' म्हणून संमति दिली. 'केसरी' हें नांव शास्त्रीबुवांनीं दिलें व त्यावर खरेशास्त्री यांनीं सुचविलेला 'क्षितिं नो रे दया-' हा श्लोक घालण्याचें सर्वानुमतें ठरलें.

नंतर माडे यांचे मार्फत एक प्रेस विकत घेतला. प्रेसचें सामान माडे यांच्या शिवाजी छापखान्यांत ठेवलेलें होतें. मोरोबा दादाच्या वाड्याला ती जागा जवळ आहे. एके दिवशीं त्या वाड्याला आग लागली असें कळलें. तेव्हां रातोरात जाऊन टिळक, नामजोशी, त्रिंबकराव जोशी, कारकून गणपतराव सोवनी व बाळा शिपाई वगैरे मंडळींनीं टाइपाच्या केसी भरबुधवारांतून आपल्या डोक्या-वरून वाहून आणल्या !

शाळेंत शिकविण्यासंबधीं प्रथम तरी कोणाची एकमेकांबद्दल तक्रार नसे. इतर बाबतींत नंतर मतभेद उत्पन्न झाले म्हणून तीच कुरकुर शिकविण्यासंबधानें होऊ लागली. त्या वेळीं बहुधा सर्वजण आपला विषय हौसेनें शिकवीत व वेळप्रसंगीं दुसऱ्याचेहि तास घेत. बाहेर सर्वजण पागोटीं घालीत परंतु टिळक आगरकरादि बहुतेक सर्व शाळेंत टोप्याच घालून मुलांस शिकवीत.

टिळक केव्हां केव्हां संस्कृतहि शिकवीत असत. न्यू स्कूलच्या पहिल्या वर्षी वासुदेवशास्त्री खरे व टिळक हे एकाच वर्गी शिक्षक होते. एके दिवशीं टिळक हे वर्गावरून आले व खरे वर्गावर जाण्याच्या गडबडींत होते. तेव्हां टिळक खरे यांना थांबवून म्हणाले, 'कर्मणा यमभिप्रैति स संप्रदानं' हें सूत्र, त्याची वृत्ति व उदा-हरणें यासह मला समजून द्या. 'आतां मला वेळ नाहीं' असें खरेशास्त्री यांनीं म्हटल्यावर 'तुमची प्रतिज्ञा नको, सद्य भविष्यात कौमुदी तयार करीन' असें टिळकांनीं उत्तर दिलें. टिळकांचा तापट स्वभाव खरे यांना माहीत. त्यांनीं लगेच वर्गावर जाण्याचें थांबवून तेथेंच टिळकांना रूपें समजावून दिलीं. टिळक बोलल्या-प्रमाणें खरोखरच स्वतः कौमुदी शिकून दुसऱ्यास शिकवतील अशी खरे यांना खात्री होती, म्हणून या मानी पुरुषाचा त्यांनीं विलंब न लावता संतोष केला.

टिळक हे संस्कृत शास्त्रपद्धतीप्रमाणें इंग्रजी टीकापद्धतीहि चांगली जाणत, त्यामुळें त्यांचें शिकवणेंहि मार्मिक होई. कालिदासाच्या मेघदूतामध्यें हा अमका श्लोक, या अमक्या श्लोकापुढें का आला याचें कारण संस्कृत पद्धतीप्रमाणें शिकलेल्यापैकीं फारच थोडेजण सांगू शकतील. पण त्याचा सूक्ष्म अभ्यास केल्यामुळें प्रत्येक शब्द योजताना किंवा अमक्या श्लोकाचा एकापुढें एक असा क्रम लावताना कवीला दृष्टीपुढें काय काय दिसत असेल, त्याच्या मनांत क्रमानें कोणते विचार येत असतील वगैरे गोष्टी स्वतंत्रपणानें मनाव ठरवून त्यांनीं त्याची एक साखळी बनविली होती व सातव्या इयत्तेस व दुसऱ्यादा कॉलेजमध्यें पी. ई. च्या वर्गात

त्यांनीं मेघदूत शिकविलें त्या वेळीं असेंच विवरण करून एका श्लोकातून दुसरा का व कसा निघाला तें विशद करून सांगितलें.

सरतेशेवटीं, आगरकर व टिळक याच्या भांडणाचें मूळ बीज न्यू स्कूलमध्यें असतानाच कसें पेरलें गेलें होतें यावद्दल टिळकानीं स्वतः एके दिवशीं खरे याजजवळ सांगितलेली एक गोष्ट सांगून कै. खरेशास्त्री याच्या आठवणी संपवितों.

श्री. बाळासाहेबमहाराज होळकर पुण्यास आले होते, तेव्हा टिळक व आगरकर यास भेटण्याची आपली इच्छा आहे असें त्यानीं बरोबर रा. ब. भाईसाहेब गुसे आले होते त्यास कळविलें. त्याप्रमाणें गुसे याची चिठी आल्यावरून टिळक व आगरकर महाराजाच्या भेटीस गेले. कोल्हापूर-प्रकरणाबद्दल तुम्हास हाल-अपेष्टा सोसावी लागली असें म्हणून महाराजानीं मडळीच्या स्वार्थत्यागाबद्दल व सार्वजनिक कळकळीबद्दल फार तारीफ केली; आणि निघताना टिळकाच्या हातात नोटाचें पाकीट दिलें. बाहेर येताच टिळकानीं गुसे यास म्हटलें कीं, आम्ही भेटीस आलों त्यात काहीं मागावें असा आमचा हेतु नसता महाराजानीं हें द्रव्य दिलें आहे, सबब तें परत घ्या. गुसे यानीं उत्तर दिलें कीं, महाराजानीं दिलेली देणगी परत करणें हें शिष्टाचाराला अत्यंत विरुद्ध आहे, सबब हें द्रव्य तुम्ही निमुटपणें घेतलेंच पाहिजे.

"रकम उभयतास खासगी रीतीनें दिली आहे" अशा अर्थाचे उद्गार दिवाण भाईमिया याचेहि तोंडून निघाल्यामुळें ही रकम दोघानीं वाटून घ्यावी असें वाटेत आगरकर टिळक याच्याजवळ म्हणाले. त्या वेळीं टिळक काहीं एक बोलले नाहींत, व वाटेंत आगरकर यास टांग्यातून घरीं सोडून तसेंच न्यूस्कूलमध्यें जाऊन त्यानीं दोघाची सबंध सातशें रुपयाची रकम, स्वतःच्या सेक्रेटरीचे अधिकारात, शाळेकडे जमा केली. काय असेल तें असो, पण सर्व जन्म दारिद्र्यात व स्वार्थ-त्यागात काढूनहि या कामात, हेतुपूर्वक वा अहेतुपूर्वक, आपण स्वार्थी असल्याचा जो वाईट ग्रह उमटला तो मानी आगरकरास सहन झाला नाहीं व एवादी नाजुक गोष्ट घडूनहि मर्मभेद होण्यासारखा भाव [illegible] तशी स्थिति होऊन 'मागुळें आगरकर व मी'

खालीं दिसणाऱ्या वेळवड खोऱ्यात सुमारें अठरावीस वर्षांपूर्वी टिळक कांहीं कामानिमित्त गेले होते व उघड्यावरच सतरंजीवर बैठक टाकून त्याच्याबरोबर कांहीं मंडळी बोलत बसली होती इतक्यात जवळच तिकडून या किल्लेदाराला जाताना पाहून मंडळींपैकीं कोणी एकानें सहज, हे राजगडचे किल्लेदार, अशी त्याची ओळख टिळकाना करून दिली टिळकांनींहि त्याला या बसा म्हटलें व राजकीय विषयाबद्दल इतरांशीं बोलणें झाल्यावर किल्लेदाराशींहि एकाद दुसरा शब्द बोलावा म्हणून त्याला ते म्हणाले, "आमच्या या कार्याला तुमचीहि सहानुभूति असू द्या, म्हणजे तुमच्या किल्लदारीच सार्थक होईल !"

यानंतर प्रसंगोपात म्हणून टिळक हा किल्ला पाहून गेले पण त्यानंतर भाजी भोरकराकडून टिळकाना किल्ल्यावर येऊं दिल्याबद्दल सदरहू किल्लेदाराला चांगलीच समज मिळाली व "तुला तेथें पाहऱ्यावर नेमला असता टिळक वर आला कसा ?" असाहि प्रश्न साहजिकच आला त्यावर त्या किल्लदारानें थाव घेऊन उत्तर केलें–"महाराज, आपल्या किल्ल्याला धड दरवाजेसुद्धा नाहींत, म्हणून टिळक वर आला !"

पाहूनहि जास्त विचारता, सध्याची दरवाज्याची दुरुस्ती त्यानंतरची आहे असें त्या किल्लेदारानें आम्हाला सांगितलें

(३) कै. ना. गोखल्यांच्या स्मशानयात्रेच्या प्रसंगीं टिळकांनीं केलेलें वर्तन व ओंकारेश्वरावर केलेलें भाषण अनेकांनीं ऐकलें असेल. पण त्याची इत्थंभूत व व साधार हकीगत कोठेंहि प्रसिद्ध झालेली पाहण्यात आली नाहीं. स्मशानभूमीवरच्या दुःखव्याच्या प्रसंगीं सुद्धा टिळक भाषण करण्यास उभे राहताच कांहीं मूर्ख प्रेक्षकांनीं टाळ्या वाजविल्या, त्याचा निषेध करून "हा प्रसंग आनंदाचा नाहीं, हा प्रसंग दुःखाचा आहे" असें त्यांना प्रेक्षक वर्गास बजावलें परंतु याहीपेक्षा लक्षांत राहण्यासारखी गोष्ट म्हणजे, टिळकांनीं म्हटलें "या प्रसंगावरून पेशवाईंत पूर्वी घडलेल्या एका प्रसंगाची आठवण होते आजचा प्रसंग तसाच आहे त्या वेळेप्रमाणें आताहि येथें बारभाईप्रमाणें संकल्प झाले पाहिजेत. तुमच्या टाळ्या वाजविण्याचा उपयोग काय ? येथ टाळ्या वाजवाल आणि घरीं परत जाल. गोखल्याप्रमाणें होण्याचा निश्चय करण्यास तुमच्यापैकीं कोणी तयार

कांचे घरीं नेहमींच खुला दरबार असल्यानें कधींच कोणास मज्जाव नसे. अर्थात् खासगी किंवा राजकीय गोष्टींवरोबर कचित् सरकारी दूतांनाहि तेथें प्रवेश होण्याचा संभव फार. टिळकांचे घरीं पूर्वी असेच केव्हां एकदां लग्नमुंजीचें कार्य असतां, अनेक पोलिसचे लोक आंत आले होते. त्यांत सदर पोलिस रिपोर्टरहि होता. टिळक स्वतः आदरातिथ्याचे कामांत असून ज्या त्या माणसांचे दर्जाप्रमाणें त्यास पंगतीमध्यें स्थान देण्यामध्यें गुंतले होते. त्यांनीं न बोलतां इतर मंडळीमध्यें मिसळलेल्या सर्व पोलिसच्या लोकांस नेमकें निवडून काढून एका पंक्तीस आणून बसविलें! ह्याच गोष्टीस उद्देशून सदर रिपोर्टर म्हणाला, 'टिळकांच्या' शोधक दृष्टीपुढें आम्ही लपणार किती?

किस्येक सरकारचे लोक वरून आपलें स्वरूप न दाखवितां त्यांजकडे जेवणादिं जात असें म्हणतात. टिळक त्यांस ओळखीत, पण तसी ओळख कधीं देत नसत.

(५) १९२० सालीं "लो. टिळक यांचे " चरित्राबद्दल चार गुणवर्णनपर शब्द" या विषयावर न. चिं. केळकर यांचें फर्ग्युसन कॉलेजमध्यें व्याख्यान झालें. त्या प्रसंगीं प्रो. काळे यांनीं अध्यक्ष या नात्यानें भाषण करतांना न्यायमूर्ति रानडेहि टिळकांच्या गुणांची प्रशंसा करीत असें सांगितलें; 'ग्लोब' पत्रावर विलायतेंत फिर्याद दाखल करून टिळकांनीं 'ग्लोब' पत्रास माफी मागण्यास लाविलें. या टिळकांच्या दृढनिश्चयाचें रानड्यांनीं आपल्या मंडळींत उघड कौतुक केलें! एखाद्या गोष्टीवर मत प्रदर्शित करण्यापूर्वी किंवा लिहिण्यापूर्वी टिळक त्या गोष्टीचा सांगोपांग विचार करून त्याचा पूर्ण अभ्यास करीत. या दुर्मिळ गुणाची रानड्यांनीं तारीफ करून आपल्या

## दत्तात्रय बळवंत पारसनीस

[ रावबहादूर, ग्रंथकार, इतिहाससंशोधक व ऐतिहासिक वस्तुसंग्रहकार, सातारा. ]

( रा. रा. पावटे ह्यांनीं मला कै. लोकमान्य टिळक ह्यांच्या संबंधींच्या आठवणी लिहिण्याबद्दल अतिशय आग्रहपूर्वक पत्रें लिहिलीं शिष्टसंप्रदायाप्रमाणें त्यांचा अनादर करणें मला इष्ट वाटेना परंतु वेळेचा अभाव व ज्या थोर पुरुषाच्या आठवणी लिहावयाच्या त्यांत स्वत चा काहीं तरी संबंध येणार व स्वत बद्दल कधींहि न लिहिणें किंवा बोलणें असें माझें नित्य मत तेव्हां त्याविरुद्ध जाण्याची माझी प्रथम मनीषा होईना परंतु थोरांच्या आठवणी किंवा आख्यायिका ह्या मोठ्या बोधप्रद व मनोरंजक असतात, आणि केव्हा केव्हा त्यांचें महत्त्व एका इंग्रज ग्रंथकारानें म्हटल्याप्रमाणें " one anecdote is worth a volume of biography " अशा दृष्टीनें एक स्वतंत्र आठवण चरित्र ग्रंथ ज्या किंमतीची असते. तेव्हां त्या प्रसिद्ध करून एका लोकमान्य व थोर विभूतीबद्दल आपली आदरबुद्धि कृतज्ञतापूर्वक व्यक्त करावी असाहि एक विचार मनांत आला त्याप्रमाणें पुढील काहीं आठवणी येथें सादर केल्या आहेत त्यांत माझा स्वत चा संबंध आला आहे, त्यामुळें आत्मश्लाघेचा थोडासा दोष येण्याचा संभव आहे. परंतु खरी हकीगत सांगावयाची म्हणजे आत्मश्लाघेचा दोष पदरीं घेतला पाहिजे त्यास उपाय नाहीं ! एका कविमित्रानें म्हटलेंच आहे.—" आत्मस्तोत्र असेल गौण परि तें वस्तुस्थिती दाविते. " )

(१) रा. रा. टिळक यांचा व माझा प्रत्यक्ष परिचय इ. स १८९१ च्या डिसेंबर महिन्यांत नागपूर येथें झाला. कै विष्णुशास्त्री चिपळूणकर, प्रो. आगरकर व प्रो. बाळ गंगाधर टिळक यांचीं नावें इ. स. १८८१ पासून माझ्या कर्णपथावरून गेलीं होतीं व त्यांच्याविषयीं व त्यांच्या लेखन कौशल्याविषयीं मला नेहमीं फार आदरबुद्धि व कौतुक वाटत असे सुप्रसिद्ध महाराष्ट्र कादंबरीकार रा. रा हरि नारायण आपटे ह्यांचा व माझा परिचय नागपूर येथें दोन दिवसच अगोदर झाला होता त्यांना मीं सहज म्हटलें "टिळक ह्यांची व माझी ओळख होऊं शकेल काय ? " त्यांनीं नागपूरच्या राष्ट्रीय सभेच्या मंडपात शेवटच्या दिवशीं सर्व प्रतिनिधींस जी एक टपहाराची टोलेजंग मेजवानी झाली, त्या वेळीं माझी व टिळकांची ओळख करून दिली त्या वेळीं मी वयानें लहान असल्या मुळें व अल्पवयांत " महाराष्ट्र कोकिळ " मासिक पुस्तक चालवीत असल्यामुळें टिळकांस मजकडे पाहून क्षणभर अचंबा वाटला त्यांनीं मला विचारिलें, " काय महाराष्ट्र कोकिळ तुम्ही लिहीत असतां ? इतक्या ल्हान वयांत तुम्ही चांगलें मराठी लिहितां ! " वगैरे अभिनंदनपर उद्गार काढिले. त्या योगानें माझ्या

कोमल मनावर केवढा परिणाम झाला व मला किती प्रोत्साहन मिळालें, त्याचें नुसतें स्मरण देखील मला अद्यापि स्फूर्तिदायक वाटतें. असो, त्या वेळीं टिळकांनीं मराठीमध्यें राष्ट्रीय सभेच्या हकीकतींचीं साराशरूप वर्णनें प्रसिद्ध करण्याबद्दल मला सूचना केली, आणि सांगितलें कीं, " इंग्रजी न जाणणाऱ्या लोकसमाजाकरिता राष्ट्रीय सभेची माहिती प्रत्येक प्रांतातल्या वेगवेगळ्या भाषेंत प्रसिद्ध झाली पाहिजे. तुम्ही जर असा कांहीं प्रयत्न मराठींत कराल तर लोकशिक्षणाच कामीं त्याचा फार उपयोग होईल. " ही सूचना मला फार आवडली माझ्याहि मनात राष्ट्रीय सभेचें वर्णन लिहिण्याची इच्छा घोळत होती तिला आपोआप उत्तेजन मिळाल आणि त्याचा परिणाम " भारतभाग्योदय, " " भारतराष्ट्रमहोत्सव " वगैरे नागपूर, अलाहाबाद वगैरे ठिकाणच्या राष्ट्रीय सभेचीं वर्णनें प्रकाशित करण्यात झाला, ह्याचें मुख्य श्रेय टिळक ह्यांच्या प्रोत्साहनास आहे नागपुराहून परत जातांना त्यांनीं मला मुद्दाम पुण्यास बोलाविलें आणि मजविषयीं फार आदर दाखवून, मला म्हटलें, इतिहास व प्रवासवर्णनें मराठी भाषेमध्यें कमी आहेत, तर त्याबद्दल जरूर प्रयत्न करावा, मी तुम्हास प्रकाशनाचे कामीं मदत करीन, असें आश्वासन दिलें. ज्या दिवशीं मी पुण्यास त्याचा प्रथम निरोप घेतला त्या वेळीं त्यांनीं मला सांगितलं, " तुमची माझी ओळख एकाद भेटींत विसरून जाऊं देऊं नका. लेखकाची ओळख अयरूपानें पुढें कायम टिकली पाहिजे." खरोखर माझ्या अंगीं कसलीहि विद्वत्ता नसताना त्यांनीं मजविषयीं इतकं प्रेम दाखवावें व मला इतकें उत्तेजन द्यावें ह्याचें मला फार आश्चर्य वाटलें.

तेव्हां त्यांनीं मला भेटण्याची इच्छा व्यक्त करून मद्रास निरोप पाठविला
त्याप्रमाणें माझा व त्यांचा फर्ग्युसन कॉलेजच्या एका झोंपडीमध्यें भेट झाली
त्यांनीं माझ्या प्रवासलेखांबद्दल फार प्रशंसा केली व मला सांगितलें कीं, 'केसरीनें
उत्तर हिंदुस्थान घेतलें, तर सुधारक दक्षिण हिंदुस्थान घेण्यास तयार आहे"
त्यांच्या ह्या विशेष आग्रहावरून मी सुधारकामध्यें "दक्षिण हिंदुस्थानांतील
प्रवास" म्हणून लेखमाला लिहिण्यास सुरवात केली. परंतु पुढें आगरकर
वारले व मलाहि इतर कांहीं अडचणी आल्या, त्यामुळें ही लेखमाला एकदम
बंद झाली. आगरकरांच्या मताची हकीकत मी टिळकांस श्रुत केली व त्यांच्या
इच्छेवरून दक्षिण हिंदुस्थानचा प्रवास 'सुधारकांत' लिहिण्याचें मीं कबूल केलें
असें कळविलें. त्यांनीं यांत कांहींच मनस्ताप न दाखविता, उलट हास्यमुद्रेनें
उद्गार काढले —" एकंदरीत तुम्हीं सातारकरी मुत्सद्देगिरी लढविली म्हणावयाची ! नानासाहेब पेशवे व रघोजी भोसले यांचें भांडण झालें. त्यावेळीं
शाहूराजानें नानासाहेबांस उत्तर हिंदुस्थान दिलें व रघोजी भोसल्यास कर्नाटक
दिलें, त्याप्रमाणें तुम्हीं वाटणी केली की काय ! पण लक्षांत ठेवा आम्हीं दोघेहि
पुणेकर आहोंत सातारचा कारभार करून टाकूं" मला हें विनोदी उत्तर ऐकून
फार मौज वाटली व क्षणभर हसूं आलें.

(३) टिळकांचा व माझा परिचय झाल्यानंतर त्यांचें माझें दळणवळण वाढत
चाललें. त्यांच्या भेटीमध्यें मराठ्यांच्या इतिहासाबद्दल वारंवार गोष्टी निघू
लागल्या. आपल्या देशाचा खरा इतिहास लिहिण्यासाठीं अस्सल कागदपत्रांचा
शोध लावला पाहिजे. विष्णुशास्त्री चिपळूणकर व साने यांनीं 'काव्येतिहास
संग्रह' द्वारें केलेला प्रयत्न पुनः चालविला पाहिजे. आमच्या देशांतील इतिहासप्रसिद्ध थोर पुरुषांचीं चरित्रें स्वतंत्र रीतीनें लिहिलीं गेलीं पाहिजेत असे त्यांचे
वारंवार उद्गार ऐकूं येत. त्यांचा माझ्या मनावर बराच परिणाम झाला आणि
ह्या मार्गानें प्रयत्न करण्यास मी सुरुवात केली. प्रथम मीं झांशीच्या राणीचें
चरित्र हातीं घेतलें व तें इ. स. १८९३ मध्यें पुरें केलें. ह्या अलौकिक शूर
स्त्रीचें खरें चरित्र उपलब्ध नसल्यामुळें उत्तर हिंदुस्थानांतले पुष्कळ लोक वाटेल त्या
गप्पा सांगत असत व त्यांचा परिणाम एकदां टिळकांस भोगावा लागला.
एकदां कोणी पाटील वसंतराव नावाच्या गृहस्थांनीं पुण्याच्या वसंतव्याख्यानमालेमध्यें इ. स. १८५७ च्या बंडाबद्दल व्याख्यान दिलें, आणि झांशीच्या राणी
बद्दल वाटेल तशा रसभरित कादंबरीवजा गोष्टी सांगितल्या. त्यामुळें श्रोतृवृंदाचें
पुष्कळ मनोरंजन झालें. परंतु त्यांतील पुष्कळ विधानें असत्य असल्यामुळें
झांशीच्या राणीचे दत्तकपुत्र—जे त्या वेळीं इंदूर छावणीमध्यें इंग्रज सरकारचें
पेनशन घेऊन राहत असत त्यांना फार वाईट वाटलें, व त्यांनीं टिळकांस पत्र
लिहून पाटील वसंतराव ह्यांचीं विधानें परत घ्यावींत व तीं प्रसिद्ध केल्याबद्दल

माफी मागावी अशी नोटीस दिली. टिळक यांचेजवळ ऐतिहासिक पुरावा नसल्यामुळें त्यांनीं प्रांजलपणानें श्री. दामोदरराव ह्यांची माफी मागितली, परंतु तेव्हांपासून त्यांना झांशीच्या राणीचा खरा इतिहास साधार प्रसिद्ध व्हावा अशी फार उत्कट इच्छा वाटूं लागली. मी महाराष्ट्र कोकिळांत झांशी संस्थानचा संक्षिप्त इतिहास प्रसिद्ध केला होता, म्हणून त्यांनीं मलाच ह्या चरित्राची माहिती शोधून काढून तें साधार व स्वतंत्र रीतीनें प्रसिद्ध करावें असा तगादा लाविला. पुढें सुदैवानें त्याबद्दलची समग्र माहिती मिळून मी तें चरित्र तयार करून त्यास दाखविलें. तें पाहून त्यांना अत्यंत समाधान वाटलें, आणि त्यांनीं तें छापण्यापूर्वीच "केसरी"च्या ता. ३ आक्टोबर इ. स. १८९३ च्या अंकामध्यें त्याबद्दल एक अभिनंदनपर स्फुट लेख लिहिला व त्याचा फार गौरव केला. ह्या वेळीं त्यांनीं मला मोठ्या कळकळीनें सांगितलें कीं, तो लेख फार वाचनीय आहे त्यावरून टिळकांची ऐतिहासिक वाङ्मयाबद्दलची कळकळ व्यक्त होते, "इतिहासांतल्या गोष्ट्या गप्पा प्रसिद्ध केल्याबद्दल मला एकदां माफी मागावी लागली. एका माफीबद्दल जर एक चरित्र बाहेर येऊं लागलें तर अशा माफीचे अनेक प्रसंग मी मोठ्या आनंदानं स्वीकारीन, पण ऐतिहासिक गप्पा सांगून मला माफी मागण्यास लावणारे पंडित वसतराव तरी पुष्कळ कोठें आहेत ? इतिहासाच्या सत्या खोट्या निदान गप्पा तरी मारणारे व त्याबद्दल लोकांत अभिरुचि लावणारे अनेक लोक निघाले, तरी देखील पुष्कळ खरा इतिहास प्रकाशांत येईल !"

(५) " झांशीच्या राणीचें चरित्र " इ. स. १८९४ मध्यें प्रसिद्ध झाल्यानंतर कै. न्यायमूर्ति रानडे ह्यांचा माझा परिचय झाला. हें पुस्तक वाचून झाल्यावर त्यांनीं अभिनंदनपर पत्र लिहिलें व इतिहाससंशोधनाचे कामीं मी मदत करावी अशी इच्छा प्रदर्शित केली. टिळक, हरिभाऊ आपटे व साताऱ्याचे माझे दोन मित्र ह्यांना मीं ह्या कामीं सल्ला विचारिली. त्यांनीं मोठ्या आनंदानें सांगितलें कीं, म. गो. रानड्यांना मराठ्यांच्या इतिहासाची फार अभिरुचि व अभिमान आहे, परंतु त्यांना सरकारी नोकरीमुळें फुरसत मिळत नाहीं. तुम्ही त्यांच्या सूचनेस मान देऊन इतिहासाचें कांहीं विशेष काम होत असेल तर अवश्य करावें. पुढें माझी व न्या. रानडे ह्यांची प्रत्यक्ष भेट झाली. त्यांनींहि मजविषयीं चांगली कृपादृष्टि दाखविली. पुढें त्यांचा माझा इतिहाससंशोधनानिमित्त पुष्कळ समागम झाला. त्यांच्याच प्रयत्नानें मला पेशव्यांचें दप्तर पाहण्याची परवानगी मिळाली, व तन्निमित्त मला पुण्यांत राहण्याचा प्रसंग आला. माझे मित्र रा. हरि नारायण आपटे ह्यांनीं आनंदाश्रमांतच माझी राहण्याची तजवीज केली. इ. स. १८९४ पासून माझें पुण्यांत पुष्कळ राहणें होई. परंतु माझें सर्व लक्ष इतिहाससंशोधनाकडे असल्यामुळें माझ्या नित्य व्यवसायाखेरीज दुसरीकडे कोठेंहि मी जात नसे. टिळक व आपटे दोन्ही माझे स्नेही, परंतु त्यांचीं राजकीय मतें व पक्ष पुढें वेगवेगळाले झाले, तथापि उभयतांसहि माझें ध्येय पूर्ण माहीत असल्यामुळें त्यांचा मजविषयीं कधींहि गैरसमज झाला नाहीं. एवढेंच नव्हे तर त्यांची मजवर सदैव मेहेरबानी असे. न्यायमूर्ति रानडे व आपटे ह्यांचीं राजकीय मतें वेगळीं होतीं, परंतु त्यांचें टिळकांविषयींचें खाजगी मत फार चांगलें असून खासगी भेटींत ते नेहमीं परस्परांविषयीं आदरबुद्धि दाखवीत असत व टिळकांचेंहि वर्तन पण तसेंच सोज्वळ होतें; सार्वजनिक कामाची दिशा व मतें भिन्न असतांहि व्यक्तिविषयक प्रेमादर ह्या थोर पुरुषांच्या चारित्र्यांत मला विलक्षण दिसून येत असे. न्या. रानडे ह्यांनीं मला इतिहासविषयाशिवाय दुसऱ्या कशस्यांहि चळवळींत पडूं नये असा एका प्रसंगीं जोरदार उपदेश केला होता. त्यास अनुसरून वागण्याचा माझा नेहमीं परिपाठ आहे; व टिळक व्यवहारचतुर असल्यामुळें त्यांना माझें वर्तन पूर्ण संमत असे. एके दिवशीं टिळकांची व माझी भेट झाली. त्यांच्या बरोबर त्यांच्या सहचारांपैकीं एक गृहस्थ होते. माझी फार दिवसांनीं भेट झाल्याचें पाहून त्यांनीं सहज टोला मारिला:—" काय ? आनंदाश्रमांत राहूं लागल्यापासून प्रतिपक्षास मिळालां वाटतें ! " ह्या प्रश्नाचें उत्तर मला देण्याचें कारण पडलेंच नाहीं. टिळक लगेच म्हणाले, " अहो, इतिहासास पक्ष नाहीं. सत्य हाच त्याचा पक्ष !! " हें उत्तर ऐकून टिळकांच्या थोर मनाची कोणास कल्पना होणार नाहीं !

(६) टिळक इ. स. १८९८ सालीं लखनौच्या राष्ट्रीय सभेस हजर होते. ह्या वर्षी न्यायमूर्ति रानडे यांच्या बरोबर मलाहि लखनौस जाण्याचा प्रसंग आला रानडे, टिळक, गोखले, दाजीसाहेब खरे व दुसरी बरीच पुणेंकर मंडळीं एकाच गाडीनें लखनौस गेली. आगगाडीमध्यें रात्रीं फराळ वगैरे होऊन मंडळी गप्पा गोष्टी सांगत बसली होती. रात्रीं सुमारें ८।९ वाजता धीना जंक्शन स्टेशनवर पंजाबमल आली टिळकांना पाहण्यास स्टेशनवर पुष्कळच गर्दी झाली होती तशांत एक युरोपियन गृहस्थ कांहीं पोलिस शिपाई बरोबर घेऊन फिरत होता स्टेशनवर गाडी थांबताच "Where is Mr Tilak ?" म्हणून तो युरोपियन गृहस्थ प्रत्येक सेकंड क्लासच्या डब्याजवळ चौकशी करूं लागला हा कृष्णवर्ण धारण केलेला युरोपियन अधिकारी पाहताच टिळकांवर कांहीं तरी नवीन संकट आलें कीं काय असें मनांत येऊन त्यांची मित्र मंडळी क्षणभर भीतिग्रस्त झाली इतक्यांत तो गृहस्थ टिळकांजवळ गेला आणि त्यानें 'Are you Mr Tilak ?' असा प्रश्न केला. टिळक उघडे थोडके एकदम पुढें आले व मोठ्या गंभीरपणानें 'होय, मीच टिळक" असें म्हणाले, हें उत्तर मिळताच त्या गृहस्थानें मोठ्या प्रेमभरानें त्यांस आलिंगन दिलें व सांगितलें 'I have come to congratulate you and to pay you my respect' हे ऐकून सर्वांस फारच चमत्कार वाटला टिळकांनीं या गृहस्थाचे आभार मानिले व सानंद मत करणानें उद्गार काढले —"युरोपियन लोक गुणग्राही व देशाभिमानी खरे आणि त्यांच्या देशाभिमानाचे पहातेहि तेच !"

---

# गोपाळ सदाशिव पळसुले

[ एल् एस् अँन्ड एस् (नॅ) डॉक्टर, लोकमान्याच भक्त, सार्वजनिक चळवळींत उत्साहानें काम करणारे, संस्थापक भारत–स्वयंसेवकमंडळ, पुणें ]

मंगळवार ( तारीख २७ ऑगस्ट १९२० ) संध्याकाळपासून लोकमान्याची प्रकृति जास्त बिघडली व मंडळींस काळजी वाटू लागली. बुधवारी सकाळीं कांहीं मंडळी त्याचजवळ खिन्न अंतःकरणानें व म्लान वदनानें बसली होती त्या वेळीं त्यास उद्देशून लोकमान्य म्हणाले, "तुम्ही अशी काळजी का करता ? I will not succumb ( मी या दुखण्यास बळी पडत नाहीं ) माझा हा नवज्वराचा ताप आहे. Crisis ( धोक्याचा दिवस ) निघून गेला. मला आतां उद्यापासून बरें वाटू लागेल." परंतु यानंतर दोन प्रहरापासून त्यांची प्रकृति ज्यास्त बिघडू लागली व त्यास भ्रम पडून ते बेशुद्ध होऊं लागले. बुधवारीं रात्रीं व गुरुवारी सकाळीं तर जास्तच काळजी वाटू लागली. गुरुवारी सकाळीं ब्राह्मणांना बोलावून त्याचेकडून गीता–पठणादि धार्मिक कृत्य करवून घतलीं लोकमान्य बेशुद्ध स्थितींत होते परंतु हाक मारली तर विचारलेल्या प्रश्नास उत्तर म्हणून एकाद-दुसरें वाक्य मोठ्या कष्टानें बोलत असत तेथें जवळच श्रीमद्भगवद्गीतेची पोथी होती. त्यातील भगवान् श्रीकृष्णाचें चित्र लोकमान्यांच्या समोर धरून एका गृहस्थानीं 'हें काय आहे ?' म्हणून लोकमान्यास विचारलें. त्यांनी त्या चित्रा कडे बराच वेळ पाहिल्यानंतर ते म्हणाले, "हं श्रीकृष्णाचें चित्र आहे याच्या चरित्राचें सर्वांनीं अनुकरण करावें" नंतर "यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत। अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम्" हा संपूर्ण श्लोक तोंडानें म्हणून त्या चित्रास त्यांनीं नमस्कार केला नंतर लागलीच डोळे झाकले गेले व हात खालीं पडले. यानंतर दोन दिवस ते कांहींच बोलले नाहींत. कर्मवीर अशा या थोर विभूतीचे अर्थात् हेच शेवटचे शब्द होत। यावरून लोकमान्यांचा सर्व राष्ट्रास शेवटचा निरोप काय होता याचा स्पष्ट बोध होण्यासारखा आहे

---

## Swami Shraddhanand.

*[Prominent Arya Samajist, Founder of the Grurkula at Haridwar, Leader and Sanyasi]*

On

(1) I met Lokamanya Balwantrao Gangadhar Tilak for the first time in December 1899 at Lucknow, during the National Congress session I was an admirer of the great Indian Patriot through his research work His Orion or the Antiquity of the Vedas endeared him to me because he had the courage to stand up for the Antiquity of the Vedas as against European Scholars whom no Indian had dared to give lessons in research work before

It was the first day of the session and I had been given a place on the platform The Moderates were afraid of being publicly associated with him because he had recently come out of jail Lokamanya came through a side-door and was proceeding to the Bombay delegates block when the audience saw him and rose up to give him an ovation and pressed him loudly to go to the platform The moderate leaders remained seated and feared lest the idol of the people might compromise them by ascending the platform Tilak took a chair in delegates block and quietly sat down As I found confirmation on his subsequent public appearances he hated dramatic playing with people's feelings

As a follower of the Vedas I wanted to meet Lokamanya personally When the audience rose for lunch Lokamanya alone remained sitting and I took advantage of the occasion to go and have a talk with him I conversed with him on the interpretation of the memorable Vedic Mantra on Varun Vyavastha and was surprised to find that his views coincided with those of Rishi Dayanand the founder of the Arya Samaj I watched him keenly during the half an hour that I talked to him and found that he was always meditating on something very serious in which his soul appeared absorbed A friend—a moderate leader—speaking of Tilak had told me— Tilak is great in intellect but—ah ! his ambition is something terrible I saw him with another eye and I found that he had no personal ambition but he brooded on the wrongs of his Motherland and his determination to liberate his country appeared to me to be really terrible

(2) A second time I again met him personally for some five minutes It was in December 1907 when the split (fortunate or unfortunate who can say?) at Surat occurred I reached a day after the fight in Congress pandal took place Lokamanya was putting up in a Wadi with the whole of his contingent Leaders and followers all slept on the ground and messed together They appeared in a way, knitted to each other It was one solid body of stern Puritans I went to the Moderate Camp and found them seated in a dozen places enjoying every sort of luxury I told my friends and associates there— the future of the Motherland rests in the palm of the party which has been dubbed extremist

(3) I saw Pandit Bal Gangadhar Tilak again at Lucknow in December 1916 at the Congress Session Orator after orator in glowing colours came on the platform and left after declaiming and getting deafening cheers But when Lokamanya stood up in his simple Dhoti and Maratha shoes after once clapping hands the whole audience hushed up into silence Simple sentences came out of his mouth slowly in his natural tone and the audience drank every word that was uttered He said in substance— The British tell us that we decendants of the Aryas are not the original owners of the soil We Aryas took the conutry from the Aborigines the Muslims conquered it from the Aryas and the English conquered it from the Muslims Hence the English are the guardians of the Aborigines Well I agree to this and ask the English to go away delivering the possession to Bhils Gonds and Adi Dravids We will gladly serve the original owners of the soil There was laughter and cheers but when after explaining further he said in his natural simple voice Home Rule is my birth right and I shall have it the whole pandal resounded with one combined resonant voice and the whole house was brought down And that day my forecast was realised

(4) In December 1919 I again met Lokamanya at Amritsar We had frequent talks during that memorable week My impression during those days was that there was no Indian who knew how to guide his collegues and followers as the Lokamanya did I cannot enter into details because almost all the actors in that memorable drama are living to-day

(5) For the last time I met Lokamanya at Delhi where it was my privilege to read his innermost thoughts The estimate

which I then made of his place in Indian politics appeared in the Vernacular Daily on the 1st of August, 1922 There I said— If it is true that the credit of bringing Philosophy from Heaven to earth belongs to Bacon then it is perfectly true that the credit of taking politics out of the cave of theory to the practical platform belongs to Lokamanya Tilak the Avtar of Shivaji Maharaj Before he brought politics to masses it was confined to drawing rooms He was not a carpet knight but a champion of his Mother land If to Gandhi s rule of Indian heart could be joined the rule of Tilak s intellect on their Buddhi the means of attainment of Indian Swarajya could be complete

*　　*　　*

I wrote the above exactly twelve months ago and I am even to-day more than ever convinced that Tilak will always loom large before Indian politicians till the goal is reached

## M R Jayakar

*[Bar at Law Leader Swaraj party Bombay]*

(1) The point that struck me in Lok Tilak s career as evidencing his all absorbing patriotism is the absolute absence of all self-consciousness and egotism In his enthusiasm for the cause he forget for the moment that he was a great man In his interest for the cause he would willingly wait upon lesser men for hours and hours How often have I seen him in the High Court in the Chambers of Nationalists waiting for hours to be able to get a chance to see them I distinctly remember one occasion when he came to see me about the time he was thinking of arranging for a deputation to go to England in connection with Home Rule He came to my Chamber shortly after the recess at about 4 o clock I was then working in Courts and returned to my chamber at about 6-30 after finishing my conferences On coming to my Chamber I found him sitting in a low easy-chair almost doubled up with tiresome waiting in the characteristic Deccani fashion with his uparna wound across his legs I felt ashamed of myself that I had kept him waiting for such a long time and as I was about to reprimand my peon for not having immediately given me intima

